

# ऐरावत

ब्रह्मदेशाच्या एका गांवी एक धोबी रहात असे. त्या धंद्यात त्याचा हात धरणारा दुसरा धोबी जवळपास नव्हता. त्याने कपडे धुतले की कपडे कसे होत पांढरे स्वच्छ म्हणून गावातला प्रत्येक श्रीमत मनुष्य त्याच्याचकडे कपडे धुवायला टाकी. अशा तऱ्हेने तो फार मोठा श्रीमंत झाला.

धोब्याच्या शेजारी एक कुंभार रहात असे. धोबी आपल्या कामात जितका चतुर होता, कुंभार तितकाच कमी कुशल होता. म्हणून तो गरीबच राहला. आपल्या नशिबात नाही, असे समजून तो स्वस्थ बसला असता तर प्रश्नच नव्हता. परंतु तो दुष्ट होता. धोब्याची श्रीमंती पाहून तो त्याचा हेवा करू लागला. आता कोणत्याही परिस्थितीत श्रीमंत होता येणार नाही, तर धोब्याचे खूप नुकसान करून त्याला कसे खाली ओढायचे, हा एकच एक विचार त्याच्या मनात घोळू लागला. रात्रंदिवस तोच विचार त्याच्या मनात येई व शेवटी त्याने एक उपाय करायचे ठरविले.

त्या गावच्या राजाकडे एक सुंदर हत्ती होता. तो सर्व हत्तीसारखा काळा होता. इंद्राचा हत्ती ऐरावत हा शुभ्र पांढरा असतो, हे सर्वांना माहीतच आहे. राजाच्या मनात होते की त्याचा हत्ती पण ऐरावता-सारखा शुभ्र पांढरा झाला तर आपल्याला इंद्रपद मिळेल. जगभर त्याची प्रसिद्धी होईल. त्याच्या हत्तीचा काळा रंग पालटून कोणी तो पांढरा करून द्यावा म्हणजे इतर राजेलोक त्याचा हत्ती पाहून स्वतःला तुच्छ लेखतील, असे त्याला वाटू लागले. राजाच्या मनातली ही इच्छा राजधानीतल्या प्रत्येक माणसाच्या कानावर येऊन पोचली.

एकदा कुंभार राजवाड्यात गेला व पाहरेकऱ्यांना म्हणाला—"मी राजाजवळ









कारने त्याला दंड केला. त्याने या
माविरुद्ध १८४८ मध्ये राजिनामा दिला.
पदावर खानसिंग याची नेमणूक करून
इंग्रज सेनाधिकाऱ्यांना लाहोर सरकारने
विले. २० एप्रिल रोजी दोघांचा खून
ला. त्याचा आरोप मूलराजवर लावण्यात
ला.

परंतु इंग्रज यासाठी युद्धाला आले
ीत. ते मूलराजच्या प्रश्नावर लाहोर
कार काय करते या गोष्टीची वाट पाहू
ले. परंतु एका सामान्य इंग्रज अधि-
याच्या हातघाईमुळे प्रश्न अधिक
गुंतीचा होऊ लागला. मुलतान येथे
राज याच्या सैन्याशी युद्ध करण्यासाठी
ाराचा सुभेदार छत्तरसिंग याने त्याचा
गा शेरसिंह यालाबरोबर सैन्य देऊन
विले. पण तो मूलराजला फितूर झाला.
ख शीख पुढारी देखील शेरसिंगच्या
ात सामील झाले. या खेपेस शिखांनी

अफगाणांना पेशावरचे प्रलोभन दाखवून त्यांना आपल्या बाजूला वळवून घेतले.

१० ऑक्टोबर १८४८ या रोजी ब्रिटिशांनी शिखांविरुद्ध आणखी एका युद्धाची घोषणा केली. १६ नव्हेंबर १८४८ व १३ जानेवारी १८४९ या दरम्यानच्या काळात दोघांचे परस्परांशी युद्ध झाले. या युद्धात इंग्रजांचा पराभव झाला नाही. पण त्यांचे नुकसान मात्र पुष्कळ झाले. २२ जानेवारीला मुलतान येथे जे युद्ध झाले त्यात इंग्रजांना जय मिळाला. मूलराज याला जन्मठेप शिक्षा झाली.

परंतु चिनाब नदीजवळ गुजरात येथे शिखांशी पुन्हा झालेल्या युद्धात इंग्रजांनी जय मिळविला. अशा तऱ्हेने शिखांचे बळ कमी होत गेले. इंग्रजांनी पंजाब वर आपला अंमल कायम केला. दिलीप सिंगाला इंग्लंड-मध्ये पाठविण्यात आले. तेथे त्याला दर वर्षी पाच लाख रुपये पेन्शन देण्याचे ठरले.



आहे. तू माझा हत्ती पांढरा करून दाखविलाच पाहिजे."

ते ऐकून धोबी चकितच झाला. आपल्याशी द्वेष करणाऱ्या कुंभाराचे हे कारस्थान आहे हे ओळखायला धोब्याला वेळ लागला नाही. हत्तीला माझ्याकडून पांढरा करवून घेण्याची गोष्ट राजाच्या मनात यानेच भरली असणार.

म्हणून तो राजाला म्हणाला—"महाराज, आपली इच्छाच आहे तर मी आपल्या हत्तीला पांढरा करून दाखवितो. ते तेवढे कठीण काम नाही. त्याला कपड्यांसारखेच धुवावे लागेल. परंतु माझ्याकडे जितकी मडकी आहेत ती कपडे उकळण्याच्या बेताची आहेत. म्हणून हत्ती मावेल एवढे मडके बनवून देवविलेत तर मी हत्तीला त्यात बसवून स्वच्छ धुऊन काढीन.

मूर्ख राजाला धोबी जे म्हणाला ते खरे वाटले व त्याने कुंभाराला बोलावून हत्ती बसण्या जोगे मोठे मडके करून द्यायला सांगितले. या खेपेस कुंभाराची पाळी होती. त्याचे डोळे पांढरेच झाले. धोब्याच्या गळ्यात जे जाळे टाकायला तो गेला होता ते त्याच्याच गळ्यात येऊन अडकले. तरी राजाज्ञेचे पालन करणे आवश्यक होते.



म्हणून म्हणाला—"महाराज! मी तसे मडके
करून देतो; परंतु मला एका महिन्याच
अवधी देण्याची कृपा करावी." असे सांगू
कुंभार घरी निघून गेला. त्याने आपल्य
जातभाई कुंभारांना मदतीला बोलावू
एक मोठे मडके तयार केले आणि ते राज
वाड्यात पोचते केले.

धोब्याला निरोप आला. राजाच्य
शिपायांनी हत्तीला मडक्यात चढवण्यासाठ
अंकुश मारून पुढे जायला ढकलले. परं
हत्तीने आत पाय ठेवताच मडके फुटले.

राजाने कुंभाराला बोलवून पुन्हा दुसर
मडके तयार करून देण्यास सांगितले

ह्णाला–"तू तयार केलेले मडके फार ातळ होते. म्हणून फुटले. हत्तीचे वजन याला पेलले नाही. या खेपेस छान जाडजूड मडके तयार करून आण."

कुंभाराला काय करावे हे सुचेना. परंतु ाजाज्ञेचे पालन करणे आवश्यक झाले. याने गावातल्या सर्व कुंभारांना बोलावून आणले आणि मातीचा मोठा ढीग लावला. याने एक जाडजूड मोठे मडके तयार केले व ते भाजून राजाकडे पोचते केले.

या खेपेस हत्तीच्या भाराने ते मडके फुटले नाही. परंतु त्यात पाणी घालून पाणी तापवण्यासाठी प्रयत्न करून पाहिला तर ाणीच तापेना. गाड्या भरभरून लाकडे ागविण्यात आली. परंतु त्याचा काही एक उपयोग झाला नाही."

"महाराज या खेपेस मडके इतके जाड ााले आहे की यात पाणी तापणेच शक्य ाही." धोबी राजाला म्हणाला.

राजाने पुन्हा कुंभाराला बोलाविले व रागावून म्हणाला–"कायरे तू मडके इतके जाड कशाला करून आणलेस? यात पाणी तापत सुद्धा नाहीं. या खेपेस चांगले मडके तयार करून घेऊन ये. नाहीतर तुला फाशी देईन."

कुंभार व त्याच्या नातेवाइकांनी कित्येक मडकी तयार केली. पुष्कळ मेहनत केली. कित्येक महिने आपले काम सोडले. पण सर्व फुकट झाले. शेवटी त्याला आपला मूर्खपणा कळला. हत्तीचे वजन पेलू शकेल व पाणी तापेल असे मडके ब्रह्मदेवाला देखील करता येणार नाही. त्याने ती गोष्ट राजाला सांगितली. राजाने हत्तीला धुऊन पांढरा करण्याचा विचारच सोडला. परंतु दुसऱ्याचे नाक कापण्याच्या प्रयत्नात त्याचेच नाक कापले गेले याबद्दल कुंभाराला मात्र चांगलीच अद्दल घडली. राजाचा मूर्खपणा पाहून धोबी मनातल्या मनात हसला.





# पडकें देऊळ

[ ११ ]

[ रानात अस्वलाला पाहिल्यानंतर शिखीमुख व नागमल्ली दोघांना एक विचित्र मनुष्य दिसला. त्याने आपले नाव नागगिधाड असे सांगितले आणि दोघांना पुजारी होता त्या जागेची वाट दाखविण्यासाठी निघाला. ते डोंगर चढत असता विक्रमकेसरी धावत तेथे आला व त्याने पुजाऱ्याची गुहा पाहिली असल्याचे सांगितले. पुढे–]

विक्रमकेसरीला पळत येत असलेला पाहून शिखीमुखाला हे कळायला वेळ लागला नाही की त्याने पुजाऱ्याला पकडण्यासाठी योजलेली युक्ती फसली. विक्रमकेसरी ओरडला ते सर्व त्या दुष्टाला ऐकू गेले असणार, त्यात त्याला संशय उरला नाही. पुजाऱ्याला हे देखील कळले असणार की गोडगोड बोलून शिखीमुख व नागमल्ली दोघांना आपल्या जाळ्यात फसविणे शक्य

नाही. कारण आता विक्रमकेसरी मदतीला येऊन पोचला होता. आता करावयाचे? त्याचा दूत म्हणून आले या नागगिधाडाला बांधून ठेवले कदाचित त्याच्या मदतीला पुजारी ये तेव्हां......शिखीमुखने असा काही विचार करून एकीकडे विक्रमकेसरीला हालवून खुणावले व दुसरीकडे नागमल्ली सावध राहून त्या नागगिधाडाला निस

न जाऊ देण्यास सांगितले. गोडगोड बोलून त्याला काही वेळ थांबवायला पण त्याने तिला सांगितले. त्याला काही वेळ विक्रमकेसरीशी एक दोन गोष्टी बोलून काही ठरवावयाचे होते.

नागमल्लीने होकारार्थी मान हलविली व घाई घाईने झपाझप पावले टाकीत ती त्या नागगिधाडाकडे जाऊ लागली. त्याच वेळी पुजाऱ्याचा आवाज ऐकू आला–"नागगिधाडा! तू गैरसावध दिसतो आहेस. सावध रहा आणि या लोकांच्या हातून स्वत:चा बचाव कर. हा घे कर्मपाश आणि आकाशात उडू लाग."

शिखीमुखने पण ते ऐकले. तो सुद्धा नागगिधाडाला धरण्यासाठी पळू लागला. त्यावेळी आकाशातून एक काळे दोरखंड येऊन नागगिधाडासमोर पडले. नाग-गिधाडाने घाई घाईने त्या दोरखंडाचे एक टोक कमरेला बांधले व ओरडून म्हणाला–"पुजारी धनी! हा नागगिधाड आकाशात उडण्यास तयार आहे. आपला पुढे काय हुकूम आहे?"

दुसऱ्या क्षणाला नागगिधाड आकाशात वर जाऊ लागला. त्याला पकडण्यासाठी तिघे धावले. परंतु तोपर्यंत तो दहावीस हात आकाशात तरंगू लागला होता. विक्रमकेसरी धनुष्यावर बाण चढवून म्हणाला–"अरे पुजाऱ्याच्या गुलामा तुझे मरण जवळ येऊन ठेपले आहे पहा."

त्याच वेळी शिखीमुखच्या डोक्यात एक विचार आला व त्याने विक्रमकेसरीला बाण न सोडण्यास खूण केली व म्हणाला–"नको, घाई करून कोस तो मेला तर फायद्यापेक्षा आपले नुकसानच जास्त होईल. तो जिवंत राहाला तर आपले काम होईल."

"तो त्या दुष्ट पुजाऱ्याचा लालघोटचा नोकर आहे. जसा धनी तसा त्याचा नोकर.



तो देखील दुष्टच आहे." विक्रमकेसरी रागाने म्हणाला.

"होय, तो दुष्टाचा नोकर, नाहीच गुलाम पण आहे, दुष्ट नाही. अगदी सरळ भोळाभाबडा मनुष्य आहे. दारूच्या धुंदीत आपण आकाशात उडत आहो असे त्याला वाटते. अशा मूर्खांचा उपयोग स्वत:च्या स्वार्थासाठी कोणी ही करून घेऊ शकेल. म्हणून माझ्या मते, तो जिवंत राहून पुजाऱ्याची सेवा करीत राहला तर पुढे कधीतरी आपल्या उपयोगी पडेल. असे नाही का वाटत?" शिखीमुख म्हणाला.

"पुढे कधीच्या गप्पा कशाला? त्या पुजाऱ्याच्या गुहेवर पाहरा देण्यासाठी मी दोघां शबरांना नेमून आलो आहे. आणखी एक जण आकाशात उडत निघून गेलेल्या अस्वलाच्या शोधार्थ गेला आहे. आपण लवकर जाऊन पुजाऱ्याच्या गुहेला वेढा देऊ या." विक्रमकेसरी म्हणाला.

"मित्रा! तुझे हे सर्व बोलणे त्याला ऐकू गेले नसेल असे वाटते होय तुला? आपला सर्व डाव त्याला कळला नसेल का त्याला?" शिखीमुख म्हणाला. नंतर त्याने अस्वलाला ठार केल्यापासून पुढे काय काय झाले हे सर्व सांगून नागगिधाडाने दिलेले हरणाचे कातडे दाखविले. त्यावर को
दृश्य पाहून विक्रमकेसरी चकित हो
गेला.

"या कातड्यावरच्या नकाशा
आपल्याला ब्रह्मपुत्र नदीच्या खो
प्रवेश करून पुढील शोध लावणे स
होईल. तू हे आपल्याजवळ ठेवून
शिखीमुख विक्रमकेसरीला ते कातडे
म्हणाला.

विक्रमकेसरीने ते कातडे घडी
आपल्या कमरेला नीट बांधून
इतक्यात एक शबर येऊन म्हणाला–
जादूगार आणखी एकाला बरोबर



गुहेत गेला आणि बराच वेळ काहीतरी त्याच्याशी बोलत राहला. आत उजेड व्हावा म्हणून त्यांनी काही तरी पेटवून जाळ केला असावा. गुहेचे तोंड धुराने भरले आहे."

"मला वाटते की गुहेत उजेड होण्यासाठी नव्हे, आपल्याला त्या धुरामुळे आत शिरता येऊ नये यासाठी व आपल्याला चकवून तेथून पाय काढण्यासाठी त्यांनी तो धूर केला आहे. आता तो आपल्या हातात सापडेल की नाही शंकाच वाटते. तरी चल, आपण प्रयत्न करून पाहू." शिखीमुख विक्रमला म्हणाला.

"तो कुठे सुटतो? आकाशात उडणारे ते भूत आहे थोडेच. नाहीसा कसा होईल?" नागमल्ली म्हणाली.

"नागमल्ली कसे अगदी बरोबर म्हणाली. शिखी, चल आपण तिकडेच जाऊ." असे सांगून विक्रमकेसरी पुढे निघाला व दोघे पाठी मागून. त्याने पुजाऱ्याची गुहा पाहलेली होती. म्हणून ती शोधून काढण्याचा प्रश्नच नव्हता. तिघे गुहेजवळ लवकरच येऊन पोचले.

गुहेचे तोंड धुराने भरलेले होते. तो धूर पाहून शिखीमुख म्हणाला—"तो दुष्ट गुहेत नाही. अशा धुरात कोणी गुहेत जिवंत बसून राहील तरी का?"

"तरमग तो पळून गेला असावा म्हणतोस?" विक्रमकेसरी निराश होऊन विचारू लागला.

"शिखीमुख उत्तरादाखल काही बोलणार तेवढ्यात त्यांच्या बरोबर आलेला शबर दुरून ओरडून म्हणाला—"धूर तिकडूनच नव्हे तर गुहेच्या पाठीमागच्या बाजूने सुद्धा दोन तीन ठिकाणातून निघत आहे." म्हणजे त्या दुष्टाला पळून जायला चोर-वाट कोठं तरी आहे. विक्रमकेसरी तू ज्या दोघांना पाहऱ्यावर नेमले होतेस ते



दोघे आहेत कोठे? झोपले आहेत की पुजारी दोघांना खांद्यावर उचलून घेऊन पळून गेला?" नागमल्लीने व्यंग करीत विचारले.

शिखी स्वत:चा राग आवरीत म्हणाला—"त्या दुष्टाने शबरांनाच नव्हे तर नाग-लोकांना पण मूर्खात काढले आहे. आता आपण जास्त सावधगिरी बाळगून वागले पाहिजे. विक्रम! तू त्या दोघांना पाहऱ्यावर नेमले होतेस ते त्याचा पाठलाग करीत गेले असतील." असे म्हणत त्याने झाडाची एक फांदी एका झटक्यात ओढून तोडली व गुहेच्या तोंडावर फेकली. त्यामुळे धूर उडून गेला. विक्रमकेसरीने त्याच वेळी दोन तीन बाण गुहेत मारले. आतून काहीच आवाज आला नाही.

पुढे काय करावे या विचारात शिखीमुख उभा होता. इतक्यात गुहेच्या वरच्या बाजूला चढून पहात असलेली नागमल्ली टाळी वाजवून त्याला हाक मारून म्हणाली—"ते पहा! ते पहा!" तिला खोऱ्यात खाली पुजारी पळत जात असलेला व त्याच्या पाठी मागून दोन नागगिधाड जात असलेले दिसले. त्यांच्या पाठी मागून कोणी दोघे दगडांच्या आड चालत होते.



विक्रमकेसरीने नेमलेले दोघे शबर
असावे असे नागमल्लीला वाटले.
मल्लीचा आवाज ऐकून त्या दोघां
एकाने तिकडे वळून पाहिले
दुसऱ्याच्या कानात काही तरी सां
आणि झपझप डोंगर चढून गुहेकडे
लागला.

"नागमल्ली, तिने जे पाहिले ते
मुख व विक्रमकेसरीला सांगणार
पण ते दोघे स्वत:च त्या आधी वर
पोचले. त्या दोघांनी व बरोबरच्या श
खाली खोऱ्यात पाहिले तेव्हां
त्यांच्याकडे येत असलेला शबर दिस



खोऱ्यात खाली उतरणारा पडक्या देवळाचा पुजारीपण दिसला.

"शिखी! त्या पुजाऱ्याचा पाठलाग करून त्याला धरणे आपल्याला तेवढे कठीण नाही. आता उशीर करू नकोस. नीघ लवकर." विक्रमकेसरी आनंदाने व उत्साहाने म्हणाला.

"मलापण तसेच वाटते. पण नागमल्ली काय म्हणेल?" असे म्हणत शिखीमुखने तिच्या मनातला भाव ओळखण्यासाठी हळूच तिरप्या नजरेने तिच्याकडे पाहिले.

"तो आपल्याला सापडला नाही तर त्याला तीर मारून रानटी जनावरासारखा ठार करू या. समोर सापडल्यावर तो दोन हात करावयास तयार झाला तर भाल्यांनी टोचून त्या सर्वांना ठार करू. चला." असे सांगून नागमल्ली धावत डोंगर उतरू लागली.

नागमल्लीच्या शौर्याची व साहसाची ओळख त्यांना नसती तर दोघे त्या तोंडाच्या वाफा समजून हसले असते. परंतु दोघांना तिच्या शौर्याची पूर्ण कल्पना होती. तरी तिचा बचाव करणे आवश्यक होते. कारण तिच्या रक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर होती. पडक्या देवळाचा पुजारी ऐन वेळी काय युक्ती करील याची त्यांना कल्पना देखील असणे शक्य नव्हते. म्हणून ते सावधपणाने चालत होते.

शिखीमुख पुढे होता. बाकी तिघे त्याच्या पाठीमागून येत होते. त्यांची नजर पुजाऱ्यावर होती. दगडांच्या व मोठमोठ्या शिळांच्या आड तो त्यांच्या हातावर तुरी देऊन पळून तर जाणार नाही. परंतु पुजारी सावकाश निर्भयपणे खोऱ्यात उतरत होता. त्याने एक दोनदां त्याच्या पाठलाग करणाऱ्या विक्रमकेसरी, शिखीमुख वगैरेंना मागे वळून पाहिले व बरोबरच्या नागगिधाडाला काही तरी म्हणाला.

"त्याचा काही तरी घाट दिसतो आहे विक्रम! तो आपल्या हातातून निसटून जाण्याचा प्रयत्न करीत असलेला दिसत नाही. उलट त्याला कसलीच भीती वाटत नाही असे आपल्याला दाखवीत आहे." शिखीमुख म्हणाला.

"खोऱ्यात त्याचे ते ब्रह्मराक्षसांचे सैन्य असेल कदाचित." नागमल्ली थट्टेने म्हणाली.

"असेल तर एकटी लट्टूसिंहाची पोर त्यांना वाटेला लावील. आपल्याला कोणाला भिण्याचे कारणच काय?" शिखीमुख चेष्टेने म्हणाला.

ते ऐकून विक्रमकेसरी जोराने हसला. इतक्यात वर चढून आलेला शबर जवळ आला व त्याने पुजारी गुहेतून दुसऱ्या वाटेने कसा निसटला व स्वतःचा बचाव करीत त्याचा पाठलाग करीत तो कसा डोंगरावरून खोऱ्यात उतरत गेला हे सांगितले.

"तुझ्या जवळ बांबूची गोफण आहेना त्याचा उपयोग तुझ्या भाल्यापेक्षा आता जास्त होणार आहे. तो आपल्या हातात आला नाही तर या बांबूच्या गोफणीने त्याला खाली लोळव." विक्रमकेसरी म्हणाला

शबर भाला खांद्यावर ठेवून बांबूच्या गोफणीत दगड घालून चालू लागला. तिकडे पुजारी डोंगरावरून उतरून सपाट मैदानात आला. शिखीमुख त्याच्या बरोबरच्यांना झपाझप चालायला सांगून धावत मैदानत येऊन पोचला आणि ओरडून म्हणाला—"अरे चोरा! थांब, असा पळतोस काय? पळण्याचा प्रयत्न केलास तर तुला येथेच जमिनीवर लोळवीन."

पुजाऱ्याने मागे वळून पाहिले व म्हणाला—"हे पहा, मी अर्ध चंद्राकृती शिळांजवळ जाऊन थांबतो. तुम्ही सर्व सावकाश या. मी तेथे तुमची वाट पाहतो. मग सावकाश बोलू." (पुढील गोष्ट पुढे)



# घोर हत्या

विक्रमार्काने हट्ट सोडला नाही. तो झाडा-जवळ आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू हे जे श्रम करीत आहेस हे अपयशी मानू नकोस. कारण कधी कधी अशुभ कार्याचे परिणाम शुभ होतात. त्याला एक उदाहरण म्हणून मी तुला कल्याणी नावाच्या वैश्य कन्येची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी कांचीपुरम् येथे कल्याणी नावाची एक अप्रतिम सुंदर वैश्य कन्या रहात असे. तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने थोर कुलीन कुळातले श्रीमंत तरुण युवक आले. परंतु तिचे लग्न झाले नाही. त्याला एक कारण असे झाले की तिचे वडील बरेच दिवस आजारी होते व शेवटी



त्यांना मरणच आले. दुसरे कारण म्हणजे कल्याणीचे अमरगुप्त नावाच्या एका वैश्य तरुणावर प्रेम होते. त्या तरुणाने पण वडिलांची परवानगी मिळवून नंतर तिच्याशी लग्न करण्याचे ठरविले होते.

वडील वारल्यावर तिचा मामा प्रचंडगुप्त हा तिचा पालक झाला. तो जुगारी व दारुड्या होता. तो कल्याणीच्या वडिलांनी ठेवलेला पैसा पाण्यासारखा व्यसनात खर्च करू लागला. तो पैसा देखील संपुष्टात येऊ लागल्याचे दिसू लागले.

तेव्हां कल्याणी व अमरगुप्त यांचे परस्परांवर प्रेम आहे ही गोष्ट त्याला कळली. अमरगुप्ताचा बाप एक कोट्याधीश असल्याचे त्याला चांगले ठाऊक होते. आपल्या भाचीचे लग्न अशा श्रीमंत बापाच्या मुलाशी झाले तर तिच्याकरीव वाटेल तेवढा पैसा उकळता येईल असा विचार करून प्रचंडगुप्त म्हणाला–"मुली, अमरगुप्ताशीच तुझे लग्न लावून देण्याची जबाबदारी माझी. तुझा संसार सुखाचा व्हावा याची काळजी मला नसणार तर कोणाला असणार?". असे कल्याणीला सांगून प्रचंडगुप्त अमरगुप्ताचे वडील वीरेंद्रगुप्त यांच्याकडे गेला व त्याला म्हणाला–"माझी भाची कल्याणी एक अप्रतिम सुंदर मुलगी आहे, ही गोष्ट आपल्याला माहीतच आहे. तिने कित्येक राजकुमारांना साफ नकार दिला आणि आपले चिरंजीव अमरगुप्त यांच्याशिवाय इतर कोणाशी देखील लग्न करणार नाही, अशी तिने प्रतिज्ञा केली आहे. आपल्या चिरंजीवांनी पण कल्याणीशीच विवाह करण्याचा निश्चय केला असल्याचे ऐकतो. आता आपण होकार दिलात की दोघांचे लग्न..."

"मी तुझ्या भाचीला आपली सून म्हणून करून घ्यायला तयार नाही. तू स्वतः येऊन या विषयी विचारण्याचे कारणच नाही." विरेंद्रगुप्त म्हणाला. कारण प्रचंडगुप्ताचे नुसते नाव ऐकूनच त्याच्या कपाळाला आठ्या पडत असत.

वीरेंद्रगुप्ताने नकार दिल्यामुळे प्रचंडगुप्ताचा डाव फसला. कल्याणीच्या भाग्यात काय लिहिले आहे याच्या काळजीपेक्षा त्याचा हेतु साध्य झाला नाही याचे दुःखच त्याला जास्त वाटले.

तो स्वभावाचा दुष्ट होताच, म्हणून त्याच्या मनात एक दुष्ट विचार आला. कल्याणीला आपली सून करून घेण्याशिवाय वीरेंद्रगुप्ताला गत्यंतर राहणार असा एक उपाय करण्याचे प्रचंडगुप्ताने योजला. तो बेत पार पाडायचा झाला तर कल्याणीची मदत आवश्यक होती. म्हणून प्रचंडगुप्त कल्याणीला बोलावून म्हणाला–"बाळ कल्याणी! त्या वीरेंद्रगुप्ताने आपल्या मुलाशी तुझे लग्न करून देण्याचे नाकारले, याबद्दल तुला जितके दुःख होत आहे त्याच्या दसपट मला होत आहे. काय वाटेल ते होवो, सर्व जण विरुद्ध उभे राहाले तरी मी तुझे लग्न अमरगुप्ताशीच करून देणार. त्याला एक उपाय आहे. त्यात तुझ्या मदतीची पण थोडी आवश्यकता आहे."

"सांगा ना!" कल्याणी म्हणाली.





"तू आज वीरेंद्रगुप्ताच्या घरी जा आणि सांग की मी आज रात्री त्याचा खून करण्याचे योजले आहे. तो ज्या पलंगावर रोज झोपतो त्यावर मनुष्य झोपल्यासारखा लोड आडवा ठेवून त्यावर पांघरूण घालून ठेवायला त्याला सांग. मी रात्री त्याच्या घरात शिरुन मी त्याच्या लोडाला भोसकतो. वीरेंद्रगुप्त पहिल्यापासून सावध राहील व मी लोडाला सुरा भोसकल्याबरोबर मला येऊन कैद करवील. मी देखील सहज कैद होऊन, केल्या चुकीबद्दल माफी मागण्याचे सोंग करतो. तू त्याच्या जवळ माझ्या प्राणाची भिक्षा माग. तू त्याचा जीव वाचविलास या उपकाराबद्दल तो मला सोडून देईल. मी तुझ्या सुखासाठी हे घोर कृत्य केले असे सांगितल्यावर तू केलेल्या उपकाराबद्दल तुझ्या विषयी त्याच्या मनात आदर व प्रेम उत्पन्न होईल व तो तुला आपली सून करून घेईल. मला शिक्षा किंवा दंड झाला तरी तो बेताचाच होईल. तुझ्या करिता मी ती शिक्षा आनंदाने भोगायला तयार आहे." प्रचंड-गुप्ताने, या शब्दात त्याने योजलेला उपाय वर्णन करून सांगितला.

"तुम्ही सांगाल तसे करायला मी तयार आहे, मामा!" कल्याणी म्हणाली.

त्या दिवशी कल्याणी घराबाहेर पडली खरी, परंतु वीरेंद्रगुप्ताच्या घराच्या बाजूला वळली देखील नाही.

त्या दिवशी रात्री प्रचंडगुप्त वीरेंद्र-गुप्ताच्या झोपायच्या खोलीत शिरला आणि त्याने वीरेंद्रगुप्ताच्या छातीत सुरा भोसकला. वीरेंद्र जोराने ओरडला तेव्हां प्रचंड गुप्त घाबरून पलंगाआड लपला. पण नोकरांनी येऊन त्याला धरले.

त्यानंतर राजाने प्रचंडगुप्ताला फाशीची शिक्षा दिली. राजासमोर खुनाची चवकशी झाली त्यावेळी प्रचंडगुप्त, भाचीच्या सुखासाठी त्याने जो उपाय योजला होता त्याविषयी एक शब्ददेखील बोलला नाही. त्या गोष्टीवर कोणाचा विश्वास बसणार नाही, हे त्याला ठाऊक होते.

यथासमयी अमरगुप्त व कल्याणी यांचा विवाह झाला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला— "राजा! कल्याणीने वीरेंद्रगुप्ताला वेळीच कां सावध केले नाही. त्याच्या खुनाला कारण तीच झाली नव्हे का? या शंकेचे समाधान माहीत असून ही तू केले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्यावर विक्रमार्क म्हणाला—"प्रचंड-गुप्ताने योजलेला उपाय दुष्टपणाचा होता, यात शंकाच नाही. त्या पद्धतीने तिचे ज्याच्यावर प्रेम होते त्याच्याशी लग्न करण्यासाठी तिला असे अनेक उपाय करणे साध्य झाले असते. नंतर त्या उपायाने वीरेंद्रगुप्ताचे मन पालटेल हा प्रचंडगुप्ताचा एक भ्रमच होता. प्रचंडगुप्ता विषयी वीरेंद्रगुप्ताच्या मनात तिटकारा होता. त्याच्या मनात कल्याणी विरुद्ध विचार येण्याचे कारणच नव्हते. प्रचंड गुप्ताचा उपाय यशस्वी झाला असता तरी त्याच्या-वरचा राग कमी होण्या ऐवजी वाढलाच असता. म्हणून तिने सहकार देण्याचा विचार सोडला. म्हणूनच तिचा फायदा पण झाला. तिला आपली सून करून घेणारा सासरा व तिच्या हिताचे मित्र पुढे करून स्वतःचा स्वार्थ साधणारा तिचा मामा दोघे ही तिच्या वाटेवरून आपापल्या कर्मांनी बाजूला झाले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# विदूषकीण

एका राजाला तीन सुंदर मुली होत्या. मुलींना आई नव्हती. म्हणून राजालाच मुलींची काळजी वहावी लागे. परंतु एकदा शत्रूशी युद्ध करण्यासाठी त्याला राजधानी बाहेर जावे लागले. म्हणून त्याने एका बाईला ठेवून तिच्यावर मुलींना सांभाळण्याची व त्यांना नेहमी आनंदात व सुखात ठेवण्याची जबाबदारी टाकली. ती बाई एक विदूषकीण होती.

राजा राजधानीबाहेर गेल्याबरोबर त्या विदूषकिणीने राजवाड्यातच ठाणे दिले. ती राजकन्यांना गमतीदार गोष्टी सांगे किंवा गमतीदार गाणी म्हणून खूप हसवी.

परंतु विदूषकिणीला राजवाडा एखाद्या कैदखान्यासारखा वाटू लागला. कुठेतरी पळून जावेसे तिला वाटू लागले.

म्हणून एकदा ती राजाच्या उद्यानात फिरायला गेली. राजकन्या तिची वाट पहात बराच वेळ जेवल्या खाल्याशिवाय बसून होत्या. पुष्कळ उशिरा ती परत आली.

"इतका वेळ कोठे होतीस ग मावशी? किती वेळ तुझी वाट पाहिली, जेवलो सुद्धा नाही बघ!" राजकन्या म्हणाल्या.

"घरात नुसती बसून तरी किती वेळ राहू? जीव कोंदटल्यासारखा होतो माझा. जरा मोकळ्या हवेत फिरून यावे म्हणून गेले होते. तुम्ही उगाच माझी वाट पहात बसून राहू नका. मला करमतनासे झाले की अशीच बाहेर जात जाईन व हलके वाटले की परत येईन." विदूषकीण म्हणाली.

त्या दिवसापासून ती रोज संध्याकाळी बागेत फिरायला जाऊ लागली व तिला वाटेल तेव्हां घरी परत येऊ लागली. परत आल्यावर ती मुलींना गप्पात रंगवून खूप हसवी. म्हणून मुलींनी तिला बाहेर जाऊ नका असे कधी म्हटले नाही.

श्री. का. न. सोनार

एकदा उजाडल्यावर तिची झोप मोडली तेव्हा तिने विचार केला, मी कित्येकदा या बागेत हिंडले फिरले, पण बागेच्या टोकापर्यंत कधी गेलेच नाही. या खेपेस पाहिले नाही ते सर्व पाहून यायचे. किती उशीर झाला तरी चालेल. त्या दिवशी ती त्या उद्यानाच्या टोकापर्यंत गेली. तेथे एका दगडावर तिचा पाय पडला तेव्हा दगड हलल्यासारखा तिला वाटला. तिने तो दगड उचलून पाहला तर त्याच्या खाली तिला एक जिना दिसला.

"हा जिना कसला बाई येथे?" असे स्वत:शीच बडबडत ती जिना उतरू लागली. सर्व जिना उतरून गेल्यावर तिला समोर एक राजवाडा दिसला. ती त्या राजवाड्याच्या दरवाज्यापर्यंत गेली व म्हणाली— "कोण आहे आत?" पण उत्तर आले नाही. दरवाजा उघडून ती आत गेली. सैपाकघरात एक म्हातारा सैपाक करीत असलेला तिला दिसला.

"काय हो दादा?" तिने म्हाताऱ्याला हाक मारून विचारले.

"तू इकडे कशी काय आलीस?" असे सैपाक्याने तोंड फिरविल्याशिवाय विचारले.



"माझे कर्म मला इकडे ओढून घेऊन आले. पण हा सैपाक कोणासाठी होतोय, विचारते?" विदूषकिणीने विचारले.

"माझे मालक तिघे राजकुमार आहेत, एकाहून एक सुंदर त्यांच्यासाठी."

"असे होय? मग ते कुठे आहेत?" विदूषकिणीने विचारले.

"शिकारीला गेले आहेत."

"मग मला वाढता का जेवायला? फार भूक लागली आहे!" विदूषकीण म्हणाली.

सैपाक्याने तिला पोटभर जेवायला वाढले. जेवण झाल्यावर विदूषकीण



सैंपाक्याला म्हणाली–"मला थोडा मध देता का?"

"थांब, पाहतो, रांजणाच्या तळाला असेल थोडासा" असे सांगून सैंपाकी कोठीच्या खोलीत गेला आणि पाच फूट उंचीच्या रांजणात वाकून त्याच्या बुडाशी असलेला मध पळीने काढू लागला. विदूषकीण त्याच्या पाठोपाठ गेली आणि तो रांजणात वाकल्याबरोबर त्याला लोटून जोरजोराने हसत राजवाड्यात राजकन्या होत्या तिकडे आली. नंतर तिने घडलेले सर्व वृत्त त्यांना सांगितले. ते ऐकून त्या पोटधर धरून हसल्या.

संध्याकाळी राजकुमार शिकार झाल्यावर परतले. त्यांना खूप भूक लागली होती. त्यांनी सैंपाक्याला खूप शोधले व शेवटी कोठीच्या खोलीत रांजणात उलटा उभा असलेला सैंपाकी त्यांना दिसला.

त्यांनी त्याला बाहेर काढून विचारले– "तू यात कसा काय रे पडलास?"

"कसा पडलो? मधासाठी वाकलो आणि पडलो." तो म्हणाला.

सैंपाक्याने विहिरीवर जाऊन आंघोळ केली. नंतर त्याने आपल्या धन्यांना जेवायला वाढले. ते रात्रभर झोपून उजाडल्यावर पुन्हा शिकारीला निघून गेले. ते निघून गेल्यावर विदूषकीण पुन्हा आली.

"महामाये! पुन्हा कशाला आलीस?" सैंपाक्याने संतापून विचारले.

"असे रागवता कां, दादा? मी जाणून बुजून तुम्हांला ढकलले का? तुम्हीच आत पडलात तर तुम्हांला बाहेर काढणे मला शक्य आहे का, तुम्हीच सांगा." विदूषकीण म्हणाली.

"यापुढे असे काही केलेस तर पहा." सैंपाकी म्हणाला.

"छे, छे! मी कशाला करायला जाते? थोडे जेवायला वाढता का? मी राहते तेथे पोटभर कोणी वाढत नाही हो." विदूषकीण म्हणालीं. सैंपाक्याने तिला जेवायला वाढले.

"पण काय हो काका? तुमचे धनी परत केव्हां येतील हे तुम्हांला कसे कळते हो?" विदूषकिणीने विचारले.

"पाहिले की कळते." सैंपाक्याने तिच्या त्या विचित्र प्रश्नाचे दुर्लक्षपणे उत्तर दिले.

"कोठून पाहता हो?" विदूषकणीने विचारले.

सैंपाकी तिला राजवाड्याच्या वरच्या मजल्यात घेऊन गेला व तेथे एका बुरजाच्या खिडकी जवळ घेऊन जाऊन म्हणाला–"या खिडकीतून पाहातो मी त्यांना."

"खोटे! ही खिडकी इतक्या उंचावर आहे. त्या खिडकीतून तुम्हांला कसे पाहता येईल हो तुम्हांला? मी भोळी खुळसट आहे असे वाटले होय तुम्हांला अशा थापा मारायला?" विदूषकीण म्हणाली.

"ती पहा शिडी, दिसते का तुला? त्या शिडीवर चढून पाहातो मी." सैंपाकी म्हणाला.

"शिडीवर चढून एकदा पहा तर. त्यांनी एकदम येऊन मला येथे पाहिले तर ठारच करतील ते मला." विदूषकीण म्हणाली.





सैपाक्याने शिडी आणली व तिच्यावर चढून खिडकीची चौकट धरून बाहेर पाहिले. बरोबर त्याच वेळी विदूषकिणीने त्याच्या पायाखालची शिडी ओढून घेतली. नंतर घाई घाईने खालच्या मजल्यावर उतरून गेली आणि सैंपाकघरात सैंपाकाची भांडी उघडून त्यात एकेक मूठ मीठ टाकून परत राजकन्या होत्या तेथे गेली. तिने त्यांना आपला प्रताप वर्णन करून सांगितल्यावर त्या मोठमोठ्याने पोटधर धरून हंसल्या.

परंतु सैंपाक्याला मात्र थोडे देखील हसू आले नाही. विचारा खिडकीला धरून लोंबकळत अडकून बसला होता. संध्याकाळी राजकुमार शिकार संपवून परत येईपर्यंत तो खिडकीला लोंबकळत होता.

राजकुमार त्याचा शोध काढीत शेवटी बुरुजावर गेले. तेथे लोंबकळत असलेल्या सैपाक्याला पाहून म्हणाले–"तेथे कसा काय गेलास रे?"

"तुम्ही आलात का पाहण्यासाठी शिडी लावून चढलो. चढत असता शिडी पाया खालची सरकून पडली." सैपाकी म्हणाला. तेव्हां राजकुमारांनी शिडी उभी केली आणि सैपाकी शिडी वरून खाली उतरून आला.

नंतर ते जेवायला बसले तेव्हां सर्व सैंपाक खारट झालेला. त्यांनी सैंपाक्याला विचारले–"कायरे डोके फिरले आहे वाटते तुझे? रांजणात तू पडतोस. खिडकी धरून लोंबकळतोस. सैंपाक सगळा खारट करून ठेवतोस. असे असेल तर तुला निरोपच दिला पाहिजे." राजकुमारांनी त्याची खूप खरडपट्टी काढली.

सैंपाकी चुकीची माफी मागून "पुन्हा असे करणार नाही, गरिबावर असा राग करू नका" असे सांगून पुन्हा सैंपाकाला लागला. त्याने पुन्हा सैंपाक केल्यावर राजकुमार पोटभर जेवले. जेवणे झाल्यावर ते जाऊन झोपले आणि उजाडल्याबरोबर



सवयीप्रमाणे शिकारीला निघायच्या वेळी सैपाक्याला हाक मारून विचारू लागले– "खरे सांग, तुला काय झाले आहे!"

"ते सर्व त्या महामायेचे काम आहे." असे सांगून सैपाक्याने जे घडले ते सर्व सविस्तर सांगितले. काही लपवून ठेवले नाही. सर्व सांगून झाल्यावर म्हणाला– "या खेपेस ती महामाया इकडे आली तर मी तिचा गळा दाबून तिला ठार करीन."

"नको नको ते सर्व करण्याचे कारण नाही. आज आम्ही शिकारीला जात नाही व कोठे तरी लपून बसतो. ती महामाया येते कोठून व हा सर्व खेळ कशासाठी करते हे सर्व पाहतो." राजकुमार म्हणाले. असे सांगून ते एका मोठ्या कपाटात लपून बसले.

काही वेळाने विदूषकीण आली व म्हणाली–"कसे काय दादा? बरं आहे ना?"

"तुझे श्राद्ध आहे आज. तू का अशी शनी सारखी माझ्या पाठीस लागली आहेस? मला आपल्या धन्यांना तोंड दाखवायची सोय उरली नाही. तू असे करते आहेस का!" सैपाकी म्हणाला.

"बाप रे बाप! इतके रागावलात? मी खरे सांगते, राजकन्यांच्या मनोविनोदा-साठी मला हे सगळे करावे लागले. त्यांना



रोज एक गंमतीदार गोष्ट सांगून त्यांची करमणूक करावी लागते मला. त्यांचे मनोरंजन करून मी त्यांना हसविले नाही तर ऐन तारुण्यात त्यांना वार्धक्य येईल." विदूषकीण म्हणाली.

ही गोष्ट ऐकताच राजकुमार बाहेर येऊन विचारू लागले–"पण हे सांग तू कोण?"

महाराज, युद्धावर जातांना राजकन्यांना सांभाळण्याच्या व त्यांना नेहमी खुषीत ठेवण्याच्या कामावर तिला नेमून गेले असल्याचे तिने सांगितले.

"या राजकन्या सुंदर आहेत नव्हे का?" मोठ्या राजकुमाराने विचारले.






"सुंदर विचारतोस? तू त्यांना पाहिलंस तर डोळे दिपून जातील तुझे." विदूषकीण म्हणाली.

"एकदां त्यांना दाखवतेस का?" मोठ्या राजकुमाराने तिला पुन्हा विचारले.

"मी दाखवीन, पण तुम्ही त्यांना कळल्याशिवाय पाहिले पाहिजे." विदूषकीण म्हणाली. त्या गोष्टीला राजकुमार कबूल झाले.

विदूषकीण राजवाड्यात परत गेली व म्हणाली–"बाहेर बागेत किती बरे वाटते म्हणून सांगू? चला, थोडा वेळ हिंडून फिरून येऊ या." असे सांगून त्यांना बाहेर घेऊन आली आणि बागेच्या टोकापर्यंत गेली. दगडावर पाय ठेवून म्हणाली–"अरे हा दगड तर हलतो आहे." नंतर दगड उचलून म्हणाली–"अरे, इथे तर खाली जायला जिना आहे." जिना उतरून खाली आल्यावर म्हणाली–"अरे वा! इकडे सुद्धा एक मोठा राजवाडा दिसतो आहे."

नंतर त्या चौघींनी त्या राजवाड्यात प्रवेश केला. आत पहावे तर कोणी नव्हते. राजकुमारांनी आड उभे राहून राजकन्यांना पाहिले. त्यांना त्या वेळी विदूषकिणीला दिलेले वचन आठवले नाही आणि ते समोर आले. राजकुमारांची व राजकन्यांची दृष्टा दृष्ट झाली व त्यांनी परस्परांना मनातल्या मनात वरले.

"मुलींनो तुम्ही राजकुमारांशी लग्न करून घ्या आणि मी सैंपाक्याशी करून घेते. पण त्या आधी महाराज परत आले पाहिजेत, एवढेच." विदूषकीण म्हणाली.

राजा शत्रूचा पराभव करून राजधानीत परत आला. तो आनंदात होता, म्हणून त्याने आपल्या मुलींच्या विवाहास आनंदाने संमती दर्शविली. तिघा राजकन्यांचे तिघा राजकुमारांशी थाटामाटाने लग्न झाले आणि त्याच बरोबर विदूषकिणीचे सैंपाक्याशी लग्न झाले व सर्व सुखी झाले.





# तीन संन्यासी

फार पूर्वी एका देशात एक धर्मपरायण राजा राज्य करीत असे. त्या राजाकडे एक संन्यासी आपल्या दोघां शिष्यांना घेऊन एकदा आला. राजाने संन्याश्याला यथोचित आसन बसायला देऊन येण्याचे कारण विचारले.

राजाने दाखविलेल्या आसनावर आपले हरिणाजिन अंथरून तो संन्यासी बसला व म्हणाला–"मी आपल्या या दोघां शिष्यांबरोबर हिमालय पर्वतावर जात आहे. आज आपल्याकडे भिक्षा ग्रहण करून पुढे जायचा विचार आहे."

"आपले हे दोनच शिष्य आहेत का?" राजाने विचारले.

"होय. हे दोघंच." संन्यासी म्हणाला.

इतक्यात राजाच्या दरबारात आणखी एका संन्याश्याने प्रवेश केला. त्याच्या बरोबर आठ शिष्य होते. राजाने त्याला देखील यथोचित आसन बसायला दिले व येण्याचे कारण विचारले.

"जगाच्या कल्याणासाठी मी देशाटन करीत आहे. तुम्च्यावर अनुग्रह करून जावे असे वाटल्यावरून मी इकडे आलो." दुसरा संन्यासी म्हणाला.

इतक्यात तिसरा संन्यासी एका पालखीत बसून वाजत गाजत दरबारात येऊन दाखल झाला. त्याच्या बरोबर बारा शिष्य होते. दरबारात प्रवेश करताच त्याने राजाला आशीर्वाद दिला. "दानशूर व धर्मवीर अशी तुझी कीर्ती सर्व जगतात होवो!"

राजाने या तिसऱ्या संन्याश्याला सुद्धा यथोचित आसन बसायला दिले. त्याच्या शिष्यांनी आपल्या गुरूचे स्तोत्र पाठ केले व राजाला म्हणाले की त्यांचे गुरु संन्याश्यात चक्रवर्ती सारखे अष्ट सिद्धींवर अधिकार असलेले थोर महापुरुष असल्या कारणाने



त्यांना खूष केल्यास राजावर व त्याच्या प्रजेवर ईश्वरकृपा होईल."

थोड्या वेळाने राजा तिघां संन्याश्यांना त्यांच्या शिष्यांसह जेवायला बोलावून घेऊन गेला.

पहिल्या संन्याश्याने त्याच्या ताटात वाढलेल्या अन्नातले डोळे मिटून तीनच तीन घास खाल्ले व उठून हात धुतले. त्याच्या दोघा शिष्यांनी पण तसेच केले.

"हे हो काय? एवढ्यात जेवण झाले. ताटात तर सर्व पदार्थ तसेच आहेत? आवडले नाही का जेवण?" राजाने पहिल्या संन्याश्याला विचारले.

"देवाने दिले त्यात आमचे पोट भरले." पहिला संन्यासी म्हणाला.

दुसरा संन्यासी व त्याचे शिष्य ताटात वाढले होते ते सर्व खाऊन व जेवण बरोबर नाही असा विचार करून उठले.

तिसऱ्या संन्याश्याने व त्याच्या शिष्यांनी ताटे रिकामी केलीच व वर वाढणारांना आणखी वाढायला खुणावून सांगितले.

"राजवाड्यात देखील दुष्काळच आहे." असे गुणगुणत तिसरा संन्यासी आपल्या शिष्यांसह उठला.

जेवणे झाल्यावर राजाने तिघां संन्याश्यां-समोर एक एक हजार मोहरांनी भरलेले ताट केले आणि म्हणाला—"ही दक्षिणा घ्या!"

पहिल्या संन्याश्याने त्या ताटाकडे एकदां पाहून शिष्यांना खुणावले. त्याप्रमाणे शिष्यांनी ताट उचलले.

दुसऱ्या संन्याश्याने आपल्या समोरच्या ताटातल्या मोहरांना एकदा मान वाकवून नमस्कार केला व आपल्या शिष्यांना मोहरा वाटून दिल्या.

तिसऱ्या संन्याश्याने ताटातल्या मोहरांना हात लावला नाही व राजाकडे रागाने पाहू लागला.

"आपल्याला आणखी काही मागून घ्यावयाचे असल्यास अवश्य मागून घ्यावे." असे राजा तिघां संन्याश्यांना म्हणाला.

"मला व माझ्या दोघां शिष्यांना एक भगवे वस्त्र द्यावे. सर्व जिंकले पण देहाचा अहंकार जिंकला नाही." पहिला संन्यासी म्हणाला.

"महाराज! कोऱ्या कापडाचे एक ठाण देण्याची कृपा करावी." दुसरा संन्यासी म्हणाला.

तिसरा संन्यासी मात्र रागाने म्हणाला—"राजा, तुझ्या या धूर्त विनयाला फसेन असे तुला वाटत असेल. पण ते विसर आणि घे माझा शाप!" असे म्हणत एकदा तिसरा संन्यासी हुंकारला.

राजाने चकित होऊन विचारले—"ते कां? माझ्या हातून काही अपराध घडला का?"

"एक चूक का? तुला लहान थोराचा विचार दिसत नाही. माझ्या सारख्याला इतरांप्रमाणेच वाढलेस व उपाशी उठायला लावलेस. दोन शिष्य असलेल्यास व बाराबारा शिष्य असणाऱ्यास एकाच तऱ्हेची दक्षिणा दिलीस. जे झाले ते झाले. पण आता तरी माझ्या प्रत्येक शिष्याला एक एक हजार या प्रमाणे मोहरा व नवीन



वस्त्रे दे. मी तुला क्षमा करीन. तसे केले नाहीस तर माझ्या शापाग्नीत तुझ्या सर्वस्वाचा नाश होईल." तिसरा संन्यासी म्हणाला.

राजा दुसऱ्या संन्याश्याकडे वळून म्हणाला—"बुवा! आपण बसला आहा ते आसन कसले आहे?"

"चांदीचे." दुसरा संन्यासी म्हणाला.

राजाने तोच प्रश्न पहिल्या संन्याश्याला केला. "आसन कसले आहे हे नाही मला माहीत. मी तर माझ्या हरिणाजिनावर बसलो होतो. मला एवढेच माहीत आहे." पहिला संन्यासी म्हणाला.

"म्हणजे कसल्या आसनावर बसला होता हे देखील ज्याला कळत नाही, त्याला तू सुवर्णासन दिलेस आणि मला पितळेचे?"

राजा स्मित करून म्हणाला–"हे सर्व मी विचार पूर्वक केले नाही. प्रथम आले त्यांना मी सुवर्ण आसन दिले. त्यांच्या नंतर आले त्यांना चांदीचे आसन दिले. सर्वात शेवटी आले त्यांना पितळी आसन दाखविले. मी हे सर्व सहज केले. परंतु अज्ञातपणे ज्यांना जी आसने दिली गेली ती त्यांना योग्यच दिली गेली असे मात्र मला वाटत आहे. पहिले संन्यासी खरे संन्यासी, खरे गोस्वामी. दुसरा संन्यासी साधकावस्थेत आहे. इंद्रियांवर अद्याप पूर्ण अधिकार झाला नाही. तू फक्त वेषधारी संन्यासी आहेस, उदर पोषणार्थ तू हा वेष धारण केला आहेस. उद्यापासून तू किंवा तुझा शिष्य माझ्या राज्याच्या सरहद्दीत कोठे दृष्टीस पडला तर प्रत्येकाला एक एक वर्ष सक्त मजुरीची शिक्षा देईन. तुझ्या सारख्याच्या शापांची पर्वा मला नाही." ते ऐकून तिसरा संन्यासी व त्याचे शिष्य माना खाली करून निमूटपणे निघून गेले.

तितक्यात पहिल्या संन्याश्याचे दोघे शिष्य त्यांना मिळालेल्या एक हजार मोहरा गोरगरिबांना वाटून रिकामे ताट घेऊन आले.

हे सर्व दुसरा संन्यासी पहात होता. तो आपल्या शिष्यांना म्हणाला–"मी तुमचा गुरु होण्या योग्य नाही. तुम्ही आता स्वतंत्र आहा. वाटेल ते करा. मी यांचा शिष्य म्हणून या पुढे राहणार आहे." असे म्हणत तो पहिल्या संन्याश्याच्या पायावर लोटांगण घालून म्हणाला–"मला आपला शिष्य म्हणून स्वीकारा. या राजाने माझे डोळे उघडले."

पहिल्या संन्याश्याने होकारार्थी मान हलविली व राजाचा निरोप घेऊन आपल्या तिघां शिष्यासह निघून गेला.





# बाहुल्या मुली

फार पूर्वीची गोष्ट आहे, एका गावी एक चांभार होता. त्याला अगदी वेताचे घर दार होते. थोडक्यात सांगायचे म्हणजे, एका खोलीतच तो राही व आपला धंदा करी. त्या खोलीला एकच एक खिडकी व एकच दरवाजा होता. तो एकटा त्या खोलीत रहात असे. तो उजाडताच घराबाहेर पडे, दिवसभर काम करी व संध्याकाळी घरी आल्यावर खाऊन पिऊन झोपी जाई. हीच त्याची दिनचर्या होती. म्हातारपण येईपर्यंत लहानपणापासून तो जोडे, वहाणा शिवण्याचे काम करी. उदरनिर्वाहाचे एकच एक तेच एक साधन त्याच्याकडे होते. एकदा त्याला वाटले, काय पण आपले आयुष्य? या जगात मी एकटा. मुलेबाळे असती तर मजेत उरलेले दिवस गेले असते. पण त्याचे लग्नच झाले नव्हते, मग मुले कशी असणार?

मुलांची उणीव भासू नये म्हणून त्याने एक उपाय योजला. त्याने पिठाच्या तीन मोठ्या बाहुल्या केल्या. तिन्हीत फरक असावा म्हणून एकीला पांढरे वस्त्र, एकीला निळे व एकीला लाल वस्त्र घातले.

दुसऱ्या दिवशी तो आपल्या कामावर निघाला तेव्हां त्याने खिडकीजवळ एक खुर्ची ठेवून त्या खुर्चीवर शुभ्र वस्त्र घातलेली बाहुली काढून तिला बसवून ठेवले व म्हणाला–"बाळ! मी संध्याकाळी परत येईन. तोपर्यंत तू समुद्राची व समुद्रात चालणाऱ्या नावा व होडकी यांची गंमत पहात रहा. आपले घराणे थोरामोठ्यांचे आहे. म्हणून, जरा संभाळून रहा, वाटेल त्याच्याकडे पाहू नकोस की वाटेल त्याच्याशी बोलू पण नकोस." आपल्या बाहुलीला असे सांगून व खोलीला कुलूप लावून तो आपल्या कामावर निघून गेला.







त्या बाहुल्या बऱ्याच मोठ्या होत्या. रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्याची नजर बाहुलीवर पडे व प्रत्येक जण मनात म्हणे,– "किती सुंदर मुलगी आहे. पण तिला स्वत:च्या सौंदर्याची फार घमेंड दिसते आहे बरं का. पहा ना, जरा नजर वर उचलून पाहील तर शपथ!"

थोड्या वेळाने राजकुमार त्या वाटेने फिरत आला. बाहुलीला पाहून तो थबकला. खिडकीजवळ जाऊन तो म्हणाला–"हे सुंदरी! तुझे सौंदर्य आता मी काय सांगू, अप्सरादेखील तुला पाहून माना खाली घालतील. फक्त एकदाच माझ्याकडे पहा न. तुझ्या हसण्यावर मी आपला जीव ओवाळून टाकीन. तू माझ्याशी बोलणार नाहीस का?"

बाहुली बोलली नाही की हलली नाही. जागच्या जागी स्वस्थ बसून होती.

"बोललीस तर फुले झडतील, ती झेलायला मिळाली तर मी तुझा फार फार आभारी होईन. तू माझ्याशी लग्न केलेस तर मी तुला मुकुट घालून आपली राणी करून घेईन आणि निरनिराळ्या वस्त्रालंकारांनी तुला सजवीन व नटवीन. माझ्याशी बोलणार नाहीस का? मग निदान एक वेळ माझ्याकडे पहा तरी." राजकुमार विनवण्या करू लागला.

तरी देखील बाहुली जागची हलली नाही.

"पण लक्षात ठेव. मी तुला असा नाही सोडणार. उद्या पुन्हा येईन. तोपर्यंत मी देतो ही भेट ठेवून घे." असे सांगून राजकुमाराने एक सोन्याची अंगठी त्या मुलीच्या मांडीवर फेकली आणि निघून गेला.

संध्याकाळी चांभार घरी परत आला. बाहुलीला पाहून म्हणाला–"बाळ दिवसभर तू एकटी राहलीस घरात. आता आपण दोघे मिळून गप्पा मारू व खाऊ पिऊ."



पण बाहुली काय बोलणार?

"मी राजकुमार आहे, राजकुमार! तुझ्या प्रेमाची भीक मागतो आहे. मला होकार दे न, की तुला माझ्याशी लग्न करायला हरकत नाही." - राजकुमार विनवण्या करीत म्हणाला.

पण काय उपयोग?

"बरे तर उद्या येतो. तो पर्यंत तुझे मन बदलणार नाही का? माझी आठवण म्हणून ही भेट ठेवून घे." असे सांगून राजकुमाराने बाहुलीच्या मांडीवर माणिक्य जडलेली एक अंगठी टाकली आणि निघून गेला.

चांभार घरी आल्यावर बाहुलीच्या मांडीवर अंगठी पाहून गरजला–"कारटे! शेवटी तू सुद्धा आपल्या बहिणीच्या वळणा‍‍च गेलीस म्हणावयाची. असली बेशरम मुलगी मला नाही खपायची." असे म्हणत त्याने दुसऱ्या बाहुलीला पण जमिनीवर आदळून फोडून टाकले.

तिसऱ्या दिवशी चांभार लाल पोशाख-वाल्या बाहुलीला खिडकीजवळ बसवून व तिला देखील तसेच बजावून सांगून आपल्या कामावर निघून गेला.

त्या दिवशीसुद्धा राजकुमार आला व बाहुलीच्या तांबड्या पोशाखाची खूप वाखाणणी करून तिला देखील थोडे स्मित करायला, बोलायला, निदान डोळे वर करून पहायला आग्रहाची विनंती करू लागला. पण काही उपयोग झाला नाही.

वैतागून तो तिला म्हणाला–"तू सुंदर आहेस, पण तुझे हृदय दगडाचे आहे. मी ते विरघळवून दाखवितो. तू माझ्याशी लग्नाला तयार होईपर्यंत मी रोज येत राहीन. ही भेट सुद्धा ठेवून घे." असे सांगून त्याने एक हिऱ्याची अंगठी बाहुलीच्या मांडीवर टाकली आणि डोळे पुसीत निघून गेला.



संध्याकाळी घरी आल्यावर चांभाराला ती हिऱ्याची अंगठी दिसली, म्हणाला– "तुमच्या सारख्या मुली असण्यापेक्षा अपत्य नसलेले बरे." असे म्हणत त्याने ती तिसरी बाहुली पण फोडून टाकली.

चवथ्या दिवशी नेहमीसारखे खिडकीचे दार बंद करून दरवाजा पण बंद केला आणि आपल्या कामावर निघून गेला.

राजकुमार चवथ्या दिवशी पण तिकडे आला. खिडकी बंद पाहून तो हताश झाला. त्यानंतर लागोपाठ तीन चार दिवस आला. पण त्या सुंदर तरुणीला खिडकी जवळ न पाहून, आता तिचे दर्शन यापुढे कधी घडणे अशक्य असे त्याला वाटले. तो इतका निराश झाला की आजारी पडला.

राजकुमार आजारी पडल्यावर राज-वैद्याला बोलाविण्यात आले. राजवैद्याने राजकुमाराची प्रकृती तपासली व म्हणाला– "महाराज! हा आजार मानसिक आजार आहे. याला औषध नाही. याचे कारण समजून घेऊन त्याप्रमाणे इलाज करावा."

राजाने विचारल्यावर राजकुमार म्हणाला–"बाबा! माझे प्रेम चांभाराच्या सुंदर मुलीवर आहे. तिच्याशी लग्न



झाले नाही तर मला जगण्याची इच्छा नाही."

"एवढेच ना? उद्या या वेळेपर्यंत तुझे तिच्याशी लग्न होऊन गेलेले असेल. तू अगदी बेफिकीर रहा!" राजाने मुलाची समजूत घातली.

राजाने चांभाराला बोलाविले आणि आज्ञा केली–"तू आपल्या मुलीला ताबडतोब राजवाड्यात आणून हजर कर."

"महाराज! ते शक्य नाही." चांभार कापऱ्या आवाजात म्हणाला.

अशक्य? ते का?" राजाने दरडावून विचारले. तेव्हां चांभाराने खरे वृत्त










सांगितले. त्या गोष्टीवर राजाचा विश्वास बसला नाही. त्याने हुकूम सोडला–"अज संध्याकाळच्या आत तू आपल्या मुलीला घेऊन आला नाहीस तर तुझे डोके उडविले जाईल."

चांभाराला काय करावे, सुचेना. तो घरी जाण्याऐवजी गावाबाहेर गेला आणि रानात येऊन पोचला. तेथे त्याला एक म्हातारी वाळक्या काटक्या गोळा करीत असलेली दिसली. तिने चांभाराला विचारले–"कुठे चालला आहेस रे बाबा?"

"माझी गोष्ट विचारतेस होय? मी कड्यावरून उडी मारून जीव द्यायला निघालो आहे." चांभार म्हणाला.

"वेडा कुठला! अरे पण सांगशील की नाही जगाचा इतका वीट येण्याचे काय कारण झाले ते?" म्हातारीने विचारले.

चांभाराने सर्व वृत्त अथपासून इतीपर्यंत सांगितले. ते ऐकून म्हातारी म्हणाली–"तरमग, मी सांगते ते कर. मी तुला एक काठी देते. ती घेऊन समुद्राच्या पाण्यावर ती काठी वाजवून म्हण–'वरुणा! आपल्या मुलीला पाठव, मी राजकुमाराबरोबर तिचे लग्न लावून देईन.' तेव्हां तुझे काम होईल."

"माझी अशी थट्टा उडवू नकोस. थट्टा करायला मीच मिळालो वाटते?", चांभार रागाने म्हणाला.

"नाही रे बाबा! मी थट्टा करीत नाही. मी सांगते तसे कर. यात तुझे काही बिघडणार नाही." असे सांगून म्हातारीने हातातली एक काटकी तोडून त्याला दिली.

चांभार ती काटकी घेऊन गुडघाभर समुद्राच्या पाण्यात उभा राहून पाण्यावर हळू हळू काटकी आपटू लागला व म्हणाला–"हे वरुणा! तू आपल्या मुलीला पाठव. राजकुमाराबरोबर मी तिचे लग्न करून देतो."





# अर्धवट गोपू

एका गावी गुरुगृही काही विद्यार्थी विद्याभ्यासासाठी रहात असत. त्यांच्या पैकी एकाचे नाव गोपाळ असे होते. लोक त्याला गोपू या नावाने ओळखत. त्याला समजूत म्हणून मुळीच नव्हती.

एकदा गुरुजी त्याला बोलावून म्हणाले–"हे बघ गोपू! गावाच्या पाटलांच्या घरी जाऊन नारळ मागून घेऊन ये." नारळ आणण्यासाठी गुरुजींनी त्याला एक पोते बरोबर दिले होते.

गोपू पाटलाकडे गेला. तेथे नारळाचे झाड होते. तो झाडा समोर उभा राहून पुटपुटला–"गुरुजींनी नारळ आणायला सांगितले आहे."

नंतर कोणाला काही विचारल्या शिवाय तो झाडावर चढला, नारळ काढून पोत्यात भरले व गुरुजींना आणून दिले.

थोड्या वेळाने पाटील आले आणि गुरुजींवर राग काढून म्हणाले–"तुम्हांला नारळ पाहिजे होते तर सांगून पाठवायला काय झाले होते?"

"मी गोपूला आपल्याकडून मागून आणायलाच सांगून पाठविले होते. मला वाटले की त्याने मागितले व आपण दिले. बरं तर मी त्याला रागावतो." असे सांगून गुरुजींनी पाटलांना शांत केले. नंतर गोपूला बोलावून विचारले–"कोणाला विचारून आणलेस रे नारळ?"

"झाडाला विचारून आणले, गुरुजी!" गोपू म्हणाला. "तुला अक्कल नावाची वस्तू शिवली देखील नाही. नुसता म्हसोबा-सारखा वाढला मात्र आहेस. उद्यापासून म्हशी चरायला घेऊन जात जा." गुरुजी म्हणाले.

दुसऱ्या दिवसापासून गुरुजींच्या गाई म्हशींना चरायला न्यायचे काम गोपू करु लागला. जातांना गुरुजी जे काही म्हणाले

श्री. ना. गो. गोसावी



त्यातले एक अक्षर देखील त्याला कळले नाही. ते त्याला म्हणाले–"न हालणाऱ्या बैलाला हलवले म्हणजे त्याला देखील विद्या येते."

गुरुजी त्या गांवच्या सांबाच्या देवळात पुजाऱ्याचे पण काम करीत. गोपू एकदा देवळात गेला. समोर नंदी होता. त्याला पाहून गोपूला वाटले की न हालणारा बैल हाच आहे. त्याला हालवून दाखविला की विद्या येईल. असा विचार करून त्याने जोराने नंदीला ढकलले. नंदी लहानच होता. म्हणून तो बाजूला वाकडा होऊन पडला. त्याच्या खाली एक खड्डा होता. त्यात एक धनाचा ठेवा होता. देवळात आलेल्या सर्वांना तो दिसला.

देवळात जी प्राप्ती होई त्यातली थोडी गुरुजी देवळाच्या कचेरीत जमा करीत व बाकी त्या नंदीच्या खाली गुप्तपणे ठेवीत. ती गोष्ट उघडकीस आली. गुरुजींनी त्या-बद्दल गांवच्या थोरा मोठ्यांसमोर कान धरून माफी मागितली की पुन्हा अशी चूक करणार नाही.

घरी आल्यावर गुरुजी गोपूला म्हणाले–"गाढवा! तुला शिकवणे मला शक्य नाही. चालतां हो बाहेर."

गोपूला आपली चूक कळली नाही. त्याच्या डोळ्यात टिपे आली व म्हणाला–"गुरुजी! तुम्ही मला जे शिकविलेत ते माझ्या डोक्यात शिरत नाही व जे शिरते ते डोक्यात रहात नाही. जाता जाता मला कोणते तरी दोन उपदेश करा. ती दोन वाक्ये मनात ठेवून निघून जाईन."

"मूर्खा! तुझ्या सारख्याला उपदेश देणे म्हणजे कावळ्याच्या चोचीत तोंडले देण्यासारखे आहे." गुरुजी म्हणाले.

"मग मी काय करू गुरुजी!"

"होणार ते टळत नाही आणि भोग काही सुटत नाही" गुरुजी म्हणाले.



गोपू आपल्या कपड्यांचे लहानसे गाठोडे डोक्यावर ठेवून गुरुजींनी सांगितले ते घोकत चालू लागला–"कावळ्याच्या चोचीत तोंडले काय कामाचे? होणार ते टळत नाही अन् भोग काही सुटत नाही."

वाटेत त्याला एक कावळा झाडावर येऊन बसलेला दिसला. त्याच्या चोचीत काहीतरी लालवस्तु होती. त्याने विचार केला, गुरुजींच्या उपदेशाप्रमाणे कावळ्याच्या चोचीत तोंडले निरुपयोगी असते. म्हणून कावळा ती तांबडी वस्तू चोचीने कुरतडू लागला. तेव्हां गोपूने त्याला हाकलले. कावळा उडाला व ती वस्तू खाली पडली. ती वस्तू म्हणजे एक लाल माणिक जडलेली अंगठी होती. गुरूचा उपदेश मानला म्हणजे असा फायदा होतो हे त्याला पटले व तो अंगठी घेऊन घरी निघाला.

ती अंगठी राजकुमारीच्या बोटातली होती. ती हरवली तेव्हांपासून राजाचे शिपाई ती हुडकत फिरत होते. गोपूच्या बोटात अंगठी पाहून शिपायांनी त्याला धरले व राजासमोर नेऊन हजर केले. गुरुजींनी सांगितल्याप्रमाणे 'होणारे टळत नाही व भोग काही सुटत नाही,' असा विचार करीत पुढे काय होणार हे पाहण्या-साठी तो निश्चित पणे राजवाड्यात गेला.

राजाने त्याला विचारले–"तुला ही अंगठी कोठे मिळाली रे?"

"एका कावळ्याने दिली महाराज!" गोपू म्हणाला.

ते उत्तर ऐकून सर्व दरबारी हसू लागले. गोपू भोळसट आहे हे राजाने ओळखले. राजाने त्याच्याजवळ सर्व चवकशी केली तेव्हा त्याला कळले की असा मनुष्य आपल्या पायावर उभा राहणे शक्य नाही. तो इमानदार आहे हे ओळखून राजाने, त्याला आयुष्यभर सुखाने राहता यावे अशी व्यवस्था करून दिली.





# माणसाचे वय

आजोबा आले तेव्हां मुले काही तरी बोलत मोठ्याने हसू लागली.

"माकड रे माकड! शंभर टक्के माकड!"

"माकडासारखं बोळकं तोंड सारखं चालू असते."

"काय रे कोणाची रे थट्टा चालू आहे?" आजोबांनी विचारले. हातातली काठी कोपऱ्यात टाकून ते आरामखुर्चीवर बसले.

"आपल्या गल्लीच्या कोपऱ्यात राहतात ना, आजोबा, ते तुमच्या शोधार्थ आले होते. बराच वेळ वाट पहात बसले होते. वाटेत तुम्हांला भेटले सुद्धा असतील." मुले म्हणाली.

आजोबांनी तपकीर चिमटीत घेतली आणि मुलांना विचारले—"त्यांचे वय काय आहे, माहीत आहे का तुम्हांला?"

"असेल सत्तर...नव्वद...शंभर, नाहीतर एकशेवीस." मुलांनी आपापल्या अंदाजाप्रमाणे सांगितले.

"म्हणून तुम्हांला माकडासारखे वाटले, होय ना?" आजोबांनी विचारले.

"असे का म्हणता हो आजोबा?" मुलांना त्यांच्या आजोबांच्या विचारण्याचा अर्थ कळला नव्हता.

"तुम्हांला मी एक गोष्ट सांगितली होती ना?" आजोबांनी विचारले.

"नाही, केव्हां सांगितलीत? सांगा ना." मुलांनी आजोबांना भंडावून सोडले.

"सांगतो. ती माणसाच्या वयाची गोष्ट आहे. सांगतो, ऐका!" आजोबांनी असे सांगून दोन्ही नाकपुड्यात तपकीर कोंबली व गोष्ट सुरु केली.

ब्रह्मदेवाने सर्व जग निर्माण केले आणि मनुष्याला ते सर्व दाखवून म्हणाला—"या सर्वांवर तुझा अधिकार राहील."

ब्रह्मदेवाने निर्मिलेल्या सृष्टीत पर्वत, नद्या, समुद्र, जंगले सर्व होते. ते पाहून

सौ. शांताबाई जाधव

मनुष्य खूष झाला व त्याने ब्रह्मदेवाला विचारले—"आजोबा! या जगावर माझा अधिकार किती काळ राहील?"

"बाळ! तुझे वय मी तीस वर्षे लिहून ठेवले आहे." ब्रह्मदेव म्हणाला.

"बस? फक्त एवढेच? आजोबा, मला मोठे वय द्या." मनुष्य ब्रह्मदेवाला म्हणाला.

"माझ्या सृष्टीतले इतर प्राणी आपल्या आयुष्यातला काही काळ तुला द्यायला तयार आहेत का पाहतो. जर त्यांनी द्यायचे कबूल केले तर तुझे वय वाढेल." ब्रह्मदेव म्हणाला.



ब्रह्मदेवाने त्यानंतर गाढवाला बोलावून विचारले—"ए गाढवा, ऐक! ओझी वाहून नेण्यासाठी, शिव्या खाण्यासाठी आणि गवत चरण्यासाठी मी तुझी सृष्टी केली आहे."

"आजोबा! असे आयुष्य किती काळ घालवावे लागणार मला!" गाढवाने विचारले.

"तुला चाळीस वर्षांचे वय मी दिले आहे." ब्रह्मदेव म्हणाला.

"नको नको, इतके लांब वय मला नको. यांतले अर्धे वय देखील मला पुरे." गाढव म्हणाले. म्हणून गाढवाच्या वयातली वीस वर्षे मनुष्याला मिळाली.

त्यानंतर ब्रह्मदेवाने कुत्र्याला बोलावून सांगितले की मनुष्याचे घर दार सांभाळण्यासाठी पाहरेकऱ्याचे काम करायला त्याची सृष्टी केली आहे. त्याला मनुष्य जे घालील ते खाऊन मनुष्याची चाकरी बजवावी लागेल. त्याला चाळीस वर्षांचे आयुष्य असल्याचे पण ब्रह्मदेवाने सांगितले.

"असेच आयुष्य कंठायचे असेल तर मला त्यातले अर्धे वयच पुरे देवा!" कुत्रा म्हणाला. म्हणून माणसाला आणखी वीस वर्षे मिळाली.

नंतर ब्रह्मदेवाने माकडाला बोलाविले व म्हणाला—"तुला पाहून जगाने हसावे










या साठीच मी तुझी सृष्टी केली आहे. तुझी नजर, कामे व हिंडणे फिरणे सर्वच विचित्र असणार व तुला झाडावर राहून आपले आयुष्य घालवावे लागणार."

"मला असे आयुष्य किती काळ कंठावे लागणार प्रभो?" माकडाने विचारले.

"साठ वर्षे!" ब्रह्मदेव म्हणाला

"नको नको प्रभो! इतके दिवस नाही जमणार मला, तसे आयुष्य कंठायला." माकड म्हणाले. त्याने पण आपले अर्धे आयुष्य दिले व अशा तऱ्हेने मनुष्याचे वय एकंदर शंभर वर्षांचे ठरले.

"पाहिलेत ना, अशा तऱ्हेने मनुष्याला शंभर वर्षांचे आयुष्य मिळाले. पण त्याचे स्वत:चे आयुष्य फक्त तीस वर्षांचेच आहे. त्यानंतर तो बायको, मुलेबाळे ना सांभाळण्यासाठी गाढवासारखा संसाराचे ओझे वाहातो. पन्नासाव्या वर्षापासून वीस वर्षे मुलांच्या मुलांचा म्हणजे नातवांचा सांभाळ करण्याचे काम कुत्र्यासारखे करतो. मुलं जे खायला घालतील ते मुकाट्याने खातो पितो. सत्तरावे वर्ष उलटल्यावर त्याचे दात पडून जातात, दृष्टी अधू होते, कानाला कमी ऐकू येते व पाय लटलटू लागतात. तेव्हां माकडासारखे त्याचे रूप पाहून मुले हसतात. तुम्ही त्या म्हाताऱ्याला माकड म्हणालात त्यात काही आश्चर्य नाही." असे सांगून आजोबांनी गोष्ट संपविली.

"तरमग आजोबा! तुमचे आताचे आयुष्य कशासारखे आहे हो?" एका व्रात्य मुलाने विचारले.

"गाढवा! तुम्हांला नेहमी गोष्ट, गोष्ट अन् गोष्ट! दुसरे काही सुचेल तर शपथ! अभ्यासाचे नाव नाही. चला, उठा, जाऊन बसा अभ्यासाला." असे सांगून आजोबांनी सर्व मुलांना पळवून लावले.





# खुळा

फार पूर्वी इराक इस्राईलच्या सीमा प्रदेशात अनाथ यहुदी मुलांना तेथील अधिकारी बळजबरीने बाटवून मुसलमान करून घेत. परंतु काही यहुदी आपल्या जातीच्या अनाथ मुलांना साना नगरी पाठवून तेथे एका गुरुगृही त्यांच्या विद्याभ्यासाची व्यवस्था करीत. ही गोष्ट साना नगराच्या मुसलमान अधिकाऱ्यांना आवडली नाही.

एक मुसलमान अधिकारी यहुदी वस्तीच्या देखरेखीसाठी आला व यहुदी मुलांच्या शाळेत गेला. त्याने शाळेतल्या शिक्षकाला विचारले–"ही सर्व अनाथ मुले आहेत, नाही का?"

"खरे बोलायचं म्हणजे ही सर्व मुले गाढव आहेत. मी त्यांना शिकवून मनुष्य केले आहे." शिक्षक म्हणाला. मुले शिक्षक म्हणाला ते खरे आहे हे दाखविण्यासाठीच जणू काही गाढवासारखे ओरडू रागले.

शिक्षक म्हणाला ते खरे असल्याची अधिकाऱ्याची खात्री पटली. तो शिक्षकाला म्हणाला–"माझ्या कडे एक डोळा असलेले गाढव आहे. त्याला मनुष्य व्हायला किती दिवस लागतील?"

"तीन वर्षे लागतील." अधिकारी म्हणाला.

"फक्त तीन वर्षे? बरं काही हरकत नाही. माझ्या बायकोला मूल नाही. म्हणून ती सारखी मुलाच्या नावाने जप करीत असते. माझ्या गाढवाला मनुष्य करून दिलात तर त्याला आम्ही मुलासारखे वाढवू." तो अधिकारी आनंदाने म्हणाला.

अधिकाऱ्याने दुसऱ्या दिवशी आपल्या फुटक्या डोळ्याच्या गाढवाला आणून शिक्षकाकडे पोचविले. शिक्षक अधिकाऱ्याला म्हणाला–"एक गोष्ट लक्षात ठेवा. ही



गोष्ट इतर कोणाला सांगू नका आणि आपल्या मुलाला पाहण्यासाठी एकदा देखील येऊ नका. तीन वर्षांनंतर येऊन आपल्या मुलाला घेऊन जा."

तो अधिकारी आनंदाने घरी निघून गेला. तीन वर्षांनंतर तो आला आणि त्याने शिक्षकाला विचारले–"कोठे आहे माझा मुलगा? दाखवता का मला?"

"तुमच्या त्या गाढवाची अक्कल आता मी काय सांगू? त्याचा विद्याभ्यास केव्हाच पुरा झाला. तो आता कचेरीत न्यायाधिशाच्या पदावर काम करीत आहे." अध्यापक म्हणाला. कचेरीतल्या न्यायाधिशाचा एक डोळा गेलेला आहे, ही गोष्ट त्या शिक्षकाला माहीत होती.

त्या अधिकाऱ्याला फार आनंद झाला. तो सरळ कचेरीत गेला. कचेरीत उंच खुर्चीवर बसलेल्या न्यायाधिशाला जाऊन म्हणाला–"बेटा! तू ओळखलंस ना मला? तू माझ्या घरचे फुटक्या डोळ्याचे गाढव होतास. आठवतं का तुला?"

न्यायाधिशाला तो अधिकारी कोणी वेडा असावा असे वाटले आणि त्याला त्याने वेड्यांच्या इस्पितळात पाठवून दिले.

* * *

एका गावी शफीका नावाची एक बाई रहात असे. तिचा नवरा हनगल खुळा होता. शफीका फार हुशार होती. ती, नवरा खुळा आहे हे जगाला कळू नये याची काळजी बाळगत असे. आपल्या नशिबी असा नवरा आला त्याबद्दल कोणाला दोष देण्यात काय अर्थ? भोग असेल तो हसत खेळत भोगण्यातच शहाणपण आहे असे तिने मनाला समजावून घेतले होते.

एकदां तिची मैत्रीण रहमा तिला भेटायला आली. बोलत असता रहमाने पुरुषांची अक्कल, शहाणपण व शक्ति सामर्थ्य यांचे खूप वर्णन केले.





सर्व काही ऐकून घेऊन शफीकाने आपल्या मनात इतके दिवस जतन करून ठेवलेले गुपित तिला सांगून टाकले. म्हणाली–"रहमक्का! काय सांगू आमच्या यांना एक काम देखील धड करता येत नाही. माझ्या डोक्यावर हा कोणाचा शाप आहे, ते त्या खुदालाच माहीत. एक अर्धा पैसा मिळवून आणतील तर शपथ. आता हे घर संभाळणे मला नाही जमत. त्यांचा खुळेपणा मी तोंडाने काय सांगू, स्वतः डोळ्यांनीच पहा. तुला तो दिसेल." असे सांगून तिने आपल्या नवऱ्याला बोलाविले. म्हणाली–"पहा, फडताळात रोटी ठेवली आहे, घेऊन या. तुम्हांला जेवायला वाढते."

हनगल निघून गेला. थोड्या वेळाने ओरडून म्हणाला–"शफीका! मी शिडीवर उभा आहे, खाली उतरू की वर चढू, सांग मला."

"हातात रोटी असेल तर खाली उतरा. नसेल तर वर चढून रोटी घेऊन या." शफीका म्हणाली.

हनगलने आपला हात पाहिला. हातात रोटी नव्हती. वर चढून रोटी हातात घेऊन शिडीच्या मध्यावर येऊन त्याने पुन्हा बायकोला हाक मारली–"शफीका! मी शिडीच्या मध्यावर आहे. खाली उतरू की वर चढू?"

शफीकाने पहिल्याने दिले होते तसेच पुन्हा उत्तर दिले. त्याने पुन्हा हातांकडे पाहिले. त्यात रोटी होती. म्हणून तो उतरून खाली आला.

"पाहिलेस रहमक्का! माझ्या नवऱ्याची ही गत आहे." शफीका म्हणाली.

"एवढेच ना! तुझा नवरा हजार पटीने बरा. माझ्या नवऱ्याचा पराक्रम येऊन पहा." रहमा म्हणाली.

असे सांगून रहमा शफीकाला बोलावून घेऊन आपल्या घरी गेली. एका भांड्यांत पाणी ओतून आपल्या नवऱ्याच्या हातात

देऊन ती म्हणाली–"हे गहू घेऊन जा व पीठ दळून घेऊन या."

रहमाचा नवरा शिमोन भांडे घेऊन गिरणीत गेला आणि गिरणीवाल्याला म्हणाला–"हे घे गहू आणि पीठ दळून दे."

गिरणीचा मालक 'वेडा आहे? असे समजून त्याला म्हणाला–"आज आत्ता दुसरे काम आहे, तू थोडा वेळ झोप. पीठ दळून झाल्यावर मी तुला उठवीन." तेथे कोणी परदेशी झोपलेला होता. शिमोन त्याच्या शेजारी जाऊन झोपला.

शिमोन घोरत पडला असता गिरणीवाल्याने त्याला उठवून त्याची दाढी कात्रीने कापून टाकली व परदेशी टोप त्याच्या डोक्याला घालून त्याच्या हातात पाण्याचे भांडे देत म्हणाला–"तुझे गहू दळून झाले, घेऊन जा पीठ घरी."

शिमोन घरी आला. त्याचे ते रूप पाहून रहमा व शफीका त्याला ओळखू शकल्या नाहीत. त्यांनी त्याला विचारले–"तू कोण रे बाबा?"

शिमोन म्हणाला–"तुमच्यापैकी कोणत्या तरी एकीचा मी नवरा आहे. दोघीपैकी कोण माझी बायको, हे नाही मला माहीत."

"आम्ही तुला नाही ओळखले." असे सांगून रहमाने त्याच्या हातात एक आरसा दिला.

शिमोनने आरशात आपले तोंड पाहिले व म्हणाला–"त्या गाढव गिरणीवाल्याने मला झोपेतून जागे करून पीठ देण्याऐवजी त्या परदेशाला जागे केले व त्याला पीठ दिले. मला वाटते मी अजून तेथेच घोरत पडलो आहे. मी जातो व त्या गाढवाला सांगतो की गाढवा! मला लवकर उठव." असे सांगून तो निघून गेला.

शफीकाला आता कळले की तिचा नवरा रहमाच्या नवऱ्यापेक्षा कमी वेडा आहे.






बाणासुराची राजधानी पहात कृष्ण उभा होता तेव्हां त्याच्या जवळ नारद आला व म्हणाला–"पाहिलेस कृष्णा! या नगराचे रक्षण स्वतः शंकरपार्वती करीत आहेत. म्हणून तुला आपल्या प्रयत्नात पूर्ण यश यावे यासाठी सर्व शक्ति सामर्थ्य पणास लावावे लागेल. तुला फार सावध पण राहले पाहिजे."

त्यावर कृष्ण स्मित करून म्हणाला–"नारदा! आपल्या कार्यात स्वतः शंकर विघ्न घालायला आला तरी त्यात वावगे मानण्याचे कारण काय? त्यातही आनंदच आहे. परंतु तुला ही गोष्ट माहीतच आहे की अयशस्वी होऊन माघार घ्यायची सवय आपल्याला नाही."

असे म्हणत श्रीकृष्ण नगराच्या द्वारापर्यंत येऊन पोंचला व त्याने आपला पांचजन्य नांवाचा शंख वाजविला. तो आवाज ऐकताच बाणासुराचे पहिल्यापासून तयार असलेले सैन्य महासागराच्या लाटासारखे श्रीकृष्णावर तुटून पडण्यास पुढे धावले.

कृष्ण, बलराम, प्रद्युम्न व गरुड पुढे सरसावले. घनघोर युद्ध झाले. कित्येक हताहत झाले व जे उरले ते नगरात पळून गेले.

पळून जाणाऱ्या आपल्या सैन्याकडे पाहून बाणासुर म्हणाला–"रक्षकुळात जन्माला येऊन युद्धात कधी पूर्वी माघार घेतली नसतांना तुम्ही आज पळपुट्यासारखे पळू लागला आहां? माझ्या शक्तिसामर्थ्यावर



तुमचा विश्वास नाही असे दिसते आहे माझा मंत्री कुंभांड हा महा प्रतापी वीर आहे. शंकराचे गण माझ्या बाजूला आहेत. मग त्यांच्या समोर आपल्या शत्रूची काय दाद लागणार? थांबा! असे पळू नका. आहां तेथे उभे रहा!" कुंभांडने पण पळणारांना अडवून धीर देण्याचा यत्न करून पाहिला. पण काही उपयोग झाला नाही; राक्षसांचे सैन्य पळत सुटले.

आपल्या भक्ताचा अशा तऱ्हेने जो अपमान झाला तो पाहून शंकराला राग आला. तो युद्धाला तयार झाला. सिंहांच्या रथावर वृषभध्वज फडकत होता. नंदीला सारथी करून षण्मुखाला बरोबर घेऊन आपल्या गणांसह शंकर युद्धास निघाला.

शंकर व कृष्ण यांचे युद्ध सुरू झाले. युद्ध सुरू होताच शंकराने कृष्णावर बाणवृष्टी केली. त्याच्या उत्तरादाखल श्रीकृष्णाने रागाच्या भरात ऐन्द्रास्त्राचा प्रयोग केला. त्यातून सहस्रावधी बाण एकाच वेळी सुटले व त्यांच्या आड शंकराचा रथ झाकला गेला. तेव्हां शंकराने आग्नेयास्त्र सोडले त्यातून आगीचे लोट येऊ लागले व त्यात कृष्णाने सोडलेले सर्व बाण जळू लागले तेव्हां कृष्णाने वरुणास्त्राचा प्रयोग करून ती आग विझविली.

शंकराने द्विगुणित रागाने आणखी पाच सहा अस्त्रे सोडली. कृष्णाने ती अस्त्रे नष्ट करण्यासाठी अनेक नवीन अस्त्रांचा प्रयोग केला व शेवटी मंत्रवून वैष्णवास्त्र सोडले. त्या अस्त्राला निरुपयोगी करण्यासाठी शंकराने फार रागाने प्रलया सारखे आपले पाशुपतास्त्र बाहेर काढले.

शंकराने काढलेले पाशुपतास्त्र कृष्णाने पाहिले. त्याने जृंभकास्त्राचा प्रयोग केला. त्यामुळे शंकर दमला आणि त्याला जांभया येऊ लागल्या. त्याच्या हातातून धनुष्य व बाण सुटून खाली पडले.



त्याच वेळी बाणासुराने रणांगणावर पाऊल टाकले. त्याने शंकराला शुद्धीवर आणण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला पण त्याचे सर्व प्रयत्न अयशस्वी ठरले. त्याच वेळी शंकराने पुन्हा आपला पांचजन्य इतक्या जोराने फुंकला की सर्व दिशा दुमदुमल्या.

"ही घटना पाहून शंकराच्या गणांना राग आला. त्यांनी प्रद्युम्नाला चारी बाजूंनी शस्त्रास्त्रांचा घेरा घालून जणु काही बंदी करून सोडले. राक्षसांनी त्यानंतर माया युद्ध सुरु केले. प्रद्युम्नाने संतापून संमोहनास्त्र सोडून सर्वांना गुंगी आल्या सारखे केले व अनेक राक्षसांना ठार केले.

इतक्यात कुमारस्वामी म्हणजे कार्तिकेय याने वडिलांना युद्धविमुख झालेले पाहून स्वतः युद्ध आरंभिले. त्याने कृष्ण बलराम व प्रद्युम्न यांच्याशी युद्ध करून त्यांना जखमी केले व स्वतःपण जखमी झाला. कार्तिकेयाने उग्र रूप धारण केले व कृष्णावर ब्रह्मशिरोनामास्त्राचा प्रयोग केला. तेव्हां कृष्णाने सुदर्शन चक्र सोडून ते अस्त्र भंग केले. त्यानंतर श्री कृष्णाने स्वतः कार्तिकेयावर सुदर्शन चक्र सोडले. ते



कार्तिकेयाला लागणार इतक्यात लंबादेवी नामक एका देवीने येऊन कार्तिकेयाला उचलून नेले.

अशा तऱ्हेने बाणासुराच्या रक्षणार्थ असलले अंगरक्षक एकेक करून निघून गेले. आता त्याला स्वतःच्या शौर्य व प्रतापावर अवलंबून राहून युद्ध करण्याशिवाय गत्यंतर नव्हते. त्याला युद्धाची जी खुमखुमी होती तिला चांगला वाव मिळण्यास संधी मिळाली. तो स्वतः कृष्णाशी युद्ध करण्यास रणांगणावर आला. त्या युद्धात बाणासुराचा रथ, शस्त्रे वगैरेंचा चक्काचूर झाला व त्याच्या छातीला कृष्णाचा तीर लागला.



त्यामुळे बाणासुर बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला.

त्याच वेळी कृष्णाने सोडलेले सुदर्शनचक्र बाणासुराचा वध करणार इतक्यात शंकर पार्वतीने पाठविलेली लंबादेवी बाणासुराच्या समोर जाऊन उभी राहाली आणि अदृश्यपणे स्वतः पार्वती पण तेथे येऊन जवळच उभी राहली.

तेव्हां कृष्ण त्यांना पाहून म्हणाला– "देवी! तू हा सर्व खटाटोप कशाला करायला आलीस? तू मध्ये उभी राहलीस तर बाणासुर माझ्या हातातून सुटेल किंवा वाचेल असे वाटले काय तुला?"

त्यावर पार्वती प्रकट होऊन म्हणाली– "कृष्णा! तू सर्व प्रकारे योग्य आहेस व तुला अडविणे शक्य नाही हे देखील मी ओळखते. परंतु मी बाणासुराला आपल्या मुलासारखा मानीत आले आहे. म्हणून माझी विनंती मान्य करून त्याला सोडून दे."

ते ऐकून कृष्ण म्हणाला–"हे देवी! याला आपल्या सहस्त्र बाहूंचा गर्व झाल्यासारखा दिसत आहे. याचे फक्त दोन हात राहून देऊन बाकी हात छाटून टाकले तर याचा गर्वभंग होईल आणि तेव्हांच याच्या राक्षसबुद्धीचा नाश होईल. म्हणून तूं मला अडवू नकोस. मी फक्त त्याचे हात छाटून त्याला सोडून देईन."

त्यावर पार्वतीने लंबादेवीस दूर व्हायला सांगितले. पार्वतीबरोबर लंबादेवी पण अंतर्धान पावली. तेव्हां कृष्णाने आपल्या सुदर्शन चक्राचा प्रयोग करून बाणासुराचे सर्व हात छाटून टाकले फक्त दोन राहू दिले. सुदर्शन चक्र आपले काय करून परत कृष्णाच्या हाती आले.

तरी बाणासुराचे राक्षसत्व नाश पावले नव्हते. तो आपल्या उरलेल्या दोन्ही हातांनी कृष्णावर बाणवृष्टी करू लागला. तेव्हां मात्र कृष्णाला मनस्वी राग आला व



त्याने सुदर्शन चक्र उचलले. तेव्हां स्वतः शंकर पार्वती सपरिवार प्रकट झाले व म्हणाले–"कृष्णा! याच्या संरक्षणाचा भार आम्ही घेतला आहे. तू याचा वध करून आम्ही दिलेले अभयदान निरुपयोगी ठरवून नकोस. आपले सुदर्शन चक्र आवर."

श्रीकृष्णाने बाणासुराचा वध करण्याचा विचार सोडला. तो शंकराचे स्तोत्र गात गरुडावर बसून अनिरुद्ध होता तेथे आला. नंदीने बाणासुराला शंकराकडे सुखरूप पोचते केले. शंकराने त्याचे सर्व दुःख दूर करून व त्याला नंदीच्या बरोबरीचे स्थान देऊन आपल्या गणात सामील केले.

कृष्ण, बलराम आदिक अनिरुद्ध सर्प-बाणांनी जेथे बद्ध होता तेथे येऊन पोचले. गरुडवाहनावर कृष्ण होता. म्हणून गरुडाला पाहताच सर्परूप धारण करून असलेल्या बाणांना त्यांचे प्राकृतिक रूप मिळाले. त्याच वेळी तेथे नारद व चित्ररेखा आले. अनिरुद्धाने कृष्ण बलरामाचे अभिवादन केले व त्यांना भेटला.

नारद कृष्णाकडे पाहून म्हणाला– "आता उशीर कसला? उषा अनिरुद्धांचा विवाह करून टाका. मुहूर्तपण जवळच आहे. बाणासुराचा मंत्री कुंभांड याने



लग्नाची सर्व तयारी करून दिली व कृष्णाला नमस्कार करून म्हणाला–"आपण माझ्यावर अनुग्रह करावा व माझे रक्षण करावे."

तेव्हां कृष्ण त्याला म्हणाला–"तू योग्य आज्ञाधारक मंत्री आहेस, हे मला माहीत आहे. आता हे बाणासुराचे सर्व राज्य तुझे. तू याचा उपयोग कर."

त्यानंतर उषा अनिरुद्धांचा थाटामाटाने लग्नसोहळा झाला. कृष्णाने वरवधूला शंकरपार्वतीकडे नेऊन दोघांना नमस्कार करायला सांगितले. त्या आदि दंपतीने या नव दंपतीस आशीर्वाद दिला. पार्वतीने



अनिरुद्धाला वाहन म्हणून बाणासुराचे मयूरवाहन दिले. श्रीकृष्ण निघाला तेव्हां कुंभांड म्हणाला–"बाणासुराच्या गाईंचे कळप वरुणाकडे आहेत. त्यांचे दूध प्याल्याने आयुरारोग्य वाढते. त्या गायी आपण स्वाधीन करून घ्याव्या.

ते कळल्यावर कृष्ण आनंदाने आपल्या बरोबर बलरामदादाला व मुलाला घेऊन गरुडावर बसून निघाला. पश्चिमेकडील समुद्राच्या काठी येऊन त्यांनी मैदानांत चरत असलेल्या लक्षावधी गायी पाहल्या. गाईंना वश करून घेण्याचे कौशल्य त्याला लहानपणापासूनच अवगत होते. म्हणून जमिनीवर उतरल्यावर तो गाईंच्या जवळ पोचला. पण त्यांनी त्याच्याकडे पाहिले देखील नाही व समुद्रात प्रवेश केला आणि अदृश्य झाल्या.

कृष्ण निराश होऊन गरुडाला म्हणाला–"माझा प्रयत्न फुकट गेला. आतां काय करावे?"

"करायचे काय? वरुणाशी युद्ध हा एकच एक उपाय आहे." गरुड म्हणाला.

गरुडाने आपले पंख फडफडविले. तेव्हां समुद्राचे पाणी मागे सरकले आणि समुद्राच्या तळाशी असलेला नागलोक दिसू लागला. श्रीकृष्णाने वरुणाच्या महालावर हल्ला केला–"दुसऱ्या क्षणाला वरुणाचे सैनिक शंख वाजवीत रथांत बसून कृष्णावर चालून आले. कृष्णाने त्यांच्याशी युद्ध केले. त्याच्या मदतीला बलराम व प्रद्युम्न होतेच; गरुडाने पण त्यांना मदत केली. वरुणाचे सैन्य पळून गेले.

"कृष्णाचे एवढे साहस?" असे म्हणत वरुण रागाने कृष्णाशी युद्ध करण्यास स्वतः आला. त्या युद्धात कृष्णाने वैष्णवास्त्राचा प्रयोग केला. तेव्हां वरुणाचा गर्वपरिहार झाला व तो हात जोडून कृष्णासमोर येऊन उभा राहला. तेव्हां कृष्ण म्हणाला–"माझ्या








जवळ शरण मागण्यात काय अर्थ आहे? प्रथम बाणसुराच्या सर्व गाई माझ्या स्वाधीन कर."

"आपण तेवढ्या गाईच मागू नये. मी बाणासुराला वचन दिले होते की मी प्राण द्यावा लागला तरी तो देऊन तुझ्या गाईंचे रक्षण करीन. कोणाला त्या गाई घेऊन जाऊ देणार नाही. मी जे सांगतो ते सर्व अक्षर अक्षर सत्य आहे. आता आपल्याला वाटेल तशी आज्ञा करावी." वरुणाने वरीलप्रमाणे उत्तर दिले.

श्री कृष्णाने सर्व गाई तेथेच सोडल्या व आपले अस्त्र परत घेतले. वरुणाने श्री कृष्ण व इतर यादव नायकांचा उचित सत्कार करून त्यांना निरोप दिला.

वरुणाकडून निरोप घेऊन कृष्ण, बलराम प्रद्युम्न, अनिरुद्ध आदिक गरुड वाहनावर बसून द्वारकेला आले व आपल्या आगमनाची सूचना म्हणून पांचजन्य वाजविला. तो आवाज ऐकून यादव प्रमुख श्री कृष्णाच्या स्वागतासाठी सामोरे आले. श्रीकृष्ण त्यांच्या आधी गरुडवाहनावरून उतरून नगरा बाहेरच्या एक उद्यानात विश्रांती घेण्यासाठी थांबला. त्याच्या बरोबर इंद्र आदिक देवपण होते. यादव त्यांना रथांत बसवून वाजत गाजत घेऊन द्वारकेत आले. कृष्णाच्या स्वागतासाठी प्रजा रस्त्याच्या दोन्ही बाजूला येऊन उभी राहली.

कृष्णाने बाणासुराचा पराभव करून जो पराक्रम गाजवला त्याचे वर्णन नगरवासी परस्परांशी करू लागले. त्यांत मुख्यत्वेकरून कृष्णाने शोणा पुराच्या रक्षणार्थ जे अग्नी होते त्यांवर कसा विजय मिळविला, पार्वतीच्या प्रार्थनेवरून बाणासुराचे हात छाटून त्याला कसे जिवंत सोडले याचे वर्णन जास्त होते. ते ऐकून कृष्णाला अर्थातच आनंद झाला.

कृष्णाने आपल्या महालात व उषा अनिरुद्धांनी आपल्या महालात प्रवेश केला.





# अरण्यपुराण

[३०]

मौवली पळू लागल्याबरोबर कुत्री त्याला धरायला त्याच्या पाठी मागून धावली. मौवली खूप जोराने पळत होता. मधमाशांची पोळी जवळ येताच त्याने पुढे काय करायचे ते आधीपासूनच मनाशी ठरविले होते. ती गोष्ट म्हणजे काबाने व त्याने जे ठरविले होते तेच.

मधमाशा त्या संध्याकाळच्या अंधुक उजेडात झोपू लागल्या होत्या. कारण सूर्यास्तानंतर मध गोळा करण्याचे काम संपलेले होते. मौवली पोळ्यांजवळ पोचला तेव्हां त्याला त्यांच्या पंखांचा गोड बारीक आवाज ऐकू आला. तेव्हां तो जास्तच जोराने धावू लागला. पळत असता त्याने पहिल्यापासून जमावून ठेवलेले दगड पायाने ढकलले. तो बारीक आवाज मोठा होऊ लागला व थोड्याच वेळात भयंकर वाटू लागला. काळ्या ढगासारख्या मधमाशा आकाशात पसरल्या. समोर दिसेल त्याला चावून ठार करण्याचा जणु काही त्यांनी चंग बांधला होता. खाली वेणगंगा पसरलेली होती. नदीत काबाचा फण झळकत होता.

मौवलीने विचार करण्यात जास्त वेळ न दवडता काबाच्या सल्ल्याप्रमाणे पाण्यात उडी मारली. शेपटी कापल्याने खवळलेला कुत्र्यांचा नायक मौवलीला चावण्यासाठी पुढे धावत आला होता. पण त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले. मौवलीला त्याचा बेत योजल्याप्रमाणे पार पडल्याबद्दल आनंद झाला. त्याला एक मधमाशी देखील चावली नाही. त्याने रानटी लसूण आपल्या अंगाला चोळली होती. त्याचा पण फायदा झाला.

शेवटचें मलपृष्ठ



मौवली पाण्यात तरंगू लागला तेव्हां काबा त्याला वांचवायला तेथे तयार होताच. कड्याच्या टोकाला कुत्री. मध माशांच्या पोळ्यासारखीच दुरून भासत होती.

कुत्री पाण्यापर्यंत पोचली तोपर्यंत मधमाशा वर वर उडत होत्या. ती जवळ येताच मधमाशांची धाड कुत्र्यांवर पडली. एका मागून एक कुत्र्यांची प्रेते पाण्यात पडू लागली. खवळलेल्या मधमाशांचा आवाज मौवलीला ऐकू येत होता. काही कुत्री पाण्यात पडली तर काही खाचा खळग्यात पडली. मधमाशांना चावायला चांगलीच संधी मिळाली.

ते सर्व दृश्य मौवली व काबा पहात होते. थोड्या वेळाने काबा म्हणाला– "आपले काम फत्ते झाले. मधमाशा खूप खवळल्या आहेत आता येथे थांबणे आपल्या जिवाला पण धोक्याचे आहे. चल येथून पाय काढू."

मौवली शक्य तोवर पाण्यातच बुडी मारून पोहोत होता. तो निश्चित पणे पोहोत आहे हे ओळखून काबाने त्याला आणखी एका गोष्टीबद्दल सावध केले. म्हणाला–"खबरदार! लक्षात असू दे, पाण्यात जी कुत्री पडली आहेत ती सर्वच मेलेली नाहीत."

"हा खंजीर मी शोभेसाठी ठेवला आहे का रे?" मौवली उत्तरादाखल म्हणाला. मौवलीला हे पाहून आश्चर्य वाटत होते मधमाशा की पाण्याच्या धारेबरोबर उडत येत होत्या.

कुत्र्यांच्या झुंडीतली अर्धी अधिक कुत्री मधमाशांची धाड येताच घाबरून इकडे तिकडे पळू लागली व पाण्यात पडली. मौवलीने त्यांची काढलेली खोड ती विसरली नव्हती. ती जवळ येताच मौवली खंजिराने त्यांना मोक्ष देई. काहींचा जीव मध माशांनी घेतला.

शांतिडोहा जवळ पोचेतो सियोनी लांडग्यांचा आवाज ऐकू येऊ लागला. कुत्री आपल्या नायकाला विचारीत होती, "पाण्यातून काठावर जाऊ या का?" मधमाशा परत फिरू लागल्या होत्या."

"आता मी सुद्धा परत जातो. लांडग्यांशी माझं काय नातं? मला माझं पोट सुद्धा भरायचं आहे." काबा म्हणाला व तो निघून गेला. कुत्री पाण्यांत गारठून गेली होती. त्यांचा उत्साहपण गारठला होता. तरी ती लंगडत फरपटत बाहेर येत होती. एकू आपल्या लांगड्या पायानें लंगडत चालत बाहेरच उभा होता.

"या खेपेच्या शिकारीचा खेळ गमतीचा नाही." एक कुत्रे धापा टाकीत म्हणाले.

"कां छान आहे." असे म्हणत मौवलीने त्या कुत्र्याची मुंडी धरली आणि सुरा त्याच्या छातीत भोसकला.

"तूच नाही का माणसाचे पिल्लू!" एकूने ओरडून विचारले.

"त्या मरगळलेल्या कुत्र्यांना विचार रे एकू! त्यांच्या नायकाचे शेपूट छाटून टाकले व तुझ्या साठी मेजवानी वाढून ठेवली आहे." मौवली म्हणाला.

"छान, छान!" एकू म्हणाला.



लांडग्यांची टोळी जवळ जवळ येऊ लागली. नदीचा प्रवाह जेथे एका वळणावर वळत होता तेथे ओली चिप्प गारठलेली मरगळलेली कुत्री किनाऱ्यावर येऊ लागली. तीच नेमकी त्यांची चूक झाली. त्यांना लोळवायला फक्त अर्ध्या मैलावरच लांगग्यांची टोळी वाट पहात होती. एकू पहातच होता. नायकाने संकेत करताच लांडगे किनाऱ्याकडे धावले. भयंकर युद्ध सुरू झाले. कुत्र्यांची संख्या लांडग्यांच्या दहापट होती. पण लांडगे जिवावर उदार होऊन लढत होते. त्यांच्यात पोरं होती व लांडगिणी पण होत्या.

पाण्यातून बाहेर येणाऱ्या कुत्र्यांचा कंठ चिरून लांडग्यांनी एकेकाला ठार करायला सुरवात केली. तरी काही कुत्री बाहेर आली. त्यांनी लांडग्यांच्या पोटाचे लचके तोडायला सुरवात केली. पाण्याच्या बाहेर आलेल्या कुत्र्यांचे बळ वाढत आहे हे पाहाल्यावर दूर गंमत पहात उभे असलेले मौवलीचे चौघे मोठे भाऊ त्या कुत्र्यांवर तुटून पडले. त्यांच्यावर हल्ला करणाऱ्या कुत्र्यांना मौवलीने आपल्या खंजिराने मोक्ष दिला. म्हातारा एकू व नवीन नायक फावो दोघांनी फार मोठे शौर्य दाखविले. कुत्र्यांचा नायक इतर लांडग्यांच्या हातातून आपला बचाव करीत शेवटी एकूच्या हाती सापडला. मौवली त्याच्या मदतीला धावला तेव्हां एकू म्हणाला–"हो मागे, हा माझा वांटा."

शूर एकूने कुत्र्यांच्या नायकाला ठार करून धरातीर्थी आपला देह ठेवला. एकू मरताच मौवलीने लांडग्यांना प्रोत्साहनार्थ आरोळी ठोकली "एका कुत्र्याला देखील जिवंत सोडू नका."

मरते वेळी मौवली जवळ होता. एकूने प्राण सोडण्यापूर्वी मौवलीला म्हटले–"मी तुला नव्हते का सांगितले, ही माझ्या आयुष्यातली शेवटची लढाई आहे. आज तू नसतास तर आमच्या पैकी एकदेखील जिवंत राहला नसता. आता तू आपल्या लोकात परत जा. सर्व ऋण फिटले."

मौवलीने प्रेमाने एकूला पोटाशी घट्ट आवळून धरले. कधी काळी एकूच त्या टोळीचा नायक होता. आता त्याचे ते शेवटचे करुण क्रंदान नदीच्या पडलीकडे पण ऐकू येत होते.

"शिकार झाली पाहिजे!" असे म्हणत एकूने एक किंकाळी फोडून शेवटची उडी मारली. जीवन ज्योत विझली. त्याचा प्राणपक्षी उडाला. त्या रात्री जी लढाई झाली त्यात एक कुत्रे देखील जिवंत सुटले नाही.





# ८४. प्राचीन अलेप्पो कोट

सिरियांतला हा एक दुर्भेद्य डोंगरी किल्ला म्हणून प्रसिद्ध होता. मुसलमान व ख्रिश्चन मतावलंबियांमध्ये झालेल्या युद्धात ख्रिश्चन सैन्याने या किल्ल्याला वेढा दिला होता. पण तो जिंकणे त्यांना अशक्य झाले. हिट्टैटांच्या काळापासून इजिप्टच्या फारावो काळापासून सुद्धा हा किल्ला जिंकण्यासाठी कित्येक कट, युद्धे व रक्तपात झाला. कित्येकदा प्लेग व भूकंप झाले. याचा इतिहास चार हजार वर्षे जुना आहे. याच्यात प्रवेश करण्यास सर्व मार्ग भूगर्भातूनच आहेत.



सरकारने बंडखोराना कडक शिक्षा करून बंड अयशस्वी केले. परंतु १० मे १८५७ या रोजी मीरत येथे शिपायांनी उघड बंडाचे निशाण उभारले.

मीरत येथे एक इंग्रज सैनिक अधिकारी होता. त्याच्या खाली २२०० गोरे शिपाई होते. त्याने बंडखोरांकडे दुर्लक्ष केले. बंडखोर शिपाई घोड्यावर बसून दुसऱ्या दिवशी उजाडण्याच्या सुमारास दिल्लीला येऊन पोचले आणि त्यांनी दिल्ली शहर काबीज केले. तेथे गोऱ्या सैनिकांची एक तुकडी देखील नव्हती. तेथे बंडखोरांनी अनेक गोऱ्या अधिकाऱ्यांचा वध केला व घरांची मोडतोड केली.

दिल्ली शहराबाहेर एक तार आफीस होते. तेथून दोन सिग्नलरांनी तारेने पंजाबच्या अधिकाऱ्यांना बंड झाल्याची बातमी दिली. दिल्लीच्या शस्त्रागारात लेफ्टनंट विल्लबी आणि त्याचे आठ अनुयायी होते. त्यांनी काही दिवस स्वरक्षणासाठी युद्ध चालू ठेवले व शेवटी युद्ध चालू ठेवणे अशक्य वाटले तेव्हां शस्त्रागाराला आग लावली. त्यामुळे बंडखोरांचे मोठे नुकसान झाले. तरी त्यांनी मोगल बादशाहाच्या महालात प्रवेशकरून दुसरा बहादुरशाह हा भारताचा चक्रवर्ती असल्याची घोषणा केली. त्यावेळी बहादुरशाह हा फार वृद्ध झाला होता व नावापुरता मोगल बादशाह होता.

मोगल बादशहांची राजधानी काबीज करण्यासाठी ब्रिटीशांना फार प्रयत्न करावा लागला होता. त्यासाठी त्यांनी अनेक युद्धे केली व पाण्यासारखा पैसा खर्च केला होता. असे दिल्ली शहर बंडखोरांच्या हाती गेल्यामुळे ब्रिटीश साम्राज्याच्या प्रतिष्ठेला फार मोठा धक्का बसला.





# सराय

**फा**र पूर्वी एका देशात एक सुलतान राज्य करीत असे. त्याने स्वतःच्या राहण्यासाठी एक सुंदर महाल बनविला. भिंतीत व छपराला कोरीव संगमरमरी दगड बसविण्यात आले. रत्ने व माणिक्ये मागवून सुलतानाने जागो जागी ते बसवून आपला महाल शोभिवंत केला.

तो राजमहाल पाहण्यासाठी दुरदुरून लोक येऊं लागले व महालाच्या सौंदर्याची स्तुती करू लागले. कवींनी तो महाल पाहून स्तुतिपर गीते लिहिली. अशा तऱ्हेने त्या महालाची कीर्ती वाढतच गेली.

त्या महालात सुलतान वीस वर्षे राहला. याहून स्वर्गाचे सुख ते जास्त काय असणार असे त्याला वाटे. पण त्याला शेवटी तो महाल सोडून जावे लागले. मरणापूर्वी त्याने आपल्या मोठ्या मुलाला मरणशय्येजवळ बोलाविले व म्हणाला—

"हा महाल मी फार हौशीने बांधला आहे. यात मी वीस वर्षे सुखाने राहालो. आता तू या महालाचे सौंदर्य कसे वाढविता येईल ते पहा. या महालामुळे मला कीर्तिलाभ झाला. तुझी कीर्ति देखील द्वितियेच्या चंद्रासारखी नित्य वाढो, अही माझी इच्छा आहे." असे सांगून सुलतानाने डोळे मिटले.

मुलगा पितृभक्त होता. बापाने मरणसमयी दिलेला उपदेश त्याला नित्य आठवे. बापाच्या आत्म्याला शांति मिळेल अशीवाढ या महालाच्या सौंदर्यात करावयाचे त्याने आपल्या मनाशी ठरविले. त्याने महालाच्या चारी बाजूला एक सुंदर उद्यान बनविले. उद्यानात निरनिराळ्या प्रकारच्या वृक्ष वेली लावल्या. कारंजांची व्यवस्था केली. निरनिराळ्या ऋतूंत निरनिराळ्या रंगाची फुले फळे पाहून सुलतानाच्या मुलाला आनंद



झाला. नंदनवनाला लाज वाटेल असे सुंदर उद्यान होते ते.

मोठ्या सुल्तानाने देशाचा व्यापार व उद्योगधंद्यांची वाढ होण्यासाठी जसा प्रयत्न केला होता तसा प्रयत्न मुलाने केला नाही. त्याला ते जमलेच नाही. त्याचे मुख्य लक्ष महालाच्या चारी बाजूला एक सुंदर उद्यान बनविण्याकडे होते. बापाने इतकी कीर्ति मिळविली ती त्या महालामुळेच व आपण देखील त्या महालाचे सौंदर्य वाढविण्या-साठीच बापाने ठेवलेला पैसा खर्च करावा असे मनाशी ठरविले होते. त्याप्रमाणे वयाची पंचवीस वर्षे पितृऋण फेडण्याच्या कामी त्याने खर्ची घातली व पन्नासाव्या वर्षी एका एकी मरण पावला. मरण समयी त्याने आपला मोठा मुलगा अब्दुल्ला याला बोलवून त्याने त्याला उपदेश केला. म्हणाला–"माझ्या वडिलांनी हा महाल बांधला व अजरामर कीर्ति संपादन केली. मी त्या महालाचे सौंदर्य वाढविण्यासाठी वडिलांच्या इच्छेप्रमाणे एक सुंदर उद्यान बनविले. आता ही परंपरा जिवंत ठेवण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे. तुझ्या आजो-बांनी बांधलेल्या या महालाची कीर्ति अशीच वृद्धिगत होत रहावी यासाठी तू प्रयत्न करावास, एवढेच मला तुला सांगावयाचे होते." असे सांगून त्याने डोळे मिटले.

अब्दुल्ला सुलतान झाला त्या वेळी राज्याचा सर्व खजिना रिकामा झाला होता. धनाभावी महालाची डागडुजी तर दूरच साफसफाई करणे देखील अब्दुलाला अशक्य वाटू लागले.

म्हणून अब्दुल्लाने आपल्या वजिरांचा सल्ला घेतला आणि प्रजेवर नवीन कर लावले. राज्य कारभार अब्दुल्लाच्या वडिलांच्या वेळीच बेताचा होता. त्यामुळे व्यापार व उद्योग धंदे नीट चालत नव्हते. त्यात दुष्काळ पडला व प्रजा गरीब झाली. सुलतानाने लावलेले कर देण्यास कोणाजवळ पैसेच नव्हते तर कर कोठून देणार?

अब्दुल्लाला मरणसमयी बापाला दिलेले वचन आठवले व त्याने आपल्या महालाची व बागेची डागडुजी सुरू केली. प्रजेवर कराचा बोजा वाढू लागला. राज्यात अराजकता पसरली.

त्यावेळी राज्यात परदेशातुन एक फकीर आला. त्याने प्रजेच्या दुःखाचे कारण विचारून ते दूर करण्याचा मनाशी निश्चय केला. सुलतानाची बुद्धि भ्रष्ट झाली आहे. त्याचे डोळे उघडण्यासाठी काही तरी उपाय केला पाहिजे या विचाराने तो राजमहालात गेला. पाहरेकऱ्यांजवळ विचारपुस केल्या-शिवाय सरळ राजमहालात प्रवेश केला. फकिराला अडविण्याची हिंमत किंवा साहस पाहरेकऱ्यात नव्हते.

फकीर भोजनालयात गेला आणि सैपाक्यांना जेवण वाढायला सांगितले. सैपाक्यांनी मुकाट्याने त्याला जेवण वाढले. जेवणखाण आटोपल्यावर फकीर सुलता-नाच्या झोपण्याच्या महालात गेला व पलंगावर जाऊन झोपला. त्याला कोणी विचारले नाही की अडविले नाही.

अब्दल्लाला नोकरांकरवी कळले की कोणी फकीर राजमहालत आला आहे. त्याने














चवकशी केली तेव्हां फकीर सुलतानाच्या पलंगावर झोपला असल्याचे कळले. तो तावातावाने पलंगाजवळ गेला. फकिराचा रुबाबदार चेहरा पाहून त्याला जागे करण्याची अब्दुल्लाला हिंमत झाली नाही. तो जागा होईपर्यंत त्याला वाट पहावी लागली. जागा झाल्यावर नम्रपणे म्हणाला—"फकिरांसाठी आमच्या आजोबांनी एक सुंदर सराय बांधलेली आहे. तेथे कां नाही गेलात आपण?"

"म्हणजे ही सराय नाही का?" फकिराने विचारले.

"नाही. हा बादशाहाचा राजमहाल आहे. आमच्या आजोबांनी बांधला. तेव्हां पासून आम्ही यातच रहात आलो." अब्दुल्ला म्हणाला.

"तुझे आजोबा किती वर्षे राहले या महालात?" फकिराने विचारले.

"वीस वर्षे." अब्दुल्ला म्हणाला.

"तुझे बाबा?" फकिराने पुन्हा विचारले.

"पंचवीस वर्षे!" अब्दुल्ला म्हणाला.

"तू किती वर्षे राहलास?" फकिराने विचारले.

"मी माझ्या जन्मापासून येथेच रहात आहे" अब्दुल्ला म्हणाला.

"तुझे वय काय?" फकिराने विचारले.

"तीस वर्षे!" अब्दुल्ला म्हणाला.

"तुला शंभर वर्षांचे आयुष्य लाभले तर तू आणखी ७० वर्षे यांत राहशील. बस, इतकीच ना? त्यानंतर पन्नास पाउणशे वर्षे तुझा मुलगा राहील व त्याच्यानंतर त्याचा मुलगा. मग ही सराय नाही तर काय आहे? या सरायीच्या दुरुस्तीसाठी तू आपल्या प्रजेवर अत्याचार करतो आहेस?" असे सांगून फकीर उठून निघून गेला.

अब्दुल्लाला ज्ञानबोध झाला. त्याने त्यानंतर प्रजेच्या हिताचीच कामे केली.






# पडकें देऊळ

[ १२ ]

[ शिखीमुख व विक्रमकेसरी पुजारी लपून बसला होता त्या गुहेजवळ पोचले, पण तो गुहेत नव्हता. नागगिधाडाला बरोबर घेऊन डोंगरातली एक दरी पार करून जात असलेला पुजारी त्यांना दिसला. शिखीमुख वगैरेंनी त्याचा पाठलाग सुरु केला. पुजाऱ्याने खोऱ्यातील एक खडक शिखीमुखला दाखवून तिकडे यायला सांगितले. पुढे–]

पडक्या देवळाच्या पुजाऱ्याने म्हटले ते ऐकून शिखीमुखला व त्याच्या साथी अनुयायांना राग आला. घाई घाईने दरीत उतरल्यावर त्यांना खडकासमोर नागगिधाडाबरोबर उभा असलेला पुजारी दिसला. ते त्याच्या जवळ पोचल्याबरोबर खडकामागून दहा गोंड ओरडत उड्या मारून पुढे आले. त्यांचा नायक घोड्यावर बसलेला होता. तो खडकामागून पुढे येऊन म्हणाला–"कोण तुम्ही? शिखीमुख व नागमल्ली नाही का? शबर व नाग जातींची पोरे? तुम्ही माझे कैदी झाला आहां. तुमचे दोघांचे आईबाप किती पैसे देऊन तुम्हांला सोडवून नेतात ते मी पाहणार आहे."

"छा...न! अशी गंमत आहे तर! समजले शिखी!" असे म्हणत पुजारी मोठ्याने खदखदा हसू लागला.



"तो गोंड लुटेऱ्यांचा नायक आहे. वस्ताद लुटेरा आहे, केसरी!" शिखीमुखने भाला रोखीत विक्रमला सावध केले.

"त्या दुष्ट पुजाऱ्याने टाकलेले आणखी एक जाळे दिसते आहे हे. आपण सावध राहूले पाहिजे विक्रम!" नागमल्ली म्हणाली.

विक्रमकेसरी विचार करीत उभा राहला नाही. त्याने झडप मारल्यासारखी उडी मारली व घोड्याजवळ पोचून गोंड लुटेऱ्यांच्या नायकाच्या डोक्यात भाला मारला. त्याबरोबर गोंड घोड्यावरून खाली पडला. त्याच्या घोड्याचा लगाम चटदिशी धरून विक्रम म्हणाला—"शिखी! पाहतोस काय? येथे थांबायला वेळ नाही. तुम्ही दोघे घोड्यावर बसून पळा. पुजाऱ्याने तुम्हांला दोघांना धरण्यासाठी हे जाळे टाकले होते, हे विसरू नका." असे सांगून विक्रमने शिखीमुखचे दोन्ही हात धरून त्याला जबरदस्तीने घोड्यावर बसविले व नागमल्ली "नको नको!" म्हणत असतांच तिला उचलून घोड्यावर बसविले आणि घोड्याला इतक्या जोराने लाथ मारली की घोडा पळू लागला व पाहता पाहता दृष्टीआड झाला.

हे सर्व इतक्या लवकर घडले की पुजाऱ्याला व तेथे त्याच्या मदतीला आलेल्या गोंड लुटाऱ्यांना काय करावे हे ठरवायला सुद्धा वेळ मिळाला नाही. गोंड लुटेऱ्यांचा नायक कण्हत एका बाजूला पडला होता. तो ओरडून आपल्या अनुयायांना म्हणाला—"पाठलाग करा त्यांचा. अडवा घोडा, आणि पकडा त्या दोघांना. येथे मागे आहेत त्यांच्या समाचाराला मी व पुजारी आहोच. पाहता काय? पळा, धरा त्या दोघांना."

चार पाच गोंड घोड्याच्या पाठी मागून पळू लागले. पुजारी त्याचा डाव फसला म्हणून चिडून जाऊन दात ओठ चावीत ओरडू लागला—"त्या विक्रमकेसरीला पकडा. त्याचा बळी देऊन आज मी शिथिलेश्वरी देवीला तृप्तकरीन. बळी द्यायला याच्याहून चांगला मनुष्य कोठून मिळणार? चांगली संधी मिळाली आहे. ही संधी घालवू नका व्हा पुढे!"

विक्रमकेसरीने आपल्या तिघां अनुयायांना सावध केले आणि एक एक पाऊल मागे टाकू लागला. गोंड लुटेरे त्यांना पकडण्यासाठी पुढे सरसावले.

"गोंड नायका! तुझं चुकले बघ! तू पन्नास साठ जणांना बरोबर घेऊन यायला पाहिजे होतेस. तुला खात्रीने यश मिळाले असते. हा विक्रमकेसरी असा सहजी हाती येणारा नाही. हा जख्मी होऊन खाली पडला तरच याला पकडता येईल. जखमी माणसाचा बळी शिथिलेश्वर देवीला आवडत नाही. म्हणून आतां याचा नाद सोडचा आणि आपण आपल्या निवासस्थानी जाऊया." पुजारी म्हणाला.

"पुजारी, धनी! ते पहा, तो माझ्या अनुमायांना त्या खडकांच्या सभोवती कसा पळवून दमवून सोडीत आहे तो. तुम्ही एक काम करता का? तुम्ही मंत्रप्रयोग



करून त्याचे हात पाय कां नाही बांधून टाकीत? फुकटची मेहनत तरी वांचेल. मंत्राने काम चालण्यासारखे असेल तर तेथे शक्तीचा प्रयोग फुकट आहे." गोंडांचा नायक म्हणाला.

ते ऐकून स्मित करून पुजारी म्हणाला—"काय म्हणतोस गोंडनायका? मी याच्यासारख्या मूर्ख दुष्ट माणसासाठी आपली मंत्रशक्ती व्यर्थ खर्ची घालू? तो खुळेपणा ठरेल. म्हणून मी सांगतो ते आता कर. तू आपल्या अनुयायांना परत बोलाव, नाहीतर त्यांना सुद्धा शिखीमुख व नागमल्लीला धरून आणण्यासाठी त्या बाजूला पाठव."



"जशी आपली आज्ञा, पुजारी धनी!" असे सांगून गोंड नायकाने नम्रपणे पुजाऱ्याला नमस्कार केला व थोड्याशा निराशेनेच विक्रमकेसरीला धरण्यासाठी गेलेल्या आपल्या अनुयायांना परत येण्यासाठी हाक मारून बोलावू लागला. ते ऐकून त्याचे अनुयायी विक्रमकेसरीच्या हाती जखमी झालेल्या आपल्या एका साथी मित्राला खांद्यावर उचलून घेऊन आले.

"पुजारी धनी! आता आम्ही आपल्या गगनचुंबी गुहेत जातो. माझे अनुयायी शिखीमुख व नागमल्ली दोघांना धरून नक्की तेथेच घेऊन येतील. आपण सुद्धा थोडा वेळ विश्रांती घ्यावी." गोंड नायक म्हणाला.

"ठीक, जाऊ या. पण मला एक शंका वाटते. तुझे अनुयायी त्या दोघांना पकडू शकतील का? मी या प्रदेशात आलो तेव्हा पासून एक न एक विघ्न माझ्या कामात येत आहे. माझा एक देखील यशस्वीपणे पार पडला नाही. विन्ध्य पर्वताच्या दक्षिणेकडील भागात शिथिलेश्वरी देवीचा प्रभाव कमी असावा असे वाटते." पुजारी हताश होऊन म्हणाला.

"असेल, पुजारी प्रभू! आपल्याला या माकडांशी काय करायचे आहे? चला आपण सरळ ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात जाऊ या उडत उडत. मी पुढे उडत जाऊ का उडत?" असे म्हणत नागगिधाड हात वर करून उडण्यासाठीच जणुकाही हालवू लागला.

पुजाऱ्याने नागगिधाडाच्या मानेवर हात ठेवून त्याला ढकलले व म्हणाला–"उडायचे झाले तरी काळ वेळ पाहून उडावे लागते, मूर्ख! ही वेळ कावळ्यांनी उडण्याची आहे. गिधाडे या वेळी उडत नसतात. जमिनीवरच ती राहतात. आता तोंड बंद कर आणि गुपचुप माझ्या पाठी मागून चल." असे सांगून पुजारी चालू लागला.

गोंड नायकाबरोबर पुजारी इतर गोंड व नागगिधाड चालू लागले. त्याच वेळी विक्रमकेसरी व शबर शिखीमुख व नागमल्ली घोड्यावरून गेले होते त्या बाजूला खोऱ्यात धावत निघाले. विक्रमकेसरीला दुरून घोड्यावर बसलेले शिखीमुख व नागमल्ली चांगले दिसत होते. त्यांच्या पाठीमागून पळणाऱ्या गोंड सुद्धा त्याला दिसले.

घोड्यांना त्या खडकाळ उंचसखल जमिनीवरून जोराने पळता येत नव्हते गोंड त्यांना गाठण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करीत होते.

विक्रमकेसरीने ओरडून शिखीमुखला व नागमल्लीला धीर दिला. म्हणाला–"आम्ही आलो तुम्च्या मदतीला. पुजारी व गोंड नायक पळून गेले." असे सांगून तो व त्याचे शबर साथी धावू लागले. परंतु त्यापूर्वीच दोघे तिघे गोंड एका खडकावर उडी मारून मधल्या वाटेने घोड्याच्या वाटेवर जाऊन उभे राहले.

शिखीमुखने तलवार उपसून व नागमल्लीने भाला फेकून त्यांना जवळ येऊ दिले नाही. दोन मिनिटांनी शिखीमुखने



घोड्याला वळविले व डोंगर चढू लागला. त्याला विक्रमकेसरीचा आवाज चांगला ऐकू येत होता. त्याला वाटले की त्याच बाजूने विक्रमकेसरी त्याच्या मदतीला येत असावा.

शिखीमुखने घोडा वळवल्याबरोबर गोंड टाळ्या वाजवून व ओरडून घोड्याला धावरवून सोडण्याचा यत्न करू लागले. तो आरडा ओरडा ऐकून घोडा बिचकला व मागच्या पायावर उभा राहून खेकाळू लागला. आता आपण खाली पडणार हे ओळखून नागमल्लीने त्यापूर्वीच समोरच्या गोंड लुटेऱ्यावर नेम धरून भाला फेकला.




पण त्याने तो वार चुकविला आणि आणखी जोर जोराने ओरडू लागला.

शिखीमुख व नागमल्लीवरचा प्रसंग ओळखून विक्रमकेसरीने बांबूची गोफण असलेल्या शबराला त्या गोंड लुटेऱ्यावर नेम धरून दगड मारायला सांगितले. म्हणाला–"इतर गोंड लुटेऱ्यांचा समाचार घ्यायला आपण सर्व आहोच."

शबराने गोफणीत दगड ठेवून दोनदां ती जोराने फिरवून दगड मारला व तो बरोबर त्या गोंड लुटेऱ्याच्या छातीला जाऊन लागला. त्याबरोबर तो घेरी येऊन खाली पडला व डोंगरावरून घसरत खाली



जाऊ लागला. तो घसरत घोड्यावर येऊन आदळणार हे पाहून घोडा मागे फिरला. त्याचा पाय एका दगडावर पडला व झोक जाऊन तो जमिनीवर पडला व पाठीवरच्या दोघां स्वारांसकट घसरत खाली जाऊ लागला. शिखीमुख व नागमल्ली घोड्याला लागलेल्या धक्याने खाली पडले व दोघे डोंगरावरून खाली घसरत जाऊ लागले.

गोंड ते दृश्य पाहून आनंदाने उड्या मारून ओरडू लागले–"पकडा, धरा त्यांना! पळून जाऊ देऊ नका." असे ओरडत ते जवळ येऊ लागले. परंतु विक्रमकेसरीने ते जवळ पोचण्यापूर्वी नेम धरून एका मागून एक तीर सोडले. एक गोंड तीर लागताच खाली पडला. तोपर्यंत शिखी उठून उभा राहूला होता. त्याने समोरच्या एका गोंड लुटेऱ्याला लाथ मारून खाली पाडले व त्याच्या हातातला भाला हिसकावून घेतला.

तिकडे नागमल्ली घोड्यावरून खाली पडल्यावर बेशुद्ध झाली. तिला उचलून घेऊन दोन गोंड पळू लागले. इतर गोंड काही वेळ शिखीमुखशी युद्ध करीत राहिले. इतक्यात विक्रमकेसरी व शबर जवळ येऊ

















लागलेले पाहून ते खाली दरीत पळून गेले आणि खडकाआड पळत दृष्टीआड झाले.

शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांनी पळणाऱ्या गोंडांचा पाठलाग केला. परंतु शिखीमुखला घोड्यावरून खाली पडल्यामुळे पळणे जड वाटू लागले. तो पर्यंत विक्रम-केसरी त्याच्या जवळ येऊन पोचला.

"विक्रम! आपल्या तोंडाला काळे फासले गेले बघ! आपण नागमल्लीचे रक्षण करु शकलो नाही ही गोष्ट कळल्यावर तिचा बापच नव्हे, तर माझे बाबा सुद्धा मला समोर उभा राहू देणार नाहीत. आपण गोंड लोकांशी चार हात केल्याशिवाय नागमल्लीला सोडवून आणणे शक्य नाही. तू शबरांच्या वस्तीत जाऊन दहावीस जणांना मदतीला बोलावून घेऊन ये. मी त्या दुष्टांचा माग घेत जातो. ते नागमल्लीला कोठे घेऊन जात आहेत हे पाहतो." शिखीमुख विक्रमला म्हणाला.

विक्रमकेसरीला ते बरोबर वाटले नाही व तो काही बोलणार होता. परंतु शिखी-मुखने त्याला बोलू दिले नाही. म्हणून नाइलाजाने विक्रमने एका शबराला शिखी-मुख जवळ रहायला सांगितले व दोघां शबरांना बरोबर घेऊन शबरच्या वस्तीकडे निघाला.

शिखीमुख गोंडांच्या पावलांच्या खुणा पहात अर्ध्या तासाने डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या एका जंगलात पोचला. त्याला झाडीत कित्येक लोक मोठमोठ्याने ओरडत असलेले दिसले. त्याने आपल्या साथी शबराला सावध केले व आपली चाहूल न देण्यास खूण केली. नंतर स्वतः हळूच एका झाडावर चढून त्याने खाली पाहिले. झाडीत एका जागी वाघाचा पिंजरा होता. गोंड नागमल्लीला उचलून तिकडे नेत असलेले दिसले.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# अजातशत्रु

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुला पाहून कदाचित लोकांना वाटेल की तू असमर्थ आहेस. पूर्वी कलिंग देशाचा राजा अजातशत्रूला पाहून असाच भ्रमात पडला होता. तुला ही रात्रीची वेळ कंटाळवाणी वाटू नये म्हणून मी अजातशत्रूची गोष्ट सांगतो. ऐक." असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी एक चालुक्य वंशी राजा राज्य करीत असे. तो सुशील, शांत स्वभावाचा एक प्रजावत्सल राजा होता. त्याच्या मनाला कधी राग लोभ शिवला नाही. तो उदार व दयाळु होता. अपराध्याला दंड देणे हे राजाचे कर्तव्यच आहे. म्हणून तो

     



कर्त्तव्य म्हणून अपराध्याला शिक्षा करी. परंतु अपराध जेवढा असेल तेवढीच शिक्षा करी. स्वतः अपराध्याला सुद्धा या गोष्टीची जाणीव होत असे की राजा कधी अन्यायाने जास्त शिक्षा देणार नाही. ते राजाने केलेली शिक्षा आनंदाने कबूल करीत. म्हणून त्याला लोक अजातशत्रु म्हणू लागले.

अजातशत्रूच्या राज्याला लागून कलिंग देशाचे राज्य होते. कलिंग देशाचा राजा दुष्ट, अहंकारी व परक्याचे वैभव पाहून हेवा करणारा होता. त्याची प्रजा पण सुखी नव्हती. राजाच्या अत्याचाराला भिऊन पंडित, विद्वान व कवि कलिंग देश सोडून अजातशत्रूच्या आश्रयास येऊन राहू लागले. कारागीर पण अजातशत्रूच्या राज्यात येऊन राहू लागले. त्यामुळे अजातशत्रूच्या राज्याची भरभराट होऊ लागली. हे सर्व पाहून कलिंग देशाच्या राजाचा राग अजातशत्रूवर वाढू लागला. कोणी अजातशत्रूची स्तुती केली की कलिंग राजाचा द्वेषाग्नि भडके. त्याने अजातशत्रूच्या राज्यावर आपले सैन्य पाठवून हल्ले करायला सुरवात केली. परंतु अजातशत्रूची प्रजा त्याचे हल्ले परतवून लावी. अशातऱ्हेने कलिंग राजाचा तो प्रयत्न देखील फुकट गेला.

पुढे कलिंग राजाने अजातशत्रूच्या राज्यावर स्वारीच करण्याचे ठरविले. त्याला वाटत होते की अजातशत्रु प्रजावत्सल व दयाळू राजा आहे, त्याच्याकडे सैन्यबळ नसणार. कारण त्याने कधी दुसऱ्याच्या राज्यावर स्वारी करून ते राज्य जिंकल्याचे त्याने ऐकले नव्हते. अशा असमर्थ राजाच्या राज्यावर स्वारी करून ते राज्य आपल्या राज्याला जोडावे अशा विचाराने त्याने स्वारी केली.

अजातशत्रूला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले. कारण कलिंग राजाने पूर्वी कधी पत्र पाठविले नव्हते किंवा राग दर्शविला नव्हता. मग अचानक स्वारी करण्याचे कारण काय, अजातशत्रूला कळेना. पण कलिंगराजाला वाटत होते तसा अजातशत्रु असमर्थ राजा नव्हता. त्याने प्रजेला आपापली शस्त्रास्त्रे घेऊन युद्धास सज्ज होऊन येण्यास कळविले. राजाच्या हाकेला प्रजा धावून आली व शत्रूला तोंड देण्यास सज्ज झाली.



कलिंगराजा ससैन्य राज्यांत शिरला. अजातशत्रूच्या प्रजेने चारीबाजूंनी त्या सैन्याला कोंडीत धरले. सैन्याचा दाणागोटा बंद केला. कलिंगदेशाचे सैनिक आपल्या राजापासून असंतुष्ट होते. ते आपल्या राजाच्या विरुद्ध उलटले. शेवटी कलिंग-देशाचा पूर्ण पराभव झाला आणि स्वतः राजा कैद झाला. त्याला अजातशत्रूसमोर आणून उभे करण्यात आले. तो मान खाली करून उभा होता.

अजातशत्रूने आपल्या सरदारांचा सल्ला घेतला की कलिंगराजाला कोणत्या प्रकारची शिक्षा द्यावी. काही सरदारांचे म्हणणे पडले की त्याचा शिरच्छेद करून त्याचा काटा कायमचा मोडून टाकावा. काहींनी असा सल्ला दिला की त्याचे डोळे फोडून त्याला सोडून द्यावे. आणखी काही जणांनी त्याच्या शरिराचे तुकडे करून ते कुत्र्या मांजरांना खायला घालावे असा देखील सल्ला दिला.

सर्वांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेऊन राजा म्हणाला—"त्याला बंधनमुक्त करून आदरपूर्वक स्वदेशी पोचते करा. राजाचा उदार स्वभाव सरदारांना माहीत होता. म्हणून कोणी काही बोलला नाही. कलिंगच्या राजाला त्याच्या राज्यात सुखरूप पोचविण्यात आले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मला हे कळत नाही की कलिंग-राजा अजातशत्रूचा एकमेव शत्रू होता.

त्याला ठार करून त्याचा काटा कायमचा दूर करण्याचे सोडून त्याला त्याने सोडून कां दिले? त्याला आपल्या 'अजातशत्रु' या उपाधीचा मोह होता म्हणून? की कलिंगराजा मैत्रीचा व्यवहार केल्यास मित्र होईल म्हणून? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"अजातशत्रूने कलिंगच्या राजाला सोडले त्याची कारणे हीच होती असे म्हणणे बरोबर होणार नाही. कारण कलिंगचा राजा त्याचा एकमेव शत्रु होता हे म्हणणेच मुळात बरोबर ठरणार नाही. कारण अप्रगट शत्रु केव्हा व कोणत्या परिस्थितीत डोके वर काढतील हे सांगणे कठिण आहे. शिवाय कलिंगच्या राजाची मुले व नातवंडे वैर मनात बाळगणार नाहीत असे थोडेच आहे. कलिंगराजाच्या वधाने त्यांच्या मनात सुडाची भावना वाढेल व ते संधीची वाट पहात राहतील. नंतर कलिंगराजाला सोडून दिल्याने अजातशत्रूचे नुकसान काहीच होणार नव्हते. कारण कलिंगराजाचे फार नुकसान झाले होते. एवढे मोठे सैन्य उभारून पुन्हा अजातशत्रूच्या राज्यावर स्वारी करण्याचा विचार त्याच्या मनात आला सुद्धा नसता. त्याने आपल्या वारसांना सुद्धा स्वारी करण्यास सांगितले नसते. कारण अजातशत्रूच्या उपकाराच्या भाराखाली त्याला वांकावे लागले होते. या व अशाच कारणास्तव कलिंगराजाला अजातशत्रूने सोडले असावे. तसे करून त्याने आपली अजातशत्रू उपाधि सार्थक असल्याचे पण साबित केले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# वेडे पीर

बगदाद येथील वेड्यांच्या दवाखान्यात दोघां वेड्यांची परस्परांशी फार मैत्री होती. त्यांच्या पैकी एक श्रीमंत होता. परंतु व्यापारात आपले सर्व घालवून बसला व त्याला वेड लागले. दुसरा चांगला शिकला सवरलेला होता. त्याचं एकीवर प्रेम होतं. पण तिने त्याच्याशी लग्न केले नाही म्हणून त्याला वेड लागले होते.

श्रीमंत वेडा रोज तुरुंगाच्या अधिकाऱ्याकडे जाई व विनवण्या करी की त्याच्या वैरी व्यापाऱ्यांनी कट करून त्याला वेड लागले असे जाहीर करून त्याला वेड्यांच्या दवाखान्यात आणून सोडले, मी वेडा नाही. मला घरी जाऊ द्या." परंतु त्याच्या विनवण्याकडे कोणी लक्ष दिले नाही.

एकदा तो मनुष्य दवाखान्याच्या आवाराच्या भिंतीवर चढून बसला व घोड्यासारखा "चल चल" असे त्या भिंतीला म्हणू लागला. दवाखान्याच्या अधिकाऱ्यांना वाटले की हा जर जमिनीवर पडला तर जागच्या जागी गार होईल. म्हणून त्यांनी त्याला खाली उतरविण्याचा पुष्कळ यत्न केला. पण तो भिंतीलाच घोडा समजून "चल चल" म्हणत होता.

इतक्यात त्याचा मित्र तेथे आला व अधिकाऱ्याला म्हणाला–"मला तुम्ही घरी जाऊ दिलेत तर मी आपल्या मित्राला खाली उतरवून दाखवीन."

अधिकाऱ्याने ती अट मान्य केली. त्या वेड्याने एक मोठी कातरी आणून आपल्या श्रीमंत वेड्याला दाखविली व म्हणाला– "ही पहा मी ही भिंत कातरून टाकतो. तू खाली पडशील."

भिंतीवर बसलेला श्रीमंत वेडा आपल्या मित्राच्या हातातली कात्री पाहून म्हणाला–

"थांब रे! मला उतरू देशील की नाही? मग टाक कातरून पाहिजे तर!" असे सांगून तो घाईघाईने खाली उतरला. दवाखान्याच्या अधिकाऱ्याने त्याला धरून कोठडीत टाकले व दुसऱ्या वेड्याला सोडले. तो घरी निघून गेला.

* * *

वेडे फक्त वेड्यांच्या दवाखान्यातच असतात असे नाही, दवाखान्याबाहेर देखील कित्येक वेडे पीर आढळतात.

मुल्ला नासिरुद्दीन नावाच्या एका माणसाने एकदा एका सार्वजनिक स्नानागारात जाऊन खूप स्नान केले. त्याच्यासारखेच स्नान करून काही लोक फर्शीवर घोरत पडलेले त्याला दिसले. त्याला पण झोप आली. परंतु त्याला एका गोष्टीची शंका वाटली. त्यांच्या मध्ये झोपल्यावर कदाचित तो कोण हे ओळखता येणार नाही. म्हणून तो खुणेसाठी एक लहानशी सुरई कमरेला बांधून झोपला.

थोड्या वेळाने झोपलेल्या लोकांपैकी एकाची झोप मोडली. मुल्ला नासिरुद्दीनच्या कमरेला सुरई बांधलेली पाहून त्याचे मन त्या सुरईवर गेले. त्याने ती सुरई काढून घेतली व आपल्या कमरेला बांधून ठेवून झोपला.

मुल्ला नासिरुद्दीनची झोप मोडली तेव्हां त्याच्या कमरेला सुरई नव्हती, ती दुसऱ्याच्या कमरेला बांधलेली होती. म्हणून त्याने त्या माणसाला जागे करून विचारले–"काय हो, मी मीच असेन तर माझ्या कमरेची सुरई कोठे गेली? तुम्ही मी असाल तर मी कोण?"

* * *

इराण देशातला एक जमीनदार घोड्यावर बसून कोठे तरी जात होता. त्याचा नोकर घोड्याच्या पुढे पुढे धावत होता. संध्याकाळच्या सुमारास ते एका गावी येऊन पोचले. त्यांनी रात्री विश्राम घेण्यासाठी एका जागी उतरण्याचे ठरविले.

दोघांचे खाणेपिणे झाल्यावर जमिनदार नोकराला म्हणाला–"दिवसभर पळत राहून तू दमला असशील म्हणून तू मध्यरात्र होईपर्यंत झोप. मी पाहरा देतो. मी तुला मध्यरात्रीच्या सुमारास जागा करीन व नंतर मी झोपेन. तू उजाडेपर्यंत पाहरा दे."

त्याप्रमाणे नोकर झोपला. मध्यरात्र होईपर्यंत मालक जागा राहून पाहरा देत होता. नंतर नोकराला जागा करून म्हणाला–"आता उजाडेपर्यंत पाहरा देण्याचे काम तुझे." असे सांगून तो झोपला.





एका तासाभराने मालकाची झोप मोडली. तेव्हां त्याने नोकराला हाक मारून विचारले–"काय करतो आहेस रे?"

"विचार करतो आहे, मालक!" नोकर म्हणाला.

"काय विचार करतो आहेस रे?" मालकाने विचारले.

"काटचाला अणकुचीदार कोण बरे करतो? या विषयी विचार करीत आहे." नोकर म्हणाला.

"शाबास! छान, हुशार दिसतोस." मालक म्हणाला आणि पुन्हा झोपी गेला.

एका तासाभराने पुन्हा त्याची झोप मोडली. त्याने नोकराला हाक मारून विचारले–"काय करतो आहेस रे?"

"विचार करतो आहे, मालक." नोकर म्हणाला.

"आता कसला विचार करतो आहेस रे?" मालकाने विचारले.

"जमीन खणण्यासाठी आपण जमिनीत कुदळ मारतो तेव्हां जमिनीत ती शिरल्याने जो खड्डा होतो त्या जागची माती कोठे जाते? या विषयी मी विचार करीत आहे." नोकर म्हणाला.

"छान! हुशार आहेस बरं का!" मालक म्हणाला आणि पुन्हा झोपी गेला.

एका तासानं पुन्हा त्याची झोप मोडली. त्याने नोकराला हाक मारून विचारले–"आतां काय करतो आहेस रे?"

या खेपेस पण नोकराने तेच उत्तर दिले–"विचार करतो आहे, मालक!"

"काय विचार करतो आहेस रे?" मालकाने विचारले.

"काल रात्री आपण घोड्यावर बसून जात होता व मी पुढे पुढे पळत होतो. आता घोडा दिसत नाही, घोड्याचा लगाम धरून पुढे पुढे कोण चालत असेल बरे? हा विचार करीत आहे." नोकर म्हणाला.






# जग असं आहे

एका गावी चंदू नावाचा कोष्टी रहात असे. विणकामात त्याची बरोबरी करू शकणारा जवळ पास कोणी नव्हता. म्हणून त्याने खूप पैसे मिळविले. त्याच्या जवळ पैसे होते म्हणून त्याचे नातेदार व मित्र मंडळी गुळावरच्या मुंग्यांसारखी त्याच्याकडे येऊ लागली. कोणी भीक मागायला आला तर रिकाम्या हाताने परतला नाही. असा उदार होता चंदू कोष्टी. परंतु त्याचे हे दानशूरत्व शेवटी अंगाशी आले. त्याच्या जवळचा सर्व पैसाअडका संपुष्टात आला. हातमागाची दुरुस्ती करून घ्यायला सुद्धा पैसे जवळ उरले नाहीत. शेवटी दोन वेळचे जेवण मिळणे कठीण झाले. त्याला दुसऱ्यासमोर हात पसरावा लागला.

तो आपल्या जवळच्या नातलगांना व मित्र मंडळींना जाऊन भेटला. पण कोणी त्याला जवळ उभे देखील केले नाही. त्याने फक्त उधार म्हणून थोडे पैसे मागितले होते. ते सुद्धा हातमागाची दुरुस्ती करण्यासाठी. पण कोणी त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. एका दोघांनी त्याच्या खर्चिक स्वभावावर व दानशूरत्वावरच तोंड सुख करून घेतले. त्या सर्वांनी एका काळी चंदूची खोटी स्तुती करून त्याच्या कडून पैसे मागून घेतले होते. उशिरा का होईना चंदू कोष्टयाचे डोळे उघडले. आता हात मागावर काम करणे तर अशक्यच, मजुरी करण्याची पाळी आली. पण धीर खचू न देता आलेल्या प्रसंगाला धैर्याने तोंड देण्याचे त्याने ठरविले.

त्याच सुमारास गावात पाण्याच्या सोयीसाठी एक मोठा तलाव खोदण्याचे काम सुरू झाले होते. त्या कामाची सर्व व्यवस्था एका वयोवृद्ध व अनुभवी गावकऱ्याने आपल्याकडे घेतली होती.



जवळपासच्या गावांतले मजूर काम करायला आले. चंदू कोष्टीपण कुदळ फावडे घेऊन आला. त्या वयोवृद्ध गृहस्थाने मजुरांनी भराभर काम करावे या साठी जाहीर केले की तलाव खणण्यासाठी जी जागा निवडण्यात आली आहे, तेथे खणत असता कोणाला काही ठेवा सापडला तर तो त्या मजुराच्या मालकीचा मानला जाईल. त्यावर दुसऱ्या कोणाचा अधिकार मानण्यात येणार नाही. पाहू या कोणाच्या नशिबात काय लिहिले आहे ते."

ते कळल्यावर मजुरांनी उत्साहाने कामाला सुरवात केली. काम करीत असता

चंदू कोष्टयाला एक गोष्ट सुचली. रात्री घरी गेल्यावर तो त्या प्रयत्नाला लागला. त्याने ती गोष्ट स्वतःच्या बायकोला सुद्धा सांगितली नाही.

त्याने एक जुना तांब्याचा हंडा घेतला व त्यात खापरे भरून हंड्याचे तोंड पत्रा लावून बंद केले आणि रात्री एका जागी तो हंडा नेऊन पुरून ठेवून दिला आणि घरी येऊन झोपला.

दुसऱ्या दिवशी मजूर कामाला आले त्यांच्या बरोबर चंदू पण आला. त्याने भांडे पुरून ठेवले होते त्याच्या जवळपास खणायला सुरवात केली. खणत असता 'खण' असा आवाज झाला. बाजूला उभे असलेले मजूर ओरडले—"अरे चंदू! सोन्याचा ठेवा रे ठेवा!" सर्व मजूर गंमत पहायला जमा झाले. चंदूने माती बाजूला सारून हंडा बाहेर काढला.

"याला म्हणतात नशीब! चंदू उघड तर हंड्याचे तोंड! पाहू तर या आत काय आहे ते." मजूर म्हणाले. तलाव खणण्याची जबाबदारी ज्या वयोवृद्ध गृहस्थाने स्वतःवर घेतली होती त्याला पण भांड्यात काय आहे हे पाहण्याची इच्छा होती. पण चंदू म्हणाला—



"देवाने दिलेला हा ठेवा. देवाची पूजा केल्या शिवाय उघडून पाहणे बरोबर नाही. मी ग्रहशांत करून एक ब्रह्मभोज देईन व नंतर हा हंडा उघडून पाहीन."

"अरे बाबा! तुझे नशीब उघडले. जा घरी. कशाला मजुरी करतोस आता?" तो वयोवृद्ध मनुष्य म्हणाला.

चंदू हंडा घेऊन घरी आला. हंडा घरात ठेवून स्वस्थ झोपी गेला.

पण दुसऱ्या दिवशी पुन्हा तो कुदळ फावडे घेऊन तलाव खणण्याच्या कामावर आला तेव्हां त्या वयोवृद्ध मनुष्याने विचारले—"काय रे तुझे दारिद्र्य गेले. आता कशाला मजुरी करतोस रे?" इतर मजुरांनी पण त्याला तेच विचारले.

तेव्हां तो म्हणाला—"काय सांगू हो? मी भटजींना विचारले की चांगलासा मुहूर्त पाहून सांगा. त्यांनी माझी कुंडली पाहिली व म्हणाले—"ज्या घडीला हा हंडा मिळाला ती वेळ व कुंडली या वरून हंडा उघडायला निदान तीन वर्षे लागतील. कारण ग्रहशांत करावी लागेल व अन्नदान पण करावे लागेल. या सर्वाला मी कोठून आणू पैसे? म्हणून मला पैसे मिळवूनच ग्रहशांत करावी लागणार.



आणखी तीन वर्षे पोटाची खळगीपण भरली पाहिजे ना?"

प्रत्येकाला त्याच्याबद्दल सहानुभूती वाटली. तो कुदळ फावडे घेऊन काम करीत होता. पण प्रत्येक त्याचा आदर करी. कारण तो तीन वर्षांनी श्रीमंत होणार होता.

चंदूला मिळालेल्या गुप्त हंड्याची गोष्ट त्याच्या नातेवाइकांना पण कळली. ते त्याला भेटायला व त्याचे अभिनंदन करायला धावले. काहीजण म्हणाले—"नशीबवानाला कोणत्या गोष्टीची कमतरता? देवच पाठीराखा असल्यावर सर्व जग उलटले तरी भिण्याचे काय कारण?












आम्हांला किती आनंद झाला म्हणून सांगू? तू पोटासाठी मजुरी करणे बरोबर नाही."

चंदू म्हणाला–"तुम्ही म्हणता ते सर्व बरोबर आहे? पण या टीचभर पोटाची खळगी भरायला काही मार्ग हवा की नाही. तीन वर्षे त्या हंड्याला हात लावता येणार नाही, असे भटजींचे म्हणणे आहे. माझे माग नादुरुस्त झाल्यामुळे बंद पडले आहेत. ते दुरुस्त केले तर पुन्हा धंदा चालू होईल. निदान एक हजार रुपये तरी नवीन काम सुरु करायला लागतील."

"कधी काळी आम्ही आमच्याकडे पैसे नाहीत म्हटले म्हणजे आमच्याकडे कधीच पैसे नाहीत असा त्याचा अर्थ नाही, आम्ही करतो पैशांची व्यवस्था व तू ही मजुरीची कामे बंद कर."

चंदूने 'नको नको' म्हणत असता त्याच्या दोघां तिघां नातलगांनी प्रत्येकी चार पांचशे रक्कम दिली व हजारच नव्हे तर दीड दोन हजार रुपये चंदूला मिळाले. त्याने जुने माग दुरुस्त करण्या-ऐवजी नवे मागच विकत घेतले आणि निरनिराळ्या प्रकारचे कापड विणायला सुरवात केली. त्याने दुसऱ्याच वर्षी आपल्या नातलगांचे कर्ज फेडले. दोन वर्षांत त्याच्याकडे पुष्कळ पैसे जमा झाले व त्याचा धंदा चांगला चालू लागला.

हंडा उघडण्याचा मुहूर्त जवळ आला. सर्व नातलग व मित्रमंडळी जमा झाली. ब्राह्मणांनी मंत्रघोष केला. ग्रहशांत झाली व ब्रह्मभोज झाल्यावर मोठ्या समारंभाने हंडा उघडण्याचा विधी झाला. परंतु हंड्यात खापराचे तुकडेच निघाले.

जे लोक चैन करण्याच्या हेतूने आले होते त्यांना निराश व्हावे लागले.

चंदूने केलेली युक्ती यशस्वीपणे पार पडली. 'जग असे आहे' असे समजून माणसाने वागावे हा धडा त्याने घेतला.





# पाण्याची किंमत

सिरपुर नावाच्या गावी विजयेंद्र नावाचा एक राजा राज्य करीत असे. सिरपुरच्या चारी बाजूला दाट जंगल व डोंगर होते. त्या प्रदेशात भिल्ल जातीचे लोक रहात असत.

भिल्ल जातीचा नायक दर वर्षी विजयेंद्र राजाकडे जंगलातली कोणती तरी उत्तम वस्तू भेट म्हणून पाठवीत असे. ती भेट तशी मूल्यवान नसे. पण भिल्लाच्या राजभक्तीचे एक चिन्ह म्हणून त्याचे महत्व होते.

दर वर्षीप्रमाणे त्या वर्षी भिल्ल नायकाने दिलेली भेट घेऊन सुमंग नावाचा एक भिल्ल राजधानीत आला. राजाने त्याला दरबारात बोलावून त्याचा यथायोग्य सत्कार केला. सुमंगने बांबूच्या काड्यांच्या एका सुंदर करंडीतून एक झाकण असलेला बांबूचा पेला भक्तिपूर्वक राजाला सादर करून नमस्कार केला.

सर्व दरबारी त्या पेल्यात काय आहे हे औत्सुक्याने पहात होते. राजाने पेला घेऊन त्याचे झाकण काढले व मोठ्याने हसत पेला उलटा केला. त्यात पाणी होते ते जमिनीवर सांडले.

राजा सुमंगकडे वळून म्हणाला–"तुझ्या धन्याचे डोके फिरले तर नाही ना? त्याला जाऊन सांग असला निरर्थक नजराणा पाठविण्याची गरज नाही."

सुमंग हात जोडून नम्रपणे म्हणाला–"क्षमा करा महाराज! माझ्या धन्याने आपणांकडे जे पाणी पाठविले आहे ते नुसते साधे पाणी नाही. नुकताच आम्हांला एका जागी शिवलिंगावर संतत अभिषेक करणारा एक झरा आढळला. ते पाणी अमृतासारखे गोड आहे. म्हणून आमच्या धन्याने ते आपणांकडे पाठविले. आपण ते साधे पाणी समजून फेकून दिलेत, पण

श्री. ग. गो. पोफळे



याची किंमत एखाद्या राज्या एवढी ठरल्यास नवल नाही.

सुमंग जे म्हणाला त्यातला पहिला भाग राजाला आवडला, परंतु पुढे तो जे म्हणाला ते ऐकून राजाला राग आला. तो रागाच्या भरात म्हणाला—"हे पेलाभर पाणी देऊन जा मिळव राज्य. मी तुझ्याशी आपल्या मुलीचे लग्न करून देईन."

सुमंगने लवून राजाला नमस्कार केला आणि परत जाऊन आपल्या धन्याला जे घडले ते जसेच्या तसे सांगितले. आपल्या अनुयायाचा शब्द खरा करून दाखविण्याची जबाबदारी भिल्ल नायकावर येऊन पडली.

काही दिवसांनी भिल्ल नायकाने राजाकडे एका मनुष्याला पाठविले. तो राजाला जाऊन म्हणाला—"महाराज! जंगलात महादेवगिरी पर्वताच्या दरीत असंख्य रानटी डुकरे आहेत. त्यांची शिकार करण्यास आमच्या धन्याने आपणास आदरपूर्वक बोलाविले आहे.

विजयेंद्र तो निरोप कळल्यावर भिल्लांच्या वस्तीत गेला. भिल्ल नायकाने राजाच्या स्वागतार्थ एक मोठी मेजवानी दिली. त्या मेजवानीला उत्तमोत्तम गोड पक्वान्ने वाढण्यात आली होती. मेजवानी संपल्यावर विजयेंद्र घोड्यावर बसून भिल्ल नायक व तिघां अंगरक्षकांना बरोबर घेऊन अन्य शिकाऱ्यासह महादेवगिरी पर्वताच्या खोऱ्यात निघाला.

झुडपे छाटीत वाट काढीत पुढे जावे लागले. खोऱ्यात पोचेपर्यंत बराच उशीर झाला. इतका श्रम झाला, पण तेथे पोचल्यावर त्यांना श्रमाचे फळ मिळाले. तेथे अनेक रानटी डुकरे होती. त्यांची शिकार करण्यात राजा तहान भूक सर्व विसरून गेला. एक गलेलठ्ठ डुक्कर राजाला दिसले. राजाने त्याला नेम धरून बाण सोडला. पण तो बाण डुकराला लागला नाही व डुक्कर पळू लागले.

डुकराचा पाठलाग करीत धावणारा राजा दृष्टीआड होताच भिल्ल नायकाने एक विशेष खुणेचा आवाज काढला व त्याला लगेच त्याचे उत्तर पण मिळाले. थोड्याच वेळाने तेथे सुमंग आला. भिल्ल नायकाने राजा ज्या मार्गाने गेला होता ती दिशा दाखविली. सुमंग पोचण्यापूर्वी राजाने त्या डुकराला ठार केले होते. पण त्याला त्या वेळी फार तहान लागली होती. मेजवानीच्या वेळी त्याने जी गोड पक्वान्ने खाल्ली होती त्यामुळेच त्याला जास्त तहान लागली ही गोष्ट त्या वेळी राजाच्या लक्षात आली नाही. तहानेने जीव कासावीस झाला. डोळ्यासमोर काळोखी आल्यासारखे त्याला भासले. "पाणी! पाणी!" असे तो ओरडू लागला. पण शब्द तोंडावाटे बाहेर येत नव्हते. एका मोठ्या दगडावर राजा आडवा झाला व त्याला वाटले की आपला शेवट जवळ आला.

त्याच वेळीं सुमंग राजाच्या जवळून पुढे निघून जाऊ लागला, जणुकाही त्याने राजाला पाहिलेच नाही. राजाने पण सुमंगला ओळखले नाही. राजा हाक मारून म्हणाला—"कोण रे बाबा तू? मला तहान लागली आहे."






"माझ्या जवळ आहे पाणी एक पेलाभर, देईन प्यायला. पण मला त्याबद्दल काय द्याल?" सुमंगने विचारले.

"माझा जीव जातो आहे. पाणी दे, तू मागशील ते देईन." राजाने विनवण्या करीत पाणी मागितले.

सुमंगने करंडी टोपलीतून बांबूचा पेला काढून राजाच्या हातात दिला.. राजाने सर्व पाणी गटागटा पिऊन टाकले. त्याला जिवात जीव आल्यासारखे वाटले. नंतर त्याने हातातला पेला पाहिला. आपण असाच पेला पूर्वी कधी पाहिला असावा असे राजाला वाटले. सुमंगकडे पण त्याने जरा न्याहाळून पाहिले. त्याला देखील कोठे तरी पाहिल्यासारखे राजाला आठवू लागले.

"तू माझा जीव वांचविलास. याबद्दल तू काय वाटेल ते मागून घे." राजा म्हणाला.

"मला आणखी काही नको, राज्य द्यावे." सुमंग स्मित करून म्हणाला.

राजाला तेव्हां पूर्वीची सर्व गोष्ट आठवली व त्याने सुमंगला ओळखले. म्हणाला—"तू होय?"

त्यानंतर राजा प्रेमाने त्याला भेटला व म्हणाला—"तू म्हणालास ते करून दाखविलेस. तुला राज्य हवे की माझ्या मुलीशी लग्न करणार? की दोन्ही?"

"महाराज! मला यांपैकी काही एक नको. आपली कृपा असली म्हणजे पुरे. आपल्या राज्यात आम्ही सर्व सुखी आहो, आपल्या रक्षणार्थ आपला जीव ओंवाळून टाकावा लागला तरी आम्ही तयार आहो. आपण राजकन्येचा विवाह एकाद्या राजकुमाराशी करून द्यावा."

राजा सुमंगचा नम्रपणा व राजभक्ती पाहून खूष झाला. त्याने भिल्ल नायक आणि सुमंग दोघांना राजधानीत आदर पूर्वक बोलावून त्यांचा सत्कार केला.





# खुनी

फार प्राचीन काळी चीन देशात एक शिपी रहात असे. तो खाऊन पिऊन सुखी होता. तो स्वभावाने विनोदी होता. तो मधून मधून आपल्या बायकोबरोबर गावात गंमत पहात हिंडायला जात असे. असाच एकदा तो शिपी बायकोबरोबर गावात हिंडून संध्याकाळी घरी परत येत होता, तेव्हां त्याला वाटेत एक खुजा मनुष्य दिसला. तो गिड्डूमल हास्यविनोद करून प्रेक्षकांना हसवीत होता. इतरांबरोबर शिपी व त्याची बायको पण त्याचा खेळ पाहून खूप हसले. त्यांना त्याचा खेळ त्याचा इतका आवडला की त्यांनी त्या गिड्डूमलला रात्री त्यांचे आतिथ्य स्वीकार करण्यास विनंती केली व त्याने ती मान्य केली.

गिड्डूमलला आपल्या घरी पोचता करून शिपी बाजारात गेला व भाजलेली मासळी, रोटी, लिंबे व पांढऱ्या तिळाची रेवडी विकत घेऊन परत आला. रात्री तिघे बरोबर जेवायला बसले.

गिड्डूमल जेवणात गर्क असता शिप्याच्या बायकोने एक मासा गिड्डूच्या तोंडात कोंबला व त्याचे तोंड धरून तो मासा खाऊन टाकायला दोघांनी आग्रह करून सांगितले. पण दुर्दैवाने माशाचा एक काटा गिड्डूमलच्या घशात अडकला व तो तत्क्षण गतप्राण झाला.

ते पाहून शिपी घाबरून गेला. म्हणाला—"हे देवा! हे काय झाले? या बिचाऱ्याचा जीव आमच्या मुळे गेला. आतां काय करायचे?"

"झाले ते झाले. आता रडत बसून राहण्यात काय अर्थ आहे? पुढे काय करायचे याचा विचार करा." शिप्याची बायको म्हणाली.

"सांग, काय करायचे?" शिप्याने विचारले.



"याच्या अंगावर एक पांघरूण घालून याला उचलून घेऊन जाऊ या. कोणी विचारले तर सांगू आमचा मुलगा आजारी आहे, त्याला वैद्याला दाखवायला घेऊन जातो आहो." बायको म्हणाली.

शिप्याने त्याप्रमाणे त्या गिड्ड्याला एक चादर पांघरून उचलून घेतले व गल्लीत आला. त्याची बायको रडत होती, "माझ्या मुलाला देवी आल्या हो, याला आता कोण वांचवील? आहे का कोणी वैद्य वांचविणारा?"

देवीचे नाव ऐकून गल्लीतला एक देखील मनुष्य जवळ आला नाही. जे जवळ होते ते दूर पळून गेले. तरी एकाने वैद्याचे घर दाखविले.

शिप्याने वैद्याच्या दारावर थाप मारली. एका निग्रो बाईने येऊन दरवाजा उघडला. शिप्याच्या बायकोने त्या निग्रो बाईच्या हातावर एक चांदीचे नाणे ठेवले व म्हणाली—"माझ्या मुलाला भयंकर ताप आला आहे. वैद्यबुवांना जाऊन लवकर यायला सांग. उशीर झाला तर जीव धोक्यात आहे असे ही सांग."

तो निरोप घेऊन ती निग्रो बाई वरच्या मजल्यावर वैद्य झोपला होता तेथे गेली. ती संधी साधून शिंपी व त्याची बायको दोघे गिड्ड्याचे प्रेत वैद्याच्या घरात शिरून जिन्यात टाकून पसार झाली.

निग्रो बाईने माडीवर जाऊन वैद्यबुवांना ते चांदीचे नाणे दिले व म्हणाली—"खाली कोणी दोघे आजारी मुलाला घेऊन आले आहेत." वैद्य चांदीचे नाणे पाहून खूष झाला. त्या आनंदातबरोबर दिवा सुद्धा घेतला नाही व घाईघाईने जिना उतरू लागला आणि गिड्ड्याच्या प्रेताला त्याचा पाय लागला व प्रेत गडगडत खाली येऊन पडले. वैद्याने खाली येऊन पाहिले तो रोगी निश्चेष्ट पडला होता.

वैद्याला वाटले की कदाचित आपला पाय लागून रोगी खाली जाऊन पडला व त्यामुळेच रोग्याचा जीव गेला असावा. आता काय करायचे या काळजीत तो पडला. त्याने त्याच्या बायकोला जे घडले ते जाऊन सांगितले.

तेव्हां वैद्याची बायको म्हणाली—"हे प्रेत घरात ठेवणे धोक्याचे आहे. सकाळी हे प्रेत आपल्या घरात दिसले तर मोठेच संकट जिवावर येईल. हे प्रेत गच्चीवर नेऊन शेजाऱ्याच्या परसात टाकून दिले की झाले. आपला शेजारी सुलतानाच्या महालात सैपाक्यावरचा अधिकारी आहे. त्याच्या घरी कुत्री, मांजरी व उंदरांची गर्दी आहे. ती हे प्रेत खाऊन टाकतील."

वैद्याला तो सल्ला पसंत पडला. दोघांनी ते प्रेत शेजाऱ्याच्या आवारात अशा हुशारीने सोडले की ते आवाराच्या भिंतीला टेकून उभे राहिले.

शेजाऱ्याच्या घरी खाण्यापिण्याच्या वस्तू नेहमी चोरीला जात. त्याला आजपर्यंत वाटत होते की कुत्री, मांजरे खाऊन जात असतील. परसात त्याने भिंतीला टेकून एक माणूस उभा असलेला पाहिला व त्याला वाटले की हीच स्वारी चोरी करीत असावी, शेजारच्या गच्चीवरून उतरून





येत असावी. असा विचार करून त्याने एक काठी घेतली आणि त्या माणसाला झोडपून काढले. तो मनुष्य खाली पडला तरी रागाच्या भरात त्याने त्याला खूप बडविले.

बराच वेळ झाला, पण तो मनुष्य हाल्ला डुलला नाही की रडला ओरडला नाही म्हणून त्याने जवळ जाऊन पाहिले तर ते प्रेतासारखे त्याला आढळले.

"अरे गिड्ड्या! मेलो रे मेलो. माझ्या घरी चोरी करून व माझे एवढे नुकसान करून शेवटी माझाच जीव घ्यायला तयार दिसतोस की रे. हे देवा! वांचव रे मला या संकटातून." तो मनुष्य हातातली काठी दूर फेकून डोके धरून जमिनीवर बसला.

नंतर त्याने विचार करून ते प्रेत उचलून खांद्यावर घेतले व बाजारात एका दुकानासमोर नेऊन उभे केले. जवळपास कोणी नाही हे पाहून तो पसार झाला. तोपर्यंत अर्धी रात्र संपली होती.

थोड्या वेळाने एक व्यापारी दारू पिऊन झिंगून त्या बाजूला आला. गिड्ड्याला दुकानासमोर उभा पाहून त्याला वाटले की कोणी चोर असावा. तो जोराने ओरडू लागला—"चोर चोर! धावा, पकडा!" आणि गिड्ड्याच्या प्रेताला जोरजोराने मारू लागला.

व्यापाऱ्याचा आवाज ऐकून चौकीदार धावून आले. दारुड्या एका माणसाला बडवीत असलेला त्यांनी पाहिले. तो मनुष्य जमिनीवर निश्चेष्ट पडलेला होता.

"तू खून केला आहेस त्या माणसाचा. चल ठाण्यावर!" असे सांगून चौकीदारांनी त्या गिड्ड्याचे प्रेत उचलून घेतले व व्यापाऱ्याला धरून पोलीस ठाण्यावर गेले.

कोतवालाने सर्व चवकशी करून खुनी व्यापाऱ्याला न्यायाधिशासमोर हजर केले. न्यायाधिशाने व्यापाऱ्याला फाशीची शिक्षा दिली.

दुसऱ्या दिवशी व्यापाऱ्याला फाशीची शिक्षा झाल्याची दवंडी पिटविण्यात आली. लोकांची गर्दी वधस्थानी जमा झाली. व्यापाऱ्याला फाशीच्या फळीवर उभा करून त्याच्या गळ्यात फास अडकविण्यात आला.

इतक्यात सुलतानाच्या सैपाक्यावरचा अधिकारी धावत येऊन म्हणाला—"थांबा हो थांबा! या गिड्ड्याचा खून माझ्या हातून झाला."

"तू याचा खून कां केलास?" कोतवालाने विचारले.

त्याने रात्री घडलेली गोष्ट सुरवातीपासून शेवटपर्यंत सांगितली.

ते ऐकून कोतवाल म्हणाला—"हा म्हणतो ते खरे आहे व याने आपला अपराध कबूल केला आहे. तरी याला फाशी द्या." त्याने शिपायांना हुकूम केला.

इतक्यात वैद्य धावत पुढे आला व म्हणाला—"याच्या मरणाला कारण खरोखरी मी आहे." त्याने घडलेली गोष्ट सांगितली. कोतवालाने वैद्याला फाशी द्यायला शिपायांना सांगितले.

शिपाई वैद्याला फाशी द्यायला धरून नेऊ लागले, एवढ्यात शिंपी पुढे येऊन













म्हणाला–"हे सर्व खोटे आहे. याच्या मरणाला खरा कारण मी आहे." त्यानंतर त्याने सुरवातीपासून शेवटपर्यंत घडलेले वृत्त सांगितले.

"खरा खुनी हाच आहे, तेव्हां यालाच फाशी द्या." असे कोतवाल म्हणाला.

परंतु पुन्हा एक विघ्न आले. तो मेलेला गिड्डा सुलतानाच्या घरचा विदूषक होता. एक दिवस आधी तो निघून गेला आणि परत आला नाही. म्हणून सुलतानाने त्याला हुडकून काढण्यासाठी शिपाई पाठविले होते. तेव्हां आपला विदूषक मेल्याचे सुलतानाला कळले आणि हे देखील कळले की त्याच्या खुनाचा अपराध कबूल करणारे एका मागून एक तिघे चौघे पुढे आले आहेत. म्हणून सुलतानाने कोतवालाकडे निरोप पाठविला की चौघां खुनी आरोप्यांना व मृत विदूषकाला दरबारात हजर करावे.

हुकमाप्रमाणे कोतवालाने सर्वांना दरबारात हजर केले. चौघांनी जे जे घडले ते खरे खरे सांगितले. सर्वांचे वृत्त ऐकत बसलेला दरबारी न्हावी वैद्य गिड्डयाच्या प्रेताकडे न्याहाळून पाहून म्हणाला–"गिड्डयाच्या देहात अजून जीव आहे."

त्याने जवळ जाऊन गिड्डाचे तोंड उघडले आणि त्याच्या घशात अडकलेले माशाचे हाड चिमटाने ओढून बाहेर काढले. लगेच गिड्डा जोराने शिंकला आणि उठून तोंड पुसू लागला.

अशा तऱ्हेने गिड्डा जिवंत असल्याचे कळल्यावर सर्वांच्या जिवात जीव आला. गिड्डयाने इतका मार खाल्ला, इतकी आदळ आपट त्याच्या शरिराची झाली तरी मेला नाही हे कळल्यावर सर्व चकित होऊन त्याच्याकडे कौतुक करीत पाहू लागले.





# चोरांत चोर

भोजपूरचा राजा रणधीरसिंह एक दयाळू राजा होता. त्याची प्रजा सुखी होती. प्रजेला लागणारे सर्व पदार्थ मिळण्याची व्यवस्था राज्यशासना तर्फे मोठ मोठ्या भांडारात करण्यात आली होती.

परंतु अचानक चोर व लुटेऱ्यांची धाड राज्यावर आली. लुटेरे केव्हा कोणत्या गावात शिरतील याची कल्पना कोणाला नव्हती. त्यांना कसे पकडावे हा एक मोठा प्रश्न राजासमोर उभा होता.

भोजपूरच्या पूर्वेला एक जंगल होते. त्याच्या पलीकडे उंच डोंगर होते. हळूहळू लोकांना कळले की त्या डोंगरातल्या गुहेत कोठे तरी चोरांचे ठाणे आहे. त्या जंगलाच्या वाटेने येऊन चोर राज्यात शिरत होते.

राजाने राज्यात दवंडी पिटली की जो कोणी चोरांना पकडण्यासाठी मदत करील त्याला मोठे बक्षिस व जहागीर दिली जाईल. काही साहसी लोकांनी चोरांचा शोध लावण्याचा यत्न करून पाहिला. जंगलाच्या वाटेने त्यांच्या पैकी जो कोणी जाई जिवंत परत येत नसे.

एकदा चोरांची टोळी जंगलाच्या वाटेने गावाकडे जाऊ लागली. तेव्हां त्यांना झाडांच्या आड एक तरुण स्त्री राजाच्या शिपायांशी एकटी लढत असलेली दिसली. चोरांना पाहून राजाचे शिपाई पळून गेले.

चोरांनी त्या तरुण बाईला जवळ जाऊन विचारले–"ताई! कोण तुम्ही? ते शिपाई तुम्हांला मारायला कां आले होते? आमच्याकडून काही मदत होण्यासारखी असेल तर सांगा, आम्ही अवश्य करू."

"तुम्ही कसे अगदी वेळेवर आलात. आज त्यांच्या हाती मला मरण येणार होते. तुमचे ऋण कसे फिटेल, कळत नाही." ती तरुण स्त्री म्हणाली.

सौ. काशीताई तांबट



"आम्ही एका सोनेरी टोळीचे चोर आहोत. पण तू कोण?" चोरांनी त्या तरुण स्त्रीला विचारले.

"तुम्ही लुटेरे असाल तर आपण सर्व राजाचे शत्रू आहों. माझे नाव दुर्गाबाई. माझे बाबा राजाच्या फौजेत सैनिक शिक्षण देत असत. त्यांना माझी मोठी बहीण व मी अशा दोघी मुली. मी आपल्या वडिलांजवळ शस्त्रास्त्र विद्या शिकून घेतली आहे. पण माझ्या बहिणीला ते आवडत नाही. तिला घोड्यावर बसण्यात कमीपणा वाटत असे. ती नेहमी अप्सरे सारखी नटून फिरण्यात भूषण मानी. राजाची दृष्टी एकदा तिच्यावर पडली. त्याने एका दासीला माझ्या बहिणीकडे, पाठविले व अंतःपुरात बोलावून तिला तेथेच कैद करून ठेवले. तिच्या जागी मी असते तर जीव असेपर्यंत स्वतःची अब्रू बांचविण्यासाठी लढले असते. पण राजाची बटकी म्हणून त्याच्या अंतःपुरात राहले नसते. राजाचे माझ्या वडिलांशी भांडण झाले व आम्ही राजाचे शत्रू झालो. राजाने राजद्रोहाचा अपराध लावून माझ्या वडिलांना हद्दपार केले. त्यांच्याबरोबर मी पण जायचे ठरविले. आम्हांला राज्या बाहेर जाण्यास जो अवधी दिला होता तो पुरा होण्याच्या आत राजाने गुप्तपणे मारेकऱ्यांकडून माझ्या वडिलांचा खून करविला. मी स्वतःचा बचाव करून निसटले व अशी प्रतिज्ञा केली आहे की राजाचा वध करून मी पितृऋण फेडीन. राजाचे शिपाई माझा पाठलाग करीत येथवर आले. ही प्रतिज्ञा कशी पुरी करावयाची हे मला कळत नाही."

चोरांना त्या तरुण स्त्रीची कीव आली व तिच्याविषयी त्यांना सहानुभूती वाटू लागली.

चोर म्हणाले—"आम्ही सर्व प्रकारे तुझी मदत करू व तुझे रक्षण करू.



परंतु वडिलांच्या खुनाबद्दल सूड घेण्याच्या कामी आम्ही काही मदत करू शकणार नाही."

"मला तेवढी मदत पुरे आहे. मी त्याबद्दल तुम्हांला एका गोष्टीची मदत करू शकेन. राजाच्या खजिन्याची व राजाने काढलेल्या सर्व भांडारांची मला माहिती आहे. त्यांत जायचे गुप्त मार्ग मी तुम्हांला दाखवीन. सूड घ्यायचा तो मी स्वतःघेईन." दुर्गाबाई म्हणाली.

"तरमग आतांच जाऊ या. आम्हांला गुप्तमार्ग दाखव." चोर म्हणाले.

दुर्गाबाईने त्यांना पूर्वे कडील भांडारात जाण्याचा गुप्तमार्ग दाखवून त्यांना आत पोचविले. चोरांनी सर्व भांडार लुटले व दुर्गाबाईला ते रहात होते त्या गुप्तस्थानी घेऊन गेले. दुसऱ्या दिवशी रात्रीपर्यंत ती चोरांच्या टोळीबरोबर त्यांच्या गुहेत राहली आणि सर्वांची ओळख करून घेतली. काळोख पडल्यावर त्यांना पश्चिमे कडील भांडाराजवळ घेऊन गेली. पूर्वेच्या भांडाराच्या गुप्तद्वारावर मोराचे तोंड होते तसेच याच्या गुप्त द्वारावर पण होते. ते तोंड फिरवतांच दरवाजा उघडत असे. दुर्गाबाईने दरवाजा उघडल्यावर सर्व चोर आत शिरले. दुर्गाबाईने बाहेरून दरवाजा बंद केला आणि निघून गेली.

थोड्या वेळाने चोरांना कळले की ते भांडाराच्या चोरदरवाज्याने आत शिरले नसून तुरुंगाच्या दाराने आत शिरले आहेत. त्यांनी दुर्गाबाईला दार उघडण्यासाठी पुष्कळ हाका मारून पाहल्या. पण काही उपयोग झाला नाही.

त्यानंतर दरबारात चोरांना उभे करण्यात आले. त्यावेळी राजाच्या बाजूला दुर्गाबाई बसलेली त्यांना दिसली. तेव्हां चोरांना कळले की दुर्गाबाई स्वतः राजकन्याच आहे.



# दानशूर

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. तो कधी दान धर्म करीत नसे. चिक्कू मारवाडी म्हणून तो गावात प्रसिद्ध होता.

एकदा एक मनुष्य त्याच्या घरी आला व दान मागु लागला.

"कुठला राहणारा रे तू ?" त्या श्रीमंताने त्याला विचारले.

"याच गांवाचा, धनी !" तो मनुष्य म्हणाला.

"शक्यच नाही. कारण मी दान करीत नाही हे साऱ्या गांवाला माहीत आहे." तो श्रीमंत मनुष्य म्हणाला.

त्याच गावात एक चांभार रहात असे. तो दानशूर म्हणून गावात प्रसिद्ध होता.

पुढे काही दिवसांनी तो श्रीमंत मनुष्य मरण पावला. गांवकऱ्यांनी त्याचे प्रेत गावातल्या रस्त्याच्या किनाऱ्याला एक खड्डा खणून पुरले. तो मेला त्याबद्दल कोणी शोक प्रगट केला नाही. चांभाराकडे लोक नेहमी प्रमाणे येत. पण त्याने त्यानंतर कोणाला दान द्यायचे बंद केले व म्हणाला—"आहे काय माझ्याकडे द्यायला ?"

गांवच्या पाटलाने चांभाराला बोलावून विचारले—"काय रे दानशूर म्हणून तू पंचक्रोशीत प्रसिद्ध आहेस आणि आतां दान देणे अगदी बंद करून टाकले आहेस, म्हणे ?"

दान करण्यासाठी जो वारला तो श्रीमंत मनुष्यच मला धन देत असे. मी त्यांना शपथ घेऊन वचन दिले होते की मी केलेला दानधर्म त्यांच्या पैशामुळेच होऊ शकला. असे कोणाला सांगणार नाही. मी स्वतः गरीब आहे." चांभार म्हणाला.





# अर्धवट गोपू

फार पूर्वी कांचीपुरम् येथे कांचनगुप्त नांवाचा एक श्रीमंत व्यापारी रहात असे. तो व्यापारात हुशार होताच, तसाच तो प्रामाणिक व सच्चरित्र पण होता. म्हणून लोक त्याला मान देत.

त्याला आनंद नावाचा एक मुलगा होता. आनंदपण चांगल्या स्वभावाचा आणि शांत प्रकृतीचा होता. पण व्यापार करण्यात तो तितकासा हुशार नव्हता. खरे बोलत असे व सर्वांवर त्याचा विश्वास होता.

आनंद लहानाचा मोठा झाला, सर्व जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली. त्याच्या बापाने त्याला पुष्कळ शिकवून व्यापाराची माहिती करून देण्याचा यत्न करून पाहिला. पण काही फायदा झाला नाही. व्यापार करणे म्हणजे सोपे नाही. गिऱ्हाइकाचा विश्वास मिळविला पाहिजे व स्वतःचे नुकसान होऊ देता कामा नये. पैसे मिळविले पाहिजेत व स्वतःचे नाव देखील राखले पाहिजे. पण आनंदला अशी कर्तबगारी करून दाखविता आली नाही.

म्हणून कांचनगुप्त नेहमी दुःखी राही. त्याला तोच एकुलता एक मुलगा होता. त्याला व्यापार ठीक ठीक करता आला नाही तर आपल्या मागून व्यापाराची जबाबदारी स्वतःवर कोण घेणार ? त्याला एकच तोड होती. त्याचे लग्न एक चांगलीशी हुशार मुलगी पाहून तिच्याशी त्याचे लग्न करून देण्याचे कांचनगुप्तने ठरविले. मुलगी श्रीमंत बापाची व सुस्वरूप असावीच असे देखील नव्हते. पण हुशार असावी आणि व्यापारातले खाचखळगे तिला माहीत असावेत, हे आवश्यक होते.

अशा एका तरुण मुलीसाठी कांचन-गुप्तने चवकशी सुरू केली. तो व्यापारा-












निमित्त जेथे जेथे जाई तेथे अशी मुलगी कोणी आहे का चवकशी करी. त्याने आपल्या मित्रमंडळींच्या कानावर ती गोष्ट घालून ठेवली होती. पण धन व रूप जसे डोळयाला दिसते तसे गुण व हुशारी दिसत नाही. म्हणून त्याच्या प्रयत्नाला यश आले नाही.

एकदा तो वर्धमानपुर नांवाच्या गावी आठवडयाच्या बाजाराला गेला असता एका तेलाच्या दुकानासमोर तांदुळाचे गाठोडे घेऊन एक मनुष्य आला व म्हणाला–"चांगले तांदूळ आहेत. तांदळा इतकेच चांगले तेल मापून देणार का?"

"चांगला व्यापार आहे. तेलाची किंमत तांदळाच्या चौपट आहे, म्हटले! तांदळाच्या इतकेच तेल द्यायचे म्हणजे ते फुकटच दिल्यासारखे आहे. असा व्यापार केला की दिवाळेच निघेल की आमचे!" तेलाचा दुकानदार म्हणाला.

त्यावेळी दुसऱ्या एका दुकानात बसलेली एक सोळा वर्षांची मुलगी म्हणाली–"अहो! इकडे घेऊन या तांदूळ. मी माप देते ते भरून तुम्ही तांदूळ द्या की मी ते भरून तेल देईन तुम्हांला."

तांदूळवाल्याने ते कबूल केले. कांचनगुप्त व इतर लोक ते सर्व पहात उभे होते.

ती मुलगी एक मोठे ताट घेऊन आली. ताटाचा काठ लहान होता. मुलीने ते ताट देऊन ताट भरून तांदूळ द्यायला सांगितले. गाठोडयातले सर्व तांदूळ दोन ताटे भरून झाले. त्यानंतर मुलीने ते ताट भरून दोनदा तेल त्या तांदूळवाल्याला दिले. तांदूळवाला काही बोलल्याशिवाय निमूटपणे निघून गेला.

अशातऱ्हेने हुशारीने व्यापार करणाऱ्या मुलीचे नावगाव विचारून व तिच्या घरची चवकशी करून कांचनगुप्त तिच्या घरी गेला व त्याने आपल्या मुलासाठी त्याच मुलीची निवड केली.





# भुतांशी मैत्री

एका गांवी रामू नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याला तीन मुलगे होते. त्यातला सर्वात धाकटा बाळू अर्धवट व खुळा होता. त्याला नेहमी भुते पाहण्याचा व त्यांच्याशी मैत्री करण्याचा नाद होता.

रामू एकदा एकाएकी आजारी पडला. मरणापूर्वी त्याने आपल्या दोघां मोठ्या मुलांना बोलावून सांगितले की त्याच्या मागे बाळू काय मागील ते त्याला प्रथम देऊन जे उरेल ते आपसात वांटून घ्या. नंतर तो बाळूला म्हणाला–"बाळ, तू जे मागशील ते द्यायला मी तुझ्या दोघां भावांना सांगून ठेवले आहे. ते घेऊन त्यांत मनाचे समाधान मानून घे. सर्व प्राण्यांवर दया कर."

"बाबा! भुते कोठे असतात हो?" त्याने बापाला विचारले.

"ओसाड घरात असतात बाळा!" रामू म्हणाला. बोलतांना त्याला फार वाईट वाटत होते की त्या प्रसंगीदेखील त्याचे भुतासंबंधीचे वेड गेले नाही.

रामू वारल्यावर त्याच्या मोठ्या मुलांनी बाळूला बोलावून विचारले–"बाबांच्या इस्टेटीतले तुला काय हवे ते मागून घे."

"मला भुतांशी मैत्री करावयाची आहे. त्यांना जे आवडते ते मला द्या." बाळू म्हणाला.

दोघे भाऊ बाळूचे ते उत्तर ऐकून खूष झाले व त्याला तिखटाचे एक पोते भरून देत म्हणाले–"भुतांच्या डोळ्यात, हे चूर्ण टाकलेस की ते तुझ्याशी मैत्री करतील."

बाळू तिखटाचे गाठोडे घेऊन निघाला. वाटेत त्याला एक ओसाड पडके घर दिसले. त्या घरात एक दिवा लावलेला होता. त्याला घरात कोणी बोलत

असल्याचा व एकाबाईच्या रडण्याचा आवाज ऐकू आला.

बाळूला वाटले की या घरात नक्कीच भुते आहेत. त्याने दाराची कडी वाजविली. म्हणाला—"मित्र हो! मी तुमच्याशी मैत्री करायला आलो आहे. दरवाजा उघडा." बाळू ओरडून म्हणाला.

आतून येत असलेला आवाज बंद झाला. ते चोर होते व एका श्रीमंताच्या घरी चोरी करून त्याच्या मुलीला धरून घेऊन तेथे आले होते. ते चोरीचा माल आपसात वाटून घेत होते. एका चोराने पुढे येऊन दार उघडले. चोरांना भूत समजून तो म्हणाला—"मित्र हो! मी हे तुमच्यासाठी घेऊन आलो आहे." असे सांगून तो तिखटाचे गाठोडे सोडू लागला. चोर त्याच्या चारीबाजूला घोळका करून उभे राहले. त्याने तिखट सर्वांच्या डोळ्यात फेकले. चोरांचे डोळे फुटले व ते ओरडू लागले.

"लवकर येऊन मला सोडवा हो!" ती मुलगी ओरडू लागली.

बापाने बाळूला गरिब प्राण्यावर दया करायला सांगितले होते. त्याने पुढे जाऊन खांबाला बांधून ठेवलेल्या त्या मुलीला सोडवले. दोघांनी बाहेरून दाराला कडी लावली व उजाडण्यापूर्वी त्या श्रीमंताच्या घरी येऊन पोचले. सर्व वृत्त मुलीकडून कळल्यावर त्या श्रीमंत मनुष्याने आपल्या नोकरांना पाठवून शिपायांना बोलाविले व त्या ओसाड पडक्या घरी जाऊन चोरांना पकडले.

आपल्यावर बाळूने केलेले उपकार आठवून त्या श्रीमंत मनुष्याने आपली मुलगी गुणवती हिच्याशी त्याचे लग्न करून द्यायचे योजले. आपल्या उपकार कर्त्यावर मुलीचे पण प्रेम आहे हे कळल्यावर त्याने दोघांचे लग्न करून दिले व बाळूला आपला घर जावई करून ठेवून घेतले.





# युवराज कोण?

एका राजाला जुळे मुलगे होते. दोघे रूपाने सारखे होते. परंतु एक रंगाने गोरा व एक काळा होता. राजाने एकाचे नाव अरुणकुमार व दुसऱ्याचे करुणकुमार असे ठेवले. दोघे लहानाचे मोठे होऊ लागले तसतसे ते विद्याभ्यास करू लागले व शस्त्रास्त्र विद्यापण शिकू लागले. दोघांचे परस्परांवर फार प्रेम होते. नेहमी बरोबर रहात, खेळत व हिंडत फिरत.

ते मोठे होऊ लागले तेव्हां राजासमोर एक प्रश्न उभा राहला, या दोघांपैकी युवराज कोणाला करायचे? शेवटी त्याने मनात एक युक्ति योजली. त्याने दोघा मुलांना बोलाविले व म्हणाला—"तुम्ही दोघे निरनिराळे गावात जाऊन संध्याकाळच्या आत शंभर रुपये मिळवून घेऊन या."

दोघे निरनिराळ्या वाटेने गावात गेले.

"शंभर रुपयांचीच गोष्ट, कोणामित्राजवळ मागितले की मिळतील." अरुणकुमाराने विचार केला. तो एका मित्राच्या घरी गेला व त्याच्या जवळ शंभर मागितले. मित्र म्हणाला—"माझ्या जवळ साठच रुपये आहेत."

"नाही रे! साठ रुपयांवर काम कसे भागेल?" असे सांगून अरुणकुमारने रुपये घेतले नाहीत आणि दुसऱ्या मित्राच्या घरी गेला. त्याच्या जवळ साठ रुपये पण नव्हते. त्याने कित्येकांना जाऊन विचारले. कोणी पन्नास, कोणी वीस, कोणी दहा असल्याचे सांगितले. म्हणून अरुणने रागाने त्या सर्वांना शिव्याशाप देण्यास देखील मागे पुढे पाहिले नाही. त्याच्या मित्रांनी त्याचा अपमान केला असे त्याला वाटले. संध्याकाळपर्यंत धावपळ करून देखील त्याला हवे होते तितके पैसे मिळाले नाहीत.

तेव्हां तो सरळ सरकारी खजिन्यात गेला व खजिन्याच्या अधिकाऱ्याला शंभर रुपये द्यायला सांगितले.

"माझ्या जवळ दहाच रुपये आहेत, मालक!" खजिन्याचा अधिकारी म्हणाला.

"तुझे रुपये मला नको आहेत. खजिन्यातून काढून दे." अरुण म्हणाला.

"सरकार स्वारीच्या लेखी हुकमाशिवाय खजिन्यातली एक पै देखील काढून देता येणार नाही, मालक!" खजिन्याचा अधिकारी म्हणाला.

अरुण निराश होऊन घरी गेला.

संध्याकाळ झाली. राजानें दोघां मुलांना बोलावून विचारले—"आणले का रे शंभर रुपये?"

अरुणने शंभर रुपये आणू न शकल्याचे सांगून त्याने शंभर रुपये मिळविण्यासाठी काय काय केले हे देखील थोडक्यात सांगितले.

करुणकुमारने शंभर रुपये आणून दिले.

"तू हे पैसे कोठून व कसे आणलेस?" राजाने विचारले.

"मी आपल्या मित्रांना जाऊन विचारले, देता का? मला काही रुपयांची गरज आहे, जितके असतील तितके द्या. काहींनी दहा दहा रुपये दिले, काहींनी पांच पांच व काहींनी दोनदोन तीन तीन व काहींनी एक एक रुपयापण दिला. शंभर रुपये पुरे होताच मी घरी परतलो."

करुणकुमारने आपला अधिकार गाजविण्याचा प्रयत्न केला नाही व जे मिळाले त्यात संतोष मानून काम पुरे केले. कोणाच्या मनाला दुखविले नाही. म्हणून गादीला वारस होण्यालायक तोच आहे, असे मनाशी ठरवून राजाने त्यालाच युवराज पद देऊन आपला वारस म्हणून गादीवर बसविण्याचे ठरविले.






एके दिवशी सकाळी कृष्ण सात्यकी व उद्धव दोघांना बरोबर घेऊन दरबारात निघाला तेव्हां त्याला भेटण्यासाठी कोणी आल्याची बातमी द्वारपालानें सांगितली. द्वारपालाबरोबर येऊन तो मनुष्य कृष्णाला म्हणाला—"प्रभो! मगध देशाचा राजा जरासंध याने वीस हजार राजांना जिंकून त्यांना कैदेत टाकले आहे. त्या सर्वांनी मला आपणांकडे आपले गाऱ्हाणे पोचते करण्यास पाठविले आहे."

त्याच वेळी नारद अचानक कोठून तरी येऊन व दत्त म्हणून कृष्णासमोर उभा राहिला. कृष्णाने नारदाचा सर्वप्रकारे सत्कार करून त्याला बसायला आसन दिले व येण्याचे कारण विचारले. तेव्हां नारद म्हणाला—"पांडवांतील ज्येष्ठ बंधु युधिष्ठिर याने राज्यप्राप्तीसाठी राजसूय यज्ञ करण्याचे ठरविले आहे. त्या यज्ञाला मुख्य अतिथि म्हणून तुलाच बोलाविण्याचे ठरले आहे. सर्व तुझी वाट पहात आहेत."

एकीकडे जरासंधाने कैद केलेल्या राजांनी त्याला त्यांचे रक्षण करण्यासाठी बोलाविले होते तर दुसरी कडून युधिष्ठिराने आरंभिलेल्या राजसूय यज्ञास मुख्य अतिथि म्हणून येण्यास पांडवांच्या वतीने निरोप घेऊन स्वतः नारद आला होता. कृष्ण विचारात पडला.

"या दोन्ही पैकी कोणाच्या बोलावण्याला मान द्यावा? दोघांना संतुष्ट करणे आवश्यक आहे." त्याने उद्धवाचा सल्ला घेतला.



"जरासंधाचे पारिपत्य करण्यासाठी काही तरी निराळी व्यवस्था करण्याची गरज नाही. कारण राजसूय यज्ञासाठी दिग्विजय हा केलाच पाहिजे. तेव्हां जरासंधाचे पारिपत्य करणे हे राजसूय यज्ञाला आवश्यक असेच एक काम आहे. म्हणून राजसूय यज्ञाला जाणे अधिक श्रेयस्कर." असा उद्धवाने सल्ला दिला.

उद्धवाने कृष्णाला या संदर्भात आणखी एक गोष्ट सांगितली. जरासंधाची बरोबरी करू शकणारा एकटा भीम आहे. त्याने द्वंद्वयुद्ध करून जरासंधाचा वध करावा. दुसरा उपाय नाही.

उद्धवाचा सल्ला कृष्णाला पसंत पडला. त्याने बलरामाची परवानगी घेऊन अंतःपुरातील स्त्रियांसह इंद्रप्रस्थाकडे प्रस्थान करण्यासाठी दारुकला बोलावून सर्व तयारी करण्यास सांगितले. चतुरंग सैन्य सज्ज झाले. रुक्मिणी, सत्यभामा आदिक राण्या पालखीत बसून निघाल्या. निघण्यापूर्वी कृष्ण नारदाला निरोप देऊन दूताला म्हणाला–"तू सर्व राजांना जाऊन सांग की मी त्यांच्या रक्षणाची जबाबदारी स्वतःवर घेतली आहे. त्यांनी भिण्याचे कारण नाही. मी जरासंधाचा वध करून त्यांना कैदेतून सोडवीन."

कृष्ण येत असल्याची बातमी कळताच युधिष्ठिर त्याला सामोरा गेला व दोघे प्रेमाने परस्परांना भेटले. कृष्ण इतर पांडवांना पण प्रेमाने भेटला. त्याच्या स्वागतासाठी तोरणे बांधण्यात आली होती. प्रजेने रस्त्याच्या दोन्ही बाजूला उभे राहून कृष्णावर पुष्पवृष्टी केली. कृष्णाच्या आगमनाने सर्व इंद्रप्रस्थ नगराला एक नवीन शोभा आली होती.

युधिष्ठिराच्या महालात कृष्णाने प्रवेश केला व प्रथम कुंतीमातेला नमस्कार केला. कुंतीच्या सर्व सुनांनी कृष्णाला नमस्कार करून आशीर्वाद घेतला.



कृष्ण पांडवांचा आप्त, सखा व बंधू होता. कृष्णार्जुनांचे सख्य तर लोकप्रसिद्धच होते. अर्जुनाने खांडववन जाळले तेव्हां स्वतः अर्जुनाने त्याचे सारथ्य केले होते. त्याला त्याने दिव्य रथ, घोडे व अक्षय भाता दिला होता. मयासुराला सांगून मयसभा रचली होती. म्हणून युधिष्ठिराने आग्रह करून कृष्णाला बोलाविले होते व कृष्ण त्याप्रमाणे आला. युधिष्ठिराने खास दरबार बोलावून कृष्णाचा सत्कार केला व राजसूय यज्ञ करण्याचे योजले असल्याचे वृत्त सांगून त्यालाच सर्व कार्याचे आधिपत्य घेण्यास विनंती केली.

कृष्णाने युधिष्ठिराचे अभिनंदन केले व म्हणाला–"तू राजसूय यज्ञ आरंभिलास हे योग्यच आहे. दिग्विजय करण्यासाठी तू आपल्या चार भावंडांना चार दिशांना पाठव. ते लवकर दिग्विजय करून परत येतील.

ते ऐकून युधिष्ठिराच्या मनाचे समाधान झाले. त्याने कृष्णाच्या सल्ल्याप्रमाणे आपल्या चौघा भावंडांना दिग्विजयासाठी पाठविले. सहदेव दक्षिणेकडे, नकुल पश्चिमेकडे, अर्जुन उत्तरेकडे व भीम पूर्वेकडे निघाले. त्यांनी आपापली कामगिरी चोख



बजावली व दिग्विजय करून व अपार धन एकत्र करून इंद्रप्रस्थ नगरी ते परत आले.

सर्व राजांना पांडवांनी जिंकले, उरला फक्त जरासंध. ते कळल्यावर युधिष्ठिर काळजीत पडला. तेव्हां कृष्ण म्हणाला–"जरासंधाचा पराभव करण्याचे काम कसे पार पडेल हे मला उद्धवाने सांगितले आहे. मी त्या कामाची जबाबदारी स्वतःवर घेतो."

त्यानंतर कृष्ण भीमार्जुनांना बरोबर घेऊन जरासंधाची राजधानी गिरिव्रजपुर येथे गेला. तेथे तिघे ब्राह्मण रूप घेऊन गेले. जरासंध नित्यनियमितपणे ब्राह्मणांची पूजा करीत असे. तो त्या दिवशी ब्राह्मणांची



पूजा करण्यात निमग्न असता तिथे त्याला जाऊन म्हणाले–"आम्ही दूर देशाचे राहणारे आहो, आम्हांला इच्छित दान द्यावे."

जरासंधाने लक्षपूर्वक एकदा त्यांच्याकडे पाहिले. त्यांचे चेहरे व आवाज ओळखीचे भासले. त्याने त्यांच्या बोटाकडे पाहिले. धनुष्य बाण धरल्याचे वण स्पष्ट दिसत होते. ब्राह्मण वेष धारण करून आलेले ते क्षत्रिय आहेत. हे त्याने ओळखले, तरी इच्छित दान देण्याचे मनाशी ठरवून तो म्हणाला–"काय पाहिजे आपल्याला?"

"तुझ्याशी द्वंद्वयुद्ध करण्याची इच्छा आहे. आम्हांला आणखी कांही नको. हा भीम व हा त्याचा धाकटा भाऊ अर्जुन. मी तुझा शत्रु कृष्ण." कृष्ण म्हणाला.

ते ऐकून जरासंध थोडासा बेफिकिरपणे हसला व म्हणाला–"अस्सं! मी द्वंद्व युद्धाला तयार आहे. पण तुझ्याशी नाही. कारण मी मथुरेवर स्वारी करायला आलो तेव्हां तू पळून द्वारकेला गेलास. तू भितरा व पळपुटा आहेस. तुझ्याशी युद्धाला मी तयार नाही. अर्जुनाशी पण मी युद्ध करणार नाही. कारण हा माझ्याहून सर्व बाबतीत लहान आहे. एकटा भीम माझ्याशी द्वंद्व युद्ध करण्यास मला योग्य दिसतो. मी त्याच्याशी द्वंद्वयुद्धास तयार आहे."

जरासंधाने एक मोठी गदा भीमाला दिली व स्वत: तशीच एक मोठी गदा घेतली. कृष्ण व अर्जुन दोघांबरोबर ते नगराबाहेर एका मैदानात गेले. तेथे भीम व जरासंध यांचे गदायुद्ध सुरू झाले. परस्परावर प्रहार करीत ते परस्परांनी केलेल्या प्रहारापासून स्वत:चा बचाव करू लागले. दोघांचे ते युद्ध म्हणजे दोघां हत्तींचेच द्वंद्व युद्ध होते. शेवटी दोघांच्या हातातल्या गदा तुटल्या. तेव्हां दोघांचे मुष्टियुद्ध सुरू झाले.



जरासंधाच्या जन्माच्या वेळची गोष्ट कृष्णाला त्यावेळी आठवली. तो जन्मला तेव्हां त्याच्या शरिराचे दोन तुकडे वरपासून खालपर्यंत होते. जरा नामक राक्षसिणीने ते जोडले. म्हणून त्या बालकाचे नाव जरासंध पडले ही गोष्ट कृष्णाला माहीत होती. म्हणून जरासंधाला उभा चिरून ठार करणे शक्य आहे असा विचार करून कृष्णाने भीमाला ती गोष्ट कळविण्यासाठी गवताची एक काडी घेऊन तिचे दोन तुकडे केले व उजव्या हातातला तुकडा डाव्या बाजूला, व डाव्या हातातला उजव्या बाजूला टाकला भीमाला त्याचा अर्थ बरोबर कळला. त्याने जरासंधाला खाली पाडले व त्याचा एक पाय आपल्या पायाखाली दाबून ठेवून एक पाय हाताने धरून जरासंधाला उभा चिरून टाकला.

भीमाचे हे कृत्य अर्थातच राक्षसीच होते. पण कृष्णाने कर्त्तव्य म्हणून भीमाकडून ते करविले हे कळल्यावर कोणी काही बोलले नाही. उलट सर्वांनी भीमाचे अभिनंदनच केले.

जरासंधाचा वध झाल्यावर कृष्णाने त्याचा मुलगा सहदेव याला राज्याभिषेक करून मगधच्या गादीवर बसविले आणि सर्व राजांना कैदेतून मुक्त केले. कृष्णाच्या आज्ञेने सहदेवाने सर्व राजांची क्षमा मागून त्यांचा यथोचित सत्कार केला व त्यांना नजराणे देऊन निरोप दिला.

त्यानंतर कृष्ण भीमार्जुनांसह इंद्रप्रस्थ येथे परत आला आणि जरासंधाच्या वधाची गोष्ट युधिष्ठिराला सांगितली. कृष्णाने युधिष्ठिराच्या हिताच्या दृष्टीनेच जरासंधाचा वध करविला होता. म्हणून युधिष्ठिराने कृष्णाचे आभार मानून आपल्या मनातला आनंद प्रगट केला.

त्यानंतर युधिष्ठिराने राजसूय यज्ञ आरंभ केला. या यज्ञाला कृष्णद्वैपायन, भरद्वाज, वशिष्ठ, विश्वामित्र आदिक ऋषी हजर होते. या यज्ञात उपस्थित राहण्यास युधिष्ठिराने भीष्म, धृतराष्ट्र, कौरव, द्रोण, कृप, विदुर इत्यादिकांस आमंत्रणे पाठविली होती. असंख्य राजा व चतुर्वण व आश्रमातले लोक उपास्थित होते.

सोन्याचा फाळ लावून यज्ञभूमि नांगरून यज्ञवेदिका तयार करण्यात आली. वैदिक पद्धतीने युधिष्ठिराला यज्ञ दीक्षा देण्यात आली. राजसूय यज्ञ मोठ्या थाटामाटाने पुरा झाला. युधिष्ठिराने सर्व अतिथि पाहुण्यांचा सत्कार करण्यासाठी एक दिवस निश्चित केला. सर्वांना एकत्र बोलावून युधिष्ठिर म्हणाला—"कृपा करून आपणच मला सांगावे की मी कोणाची पूजा सर्व प्रथम करावी."

या प्रश्नाचे उत्तर कोण देणार? कोणीच बोलला नाही. कारण लहान कोण व थोर कोण हे कोण सांगणार. तसे वदले तर कोणाला राग येण्याची शक्यता होती. अशाप्रसंगी सहदेव उभा राहून म्हणाला—"यात विचार करण्यात वेळ घालविण्याचे कारणच काय? श्रीकृष्ण अग्रपूजेस पात्र आहे. त्याची पूजा करण्याचा अर्थ सर्व जडचेतन पदार्थाची पूजा आहे."



सहदेव जे म्हणाला त्याला इतरांनी होकार दिला. युधिष्ठिराने त्याप्रमाणे श्री कृष्णाचे पाय धुवून त्याला रेशमी वस्त्र व आभूषण दिले. इतर सर्व राजांनी कृष्णाला नमस्कार केला.

परंतु दमघोषाचा मुलगा शिशुपाल याला हे सर्व पसंत पडले नाही. तो तावातावाने उभा राहून तोंडाला जे आले ते बोलू लागला—"लहान पोरवय सहदेवाचे! तो जे बोलला ते ऐकून सर्वांनी नंदी बैलासारखी मान डोलाविलीत हे मला बिलकुल पसंत नाही. या सभेत इतके तपस्वी ऋषी मुनी हजर असता त्यांना वगळून एका गवळ्याची



अग्रपूजा करणे बरोबर झाले का? ययातीने शाप दिला आहे या यदुवंशियांना."

यावर कृष्ण काहीच बोलला नाही. जणुकाही विशेष असे काही घडलेच नाही असे त्याने दर्शविले. परंतु काही लोकांना शिशुपालाचा तो प्रलाप आवडला नाही व ते कान बंद करून तेथून निघून गेले. काही लोक शिशुपालाला मारायला धावले. कृष्णाने सर्वांना बाजूला व्हायला सांगितले व सुदर्शन चक्र सोडून शिशुपालाचा वध केला. शिशुपालाच्या बाजूचे लोक घाबरून पळून गेले.

युधिष्ठिराने ब्राह्मणांना दानधर्म करून निरोप दिला. नंतर राजसूय यज्ञाला हजर झालेल्या सर्व लहान थोर राजांना त्यांच्या दर्जाप्रमाणे नजराणे देऊन निरोप दिला. युधिष्ठिराच्या आग्रहाला मान देऊन कृष्ण इंद्रप्रस्थ नगरीच काही दिवस राहिला.

पांडवांचा वाढता मानमरातब व कीर्ती पाहून दुर्योधनाला हेवा वाटू लागला. कारण त्याने स्वतःच्या डोळ्यांनी युधिष्ठिराचे ते वैभव पाहिले होते. मयासुराने मयसभा रचली होती. त्या सभेत अनेक राजांनी पांडवांची सेवा केली होती. ज्या सभेत कृष्णाचा सत्कार झाला त्याच सभेत दुर्योधनाला अपमान झाल्याने खाली पहावे लागले होते. एका जागी पाणी आहे की जमीन आहे हे देखील कळत नव्हते. जमीन समजून दुर्योधनाने पाय ठेवल्याबरोबर तो पाण्यात पडला. जेथे पाणी भासले तेथे धोतर वर करून दुर्योधन चालू लागला. ते पाहून कृष्ण हंसला. द्रौपदी आदिक पांडवस्त्रियापण हसल्या. युधिष्ठिराने हसणाऱ्यांना आवरण्याचा प्रयत्न केला. पण कोणी त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. अशातऱ्हेने अपमानाने जळफळत दुर्योधन हस्तिनापूरला परत आला.





# अरण्यपुराण

[ २१ ]

लालकुत्र्यांशी झालेल्या युद्धाला व एकूचे मरण झाल्याला एक वर्ष होऊन गेले होते. मौवलीचे वय १७ पुरे होत आले होते. वयाच्या मानाने त्याची शरीरयष्टी उंच व बांधा बळकट होते. जोराने उडचा मारीत पळणाऱ्या हरणाला धावत जाऊन तो सहज पकडून ठार करीत असे. जंगलातले इतर प्राणी त्याला पाहून दुरूनच त्याची नजर चुकवून निघून जात.

शिशिर ऋतु संपून वसंत ऋतु सुरू व्हायचे दिवस होते. वेणगंगेच्या काठी एका उंच टेकडीवर काळा वाघ व मौवली लोळत पडले होते.

"हे वर्ष संपत आले व नवे सुरू होणार आहे. नवीन गाणी म्हणायची वेळ येऊ लागली आहे. जंगलात नवीन चैतन्य आले आहे." असे म्हणत उघड्या हवेत चित्त पडून काळा वाघ पाय हलवू लागला.

"हे काय आरंभले आहेस रे आज तू? आपण दोघे या जंगलाचे राजे आहो. लाज नाही वाटत का तुला?" मौवलीने काळ्या वाघाला विचारले.

काळा वाघ सरळ बसून म्हणाला–"मी म्हटले की नवीन गाणी म्हणायचा काळ आला आहे."

"होय, होय! तुम्ही सर्व मला एकटा सोडून निघून जाणार. गेल्या वर्षी हत्तीला ऊस आणायला सांगितले तर तो दोन दिवसांनी परतला. उडचा मारीत चांदण्या रात्रीत नुसता भटकत होता. मी सर्व पहात होतो." मौवली म्हणाला.

"नवीन गाण्यांचा काळ असाच असतो रे बाबा!" काळा वाघ म्हणाला.



वसंत ऋतूच्या आगमनाने निसर्गाचे रूप पालटले होते. जंगलांतल्या प्राण्यांना एक नवीन उत्साह व जोम एकाएकी अंगात चढल्याचा भास होऊ लागला. त्यांच्या आवाजात बदल झाला. सामान्यपणे या काळांत मौवलीपणे लवकर उठून जंगलात कित्येक मैल नुसताच पळे.

पण यंदा त्याला थोडादेखील उत्साह वाटला नाही. त्याला खाल्लेले पचत नव्हते. त्याला मनातल्या मनात कावल्या-सारखे काही तरी उणीव असल्यासारखे वाटू लागले. त्याच्या अंगात आजाराची चिन्हे नव्हती. मग त्याच्या मनाची अशी स्थिती कां बरे झाली? इतर प्राणी सुद्धा असे विचित्र पणे वागत होते जणुंकाही सर्वांची डोकीच फिरली होती.

वसंत ऋतूत तरुण लांडगे गर्दीतून दूर एकांतात भांडत हे मौवलीला माहीत होते. हे माहीत असून त्याने दोघां भांडणाऱ्या लांडग्यांच्या मध्ये पडून त्यांचे भांडण मिटविण्याचा प्रयत्न केला. त्या दोघांनी मौवलीला बाजूला ढकलले व पुन्हा भांडू लागले.

मौवलीला राग आला. त्याने रागाने दात ओठ चावून खंजीर उपसला त्या दोघांना ठार करावेसे वाटले त्याला. पण त्याला तो दुबळे पणा वाटला. म्हणून त्याने खंजीर पुन्हा म्यानेत ठेवून दिला.

"मी विष खाल्ले आहे का? आज-पर्यंत मला कोणी लांडग्याने असे बाजूला ढकलण्याची हिंमत दाखविली नाही. या दोघांनी कसे सहजी ढकलले. माझ्या अंगातली सर्व शक्ति अशी लयास कशी काय गेली? आता मी मरणार!" मौवलीला वाटले. तो हताश होऊन खाली बसला.

त्याने त्या दिवशी संध्याकाळी एक शिकार धरून आणली. परंतु खाण्याची इच्छा नव्हती त्याला. रात्री दुधासारखे स्वच्छ चांदणे पडले होते. जंगलात चहूकडे त्याला गाण्याचा किंवा भांडणांचा आवाज ऐकू येत होता. अशा चांदण्यारात्री त्याला पळावेसे वाटे व तो पळत पण असे. म्हणून जोराने गाणे म्हणत जंगलातून उत्तरेकडे तो धावत निघाला. तो उड्या मारीत डोंगराच्या टोकाला जाऊन पोचला.



तेथे एका ओढ्याच्या काठी खडकाला टेकून बसला. त्याला आज काहीच आवडत नव्हते. त्याला वाटू लागले, नक्कीच आपण विष तर खाल्ले नसेल.

आता भीति आणि मरण दोन्हींच्या विचाराने त्याचे मन घेरले. या ओढ्यात आपले प्रेत तरंगत राहणार. त्याने विचार केला जंगलाच्या मध्य भागच्या टेकडीवर आपल्याला मरण आले तर एकूच्या देहाचे रक्षण झाले तसे आपल्या देहाच्या रक्षणाची काळजी काळा वाघ वाहील.

त्याच्या डोळ्यावाटे एक टीप येऊन गालावरून घसरत खाली पाण्यात पडले. पण तेवढ्याने त्याला डोके थोडे हलके झाल्यासारखे वाटले. मरतांना एकूने सांगितले होते ते त्याला आतां आठवले. "तू मनुष्यात जाऊन रहा." एकू म्हणाला होता. तो असे देखील म्हणाला होता— "मरायला कोठे निघालास?" आणि मी










म्हटले होते त्याला–"चल चल! मी या जंगलाचा राजा आहे!"

त्याच वेळी उंच गवतात उभी एक रानटी म्हैस ओरडली–"मनुष्य!"

तिच्या जवळच उभा असलेला म्हसोबा म्हणाला–"नाही ग! सियोनीच्या कळपातला तो लांडगा आहे अंगावर केस नसलेला." म्हसोबाचे ते वाक्य मौलवीला छान ऐकू आले व त्याचा राग पण आला. त्याने रांगतरांगत गवतातून पुढे जात आपल्या कटचारीने एक वार केला म्हसोबाच्या अंगावर." म्हसोबा कळवळून जमिनीवर पडला व तडफडू लागला. तेव्हां मौवलीने कटचार त्याच्या अंगातून काढून त्याला उभा केला व थोडेसे हसून म्हणाला–"सियोनी कळपातला बिन केसांचा लांडगा आहे ना मी? एकदा मी तुला पिटाळले होते, तुझ्या पाठीवर बसून!"

"तू! लांडगा! गरीब जनावरांना पिटाळण्यात पटाईत आहेस. खरा शिकारी असतात तर सापासारखा सरपटत येऊन एका बाई (मादी)च्या समोर माझा अपमान केला नसतास." म्हसोबा म्हणाला.

"म्हसोबा हा सर्व प्रदेश, हे पहा, मला नवा वाटतो. या बाजूला कोठे माणसांचा कळप किंवा वस्ती आहे का?" मौवलीने विचारले.

"उत्तरेकडे जा. ही दलदल पार करुन पलीकडे गेलास म्हणजे एक गाव दिसेल." म्हसोबा म्हणाला.

मौवली त्याप्रमाणे तो दलदलीचा प्रदेश ओलांडून एका मोठ्या मैदानात आला. त्याला दुरुन दिव्याची ज्योत दिसली. लालफूल! त्याला मनुष्यांच्या वस्तीची कल्पना होती. ते 'लालफूल' त्याला जणुकाही आपल्याकडे बोलावीत होते.

'मनुष्यांच्या वस्तीत काही फरक झाला आहे का', पाहू या तर, असा विचार करीत तो पुढे निघाला.



# सिलोनचे बौद्ध मंदिर

रुवन्वेली येथील बौद्ध मंदिर अनुराधापुर येथे २००० वर्षांपूर्वी एका राजाने बांधले. हे देऊळ बांधायला कोट्यवधी विटा लागल्या. याच्या पायात सोन्याच्या व चांदीच्या विटा बसविण्यात आल्या होत्या असे सांगतात. याची उंची १८० फुट आहे. देवाच्या जत्रेच्या वेळी भक्त वर चढून जातात.

त्यांच्या हाती आले नाही. ते शहर काबीज करण्याच्या कामी इंग्रजांना नेपाळच्या मंत्री जंगबहादुर याने सहाय्य केले.

मध्य भारतात बंडाचे निशाण उभे करणारांचे पुढारी तात्या टोपे होते. ते हजार शिपायांना बरोबर घेऊन यमुना नदीपार नानासाहेबांना भेटले. परंतु ६ डिसेंबर १८५७ या रोजी इंग्रजांच्या हातून पराभव झाल्यामुळे त्यांना पळून जावे लागले. परंतु हिंमत हारून ते स्वस्थ बसले नाहीत. त्यांनी झाशीची राणी लक्ष्मीबाई यांच्याशी सख्य करून मध्य भारतात भयंकर युद्ध आरंभ केले. ब्रिटीश सैन्याने ३ एप्रिल १८५८ रोजी टोपे यांचा पराभव करून झाशीला वेढा दिला.

४ एप्रिल रोजी झाशीच्या राणी लक्ष्मीबाई आपल्या काही विश्वासपात्र अनुयायांसह झाशीचा किल्ला सोडून काल्पीला आल्या. इंग्रजानी तेथे पर्यंत त्यांचा पाठलाग केला आणि २२ मे रोजी त्यांनी काल्पी शहर जिंकले. तरी राणी निराश झाल्या नाहीत. त्या तात्या टोपे यांच्या मदतीने ग्वाल्हेरवर चालून आल्या आणि शिंद्यांना आग्र्यापर्यंत पळून जावे लागले. नानासाहेब पेशवा असल्याचे जाहीर करण्यात आले.

तात्या टोपे व लक्ष्मीबाई यांच्या वाढत्या शक्तीला भिऊन जाऊन इंग्रजांनी त्यांचा शेवट करण्याचे ठरविले. त्यांनी मोठ्या मुश्किलीने ग्वाल्हेर पुन्हा जिंकले. १७ जून १८५८ या रोजी पुरुष वेष धारण करून युद्ध करीत असता राणी धरातीर्थी पडली. तात्या टोपे शेवटी मानसिंह नांवाच्या एका सरदाराच्या फितुरीने इंग्रजांच्या हाती पकडले गेले व त्यांना फाशी देण्यात आली. नानासाहेब नेपाळकडे पळून गेले व तेथेच मरण पावले. अशा तऱ्हेने १८५७ च्या भारताच्या प्रथम स्वातंत्र्य युद्धाची ज्योत विझली.





# शिशु

अंगीरस शाखेतल्या एका मुनीला एक पुत्र जन्मला. अंगीरस महर्षींनी त्या मुलाला पाहिले व म्हणाले—"या मुलाच्या बुद्धीला कधी वार्धक्य येणार नाही. हा सर्वदा शिशूच राहील. त्यांनी त्याचे नाव शिशु असेच ठेवले.

शिशूने आपल्या वडिलांजळच विद्याभ्यास करून काही ऋचा रचिल्या. स्वतःहून मोठ्यांना तो "वत्स!" म्हणूनच संबोधन करी. हे पाहून त्याच्या वडिलांनी आपल्या मुलाला अंगीरस मुनींकडे नेऊन मुलगा आपल्याहून थोरांचा उपमर्द करतो. तरी त्याला आवश्यक ती शिकवण द्यावी अशी विनंती केली.

शिशूने ते कबूल केले व अंगीरस मुनींना म्हणाला—"वत्स! लहान-थोर यांच्यातील अंतर याचा अर्थ असा आहे. माझ्याहून जे मोठे आहेत त्यांना मी काही सांगत नाही, कळत नाही त्याला समजाऊन सांगावे लागते. सांगणारा मोठा असतो व ऐकणारा लहान."

शिशु म्हणाला ते ऐकून अंगीरस म्हणाले—"होय! बरोबर आहे. त्याचे हे वाक्य सुद्धा एक ऋचा आहे. वेदवक्त्याच्या रूपाने हा जन्मला आहे. याच्या समोर सर्व लहान आहेत."

त्या दिवसापासून सर्व शिशूचा आदर करू लागले. तो जे बोले त्या ऋचा झाल्या.

वरुण महर्षींचा मुलगा भृगु शिशूहून वयाने थोर होता. त्याने विचार केला शिशु आपल्याहून लहान असूनही सर्वांना 'वत्स' म्हणून संबोधन करतो तर आपण देखील तसेच कां करू नये? तो देखील सर्वांना "शिशु" म्हणून संबोधन करू लागला. सर्वांना त्याचा राग आला.

श्री. का. मा. पवार











भृगू त्यांना म्हणाला–"वत्स हो! तुम्ही सर्व माझ्याहून जास्त ज्ञानवान आहां तर माझ्याशी शास्त्रार्थाला या."

"तू शास्त्रार्थच करणार असशील तर शिष्यप्रमाणे अंगीरसांकडे जाऊन त्यांचा आशीर्वाद मिळव." सर्व थोर पुरुष म्हणाले.

भृगू अंगीरस मुनींकडे गेला व म्हणाला– "वत्स अंगीरस! माझ्याशी शास्त्रार्थ कर."

"हे वत्स! तू चतुर्दिक हिंडून कोठे काय आहे हे पाहून आला आहेस का?" अंगीरसाने भृगूला विचारले.

"तू पाहून आला आहेस का? भृगूने उलट प्रश्न अंगीरस मुनींना केला.

"होय, पाहून आलो आहे. तू सुद्धा पाहून ये, मग शास्त्रार्थ कर." अंगीरस मुनी म्हणाले.

भृगू त्या गोष्टीस कबूल झाला. तो प्रथम पूर्व दिशेला गेला. तेथे काही नरहारी पापी नरहत्या करून "हा तुझा वांटा, हा माझा" असे भांडत होते.

"असे हे तुम्ही कां करता?" भृगूने त्या नरहारी पाप्यांना विचारले.

"मागच्या जन्मी या सर्वांनी असाच आमचा वध करून आमचे नरमांस वांटून घेतले होते. म्हणून या जन्मी आम्ही त्यांच्याशी तसाच व्यवहार करीत आहो." ते नरहत्या करणारे दुष्ट म्हणाले.



"या पासून मुक्तीला काही मार्ग?" भृगूने त्या नरहंतकांना विचारले.

"तू अंगीरसाला जाऊन विचार." ते नरहंतक भृगूला म्हणाले.

भृगू तेथून दक्षिणेकडे गेला. तेथे देखील त्याला तसेच भयंकर दृश्य दिसले. पश्चिम व उत्तर दिशांकडे तो गेला. परंतु त्या दोन्ही दिशांना त्याला तीच दृश्ये दिसली. उत्तरेकडून ईशान्येकडे वळून तो परत येत असता त्याला दोन स्त्रिया दिसल्या. एक स्त्री देवी सारखी दिसत होती तर दुसरी राक्षसिणी सारखी. त्या दोघांच्या मध्यभागी एक भयंकर आकृती वाला पुरुष होता. त्याचे डोळे हळदी सारखे पिवळे होते. त्याच्या हातात एक काठी होती.

ते दृश्य भृगूला कळले नाही. भृगू अंगीरस मुनींकडे परतला व लाजेने मान खाली करून समोर उभा राहिला. कारण त्याला त्या सर्व दृश्यांचा अर्थ कळला नव्हता.

भृगूला मौनपणे उभा पाहून अंगीरसांनी विचारले–"चतुर्दिक तू काय पाहिलेस? काय होते ते? त्या दृश्यांचा अर्थ व त्यांच्या पासून मुक्तीचा उपाय तुला जोपर्यंत कळत नाही तोंपर्यंत तुला शांति मिळणे शक्य नाही."



"मी जी जी दृश्ये पाहिली त्यांपैकी एकाचा देखील अर्थ मला कळला नाही. प्रत्येक ठिकाणी त्याचा अर्थ आपणांकडून विचारून घ्यावा असाच सल्ला मिळाला." भृगू म्हणाला.

"तर मग तू जाऊन शिशूला विचार, तो त्यांचा अर्थ सांगेल." अंगीरस म्हणाले.

भृगूने शिशूजवळ जाऊन, त्याने जी जी दृश्ये पाहिली होती त्यांचे वर्णन करून त्यांचा अर्थ सांगण्याची विनंती केली.

शिशूने त्यांचा जो अर्थ सांगितला तो असा–"तू पूर्व दिशेला ज्या पापी नरपशूंना पाहिलेस, ते मनुष्य नसून वृक्ष होत. यज्ञकर्म कसे करावे याच्या ज्ञानाभावी मनुष्य स्वार्थवश वृक्ष, त्यांच्या फांद्या, डाहाळ्या फुले व फळे तोडतो. म्हणून त्या झाडांच्या हातीच त्यांचा वध होत आहे. त्यांपासून मुक्ति मिळविण्यासाठी अग्नीत त्या झाडांच्या समिधा टाकून यज्ञकर्म करावे. दक्षिणेकडे तुला जे दुष्ट दिसले ते पशु होत. स्वार्थी मानवाने त्यांचा वध केला होता म्हणून ते त्याचा वध करीत होते. त्या साठी यज्ञात पशुबली द्यावा. पश्चिमेकडे तुला जे पापकर्मी भेटले, त्या औषधी होत. यज्ञात त्यांचे हवन केल्यास दोष-मुक्ति लाभते. उत्तरेकडे तुला जे नरहंतक दिसले ते पाणी होय. त्याचा उपयोग यज्ञजल म्हणून करावा. म्हणजे दोष निवारण होईल. परत येते वेळी तुला ज्या स्त्रिया दिसल्या त्या अनुक्रमे श्रद्धा व अश्रद्धा म्हणजे अविश्वास होत. त्यांच्या मध्यभागी क्रोध होता. यज्ञकर्माच्या वेळी जो श्रद्धापूर्वक यज्ञ करील व अश्रद्धा दूर राखील तो क्रोधाला जिंकून निश्चित सुखी होईल."

शिशूजवळ हा सर्व उपदेश घेऊन भृगूने अहंकाराचा त्याग केला व तो देखील एक महा पुरुष झाला.





# पडकें देऊळ

[ १३ ]

[ गोंड नायकाने आपल्या अनुयायांच्या मदतीने शिखीमुख व त्याच्या साथी मित्रावर हल्ला केला. विक्रमकेसरीने त्याला घोड्यावरुन खेचले व त्याच घोड्यावर बसून शिखीमुख व नागमल्ली पळाले. घोड्यावरुन नागमल्ली पडली तेव्हां तिला उचलून गोंड जंगलांतल्या वाघाच्या पिंजऱ्याकडे निघाले. पुढे–]

गोंड लोकांनी नागमल्लीला सिंहाच्या पिंजऱ्याजवळ नेऊन तिला जमिनीवर ठेवले. तोपर्यंत नागमल्ली शुद्धीवर आली नव्हती. झाडावरुन शिखीमुख ते सर्व पहात होता. त्याला भीती वाटत होती की गोंड तिला वाघासमोर तर टाकणार नसतील? पण त्याला गोंड नायक बडबडला होता ते आठवले. तो तिच्या बापाकडून पुष्कळ पैसे वसूल करणार होता. तरी त्याच्या अनुयायांनी नागमल्लीला बेशुद्ध स्थितीत वाघाच्या पिंजऱ्याजवळ कां बरे नेऊन ठेवले हे त्याला कळेना.

शिखीमुख याच विचारात असता एक गोंड मोठ्याने ओरडून म्हणाला– "भूतनायका!" त्याचे उत्तर पिंजऱ्या मागच्या झाडीतून आले–"कोणरे तू? तुझे चामडे लोळवीन, हो चालता येथून!"



ते उत्तर ऐकून गोंड घाबरले व ज्या बाजूने तो आवाज आला होता तिकडे पाहू लागले. त्याच वेळी एक गिड्डा मनुष्य झाडाच्या पारंब्या धरून खाली उतरत असलेला त्यांना दिसला. त्याच्या गळ्यात हाडांची माळा होती व हातात एक लांब काठी होती. तो भुतांचा नायक गोंड होता.

त्याने नागमल्लीला पाहिले व म्हणाला— "अरे ही पोरगी कोण? कोणी देवलोकातली दिसते आहे. कोण घेऊन आलं हिला इथे?"

गोंडां पैकी एकाने थोडक्यात जे घडले ते सांगितले व कापऱ्या आवाजात म्हणाला—

"पुजारी प्रभूने हिला आकाश गुहेजवळ घेऊन यायला सांगितले आहे. पण बराच वेळ झाला, ही जिवंत आहे की मेली हे देखील माहीत नाही. मेली असेल तर पुजारी प्रभू आम्हांलाच ठार करील."

त्या गिड्ड्याने नागमल्लीच्या नाकपुड्याजवळ हात नेऊन तिचा श्वासोच्छ्वास चालू असल्याचे ओळखले व म्हणाला—"आहे, जिवंत आहे. घोड्यावरून पडल्यामुळे बेशुद्ध झाली आहे. हिला औषध देऊन मंत्र टाकला तर उठून बसेल व कदाचित पळून जाईल. म्हणून देतो ते भस्म घेऊन जा. आकाश गुहेजवळ घेऊन जाऊन हे नाकपुड्यांना लावा, ही तीन चारदां शिंकेल व उठून बसेल." असे सांगून कंबरेला लोंबत असलेल्या एका पिशवी तून एक पुडी काढून त्याने गोंडाच्या हातात दिली.

त्या गोंडाने ती पुडी कंबरेला खोचून ठेवली व इतर गोंडांना नागमल्लीला उचला म्हणून खूण केली. त्या प्रमाणे सर्व नागमल्लीला खांद्यावर उचलून निघाले. त्यांच्या हातातून नागमल्लीला वाचविणे तितकेसे कठीण नाही असे शिखीमुखला वाटले. तो झाडांवरूनच थोडा पुढे निघाला.



नागमल्लीला उचलून नेणाऱ्या गोंडांना वाटेत थांबवून ठेवण्याचे त्याने ठरविले.

शिखीमुखने परत येईपर्यंत आपल्यासाठी गिड्ड्या शवराला भूतनायकावर नजर ठेवायला सांगितले व स्वतः झाडावरून वरच्या वर काही अंतर चालून गेला. त्यानंतर त्याला खडकाजवळ काही गोंड नागमल्लीला घेऊन 'जाणाऱ्या गोंडांना भेटण्यासाठी पुढे येत असलेले दिसले. त्यांना पाहून शिखीमुखचा धीर थोडा खचला. त्या सर्वांच्या हातातून नागमल्लीला जिवंत सोडवून आणणे कठीण आहे असे त्याला वाटले. आता विक्रमकेसरी शवर साथीदारांना घेऊन आला की त्यांच्या मदतीने नागमल्लीला सोडविणे शक्य होईल. हा एकच एक उपाय त्याला दिसला.

विक्रमकेसरी येईपर्यंत त्याला तेथे स्वस्थ बसून रहावे लागणार या बद्दल त्याला फार वाईट वाटत होते. पण काय करणार दुसरा मार्गच नव्हता. इतक्यात त्याला भूतनायक व तो वाघाचा पिंजरा आठवला. शिखी स्वतः जंगली जाती पैकी एक होता. म्हणून मंत्रतंत्र माहीत असल्याशिवाय जंगली जातीवर अधिकार कायम ठेवणे



अशक्य हे त्याला माहीत होते. म्हणून त्याने विचार केला की त्या भूतनायकाला काही तरी उपाय करून वश करून घ्यावे, म्हणजे त्याला पुढच्या कामात यश येईल. तो विचार मनात येताच तो झाडावरून उड्या टाकीत वाघाच्या पिंजऱ्याजवळ येऊन पोचला.

भूतनायक त्यावेळी एका बकरीच्या गळ्यात एक दोरी अडकवून तिला पिंजऱ्याकडे ओढून नेत होता. व ती बकरी घाबरून 'बें बें' करीत मागे मागे फिरण्याचा प्रयत्न करीत होती. शिखीमुख थोडा वेळ ती गंमत पहात उभा राहिला. नंतर



सिहगर्जना करून झाडावरुन त्याने जोराने भूतनायकासमोर उडी मारली. भुतांचा नायक दचकला व मोठ्याने ओरडला. समोर वाघ नव्हता, एक शबर तरुण उभा होता. तेव्हां स्वतःला एकदम सावरून व वाटलेले भय मनातल्या मनात दाबून काठी उगारून तो दरडावून म्हणाला–"चोरा, गुलामा! कोण रे तू? भूतनायकाची थट्टा करण्याची तुझी हिंमत? तुला भस्म करून तुझी राख कपाळाला फासीन, समजालास काय?"

शिखीमुखीने त्याला उत्तर देण्याच्या भानगडीत न पडता शिताफीने क्षणार्धात त्याच्या हातातली काठी काढून घेतली. उजव्या हाताने त्याची शेंडी धरली. भूतनायक शिखीच्या मगरमिठीतून स्वतःला सोडविण्यासाठी धडपड करू लागला. पण शिखीमुखला भेवडावून सोडण्यासाठी तो त्याला म्हणाला–"खुळचा! तू मला ओळखले नाहीस वाटते? मी गोंड नायकाचा साथी आहे. त्याच्या नंतर होणारा त्या टोळीचा नायक!"

शिखीमुख जोराने हसला व म्हणाला–"अरे! तू कोण आहेस त्याचे मला काय करायचे आहे? भूतनायका, मला सांग, जवळ तलाव आहे ना त्यात पाणी प्यायला वाघ केव्हां येतो?"

भूतनायक तो प्रश्न ऐकून जास्तच चिडला. रागाने त्याचा चेहरा लाल झाला. तो शिखीमुखला म्हणाला–"दुष्ट चोरा! मला असला प्रश्न करणारा कोण रे तू? पहिल्याने माझी शेंडी सोड!" भूतनायक जणुंकाही शिखीमुखला खाणार अशा स्वरात बोलत होता.

"अस्सं! तर मग मी तुला काहीच विचारीत नाही. बाकी प्रश्न विचारण्याचे व इतर काम स्वतः वाघच करील. असे सांगून शिखीमुखने भूतनायकाची कंबर धरून फरपटत ओढत वाघाच्या पिंजऱ्याकडे नेले व म्हणाला–"आज बकरीचा जीव वांचला. तिच्या ऐवजी तुझाच बळी!"

भूतनायकाची बुद्धी ताळ्यावर आली. त्याचे सर्व अंग भीतीने थर थर कापू लागले. म्हणाला–"मला क्षमा कर! तू कोण आहेस हे मी ओळखले नव्हते. मला वाघाच्या तोंडी देऊ नकोस. मी तुझ्या पाया पडतो. आयुष्यभर तुझा गुलाम म्हणून राहीन."

शिखीमुखने त्याला सोडले व म्हणाला–"खबरदार! माझ्याजवळ तुझा असला खेळ खंडोबा चालणार नाही. तुला जीवदान देतो. आता आयुष्यभर माझी गुलामी करण्याची गरज नाही. फक्त चोवीस तास मी सांगतो तसा वाग."

"होय प्रभो! बोला काय करू? आपण म्हणा ते करायला तयार आहे मी." असे म्हणत भूतनायकाने शिखीमुखच्या पायावर लोटांगण घातले.

शिखीमुख त्याला उठायला सांगून म्हणाला–"नागनायक लट्टूसिहाच्या मुलीला हे गोंडलोक उचलून घेऊन गेलेले तू पाहिलेस ना? तिला रात्रीच्या रात्री सोडवून आणावयाचे आहे. तिला कसे





वांचवावयाचे हे विचारीत बसू नकोस. तू एक काम कर. तुझ्या आकाश गुहेसमोर ज्या झोपड्या आहेत, त्यांच्या चारी बाजूला काटेरी तारेचे कुंपण आहे. त्या कुंपणाचे दार आज रात्री बंद होऊ नये याची काळजी तू घेतली पाहिजेस. लट्ठू-सिंहाच्या मुलीला त्या दाराजवळच्या झोपडीत ठेवले जावे याची व्यवस्थापण तुलाच करावी लागेल."

"होय, प्रभो! आपल्या आज्ञेचे पालन मी करतो. गोंडांच्या या टोळीत मी सांगेन त्याच्या बाहेर कोणी नाही." भूतनायक म्हणाला.

"हे सर्व ठीक आहे. पण तू शब्द दिल्यासारखा वागला नाहीस तर?" शिखीमुखने शंका केली.

"मी त्या देवाला साक्षी ठेवून शपथ घेतो. मग तर खरे वाटेल ना?" असे सांगून भूतनायकाने गळ्यातली हाडांची माळा डोक्याला लावून एकदा आकाशाकडे पाहिले.

"तर मग ही हाडांची माळा मला दे. तू वचन दिल्याप्रमाणे वागलास तर मी तुला ही माळा परत देईन." शिखीमुख हाडांची माळा हाताने धरून जोराने हाल-वीत म्हणाला.

भुतांचा नायक त्या माळेतच जणुकाही त्याचा जीव आहे, अशातऱ्हेने घाबरून गयावाया करीत म्हणाला—"माझे सर्व बळ आहे ते या माळेतच आहे, प्रभो! जर ही माळा माझ्या गळ्यात नसेल तर माझ्या बोलण्याकडे कोण लक्ष देईल? सर्व गोंड मला वटवाघळासारखे मानून मला विचारणार नाहीत."

"बरे तर! पण आपले वचन पाळशील ना? खबरदार, बजावून ठेवतो! मला दिलेले वचन मोडलेस तर तुला त्या वाघाच्या तोंडी दिल्याशिवाय सोडणार



नाही. लक्षात ठेव!" शिखीमुखने त्याला दहशत घातली.

"प्रभो! मी तीन कोटी डोंगरी भुते व सहा कोटी जंगली भुतांची शपथ घेऊन सांगतो की मी दिलेले वचन मोडणार नाही." भूतनायक म्हणाला.

"ठीक तर मग तू आकाश गुहेत जा. नागमल्लीच्या जिवाला अपाय होता कामा नये. या पिंजऱ्याची फिकीर मला आहे. जे करायचे ते मी करतो. तू बेफिकीर रहा." शिखीमुख म्हणाला.

"येतो, प्रभो! आपल्याला दिलेले वचन मोडणार नाही. तसा मी याच जंगलात राहतो. ते पहा माझे झोपडे. आता मला आज्ञा द्यावी." शिखीमुखचा निरोप घेऊन भूतनायक निघून गेला.

शिखीमुखने झाडावर चढून भूतनायक कोणत्या वाटेने जात आहे हे पाहिले. तो आकाश गुहेकडे जात असल्याची खात्री पटल्यावर तो झाडावरून खाली उतरला. नंतर त्याने पिंजऱ्यात बकरीला बांधून ठेवले आणि आपल्या शबर अनुयायाला हाक मारून बोलाविले. तो झाडावर चढून लपून बसला होता. दोघे भूतनायकाने दाखविलेल्या झोपडीत गेले.



झोपडीत वाघांची व अस्वलांचीं कातडी टांगलेली होती. मधल्या खांबाला मनुष्याच्या नरोटया लोंबत होत्या. शिखीने ते सर्व ध्यानपूर्वक पाहून एक नरोटी व वाघाचे एक कातडे हातात घेतले. गोंडाच्या आकाश गुहेजवळच्या झोपडीत शिरतांना त्यांचा उपयोग होईल असे त्याला वाटले.

सूर्यास्तापूर्वी विक्रमकेसरी पन्नास-साठ शबर तरुणांबरोबर येऊन शिखीमुखला भेटला. त्यांच्या बरोबर काही नागजातीचे तरुणपण आले होते. शिखीमुखने विक्रमला सर्व परिस्थिती समजावून सांगितली व म्हणाला—"भूतनायक शब्द पाळील यात

मला तरी शंका नाही. म्हणून आपल्या पैकी फक्त पांच सहाजणांनीच गोंडांच्या वस्तीत शिरावे व नागमल्लीला उचलून घेऊन यावे. तसे न करता सर्वांनी एकदम वस्तीवर हल्ला केला तर फुकट रक्तपात होईल. शिवाय नागमल्लीचा जीव धोक्यात पडेल."

"हे सर्व कबूल! पण आपला खरा शत्रू पुजारी आहे. तोच या सर्व कष्टांच्या बुडाशी आहे. तू त्याला विसरलास असे मला वाटू लागले आहे." विक्रम म्हणाला.

"त्याला पकडण्याच्या प्रयत्नातच नाही का आपण असे त्याच्या जाळ्यात सापडलो. मी त्या दुष्टाला कसा काय विसरेन? आज रात्री तो कोठे सापडला तर त्याचा समाचार घेऊ." शिखीमुख दात ओठ चावून म्हणाला.

नंतर त्या दोघांनी काय व कसे करावयाचे याविषयी विचार केला व तसे करावयाचे ठरविले. सर्व अनुयायांबरोबर गोंडांच्या वस्तीकडे जाऊन जवळ लपून उभे रहावयाचे, फक्त आठ दहा जणांनी आत शिरावयाचे ठरले.

सूर्यास्त झाल्याबरोबर सर्व गोंडांच्या वस्तीच्या दिशेने चालू लागले. पंधरा मिनिटांनी वाघाच्या डरकाळ्या पाठीमागून ऐकू आल्या. सर्व जागच्या जागी थांबले. शिखीमुख म्हणाला—"भूतनायकाने ठेवलेल्या पिंजऱ्यात वाघ सापडलेला दिसतो आहे. तुमच्या पैकी काही जण जा आणि पिंजरा ओढून घेऊन या." जरूर पडली तर गोंडांना या दरीत ढकलता येईल.

शिखीमुखने सांगितल्याबरोबर आठ दहा जण पिंजरा ओढून आणण्यासाठी धावले. शिखीमुखला वाटले होते तसा वाघ पिंजऱ्यात सापडला होता व बाहेर येण्यासाठी धडपड करीत होता. पिंजऱ्याला लाकडी चाके होती. शबर पिंजरा ओढून नेऊ लागले. चाकांचा 'चर्रचर्र' आवाज दुरून ऐकू येत होता. (पुढील गोष्ट पुढील अंकी)



# युग धर्म

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. त्याने प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे तो मौन पणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! या कलियुगात चांगल्याला कोणी विचारीत नाही या गोष्टीची आठवण तुला रहावी या साठी आणि तू करीत असलेले कष्ट थोडे हलके वाटावे म्हणून मी तुला रामशास्त्रीची गोष्ट सांगणार आहे. नीट लक्ष देऊन ऐक." असे सांगून तो गोष्ट सांगू लागला.

द्वापर युग संपून कलियुग सुरू झाले होते. एका लहान खेडे गावात एका ब्राह्मणाला रामशास्त्री नावाचा एक मुलगा होता. रामशास्त्रीचे वडील भिक्षुकी करीत. वडील वृद्ध झाल्यावर रामशास्त्र्याला ते काम करावे लागू लागले.



एकदा रामशास्त्री दूरच्या एका गावी लग्नासाठी गेला होता. रामशास्त्र्याने जेवतांना पक्वान्ने खूप झोडली व दान दक्षिणा घेऊन आपल्या गावी निघाला. वैशाख महिन्याचे कडक ऊन पडले होते. रामशास्त्र्याने तूप खूप खाल्ले होते म्हणून त्याला घसा कोरडा झाल्यासारखा वाटू लागला. त्याने जवळपास विहीर तलाव काही आहे का पुष्कळ पाहिले, पण त्याला निराश व्हावे लागले.

परंतु त्याला एक उसाचे शेत दिसले. रामशास्त्र्याने शेताच्या मालकाला विचारून ऊस मागून खायचे ठरविले. पण त्याला कोणी दिसला नाही. स्वत:चा जीव वांचविणे आपले आद्य कर्तव्य समजून रामशास्त्र्याने एक ऊस उपटला व थोडा खाऊन आपली तहान भागवली. तेव्हां त्याच्या लक्षात आले की आपण केले ते बरोबर नव्हते. चोरी तर नाही होणार ही! त्याला शेताचा मालक कोण हे माहीत नव्हते. निदान उसाची किंमत तर दिलीच पाहिजे. असा विचार करून त्याला जी दक्षिणा मिळाली होती तिच्यातले एक तांब्याचे नाणे त्याने काढले व उरलेल्या उसाच्या कांडीवर ठेवून दिले.

हे सर्व दृश्य कलिपुरुष अदृश्यपणे पहात होता. त्याने हरिजनाचे रूप धारण केले व रामशास्त्र्याच्या पाठीमागून त्याला काही कळू दिल्याशिवाय चालू लागला. रामशास्त्र्याला ती गोष्ट माहीत नव्हती. घरी पोचल्यावर त्याने आईला पाय धुवायला पाणी आणायला सांगितले.

आई एक तांब्याभर पाणी घेऊन आली व रामशास्त्र्याच्या मागे कलिपुरुषाला पाहून तिने विचारले–"हा कोण रे?"

रामशास्त्र्याने मागे वळून पाहिले. तो कोण व त्याच्या पाठी मागून कशासाठी आला हे त्याला कळेना. रामशास्त्र्याच्या आईने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर कलिपुरुषानेच दिले–"मी हो! माझं नाव कालिदास. मी ताडी विकतो. वाटेत माझ्या जवळून ताडी घेऊन हे प्याले व घरी येऊन पैसे घेऊन जा म्हणाले. म्हणून मी आलो आहे."

"हे काय रे ऐकते मी विठ्ठला! हे पाहण्या साठीच का मला जगावे लागणार?" असे म्हणत ती बेशुद्ध होऊन पडली.

तेवढ्या अवधीत रामशास्त्र्याचे वडील बाहेर आले व बायकोला बसवून मुलाला विचारू लागले–"काय झाले रे?"

रामशास्त्री काही बोलणार तेवढ्यात कलिपुरुष मध्येच म्हणाला–"त्यांना कशाला विचारता, मी सांगतो." असे सांगून त्याने रामशास्त्र्याच्या आईला जे सांगितले होते तेच सांगितले.

रामशास्त्र्याला भयंकर राग आला व म्हणाला–"माझा मुलगा ताडी पिणे शक्यच नाही. तूच ताडी पिऊन बडबडतो आहेस."

कलिपुरुष म्हणाला–"मला खोटे बोलण्याची काय गरज? माझ्या बोलण्यावर विश्वास नसेल तर आपल्या मुलांला थोडे मीठ खायला सांगून पहा. सर्व दारु ओकून पडेल व खरे खोटे कळेल."



रामशास्त्र्याच्या बापाने थोडे मीठ आणून मुलाला खायला सांगितले. मीठ खाल्ल्यामुळे रामशास्त्री ओकला. तो पर्यंतप्यालेल्या उसाच्या रसाला आंबूस वास येऊं लागला होता.

रामशास्त्र्याच्या आई वडिलांना मुलगा ताडी पिऊन आल्याची गोष्ट खरी वाटली. त्याचा बाप त्याला म्हणाला–"आजपर्यंत मी आपल्याला एक गुणवान मुलगा आहे म्हणून सर्व जगाला सांगत होतो. पण आज तू माझ्या तोंडाला काळे फासलेस. आज पासून आपल्याला कोणी मुलगाच नाही असे मी समजेन व तुला कोणी आई बाप नव्हते

असे तू समज. चालता हो, तू माझ्या घरून अन् जा त्या हरिजनाच्या बरोबर." असे सांगून दोघे नवरा बायको घरात गेली" व दार बंद करून आतून कडी लावून घेतली.

रामशास्त्र्याला फार वाईट वाटले. त्याने तसा मोठा अपराध केला नव्हता व जी चूक त्याने केली होती तिच्या ऐवजी दुसराच आरोप त्याच्यावर लागला गेला. ज्या हरिजनाचे तोंड त्याने कधीं पाहिले नव्हते .त्याने हा आरोप त्याच्यावर लावला. त्याने असे कां बरे केले असावे? त्याने कलिपुरुषालाच विचारले–"कोणरे बाबा तू? तू असे खोटे कां सांगितलेस?"

कलिपुरुष रामशास्त्र्याला दरडावून म्हणाला–"तू केलेसच तसे एक पाप. मी तुला अद्दल घडावी म्हणून मी हा दंड दिला आहे. तूच नीट विचार करून पहा, तू जे केलेस ती एक चूक होती की नाही!" असे सांगून कलिपुरुष अदृश्य झाला.

वेताळ गोष्ट संपवून म्हणाला–"राजा! रामशास्त्र्याच्या हातून कोणती चूक घडली हे माहीत असून तू उत्तर दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्यावर राजा म्हणाला–"ज्या शेतात पाहरा नाही त्या शेतातला ऊस खाऊन आपली तहान भागवणे हे पाप झाले. त्याच्या शरिरात तेव्हांच कलियुगाचा धर्म शिरला. म्हणूनच त्याने जो ऊस खाल्ला होता त्याची किंमत काढून उसावर ठेवली. असा धर्म व जमिनीवरचा अधिकार द्वापर युगात नव्हता. रामशास्त्र्याच्या शरिरात कलीने प्रवेश केला होता म्हणून त्याला तो शिक्षा करू शकला."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेता बरोबर अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# श्रमाचे फळ

एका गावी लखू नावाचा एक लोहार रहात असे. तो आपल्या धंद्यात फार हुशार होता. अंगापिंडाने बळकट व स्वभावाने तो सहनशील पण होता. कुऱ्हाडी, कोयते, कुदळ, फावडी वगैरे तो तयार करी. भाता ओढायला त्याने एक नोकर ठेवला होता. सर्व काम तो चोख करी. मेहनत करून जी मजुरी मिळेल तेवढ्यावर संतोष मानून तो राही.

लखूला रघू नावाचा एक मुलगा होता. त्याच्या आईचे नाव मनू. तिच्या लाडामुळे रघू आळशी होऊ लागला. मनूला नवऱ्याने केलेले कष्ट पण आवडत नसत. ती नवऱ्याला म्हणे–"तुम्ही करतां त्यातली पाच टक्के मेहनत केल्याशिवाय, पहा इतर लोक कसे गबरू झाले आहेत ते. तुम्ही मात्र हाडाची काडे करता आहा आणि थड चार पैसे हाती लागतील तर शपथ. असे किती दिवस चालणार? सत्याला व इमानाला कोणी विचारीत नाही."

ती म्हणे ते ऐकून लखू बायकोला म्हणे–"मेहनतीच्या फळाची किंमत तुला काय कळणार? लबाडीने मिळविलेले पैसे माती मोलाचे!"

परंतु मनूला वाटे की धन कसे मिळविले तर काय झाले? धन ते धनच! तिचा भाऊ चांगला विद्याभ्यास करून मोठी नोकरी करू लागला व त्याचा संसार सुखाचा झाला. तिचा मुलगा तसाच विद्याभ्यास करून नोकरी करू लागला तर किती बरे होईल. काही झाले तरी त्याला लोहाराचे काम करावे लागता कामा नये. असे तिने मनाशी ठरविले. रघूला शाळेत घालण्यात आले. पण तो नीट अभ्यास करीत नसे. एवढेच नव्हे तर तो दिवसभर कोठे तरी उनाडक्या करी व संध्याकाळी



घरी परत येई. त्याच्या बापाला वाटू लागले की मुलाच्या नशिबात शिक्षण नाही. म्हणून त्याने मुलाला आपला पिढिजात धंदा शिकविण्याचे ठरविले व बोलावून म्हणाला—"बाळ, दिवसभर कोठे रे भटकतोस? ये कमीत कमी भाता तरी ओढीत जा."

रघूला अभ्यासाचा जेवढा तिटकारा होता त्याहून जास्त बापाच्या धंद्याचा होता. म्हणून तो बापाची नजर चुकवून हिंडे फिरे.

रघू लहानाचा मोठा होऊ लागला तसतशी लखूला त्याची जास्तच काळजी वाटू लागली. वयोमानाप्रमाणे शरीर थकत चालले होते व अंगातली शक्ति दिवसे दिवस कमी होत चालली होती. त्याचा मुलगा घरचा धंदा शिकला नाही व विद्याभ्यासात पण अयशस्वी ठरला होता.

एकदा विचार करून तो आपल्या बायकोला म्हणाला—"तू आपल्या लाडक्या मुलाला सांग, माझ्या अंगात शक्ति आहे तोपर्यंत आपला वडिलार्जित धंदा पाहिजे तर शिकून घे. माझ्या मागून तो काही करू शकला नाही तर हे दुकान बंद करावे लागेल. मी मिळवीन त्याच्यावर तो किती दिवस उड्या मारणार? तसे मला मिळते तरी काय? सर्वांची पोटें भरतात, एवढेच मी मागे सोडून जाईन ते त्याला चार दिवस सुद्धा पुरणार नाही. नंतर त्याच्या हाती करवंटी येईल."

रघू मनूचा लाडका होता. म्हणून ती म्हणाली—"तुम्ही उगीच एवढी काळजी करता आहा. हातात हातोडा धरला तरच पोट भरेल असे वाटते का तुम्हांला? तो सुद्धा कोणत्या तरी नोकरीच्या शोधात आहे. तुमच्या पैशावर तो आयुष्यभर उड्या नाही मारणार."

लखूला राग आला. म्हणाला—"हो, हो! कळले मला तो मिळवणार व तू खाणार. मला तीन रुपयांहून कमी एकाही दिवशी मिळाले नाहीत. तुझा लाडका तीन रुपये तर जाऊच दे, तीन पावल्या तर मिळवून आणू दे. पाहतो मी. बायकोला मुलाची नालायकी कळावी अशा तऱ्हेने लखूने सांगितले."

त्याच वेळी रघूने घरात पाय ठेवला व बापाचे ते शेवटचे वाक्य त्याच्या कानावर पडले.

"ऐकलेस का रघू, तुझे बाबा काय म्हणाले ते? तू तीन पावल्या मिळविण्याच्या लायकीचा सुद्धा नाहीस, म्हणे." रघूची आई म्हणाली.

"अजून मी कधी पैसे मिळविण्याचा यत्नच केला नाही. जेवायला वाढ पहिल्याने, मग करीन प्रयत्न." रघू म्हणाला. तो जेवून खाऊन झोपला तो खूप काळोख पडल्यावर संध्याकाळी उठला.

"काय रे! जेवायला वाढ मी जाऊन प्रयत्न करतो, म्हणाला होतास. आणि हे रे काय? बापा समोर माझी मान खाली करवणार आहेस वाटते तू?" आईने त्याला विचारले.

"आज तू तीन पावल्या दे, बाबांना नेऊन देतो. मी उद्यां मिळवून आणून देईन." रघू म्हणाला.





"आपला व मुलाचा शब्द राखण्यासाठी मनूने स्वतःच्या पदरांतल्या तीन पावल्या रघूला काढून दिल्या."

रात्री घरी परत आल्यावर लखूने आपल्या मुलाला विचारले–"काय रे? काय मिळवून आणलेस?"

"ह्या पहा, तीन पावल्या मिळवून आणल्या आहेत. असे सांगून रघूने आईने दिलेल्या पावल्या बापाला दिल्या."

लखूने क्षणभर त्याच्याकडे पाहिले व थोड्या सूक्ष्म स्वरात म्हणाला–"नाही, ही तुझ्या मेहनतीची कमाई नाही." असे सांगून त्याने त्या तीन पावल्या चुलीत फेकून दिल्या. रघू काही बोलल्याशिवाय मान खाली करून बापासमोरून निघून गेला. बराच वेळ तो विचार करीत उभा राहला की ही आपली कमाई नाही, हे बापाला कसे काय कळले?

दुसऱ्या दिवशी मनू मुलाला म्हणाली– "बाळ! निदान आज तरी मेहनत करून मिळवून आण. आपला शब्द राख!"

त्या दिवशी रघूने आईची नजर चुकवून तिच्या पेटीतला एक रुपया काढून घेतला. चार आण्याची पकोडी खल्ली व तीन पावल्या घेऊन दिवसभर गावात भटकला व रात्री घरी येऊन बापाला म्हणाला–"ही घ्या ही माझ्या मेहनतीची कमाई आहे." असे सांगून त्याने तीन पावल्या खिशातून काढून बापाला दिल्या.

लखूने पहिल्या दिवसा सारखेच आपल्या मुलाकडे व नंतर त्या पावल्यांकडे खोल नजरेने पाहिले व पुन्हा त्या पावल्या चुलीत फेकून दिल्या. म्हणाला–"ही पण तुझी कमाई नाही."

या खेपेस रघूला ती गोष्ट बोचली. त्याने मनाशी ठरविले की काय वाटेल ते झाले तरी तीन पावल्या स्वतःच्या मेहनतीने कमवून आणल्या शिवाय बापाला तोंड दाखवायचे नाही. त्या दिवशी शेजारच्या गावी आठवड्याचा बाजार होता. तेथे जाऊन त्याने ओझी वाहण्याचे काम केले. थोडा वेळ मजुरी पण केली. दिवसभर काम केल्यानंतर सुद्धा त्याला तीन पावल्या मिळाल्या नाहीत. दुसऱ्या दिवशी सुद्धा गाडीच्या अड्डयावर उभा राहून त्याने मजुरी केली. तेव्हां त्याच्या जवळ तीन पावल्या जमल्या. रात्री घरी आल्यावर त्याने बापाला त्या दिल्या. म्हणाला–"ही माझ्या मेहनतीची कमाई आहे." असे सांगून त्याने त्या तीन पावल्या बापाला दिल्या.

लखूने त्या दिवशी देखील त्या तीन पावल्या चुलीत फेकल्या व म्हणाला– "ही सुद्धा तुझी कमाई नाही."

रघू धावत चुली जवळ गेला व तीन पावल्या बाहेर काढून बापाला म्हणाला– "माझीच कमाई आहे, बाबा! मी सांगीतले ते अगदी खरे आहे."

बाप म्हणाला–"मला माहीत आहे ते. पण किती दिवसांची! या तीन पावल्या मिळवायला तुला किती दिवस काम करावे लागले?"

"दोन दिवस!" मान खाली करून रघू म्हणाला.

"तू स्वतःच्या दुकानात बसून एवढी मेहनत केली असतीस तर तुला याच्या दहा पट पैसे मिळाले असते. ओझी वाहण्यात तुला मोठेपणा वाटला का रे?" बापाने विचारले.

रघूचे डोळे उघडले. तो दुसऱ्या दिवसापासून बापाला त्यांचा पिढयान् पिढ्या चालू असलेल्या धंद्यात मदत करू लागला. बाप म्हातारा होण्यापूर्वी रघू पण हळूहळू एक हुशार लोहार म्हणून गावात प्रसिद्ध झाला.



# वेड

एका गावी एक मनुष्य रहात असे. त्याला सर्व वेडा म्हणत. तो जे बोले किंवा करी त्याचा अर्थ कोणाला कळत नसे. परंतु कधी कधी वेडात तो जो बडबडे त्यात त्याची सूक्ष्म बुद्धिमत्ता प्रगट होई.

एकदा तो नदी काठी गेला. तेथे एक ब्राह्मण कंबरभर पाण्यात उभा राहून ओंजळीत पाणी घेऊन सूर्याकडे पहात कोणता तरी मंत्र म्हणत ते पाणी पुन्हां नदीत सोडीत होता.

"काय हो हे काय करता आहां तुम्ही ?" त्या वेड्याने त्याला विचारले.

"मी सूर्याला अर्घ्य देतो आहे" तो ब्राह्मण म्हणाला.

लगेच तो वेडा पाण्यात उतरला. सूर्याकडे पाठ करून ओंजळीत पाणी घेऊन तो ते नदीत सोडू लागला.

"काय करतो आहेस रे ?" त्या ब्राह्मणाने त्या वेड्याला विचारले.

"मी आपल्या बागेला पाणी घालतो आहे हो !" तो वेडा म्हणाला.

"अरे वेड्या, तू येथे पाणी सोडलेस तर ते बागेला कसे काय पोंचेल ?" ब्राह्मणाने वेड्याला विचारले.

"कोटीहून जास्त मैलावरच्या सूर्याला तुम्ही सोडलेल्या अर्घ्याचे पाणी पोंचू शकेल तर दहा पावलावरच्या माझ्या मळ्याला पाणी पोंचणार नाही कारे? तूच सांगा !" वेड्याने उत्तर दिले !

—अनिलकुमार





# नवरा बायको

फार पूर्वी एका गांवी शंकर व पार्वती नावाचे नवरा बायको रहात असत. त्यांना मूलबाळ नव्हते. त्यांनी पुष्कळ व्रते व वैकल्यें केली, पण काही उपयोग झाला नाही. एकदा ती दोघं, तीर्थयात्रेला निघाली. दोघं काशीला गंगास्नान करीत असता, पार्वती आंघोळ करीत होती तिकडे एक ताट वहात आले. पार्वतीने ताट हातात घेऊन पाहिले तर हळदीचे पाणी होते व त्यात एक सापाचे पिल्लू हालत असल्यासारखे दिसले. तिने जास्त लक्षपूर्वक पाहिले तेव्हां तिला कळले की तो लहान सापाच्या आकृतीचा एक दागिना आहे. ती ज्या घरी उतरली होती तेथे तो दागिना घेऊन जाऊन तिने त्याची पूजा केली.

दुसऱ्या दिवशी सकाळी पार्वती त्या ताटाजवळ गेली तेव्हां तिला त्या ताटात एक सुंदर मूल दिसले. पार्वतीला अपरंपार आनंद झाला. त्या मुलाला ती आपल्या गावी घेऊन आली दोघांनी त्याचे नाव गंगादत्त ठेवले.

गंगादत्त हळूहळू लहानाचा मोठा होत गेला. तो सुशील व हुशार निघाला. सर्व गांवकरी त्याला पाहून शंकरपार्वतींच्या भाग्याची वाखाणणी करीत. तो वयात आल्यावर सुंदरी नावाच्या एका सुंदर मुलीशी त्याचे लग्न झाले.

गंगादत्तचे लग्न झाल्यानंतर काही दिवसांनी एक बाई सुंदरीकडे येऊन म्हणाली–"मुली! मला स्वतःचे कोणी नाही. मी सर्व काम करीन. मला फक्त दोन वेळचे जेवण घाल, म्हणजे झाले. त्या म्हाताऱ्या बाईची सुंदरीला कीव आली व तिने तिला आपल्या घरी ठेवून घेतले. हळूहळू सुंदरीचा तिच्यावर पूर्ण विश्वास बसला.



एकदा बोलता बोलता म्हातारी सुंदरीला म्हणाली–"तुमचे परस्परांवर पुष्कळ प्रेम आहे. पण तुला आपल्या नवऱ्याच्या संबंधाने काही माहीत नाही?"

सुंदरी थोडी रागाने म्हणाली–"वाग! वरीच आहेस की तू?"

म्हातारी स्मित करून म्हणाली–"तुला आपल्या नवऱ्याचे खरे नाव सुद्धा माहीत नाही." "कां नाही? त्यांचे नाव गंगादत्त आहे." सुंदरी म्हणाली.

"नाही. त्याचे खरे नाव एकाला देखील माहीत नाही. पाहिजे तर विचारून पहा." म्हातारी म्हणाली.

त्या दिवशी रात्री सुंदरीने आपल्या नवऱ्याला विचारले–म्हणाली–"तुमचे नांव गंगादत्त आहे. म्हणजे खरे काय नाव आहे तुमचे?"

गंगादत्त घाबऱ्या आवाजात म्हणाला–"माझे खरे नाव? नको विचारूस."

आता सुंदरीला शंका उरली नाही. नाव सांगण्यासाठी सुंदरीने हट्ट धरला.

उजाडताच गंगादत्तने सुंदरीला विचारले–"मग, मी खरे नाव सांगितलेच पाहिजे म्हणतेस? आपला हट्ट सोडणार नाहीस वाटते?"

"होय, सांगितलेच पाहिजे! तुम्ही तरी न सांगण्याचा हट्ट कां करता?" सुंदरीने विचारले.

"ठीक! तर मग माझ्या बरोबर चल!" असे सांगून तो सुंदरीबरोबर आपल्या बागेत गेला.

"अजून थोडी सवड मी देतो. तू आपला विचार सोड." गंगादत्त म्हणाला.

"नाव सांगतो, चल बरोबर असे सांगून बोलावून घेऊन आलात. म्हणून नाव सांगितलेच पाहिजे." सुंदरी म्हणाली.

"मी नागपुत्र आहे. माझ्या खऱ्या बापाने अद्याप माझे नाव ठेवले नाही."



असे सांगून गंगादत्तने बागेतल्या तलावात उडी मारली.

सुंदरीची छाती धक् धक् करु लागली. ती जोराने ओरडत म्हणाली–"माझ्या बुद्धीला काय झालं होते? आता ती ताळ्यावर आली आहे. आता माझ्यावर दया करून बाहेर या मी पाय धरते." असे म्हणत ती रडू लागली.

तेव्हां ती म्हातारी जवळ येऊन तिला धीर देत म्हणाली–"मी सुद्धा एक नाग स्त्री आहे. तुझा नवरा एका नागराजाचा मुलगा आहे. तो जन्मला तेव्हां मी त्याला गंगेकाठी ज्या ताटात उचलून घेऊन आले होते ते ताट माझ्या हातातून निसटले आणि गंगेच्या पाण्यात वाहू लागले. नागराज माझ्यावर फार रागावला. मला काही दिवसांपूर्वी कळलें की मानवाचा स्पर्श झाल्याने तो नागराजाचा मुलगा मानव झाला आहे व तुझा नवरा म्हणून नांदतो आहे. त्याला घेऊन येण्यासाठी मला नागराजाने पाठविले होते. त्याला परत नागयोनीत आणण्यास एकच उपाय होता. त्याला पुन्हा आपल्या नागलोकाची आठवण करून देणे म्हणजे रक्त रक्ताकडे धावेल. मी म्हणूनच तुझ्या करवी त्याला तो प्रश्न



विचारविला. आतां माझे काम झाले." असे सांगून त्या म्हातारीने पण तलावात उडी टाकली.

सुंदरीने प्रसंगावधान राखून म्हातारीचा पदर पकडला व तिने सुद्धा तिच्याबरोबर पाण्यात उडी टाकली. दोघी नागलोकात गेल्या. तेव्हा म्हातारी सुंदरीला म्हणाली–"तू साहस करून येथवर आलीस. ठीक! मी तुझा पति कोठे आहे पाहून येते." असे सांगून म्हातारी निघून गेली.

थोड्या वेळाने परत येऊन म्हातारी म्हणाली–"तुझा नवरा शेजारच्या खोलीतच झोपला आहे. त्याची आई त्याचे ताट



वाढून घेऊन येईल. तू लपून बस. त्याचे खाणे पिणे झाल्यावर जे उष्टे अन्न उरेल ते तू खा. नंतर तू समोर उभी रहा."

सुंदरी एका जागी म्हातारीने सांगितल्या-प्रमाणे लपून बसली. नागराजाची बायको अन्न घेऊन आली व गंगादत्त झोपला होता तेथे अंथरुणाजवळ ठेवून निघून गेली.

थोड्या वेळाने गंगादत्तची झोप मोडली. थोडेसे खाऊन हात धुवायला तो बाहेर गेला. तेवढ्या अवधीत सुंदरीने तिला खाता आले तेवढे खाऊन घेतले.

गंगादत्तने बाहेर येऊन पाहिले, ताटातले अन्न कोणी तरी खाल्ले असल्याचे त्याला कळले. "हे कसे झाले? कोणी खाल्ले ताटातले अन्न?" त्याने दरडावून विचारले.

"मी खाल्ले!" असे म्हणत सुंदरी-समोर येऊन उभी राहली व त्याचे पाय धरून म्हणाली—"क्षमा करा, माझी चूक झाली. कृपा करून मला आपल्या पायाजवळ राहण्याची परवानगी द्या."

सुंदरीला तेथे पाहून व तिच्या तोंडचें ते वाक्य ऐकून गंगादत्तला फार आनंद झाला. पण दुसऱ्या क्षणाला, काय करावे हे त्याला सुचेना. तो त्याच मनःस्थितीत म्हणाला पण हे झाले कसे? तू मनुष्य आहेस. माझे वडील भयंकर रागीट आहेत. तू त्यांच्या नजरेस पडलीस तर ते तुला तत्क्षण ठार करतील. पहिल्याने तुला कोठे तरी लप-विले पाहिजे."

सुंदरी मान खाली करून अपराध्यासारखी उभी राहून म्हणाली—"मला आता तुम्ही कोठे लपवणार व किती दिवस लपवणार? मी जी चूक केली आहे त्याबद्दल जी शिक्षा मला होईल ती मीच भोगली पाहिजे. तुम्ही मला क्षमा करा. माझी आपल्या-जवळ एवढीच विनंती आहे. आपल्या वडिलांनी मला ठार केले तरी मी त्याला तयार आहे. पण तुम्ही मला दूर लोटू



नये एवढीच विनंती करते. आपला जीव वांचविण्यासाठी मी कोठे पळून जायला तयार नाही."

गंगादत्त काही वेळ विचारात पडला. नंतर म्हणाला—"हा प्रश्न फक्त तुझ्या पुरताच नसून मला सुद्धा विचार करावा लागतो आहे. तू येथेच रहा." असे सांगून तो निघून गेला.

तो सरळ नागराजाकडे गेला व म्हणाला—"मला भेटण्यासाठी माझी बायको पण आपला जीव धोक्यात घालून आली आहे. तिला या अपराधाबद्दल जी शिक्षा करावीशी वाटेल ती मला सुद्धा करावी. कारण ती मला सोडून राहू शकणार नाही. तसाच मी पण तिच्या शिवाय या जगात फार दिवस जगणार नाही. येथे मी आलो तेव्हांपासून तिच्या आठवणी मुळे माझी अन्नावर वांछा राहिली नाही."

नागराज बराच वेळ आपल्या मुलाकडे पहात राहल्यावर म्हणाला—"तू मानव लोकात पुष्कळ दिवस राहलास म्हणून तुला तिकडची संवय झाली आहे. नागलोकांचा धर्म तुला अवगत झाला नाही. म्हणून मनुष्य जातीच्या स्त्रीला आपली पत्नी मानून तू तिच्या प्रेमाखातर आपला जीव द्यायला तयार झाला आहेस. तुला हवा आहे तसा मी दोघांना एक सारखाच दंड देतो. तुम्ही दोघे मानवलोकी परत निघून जा. तुम्हांला नागलोकात जागा नाही."

परंतु नागराजाने आपल्या मुलाला व सुनेला रिकाम्या हाताने पाठविले नाही. त्यांना त्याने अनेक अनमोल रत्नांचा साठा उपहार स्वरूप दिला. मानव लोकात गेल्यावर गंगादत्त व सुंदरी दोघांचा संसार सुखाचा झाला.



# मंत्री कोण

एका राजाचा प्रधान मंत्री अचानक वारला. त्याच्या पदरी तिघे उप मंत्री होते. तेव्हा त्यापैकी कोणाला आपला प्रधान करावे, हा राजासमोर मोठा प्रश्न होता. राजा काही निर्णय करू शकला नाही.

असेच काही दिवस लोटले. राजा आपल्या मंत्रीमंडळातील मंत्र्यांना बरोबर घेऊन ससैन्य नदीकाठी आला. त्याच्या बरोबर त्याचे उपमंत्री पण होते. सर्व नदी काठी बोलत बसले होते. राजाने पाण्याकडे पहात एक विशिष्ट जागा बोटाने दाखविली आणि आपल्या मंत्र्यांना विचारले—"पाण्यात वहात जाणारी वस्तू काय असेल सांगा बरे!"

तिघा पैकी एक जण म्हणाला—"एक फळ असावेसे वाटते."

दुसरा उभा राहून म्हणाला—"होय महाराज! फळच आहे व ते आंब्याचे आहे."

इतक्यात तिसरा मनुष्य उभा राहून आपले कपडे काढू लागला. धोतर खोचून कपडे काढून त्याने पाण्यात उडी मारली. तो त्या वस्तूच्या दिशेने पोहोत गेला. तोपर्यंत ती वस्तू वहात जवळ आली होती. म्हणून त्याला जास्त पोहावे लागले नाही. ते आंब्याचेच फळ होते. ते घेऊन तो जवळ आला व राजाच्या हातात देऊन हात जोडून समोर उभा राहला.

राजाने त्या हुषार व कार्यकुशल मंत्र्याला आपला प्रधान नेमले.





# ज्ञानबोध

गोवर्धन पर्वतावर एक ऋषी तपश्चर्या करीत होते. त्यांचे नाव शमनक असे होते. आपला जन्म सार्थक व्हावा, एवढीच इच्छा त्या मुनींच्या मनात होती. तपश्चर्या सुरु करण्यापूर्वी ते अनेक तत्ववेत्त्यांना भेटले व जन्म कसा सार्थक होईल या विषयावर विचारविनियम केला. परंतु मनाचे समाधान झाले नाही. म्हणून त्यांनी गोवर्धन पर्वतावर घोर तपश्चर्या सुरू केली. एका पायावर उभे राहून; ऊन, वारा व पाऊस यांची पर्वा न करतां फक्त वायुभक्षण व जलपान यांवर अवलंबून अनेक वर्षे तपश्चर्या केली. तरी आपला जन्म सार्थक होईल यावर त्यांचा विश्वास बसेना. त्यांना आत्मानंद झाला नाहीच उलट त्यांना निराशा वाटू लागली.

एकदां शमनक ऋषी डोळे मिटून ध्यान मग्न असता त्यांना समोर एक ज्योती दिसली व एक आवाज ऐकू आला— "वत्स शमनक! तपश्चर्या सोड व ज्ञानमार्ग स्वीकारून त्यावर चाल. पर्वतावरून उतर व पूर्वेकडे जा. दुपारच्या सुमारास तुला एक गुराखी दिसेल. तो तुला ज्ञान बोध करील."

तो संदेश देऊन ती ज्योती अदृश्य झाली.

शमनक ऋषींनी डोळे उघडून पाहिले, सूर्योदयाची वेळ होती. ऋषी उठले व पर्वतावरून खाली उतरले आणि सूर्योदयाच्या दिशेने चालू लागले. थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांना एक ओढा दिसला. शमनक ऋषींनी तेथे स्नानसंध्यादि आटोपले व पुन्हा पूर्वेकडे चालू लागले.

सूर्योदय झाल्यानंतर थोड्या वेळाने शमनक मुनींना मुरलीचा गोड स्वर ऐकू येऊ लागला. त्यानंतर थोड्या वेळाने गुरे येत असलेली दिसली. एका गाईच्या

श्री. ना. सो. पाठक



पाठीवर एक लहान मुलगी बसली होती. तिचे सुमारे वय सहासात वर्षंच असेल.

त्या मुलीने घाबरून शमनककडे पाहिले. तपश्चर्येमुळे शमनक ऋषींचा देह अस्थिपंजरवत झाला होता. त्यांच्या दाढीमिशा लांब वाढलेल्या होत्या. केस खांद्यापर्यंत पसरलेले होते. एकूण त्यांचे रूप भयभीत करणारे होते.

शमनक मुनींनी त्या मुलीकडे पाहिले नाही. त्यांचे डोळे फक्त त्या गुराख्याला शोधीत होते.

गाईंच्या मागून मुरली वाजवीत एक मनुष्य येत होता. त्याचे वय वीस वर्षांहून अधिक नव्हते. जाडजूड कपडे अंगात घातल्यामुळे तो गांवढळ दिसत होता. तरी त्याच्या चेहंऱ्यावर एक तऱ्हेचे तेज झळकत होते.

तो गुराखी दिसताच शमनक ऋषी त्याच्याकडे घाई घाईने चालू लागले. शमनकला येतांना पाहून गुराख्याने मुरली वाजवायचे थांबविले. गोवर्धन पर्वतावर एक ऋषी तपश्चर्या करीत असल्याची गोष्ट त्याला ऐकून माहीत होती. त्या जटाजूटधारी माणसाला पाहून तोच तो ऋषी असावा असे गुराख्याला वाटले.

शमनकने त्या गुराख्याला नमस्कार केला व म्हणाले–"मी तपश्चर्या कित्येक दिवस करीत आहे. पण जो आत्मानंद तुम्हांला तुम्हाला मिळाला तो मला मिळाला नाही. धन्य तुम्ही! तसाच आत्मानंद मला लाभावा असा आशीर्वाद मला देऊन माझ्या जन्माचे सार्थक करावे."

गुराख्याचा चेहरा एकाएकी लाल झाल्यासारखा दिसला. तो रागाने म्हणाला– "तुम्हीच माझ्याहून वयाने मोठे. माझ्या सारख्याची अशी थट्टा करणे शोभत नाही तुम्हांला."

"तुझा अपमान करण्याची किंवा थट्टा करण्याची तिळमात्र इच्छा माझ्या मनात नाही. तुझ्याकडून ज्ञानप्राप्तीचा बोध करून घेण्यास मला सांगण्यात आले आहे. म्हणून मी तुमच्या शोधार्थ येथवर आलो. काय केल्याने आपल्यासारखी ज्ञानप्राप्ती होईल, एवढेच मला सांगा." शमनक मुनी म्हणाले.

त्या गुराख्याला ते सर्व विचित्र वाटले. त्याला काही कळेना. तो म्हणाला– "मुनिवर्य! मी एक अशिक्षित गांवढळ मनुष्य! मला कोठून ज्ञानबोध होणार आणि त्यासाठी प्रयत्न म्हणाल तर तो तरी मी कोठून करणार? मी दहा बारा वर्षांचा झालो तेव्हांपासून गुरे चरायला घेऊन जातो आहे. गुरे चरायला नेणे एवढे एकच एक काम मला येते. गुरांना कोणताहि रोग होऊ नये, एवढी एकच एक प्रार्थना मी सदा देवाजवळ करीत असतो. या शिवाय मी काही केले देखील नाही.

"नाही, मी नाही मानणार ते. तू माझ्या पासून लपवतो आहेस." शमनक म्हणाला.

"मुनिवर्य! नाही, मी काही लपवीत नाही. लहानपणापासून मी हाच धंदा करीत आलो आहे. माझे वडीलपण हाच धंदा करीत होते. मी हें काम या लहान



मुलीला शिकवीत आहे. मुलीकडे बोट दाखवीत तसे माझ्या वडिलांनी ते मला शिकविले." गुराखी म्हणाला.

"ही मुलगी कोण? तुझी बहीण की मुलगी?" शमनकने विचारले.

"मी तिला आपली बहीण मानू शकेन व मुलगी पण म्हणेन. पण ती दोन्ही नाही. ती लहान मुलगी असतांना चोर तिच्या घरात शिरले व तिच्या आई-वडिलांना त्यांनी ठार केले. तिच्या जिवाला मात्र काही अपाय झाला नाही. त्या स्थितीत ती अज्ञान मुलगी मला दिसली!" गुराखी म्हणाला.

"त्या मुलीला तू आपल्या आईकडे किंवा पत्नीकडे आणून ठेवलेस होय ना?" शमनकने विचारले.

"नाही मुनिवर्य, मीच तिला लहानाचे मोठे केले. तोपर्यंत माझी आई वारली होती व माझे लग्न झाले नव्हते. म्हणून सर्व जबाबदारी माझ्यावरच होती तिची." गुराखी म्हणाला.

"पण तू सुद्धा तेव्हां लहानच होतास, होय ना?" शमनकने विचारले.

"लहान होतो, पण दिसायला बैला-सारखा पुंड होतो." गुराखी म्हणाला.

"त्या लहान मुलीचा त्रास नाही वाटला तुला?" शमनकने विचारले.



"कष्ट विचारता तुम्ही, मी काय सांगू? लहान मुलगी होती ती बिचारी. ती रडू लागली की तिच्या पोटात दुखते आहे की डोके दुखते आहे हे नव्हते कळत मला. ती कितीदा आजारी पडली? काय काय सांगू?" गुराखी म्हणाला.

"त्या मुलीला उचलून आणून तू व्यर्थ ओझे स्वतःवर ओढून घेतलेस. नाहीतर त्यात तुला काय फायदा होता?" शमनकने विचारले.

गुराखी शमनककडे क्षणभर विचित्र पणे पहात राहून नंतर म्हणाला—"मेहनतीचे फळ विचारता? ती असहाय मुलगी आता चालू बोलू लागली हे काहीच नाही का? तिला घेऊन हिंडलो फिरलो, तिला जेवू घातले, तिला चालायला शिकविले, तिला गाई चरायला न्यायचे काम शिकविले. तिला एक की दोन किती गोष्टी शिकवल्या म्हणून सांगू. हे सर्व श्रमाचे फळ नाही का?"

शमनकच्या डोळ्यांत नकळत टिपे आली. तुझ्या जन्माचे कसे सार्थक झाले व तुला कसा आनंद झाला हे मला आता कळले. लहान पणीच तुला प्रेमाचे रहस्य कळले. निस्वार्थ बुद्धीने इतरांसाठी कष्ट सहन करण्यात किती आनंद मिळतो हे तू शिकून घेतले आहेस. मी मात्र ते हीन कार्य समजून भटकत राहलो. या उतार वयात मला ज्ञानबोध झाला. देवाने माझ्यावर कृपा कटाक्ष टाकून आणखी काही दिवस माझे आयुष्य वाढवले तर मी घरी जाऊन त्या आत्मानंदाचा अनुभव घेईन." असे सांगून शमनक तेथून निघून गेला.

हे ऋषि काही तरी विचित्रच बोलत आहेत, असे सांगून तो गुराखी आपली मुरली काढून ती वाजविण्यात गुंगून गेला.





# परोपकारी

फार पूर्वी एका राज्याच्या गादीवर उपेंद्र-वर्मा नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला दोन बायका होत्या; दोघां राण्यांना एकेक मुलगा होता. दोघे राजकुमार जवळजवळ समवयस्क होते. मोठ्याचे नाव वेगवाहन होते व लहानाचे पशुपति. वेगवाहन कठोर स्वभावाचा होता व पशुपति मृदु स्वभावाचा.

दोघे राजकुमार वयात आल्यावर एकदा राजाला म्हणाले–"बाबा, आम्ही दोघे देशाटनाला जावे म्हणतो. आम्हांला कोणी मुलगी पसंत पडली तर आपापल्या पसंती-प्रमाणे आम्ही लग्न करून येऊ." राजाने त्यांना होकार दिला.

दोघे देशाटनास निघाले. अनेक नगरे व गावे पहात ते एका उद्यानात येऊन पोंचले. त्या उद्यानात एक मनोहर सरोवर होते. त्यात हंस विहार करीत होते. दोघांनी त्या सरोवरात स्नान केले. नंतर त्या सरोवराच्या काठी बसून सुंदर दृश्य पाहू लागले. एक हंस पोहोत येत असलेला पाहून वेगवाहनने त्याला मारण्यासाठी धनुष्य बाण काढून नेम धरला. पण पशुपतीने त्याला अडविले व म्हणाला–"उगाच त्या मुक्या प्राण्याचा जीव कां घेतोस!"

"शिकारीचा आनंद नाही का मिळत?" वेगवाहन म्हणाला.

"याला शिकार नाही म्हणत, ही हत्या होईल." पशुपती म्हणाला.

त्यानंतर दोघे तेथून उठून उद्यानांत फिरू लागले तेव्हां त्यांना मुंग्यांचे एक वारूळ दिसले. लहान लहान मुंग्या आपले वारूळ बांधण्याच्या कामात गर्क झाल्या होत्या. त्यांचा एकोपा व कौशल्य वाखा-णण्यासारखे होते. त्या वारूळात जात व परत येत. पशुपतीला ते दृश्य पाहण्यात गमत वाटली.

"वारूळाच्या आत पाहिलेस तर जास्तच गंमत पहायला मिळेल", असे सांगून वेग-वाहन एक दांडके उचलून ते वारूळ फोडायला पुढे सरसावला. पशुपतीने त्याच्या हातातले दांडके काढून दूर फेकून दिले व म्हणाला–"कां त्या बिचाऱ्यांना त्रास देतोस?"

"मोठा आला आहेस अहिंसावादी महा-वीराचा अवतार! भितरी भागूबाई!" वेगवाहन चिडून म्हणाला.

दोघे आणखी थोडे पुढे गेले. त्यांना फुलांवर बसून फुलांचा मध काढून घेत असलेल्या मधमाशा दिसल्या. वेगवाहनने रुमाल त्यांच्यावर टाकला व काही मध-माशा धरून म्हणाला–"बऱ्या सापडल्या या दुष्ट मधमाशा. एकदा चावल्या की दोन दोन दिवस कळा येतात. यांना ठार केले तरी नाही पाप लागणार." वेगवाहन म्हणाला.

पशुपतीने त्याच्या हातातला रुमाल हिसकावून घेतला व म्हणाला–"तू विना कारण त्यांना त्रास दिला नाहीस तर त्या कां चावतील?"



वेगवाहनला आतां जास्तच राग आला. म्हणाला–"तू मला काहीच करू देत नाहीस. प्रत्येक कामात विघ्न घालतोस. आतां, मी नाही येत तुझ्या बरोबर." असे सांगून तो घोड्यावर बसून निघून गेला. पशुपतीने त्याला हाक मारून थांबवण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला पण तो मागे फिरला नाही.

पशुपती भावाच्या पाठीमागून त्याचा शोध काढीत घोड्यावर बसून निघाला. त्या वेळी त्याला एकदम तीन आवाज ऐकू आले–"धनी! जरा थांबाल का?" त्याने चकित होऊन मागे वळून पाहिले. एक हंस,



एक मुंग्यांची राणी व एक मधमाशांची राणी त्याच्याजवळ येऊन पोचली व तिघींच्या वतीने म्हणाली–"धनी! आपण आमच्यावर जी दया दाखविलीत त्याबद्दल आम्ही आपले फार ऋणी आहो. या उपकाराची फेड करण्यास संधी द्यावी. आपण कोठे ही आमच्या लायक सेवेसाठी आमच्या पैकी कोणाचे स्मरण केलेत तर आम्ही तत्क्षण हजर होऊ." पशुपतीला फार आनंद झाला.

दोन दिवस तो जंगलात भटकत असता त्याला एक मोठा राजवाडा दिसला. त्या राजवाड्यासमोर एक तलाव होता. त्याच्या काठी तीन मंदारवृक्ष होते. त्या शिवाय जवळच काही वाळून गेलेली झाडे पण होती. जवळ एक म्हातारा बसलेला होता. पशुपती राजवाड्यासमोर घोड्यावरून उतरून राजवाड्यात जाऊ लागला तेव्हां तो म्हातारा म्हणाला–"तुझे काय काम आहे आत? तू आपल्या वाटेने निघून जा."

पशुपती त्या म्हाताऱ्याजवळ गेला व म्हणाला–"तू येथे मौन बसलेला दिसतो आहेस. तू कोण व हा राजवाडा कोणचा?"

म्हातारा म्हणाला–"या राजवाड्याची गोष्ट ऐकणार आहेस तू? एका राजाचा राजवाडा आहे हा. त्याला एक मुलगा व दोन मुली होत्या. दोघी जुळ्या मुली होत्या. दिसायला दोघी सारख्या होत्या. मोठीचे नाव सुवर्णा होते व धाकटीचे मधुरवाणी. मुलगा दोघींहून लहान होता. एकदा एक राजयोगी राजवाड्यात भिक्षे-साठी आला. राजकुमार व राजकन्यांनी त्याची थट्टाकरून त्याला रुष्ट केले. राजकुमार एक लहानशी पेटी घेऊन आला. त्याची किल्ली तलॉवात फेकून दिली व विचारले–"योगीश्वर! आपल्या योगबलाने ती किल्ली बाहेर काढून ही पेटी उघडून दाखवावी." सुवर्णाने आपली मोत्यांची माळा तोडून फेकली व म्हणाली–"योगीश्वर! आपण योगबलाने हे सर्व मोती किती होते हे सांगावे." मधुर-वाणी म्हणाली–"योगीश्वर! आम्हां दोघी पैकी मोठी कोण व धाकटी कोण हे सांगावे, तरच आम्ही भिक्षा घालू."

अर्थातच त्या पोरकटपणाचा त्या योग्याला राग आला व त्याने त्यांना 'मंदारवृक्ष होऊन जा' असा शाप दिला. तेच हे तीन मंदारवृक्ष. राजाला ही गोष्ट कळली तेव्हां तो धावत येऊन योगीश्व-रांच्या पाया पडला व त्यांची क्षमा मागून त्यांना शापमुक्त करण्यास विनंती केली. तेव्हां योगी थोडा शांत झाला व म्हणाला–"या मुलांनी मला जे प्रश्न विचारले होते त्यांची उत्तरे जर कोणी देईल तर यांना शापमुक्ति मिळेल. जो उत्तरे देण्याचे वचन देऊन देऊ शकणार नाही तो एक वाळके झाड होईल." असे सांगून योगी निघून गेला. ही जी वाळकी झाडे आहेत ती सर्व उत्तरे देण्याची हमी भरून तसे न करणारी माणसे आहेत. ही गोष्ट घडली त्या वेळेपासून राजाचे मन संसारापासून विरक्त झाले. राज्याचा भार आपल्या मंत्र्यांवर टाकून राजाने संन्यास घेतला. संन्यास



घेण्यापूर्वी राजाने दवंडी पिटवून असे जाहीर केले की जो कोणी माझ्या मुलींना पुन्हा मनुष्य करील त्याच्याशी दोघींचे लग्न करून देण्यात येईल. एक दोन तरुण आले, परंतु बरोबर उत्तर न देऊ शकल्यामुळे त्यांना वाळक्या झाडाचे रूप मिळाले. कालच एक राजकुमार आला होता. तो सुद्धा आपल्या प्रयत्नात अय-शस्वी झाला व हे झाड होऊन गेला आहे."

पशुपती त्या म्हाताऱ्याला म्हणाला–"मी देखील यत्न करून पहावा, म्हणतो."

असे सांगून तो तलावाच्या काठी आला व त्याने हंसाचे स्मरण केले. हंस त्याच्या-

समोर हजर झाला त्याला पशुपतीने तलावातून किल्ली आणून द्यायला सांगितले. हंसाने किल्ली आणून दिल्यावर पशुपतीने ती पेटी उघडली. त्या पेटीतून एक ताडपत्र काढून त्याने त्यावर लिहिलेले हे वाक्य वाचले—"चकाकतें तें सर्व सोनें नसते."

त्यानंतर पशुपतीने मुंगीचे स्मरण केले. तत्क्षण मुंगीसमोर हजर झाली. पशुपती तिला म्हणाला—"जमिनीवर मोती पसरलेले आहेत ना ते सर्व एकत्र करून मला आणून दे." मुंगीने सर्व मुंग्यांना बोलावून थोड्याच वेळात सर्व मोती जमा केले. पशुपतीने सर्व मोती मोजून माळा ओवली.

आता धाकटी बहीण कोणता वृक्ष झाली आहे हे ओळखायचे होते. पशुपतीने स्मरण केल्या बरोबर तत्क्षण मधमाशी-समोर आली. "या दोन वृक्षापैकी लहान झाडावर तू बस." पशुपती मधमाशीला म्हणाला. मधमाशी एका झाडावर जाऊन बसली.

क्षणार्धात तिन्ही मंदारवृक्षांतून व वाळक्या झाडांतून अनुक्रमे राजकुमार, राजकन्या व काही तरुण युवक प्रगट झाले. त्या तरुणांत वेगवाहन पण होता.

म्हातारा आपल्या मुला मुलींना प्रेमाने भेटला. सर्वांच्या डोळ्यातून आनंदाश्रू येत होते. वृद्ध राजा आपल्या मुलींना म्हणाला—"मी वचन दिल्याप्रमाणे तुमचे दोघींचे लग्न या तरुणाशी करून देणार आहे."

त्यावर पशुपती म्हणाला—"माझा विवाह धाकटीशी करून द्यावा व मोठीचे लग्न माझा मोठा भाऊ वेगवाहन याच्याशी करून द्यावे." असे सांगून पशुपतीने आपल्या मोठ्या भावाची ओळख करून दिली. वृद्ध राजाने आनंदाने दोघां मुलींचा विवाह अनुक्रमे वेगवाहन व पशुपतीशी करून दिला. दोघे सपत्नीक आपल्या राजधानीत परत आले.





# कांट्याने कांटा

एका गावी एका शेतकऱ्याला दोन मुलगे होते. ते गाव शहरापासून बरेच दूर होते. एका डोंगराला वळसा देऊन जंगलाच्या वाटेने तेथे जावे लागत असे. म्हणून तो शेतकरी त्याच्या घरच्या व शेतकामाच्या सर्व वस्तू तीन चार महिन्यांनी एकदां आणून ठेवीत असे. ते काम त्याची मुलेच बहुतेक करीत.

एकदा शेतकऱ्याने आपल्या मुलांना बरोबर पांचशे रुपये देऊन पाठविले. जातांना तो त्यांना म्हणाला—"जंगलाच्या वाटेने हल्ली चोरालुटेऱ्यांचा सुळसुळाट वाढला आहे. म्हणून तुम्ही जरा सावधगिरी बाळगा. काळोख पडण्याच्या आधी परत या."

"चोर काय करतात आम्हांला. आमच्या वाटे आड आले तर त्यांची डोकी फोडू." घमेंडीत असे उत्तर बापाला देऊन दोघे भाऊ निघाले. त्यांनी ते जे साहस दाखविले होते त्याचे कारण होते. गावात चोरांचा सुळसुळाट असल्याच्या वार्ता ज्या गावात ऐकू येत होत्या त्या खऱ्या नव्हत्या.

ते दोघे डोंगराला वळसा देऊन जंगलातून जाऊ लागले तेंव्हां चार चोर झाडीतून बाहेर आले व दरडावून दोघांना म्हणाले—"तुमच्या जवळ जे काही आहे ते काढून ठेवा समोर."

चोरांच्या तोंडावर बुरखा होता व त्यांचे रूप राक्षसासारखे भयंकर वाटत होते. शेतकऱ्याचे दोघे मुलगे घाबरून गेले. त्यांच्या जवळ रुपयांची थैली होती ती खाली पडली.

"आता पळा तुम्ही." असे सांगून चोरांनी काठ्या उगारल्या. दोघे भाऊ इतके घाबरले की मागे वळून देखील पाहिले नाही. सरळ घरी परत आले.

सौ. कमलाबाई सोमण



घरी पोचल्यावर दोघांनी घडलेली गोष्ट वडिलांना सांगितली व म्हणाले–"आम्हांला वाटले होते की चोर मनुष्य असतात. परंतु त्यांचे रूप भयंकर असल्याचे आम्हांला दिसले. त्यांचा आवाज, त्यांचे डोळे, त्यांच्या काठ्या. सर्वच भयंकर! बापरे बाप! 'शिर सलामत पगडी पचास' असा विचार करून आम्ही घरी पळून आलो."

शेतकऱ्याने मुले जे बोलली ते सर्व ऐकून घेतले. त्याला भयंकर राग आला. म्हणाला–"भागुबाई! चोरांना पाठ दाखवून पळून आलात. लाज नाही वाटत? त्यांच्या काठ्या तुमच्या काठ्याहून जास्त बळकट होत्या असे कसे वाटले तुम्हांला? माझ्या आवाजाहून त्यांचा आवाज कडक वाटला तुम्हांला? माझ्या डोळ्यांहून त्यांचे डोळे भयंकर वाटले तुम्हांला? त्या चोरांना पाहून त्यांच्यावर सिंहासारखी उडी मारून त्यांना ठार करणे तर दूरच, भित्र्या सारखे पळून आलात? तुमचे तोंड पाहू नये, पाप लागेल. चोरांच्या हातांतुन माझ्या मेहनतीची कमाई पांचशे रुपये तुम्ही परत आणीपर्यंत मला तोंड दाखवू नका." बापाने दोघांना खूप झाडले.

दोघे भाऊ माना खाली करून बाहेर आले. आपण चोरांना पाहून भ्यालो ही खरोखरच लज्जास्पद गोष्ट झाली, त्यांची खात्री पटली. बापाची अशी बोलणी लावी लागली होती त्यांना. त्यांचा स्वाभिमान जागला. "आपण केली ती केवढी चूक. चोर मनुष्यच असतात ही गोष्ट आपण पार विसरलो. चोरांना ठोकून पैसे परत मिळवून घरी परत येऊ." असे दोघांनी परस्पर विचाराने ठरविले.

परंतु चोरांना जिंकणे तसे सोपे नव्हते. कांटा काट्यानेच काढावा लागतो. या न्यायाने त्यांनी स्वतः चोर व्हायचे ठरविले. दोघांनी दाढी वाढवली. तोंडाला काळा रंग लावून स्वतःचे रूप भयंकर करून घेतले. दोघे एकेक दांडके, कट्यार व दोरी घेऊन जंगलाच्या वाटेवर दबा धरून बसले.

थोड्या वेळाने एक मनुष्य समोरून जात असलेला दिसला व झाडा आड लपला. दोघां भावांनी परस्परांशी सल्ला करून एकदम त्या माणसावर झडप मारली. दांडकी उगारून ओरडून म्हणाले–"तुझ्या जवळ जे काही असेल ते मुकाट्याने समोर काढून ठेव, नाहीतर तुला ठार करूं"

तो मनुष्य चकित होऊन म्हणाला–"कोण तुम्ही? चोर का? मला नाही वाटते ओळखलेत? मी देखील चोरच आहे, आपल्या टोळीचा पुढारी. तुम्ही नवीन चोर दिसतां. या वाटेवर मी तुम्हांला पूर्वी कधी पाहिले नाही. तुम्ही नवे असाल तर आमच्या टोळीत या. आपण सर्व मिळून चोरी करू. आपण आपापला वांटा ठरवून घेऊ."

"आम्ही शेजारच्या गांवचे राहणारे आहो. तुमच्या टोळीत आल्याने आम्हांला काय लाभ? तुम्हांला काय मिळते दररोज?" दोघां भावांनी चोरांच्या सरदाराला विचारले



"ही जागा धोक्याची आहे. सोईची नाही. आठ दिवसात आम्ही फक्त दोनच चोऱ्या केल्या. याहून चांगली जागा शोधून काढू या. आम्ही एकंदर सहा जण आहो. तुम्ही दोघे आलात तर आठ जण होऊं. प्रत्येकाला आठवा वांटा मिळेल. मग येता का आमच्या टोळीत?" चोरांच्या सरदाराने विचारले.

"तुम्ही सहा जण मिळून आम्हांला फसविलेत तर आम्ही काय करणार? पहिल्याने थोडे पैसे विश्वास उत्पन्न होण्यासाठी द्या. मग आम्ही येऊं तुमच्या टोळीत." दोघे भाऊ म्हणाले.

"ठीक, दोन दिवसांपूर्वी आम्ही दोघां भावांजवळून पांचशे रुपये लुबाडले. ते तुम्ही दोघे घ्या." चोरांचा सरदार म्हणाला.

"फक्त पांचशेच? अरे, याहून मोठी रक्कम देऊन ही रक्कम फेडू." असे दोघे भाऊ म्हणाले आणि त्यांनी ते पांचशे रुपये घेतले. नंतर ते चोरांच्या गुप्त निवास-स्थानी गेले.

तेथे बाकी चोर होते. त्यांच्याशी चोरांच्या सरदाराने आपल्या नव्या साथी मित्रांची ओळख करून दिली. त्यानंतर ते दोघे सरदाराला म्हणाले–"आतां तुम्ही चला आमच्या बरोबर. आम्ही आपली लपण्याची जागा तुला दाखवितो."

नव्या साथी चोरांचे गुप्तस्थान पाहण्या साठी इतर चोर निघाले. तेव्हां दोघे भाऊ त्यांना म्हणाले–"आपण सर्व लवकरच नव्या जागी जाऊ. आम्ही चोरीचा माल ज्या ठिकाणी ठेवला आहे तो इकडे घेऊन येतो. फक्त सरदार आमच्या बरोबर येतील."

"आम्ही परत आलोच. तुम्ही येथेच वाट पहा." असे सांगून सरदार आपल्या नव्या साथी चोरांबरोबर निघून गेला.

तिथे जंगलांतून थोडे अंतर चालून गेल्यावर दोघा भावांनी सरदाराला पकडले व त्याच्या हातातली शस्त्रास्त्रे हिसकावून घेतली. त्याला दोरीने छान बांधले आणि त्याच्या तोंडात बोळे कोंबून ठेवले. त्याला धरून ते आपल्या गावी गेले व राजाच्या शिपायांच्या हातात त्याला सोपविले.

राजाच्या शिपायांनी दोघां भावांच्या मदतीने इतर चोरांना पकडून आणले व त्यांना राजासमोर हजर केले.

अशा तऱ्हेने दोघां भावांनी आपले गेलेले पैसे पुन्हा मिळविले. त्यांच्या बापाला फार आनंद झाला. राजाने दोघांना मोठे इनाम दिले.





# ज्योतिष्याची चूक

मंगलापूरच्या राजाला पुष्कळ नवस केल्या-नंतर एक मुलगा झाला. दरबारात विष्णुशर्मा नांवाचा एक ज्योतिषी होता. पुत्रप्राप्ती संबंधी त्याची भविष्यवाणी खरी झाली.

ज्या दिवशी राणीला मुलगा झाला त्याच दिवशी विष्णुशर्माच्या बायकोला पण मुलगा झाला. राजकुमार व विष्णुशर्माचा मुलगा दोघांची कुंडली सारखी होती.

राजकुमाराच्या कुंडलीप्रमाणे राज-कुमाराला दीर्घ आयुष्य, आरोग्य व राज्यप्राप्ती होती.

"काय हो ज्योतिषी बुवा! आपल्या मुलाची कुंडली पाहून त्याचे भविष्य पण सांगाल का?" राजाने विचारले.

"त्याची कुंडली पण चांगली आहे, महाराज! तिच्यात मला काही वेगळे दिसले नाही." विष्णुशर्मा म्हणाला.

खरी गोष्ट अशी होती की विष्णु-शर्माच्या मुलाच्या कुंडलीत पण राजयोग होता. पण ती गोष्ट तो उघड बोलला नाही. कारण राजयोग असल्याची गोष्ट सांगितली तर मुलाच्या जिवाला धोका होईल, अशी भीती ज्योतिष्याला वाटली.

दिवसामागून दिवस गेले. राजकुमार व विष्णुशर्माचा मुलगा दोघे लहानाचे मोठे होत गेले. परंतु विष्णुशर्माच्या कल्पनेप्रमाणे त्याच्या मुलात राज्यप्राप्तीस आवश्यक लक्षणे दिसली नाहीत. ज्या दिवशी युवराजाचा राज्याभिषेक होणार होता त्याच दिवशी विष्णुशर्माचा मुलगा आपल्या आईवडिलांशी भांडण करून घरात होते नव्हते ते सर्व घेऊन पळून गेला.

मुलाची मनःस्थिति अशी कां झाली, हे विष्णुशर्माला कळेना. त्याचे सर्व भविष्य

उलटे झाले. ज्योतिष शास्त्रावरचा त्याचा विश्वासच उडाला. ज्योतिष शास्त्रावरचे सर्व ग्रन्थ एका गाठोड्यात बांधून तो गांवाबाहेर गेला.

एका निर्जन स्थानी तो त्या ग्रन्थांना काडी लावणार होता. एवढ्यात एक म्हातारा जवळ येऊन विचारू लागला–"तू हे काय चालवले आहेस? काही तरी भयंकर काम करीत आहेस!"

विष्णुशर्माने, म्हाताऱ्याला स्वतःच्या मुलाचे भविष्य सांगून त्याने केलेल्या मूर्खपणाचे वर्णन केले.

"बरे तर हे सांग की, ज्या ग्रहबलाने तुझ्या मुलाला राजयोग लाभत आहे तो ग्रह या वेळी कोठे आहे?" म्हाताऱ्याने विचारले.

विष्णुशर्मा जरा विचार करून म्हणाला– "मंगल ग्रह! पण तो माझ्या घरातून आता निघून गेला आहे."

"मग त्यांत काय झाले? तू भविष्य वर्तवलेस त्याप्रमाणेच सर्व होणार आहे. तुझा मुलगा तुझा आज्ञाकारी मुलगा म्हणून घरात बसून राहला तर त्याला कधी राज्यप्राप्ती होणार नाही. तुझ्या घरी राहून त्याला राजयोगाची प्राप्ती कशी काय होईल? आता तू हे सांग की राजाचा पिता होण्याचा योग तुझ्या कुंडलीत आहे का?" म्हाताऱ्याने विचारले.

विष्णुशर्माला कळले की तो वृद्ध दुसरा तिसरा कोणी नसून स्वतः मंगल ग्रह आहे. तो त्या म्हाताऱ्याला नमस्कार करून म्हणाला–"क्षमा करा. माझे अज्ञान दूर करा. मंगल देव!"

विष्णुशर्माने मान वर करून पाहिले तेव्हां तो म्हातारा तेथे नव्हता. विष्णुशर्मा निमूटपणे आपले सर्व ग्रन्थ घेऊन घरी निघून गेला. नंतर पूर्ववत् ग्रहांची आराधना करीत व ज्योतिष शास्त्रावर पूर्ण विश्वास ठेवून भविष्य सांगू लागला.





# कृष्णावतार

शिशुपालाचा मित्र साल्व हा आपल्या काही मित्रमंडळी बरोबर, जेव्हां कृष्ण रुक्मिणीला रथात बसवून निघाला तेव्हां त्याला अडवण्यासाठी आला. परंतु कृष्णासमोर त्यांच्या पैकी एकाची ही डाळ शिजली नाही. सर्वांचा पराभव झाला. साल्व याला तो एक फार मोठा अपमान वाटला. म्हणून त्याने प्रतिज्ञा केली की यादव वंशाचे उन्मूलन करीन. म्हणून त्याने घोर तपश्चर्या सुरु केली. तो फक्त माती खाऊन शंकराची आराधना करीत होता. त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन शंकर प्रगट झाला. तेव्हां साल्वने शंकराजवळ एक वर मागितला. त्याने शंकराजवळ असे एक विमान मागितले की त्या विमानाला अपाय किंवा अपघात कोणालाही करता येऊ नये. शंकराच्या आज्ञेने विश्वकर्म्याने लोखंडाचे एक काळे विमान तैयार करून दिले. त्या विमानाचे नाव 'सौभ' असे होते. त्या विमानात बसून साल्वने द्वारकेवर हल्ला केला. त्याच्या सैन्याने द्वारकेला वेढा घातला.

साल्वने विमानातून दगड, झाडे व शस्त्रास्त्रे सर्वांचा वर्षाव करून आणि त्याच्या सैन्याने द्वारकेचा तट, दारे व बागबगीचे नष्ट केले. एका एकी झालेल्या त्या हल्लयाला तोंड देण्यासाठी प्रद्युम्न, सात्यकी, चारुदेष्ण, सांब, अक्रूर, कृतवर्मा वगैरे योद्धे आपापली सैन्ये घेऊन धावले. त्या वेळी कृष्ण पांडवांकडेच होता.



साल्व व यादव यांच्या दोन्ही सैन्यांमध्ये सत्तावीस दिवस युद्ध चालू होते. द्वारकेला परत येत असता कृष्णाला त्या युद्धाची वार्ता कळली. त्याने साल्वशी युद्ध करण्यासाठी आपला रथ वळविला. कृष्णाने सौभ विमानाचा ध्वंस केला व ते समुद्रात पाडले व सुदर्शन चक्र सोडून साल्वचा वध केला.

साल्व मेल्यावर त्याचा मित्र दंतवक्त्र गदा घेऊन कृष्णावर धावून आला. कृष्ण हा दंतवक्त्राचा आते भाऊ. कृष्णाने पण गदा घेऊन त्याच्याशी गदायुद्ध करून त्याला ठार केले. अशा तऱ्हेने साल्वशी चालू असलेले युद्ध संपले.

कृष्णाला सुदामा नावाचा एक मित्र होता. दोघे विद्याभ्यासासाठी एकाच गुरुगृही रहात असत. सुदाम्याचे यथावेळी लग्न झाले. त्याला मुलेबाळे फार होती व घरची गरीबी इतकी की दोन वेळचे जेवण मिळणे कठीण झाले. सुदाम्याची बायको एकदा नवऱ्याला म्हणाली–"कृष्ण तुमचे एवढे मित्र आहेत म्हणता. त्यांच्याकडे जा आपली एवढी गरीबी पाहून ते खात्रीने काही तरी मदत करतील.

सुदाम्याच्या मनात या निमित्ताने कृष्णाची भेट होण्याची इच्छा उत्पन्न झाली. पण मित्राच्या घरी रिकाम्या हाताने कसे जायचे? त्याने बायकोला विचारले.

सुदाम्याची बायको शेजारच्या घरी जाऊन चार मुठी पोहे मागून घेऊन आली आणि एक पुरचुंडी बांधून तिने आपल्या पतीला दिली. ते पोहे घेऊन कृष्ण द्वारकेला आला आणि राजवाड्याची वाट विचारीत कृष्णाच्या वाड्यासमोर आला.

कृष्णाने सुदाम्याला दुरूनच ओळखले व धावत येऊन त्याला मिठी मारली. नंतर प्रेमादर पूर्वक त्याला घरात बोलावून नेऊन स्वतः त्याचे पाय धुतले. रुक्मिणी,



सत्यभामा वगैरेंनी पाणी ओतले. नंतर सुदाम्याच्या सर्वांगाला कृष्णाने चंदन चोळले व गळ्यात पुष्पमाळा घातली. सुमामा आला तेव्हां त्याच्या सर्वांगावर धूळ होती व कपडे फाटके होते. कृष्णाने त्याला नवीन वस्त्रे अंगात घालायला देऊन त्याचा इतका सत्कार केलेला पाहिल्यावर रुक्मिणी सत्यभामा चंवर घेऊन धांवल्या. इतर लोक चकित होऊन दोघां मित्रांच्या परस्पर प्रेमाचे कौतुक करू लागले. जेवणखाण आटोपल्यावर दोघे आपल्या गुरुकुलातल्या आठवणींची उजळणी करू लागले.

गुरुकुलांत असतांना एकदां गुरुपत्नीने त्यांना समिधा आणायला जंगलात पाठविले होते. तेव्हां सोसाट्याचा वारा सुटला व मुसळधार पाऊस पडू लागला. विजा चमकू लागल्या व रात्र पडली. त्यांचे सर्वांग व कपडे भिजले होते. वाट दिसत नव्हती. चहूकडे पाणीच पाणी होते. परस्परांचा हात धरून ते रात्रभर रानातच हिंडत होते. सकाळी उजाडल्यावर सांदीपनी गुरूंना कृष्ण सुदामा व इतर शिष्य रात्रभर आश्रमात परतले नसल्याचे कळले. ते घाबरून आपल्या शिष्यांच्या शोधार्थ निघाले. सर्व कपडे



ओले चिप्प झालेले पाहून गुरूंनी जवळ येऊन प्रेमाने त्यांना कुरवाळले व म्हणाले–"अरे रात्र भर तुम्ही पाण्यात भिजलात. आपल्या गुरु साठी इतके कष्ट तुम्हांला सहन करावे लागले. तुमची गुरुभक्ति पाहून इतरांना प्रेरणा मिळेल." ती आठवण करून देऊन कृष्णाने सुदाम्याला विचारले–"आठवते का रे तुला ते सर्व?"

"कृष्णा! मला सगळे आठवते. पण तू त्याची आठवण करून दिलीस म्हणून मला किती किती आनंद झाला म्हणून सांगू? सुदामा म्हणाला.



नंतर कृष्णाने त्याला विचारले–"कायरे सुदाम्या! निघतांना वहिनींनी माझ्यासाठी काहीं तरी दिले असेलच की नाही?"

सुदामा कृष्णाचे ते प्रेम पाहून आनंदला, पण त्याच्या सारख्या राजाला देण्यालायक नजराणा आपण काही आणू शकलो नाही, म्हणून मनातल्या मनात फार लाजला. त्याला पोहे कसे द्यायचे? त्याचा संकोच पाहून कृष्णाने त्याचे गाठोडे सोडून एका फडक्यात बांधलेले पोहे काढले व पोहे भराभर बकाणे मारून खाऊ लागला. म्हणाला–"अरे! इतके चांगले पोहे तू लपवून ठेवले होतेस का?"

"पुरे झाले. किती खायचे? पोटात नाही का दुखणार?" रुक्मिणी कृष्णाला म्हणाली.

पण कृष्णानें ते सर्व पोहे स्वतःतर खाल्लेच रुक्मिणीला पण खायला दिले.

रात्रभर दोघे मित्र बालपणच्या आठवणी परस्परांना सांगत जागले. दुसऱ्या दिवशी सुदामा घरी जायला निघाला तेव्हां कृष्ण त्याला पोचवायला पुष्कळ दूर चालत आला. निरोप देतांना कृष्णाने त्याला काही दिले नाही व सुदाम्याने त्याच्या जवळ काही मागितले पण नाही. वाटभर कृष्णाच्या मैत्रीच्या आठवणी त्याला होत होत्या. तो राजा व मी दरिद्र ब्राह्मण. पण त्याने आपल्या राणीला माझ्या पायावर पाणी घालायला सांगून स्वतः माझे पाय धुतले. मी त्याच्या जवळ काही मागितले नाही हे बरे झाले. त्याने स्वतः देखील काही दिले नाही. कारण हातात चार पैसे पडले असते तर मला गर्व झाला असता असे त्याला वाटले असावे.

असा विचार करीत व मनातल्या मनात कृष्णाचे गुणगान करीत सुदामा आपल्या गावी आला. तो आपल्या घरी जाऊ लागला तर त्याला तेथे घर दिसले नाही.



त्याच्या जागी सुवर्ण कांती असलेला डोळ्याला दिपवून सोडणारा एक वाडा होता. त्या वाड्याच्या चारी बाजूला सुंदर उद्यान होते व जवळच एक सरोवर होते. त्यात कमळे होती व पक्षी उडत होते. राजवाड्यात दास दासी फिरत होत्या.

हा कोणाचा बरे राजवाडा असेल? येथे तर माझे एक जुने मोडके घर होते. या जागी हा वाडा कसा काय आला बुवा? चकित होऊन सुदामा या विचारात एकेक पाऊल पुढे टाकीत असता स्वर्गातल्या देवां-सारखे सुंदर पुरुष वाजंत्री वाजवीत त्याच्या स्वागतासाठी सामोरे आले व त्याला आदरपूर्वक त्या राजवाड्यात घेऊन गेले.

सुंदर वस्त्राभूषणे धारण करून त्याची बायको हसत पुढे आली तेव्हां सुदाम्याला प्रत्यक्ष लक्ष्मीच अवतरल्याचा भास झाला. त्याची मुले रेशमी कपडे घालून हसत नाचत येऊन त्याला बिलगली. आनंद त्याच्या गगनात मावेनासा झाला. ही सर्व कृपा त्या कृष्णाची. त्याच्या दर्शनाने केवढे वैभव मिळाले? असा सखा मित्र कोठून मिळणार? दुःखात कष्टात मदत करायला धावतो तोच खरा मित्र व सखा! मी



त्याला काय दिले आणि त्याने पहा मला काय दिले?

त्या नंतर सुदाम्याचे दारिद्र्य कायमचे दूर झाले व त्याचा संसार सुखाचा झाला.

एकदा सूर्यग्रहण होते. तेव्हां सर्व यादवांनी द्वारकेच्या रक्षणाचा भार अनिरुद्धावर टाकला आणि ते कुरुक्षेत्री स्नानाला गेले. तेथे कृष्णाचे सर्व जुने मित्र व नातेवाईक मंडळी भेटली. नंद यशोदापण आले. भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, संजय, विदुर, कृपाचार्य, दुर्योधन आदिकांबरोबर गांधारी आली व पांडव सपत्नीक कुंतीमातेला घेऊन आले. स्नानादि आटोपल्यावर सर्व परस्परांना भेटले.



त्यावेळी द्रौपदीने कृष्णाच्या अष्ट महीषींना विचारले–"तुमची लग्ने कृष्णा-बरोबर कशी झाली?"

रुक्मिणीने सर्वात प्रथम आपल्या विवा-हाचे वर्णन केले. म्हणाली–"जरासंध वगैरेंनी माझा विवाह शिशुपालाशी करण्याचे ठरविले होते. पण कृष्णाने माझ्या विनंतीला मान देऊन माझा उद्धार केला."

त्यानंतर सत्यभामेने आपल्या विवाहाची कथा सांगितली. ती म्हणाली–"माझेवडील सत्राजित माझा विवाह आणखी कोणाशी करणार होते. त्याच सुमारास माझे चुलते वारले. त्याचा आरोप माझ्या बाबांनी कृष्णावर लावला. तेव्हां कृष्णाने माझ्या चुलत्यांचा वध करणाऱ्या सिंहाचा वध केला आणि स्यमंतकमणी चोरून नेणाऱ्या जांबुवानाचा पराभव करून स्यमंतकमणी वडिलांना परत आणून दिला. तेव्हां कृष्णाशी त्यांनी माझे लग्न करून दिले."

जांबुवतीने आपल्या लग्नाची कथा अशी सांगितली–"माझे वडील जांबुवान यांनी पंचवीस दिवस कृष्णाशी युद्ध केले. तेव्हां त्यांच्या लक्षात आले की त्यांच्या तारुण्यावस्थेत ज्या रामचंद्राला त्यांनी मदत केली होती त्या रामचंद्रानेच कृष्ण रूपाने अवतार घेतला आहे. ते लक्षात येताच त्यांनी कृष्णाचे पाय धरून क्षमा मागितली व स्यमंतकमण्यावरोबर मला देखील कृष्णाला देऊन टाकले. म्हणून कृष्णाशी माझा विवाह झाला."

त्यानंतर कालिंदीने आपल्या विवाहाची गोष्ट सांगितली. म्हणाली–"मी कृष्णाशीच आपले लग्न व्हावे, यासाठी तपश्चर्या करीत होते. ही गोष्ट त्यांना कळली व त्यांनी अर्जुनाबरोबर येऊन माझ्याशी विवाह केला."

भद्रा म्हणाली–"माझ्या स्वयंवरांत भाग घेण्यासाठी अनेक राजा आले होते.








कृष्णाने त्या सर्वांचा व माझ्या भावाचा युद्धात पराभव करून माझे पाणिग्रहण केले."

त्यानंतर नीलाने आपल्या विवाहाची गोष्ट सांगितली. म्हणाली–"माझ्या वडिलांनी असे जाहीर केले होते की त्यांच्याकडे जे सात सांड होते त्यांची मस्ती उतरवून त्यांना जो ताळयावर आणील त्याच्याशी माझा विवाह होईल. कृष्णाने त्या सातेही सांडांची मुंडी मुरगळून त्यांना ठार केले व माझ्याशी त्यांचे लग्न झाले."

मित्रविंदा म्हणाली–"कृष्ण माझा मामेभाऊ. त्यांना मी मनाने वरले आहे हे माझ्या वडिलांना कळले तेव्हां त्यांनी त्याच्याशी माझा विवाह करून दिला."

शेवटी लक्षणाने आपल्या विवाहाचा वृत्तांत सांगितला. ती द्रौपदीला म्हणाली–"तुमच्या वडिलांप्रमाणेच माझे वडील बृहत्सेन यांनी एक मासा टांगून ठेवला व जो त्या माशाचा लक्षवेध करील त्याला आपली कन्या देईन असे जाहीर केले. फरक एवढा होता की तुमच्या वडिलांनी जो मासा टांगला होता तो बाहेरून दिसत नव्हता. फक्त आतून दिसत होता. परंतु माझ्या वडिलांनी जो मासा टांगून ठेवला होता तो बाहेरून किंवा आतून कोठूनच दिसत नव्हता. त्याचे फक्त प्रतिबिंबच थोडे थोडे पाण्यात दिसत होते. माझ्या वडिलांनी एक धनुष्य पण त्यासाठी तयार करवून ठेवले होते. बहुतेकांना ते उचलता देखील आले नाही. जरासंध, शिशुपाल, दुर्योधन व कर्ण सर्वांनी ते उचलले, पण त्यांना पाण्यात माशाचे प्रतिबिंब दिसले नाही. तेव्हां कृष्णाने धनुष्य घेऊन लक्ष्यवेध केला व कृष्णाशी माझे स्वयंवर झाले."

त्या सर्व गोष्टी द्रौपदीबरोबर इतर स्त्रियांना पण ऐकायला मिळाल्या व त्या सर्वांना आनंद झाला.





# अरण्यपुराण

[ ३२ ]

आपण जंगलात नाहीं ही गोष्ट मौवली पार विसरून गेला आणि समोर जी दिव्याची ज्योत दिसत होती त्या दिशेने सरळ चालत गेला. त्याला पाहून कुत्री भुंकू लागली. मौवली लगेच खाली बसून लांडग्यासारखा गुरुगुरू लागला. ते ऐकून कुत्री शेपटी दाबून गप्प खाली बसली.

'आपण या मनुष्य वस्तीच्या बाजूला आलोच कशाला?' असा विचार त्याच्या मनात आला. मागे माणसांच्या गर्दीने दगड फेंकले तेव्हां त्याच्या तोंडाला एक दगड लागला होता.

झोपडीचा दरवाजा एका एकी उघडला. काळोखांत बाहेर एका बाईने डोकावून पाहिले व दरवाज्यात येऊन उभी राहिली. आत एक मूल रडण्याचा आवाज ऐकू येत होता. त्या बाईने मागे वळून म्हटले–"नीज हो बाळा! कोल्ह्याला किंवा लांडग्याला पाहून कुत्री भुंकू लागली आहेत.

मौवलीला त्या बाईचा आवाज ओळखीचा वाटला. एका एकी त्याच्या तोंडून माणसा सारखी वाणी उमटली. त्याने कापऱ्या आवाजात हाक मारली–"मेस्सुवा! मेस्सुवा!"

"कोण बोलले ते?" त्या बाईने आवाजालाच जणुकाही विचारले.

"मला विसरलीस?" मौवली म्हणाला. त्याच्या घशाला कोरड पडल्यासारखे झाले.

तिने दरवाजा अर्धवट बंद केला व एक हात आपल्या छातीवर ठेवून विचारले–"तूच असलास तर मी तुला ज्या नावाने हाक मारीत होते ते सांग!"

"नथ! ए नथ!" मौवली म्हणाला.

शेवटचे मलपृष्ठ



"ये, बाळ! आत ये!" मेस्सुवा म्हणाली.

मौवलीने झोपडीत पाऊल टाकीत असता मेस्सुवाकडे पाहिले. तिने कधी मातृप्रेमाचा वर्षाव त्याच्यावर केला होता. त्याने तिला एकदां वांचविले होते. आज तिचे केस पांढरे होऊ लागले आहेत. तरी तिच्या डोळ्यात किंवा आवाजात काही फरक नव्हता.

त्या बाईने मौवलीकडे नखशिख एकदा पाहिले. त्याचे डोके दाराला लागू लागले होते. शरिराचा बांधा उंच, हृष्ट पुष्ट व सुंदर होता. त्याचे काळेभोर केस खांद्यावर लोंबत होते. गळ्यात दागिन्या-सारखी घातलेली त्याची कट्यार समोर छातीवर लोंबत होती. डोक्याला फुलांची माळा होती. एकाद्या वनदेवतेसारखे त्याचे रूप होते.

खाटेवर झोपत असलेले मूल जागे झाले आणि जोरजोराने रडू लागले. मेस्सुवा त्याला गप्प करू लागली. मौवली झोपडीत ठेवलेली भांडी व इतर वस्तू पाहू लागला.

"बाळ, थोडे खा व पाणी पी! हे सर्व तुझेच आहे रे. तू आमचा जीव वांचवला होतास. मीच तुला नत्थू हे नाव ठेवले." मेस्सुवा म्हणाली.

"मीच नत्थू! मी आपली जागा सोडून पुष्कळ दूर आलो आहे. दिवा दिसला म्हणून जवळ आलो. तूच येथे असशील असे वाटले नव्हते." मौवली म्हणाला.

"आम्ही कांजिहाराला आलो तेव्हां इंग्रज म्हणाले की तुम्हाला आम्ही आपल्या भावासारखे वागवू. आम्हांला गावकऱ्यांनी जिवंत जाळण्याचा बेत केला होता, ते आठवते ना तुला?" मेस्सुवाने विचारले.

"कसे विसरेन?" मौवली म्हणाला.

"गोरे लोक त्या लोकांना शिक्षा करा-यला आले. त्यांच्या कायद्या प्रमाणे शिक्षा





करता येते म्हणे! पण ते गांवच तेथे नव्हते." मेस्सुवा म्हणाली.

"ते सुद्धा मला आठवते!" मौवली म्हणाला.

"म्हणून माझ्या कारभाऱ्यांनी पुष्कळ श्रम करून थोडीसी जमीन मिळविली. ही जमीन त्या गावच्या जमिनी सारखी चांगली नाही. तरी आम्हांला खायला किती हवे? दोन प्राणी आम्ही." मेस्सुवा म्हणाली.

"ते कोठे आहेत?" मौवलीने विचारले.

"ते गेले हे जग सोडून, एक वर्ष झाले." मेस्सुवा म्हणाली, तिच्या डोळ्याला दोन टिपे आली.

"हा कोण?" मौवलीने मुलाकडे बोट दाखवून विचारले.

"हा माझा मुलगा! दोन वर्षांचा आहे." असे म्हणत मेस्सुवाने आपल्या मुलाला उचलून कडेवर घेतले. मुलगा प्रथम घाबरला, मग मौवलीच्या गळ्यातली कट्यार धरू लागला. मौवलीने त्याच्या हाताची चिमुकली बोटे धरून हळूच बाजूला सारली.

"वाघाने उचलून नेलेला माझा नत्थू तूच असशील तर हा तुझा धाकटा भाऊ आहे. मोठा भाऊ म्हणून याला आशीर्वाद दे." मुलाला मौवलीच्या हातात देत ती म्हणाली.

"आशीर्वाद! तो काय ते नाही मला कळत. याचा भाऊ! नाही. मी नाही याचा भाऊ. हे पहा, आई! माझी छाती अशी कां बरे होते आहे?" असे म्हणत मौवलीने मुलाला मेस्सुवाच्या हातात दिले.

"कां नाही होणार? रात्री ओल्या जमिनीवर धावतोस. ताप आला असेल." मेस्सुवा म्हणाली.

ते ऐकून व जंगलात त्याला ताप आला असता, ह्याचा विचार करूनच त्याला हसू आले.

थांब, बाळ! मी दूध ऊन करून देते. डोक्यावरची ती माळ काढून ठेव. त्याचा वास तुला बरा नाही." मेस्सुवा म्हणाली.

मौवली खाली बसला. आपल्या हाताने तोंड झाकून मनातल्या मनात काही तरी गुणगुणू लागला. त्याच्या मनात निरनिराळे विचार येऊ लागले. आपण भयंकर विष तर नाही खाल्ले, असे त्याला वाटत होते. वाळल्या सारखे त्याला वाटले. पित्त दिलेले दूध एका मिनिटात त्याने मेस्सुवाने पिऊन टाकले. मेस्सुवा त्याच्या हाता खांद्यावर हळूवार पणाने हात फिरवू लागली. तो तिचा हरवलेला नथू असो किंवा नसो, पण एक माणसाचे मूल तर आहे. याच गोष्टीचा तिला परमानंद झाला.

"बाळ! तू सुंदर आहेस, असे कोणी म्हणाले नाही का तुला?" मेस्सुवा त्याच्याकडे गर्वाने पहात म्हणाली.

मौवलीने स्वत.कडे खालीवर डोके करून पाहण्याचा यत्न केला. मेस्सुवा त्याचे ते विचित्र वागणे पाहून मोठ्याने हसू लागली. तिला आपले हंसणे आवरता आवरले नाही. मूलहसू लागले मौवली पण एका एकी मौठ्याने हसू लागला.

मेस्सुवा मुलाला उचलून घेत म्हणाली– "बाळ, असे कोणी हसतं का? त्याचे अर्धे सौंदर्य जरी तुला मिळाले तर मिळेल त्या दिवशी राजाच्या धाकट्या मुलीशी तुझे लग्न लावून देईन. तुला हत्तीच्या अंबारीत बसवून मिरवणार नाही का मी?"

मेस्सुवा म्हणाली त्यातले अर्ध्याहून अधिक मौवलीला कळले नाही. पुष्कळ दूर धावत आल्यामुळे तो दमला होता. गरम दूध प्याल्याने त्याला झोप आली. थोड्या वेळाने त्याला गाढ झोप लागली. मेस्सुवाने त्याच्या तोंडावर पसरलेले काळे भोर केस प्रेमाने बाजूला सारले व त्याला एक चादर पांघरायला घालून त्याच्या सौंदर्याचे कौतुक करू लागली.



## आफ्रिकेतला कल्पवृक्ष

याचे नाव बोबाबाब असे आहे. या झाडावरच्या पोकळीतले पाणी पिण्यासाठी उपयोगी असते. याच्या पानांची कोशिंबीर करतात व साल डोळ्याच्या आजाराला उपयोगी असते. याच्या कच्च्या फळांची भाजी करतात. डाकार नजीकच्या या झाडाचा व्यास ६५ फुट आहे.



# दयानिधि

राजशेखरपूर नावाच्या गावी रत्नाकर नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याने विदेशांशी व्यापार करून अलोट पैसा मिळविला होता. परंतु दानधर्म करण्याची बुद्धि त्याला कधी झाली नाही.

त्याच्या बायकोचे नाव गुणवती होते. गोरगरिबांचे कष्ट व दुःख पाहून तिला त्यांची दया येई. पण तिच्या नवऱ्याला दान धर्म करणे आवडत नसे. या गोष्टीचे तिच्या मनाला दुःख होते.

तिच्या मुलाचे नाव दयानिधी असे होते. तो आई सारखा दयाळू होता व बापा सारखा हुशार होता. वयात आल्यावर त्याचे लग्न करून द्यावे असे आईला वाटत होते.

लग्नाविषयी गुणवती मुलाशी बोलत असतां ते ऐकून रत्नाकर तिला म्हणाला–"जोपर्यंत मुलगा मिळवू लागत नाही तोपर्यंत त्याचे लग्न करून देणे बरोबर नाही. तो पैसा उधळू लागेल व त्यानंतर व्यापाराकडे त्याचे लक्ष लागणार नाही."

एकदा रत्नाकरने दयानिधीला एका जहाजात माल भरून व्यापारासाठी परदेशात पाठविले. दयानिधी आपल्या साथी नोकरांबरोबर समुद्रपार एका बंदरात आला. त्याने एका जागी राहण्याची व्यवस्था केली व तेथे जाऊन राहू लागला. तिथले व्यापारी त्याच्याशी व्यापारधंद्या-संबंधी बोलायला आले. त्याच वेळी शिपाई काही कैद्यांना समोरून धरून घेऊन जात असलेले दिसले. त्या कैद्यांच्या हातात हतकड्या व पायात बेड्या पडलेल्या होत्या. कडक उन्हांत त्यांना चालावे लागत होते व त्यांच्या अंगातून घामाच्या धारा वाहात होत्या.

दयानिधीने व्यापाऱ्यांना विचारले–"हे सर्व कैदी चोर आहेत का?"

श्री. शा. मो. पडवळ

"नाहीत. हे गरीब शेतकरी आहेत. सरकार सारा भरू शकले नाहीत म्हणून त्यांना कैद करून घेऊन चालले आहेत. सर्व मिळून सुमारे सहाशे कैदी असतील." व्यापारी म्हणाले.

त्यांची ती स्थिति पाहून दयानिधीचे हृदय द्रवले. त्याने आपला सर्व माल व्यापाऱ्यांना विकून टाकला आणि जे पैसे मिळाले ते घेऊन तो राजाच्या दरबारात गेला. जेवढा सारा भरावयाचा होता तो सर्व भरून त्याने कैद्यांना सोडविले व स्वदेशी परतला.

दयानिधी जे पैसे घेऊन आला ते पाहून रत्नाकरने मुलाला विचारले–"एवढेचका पैसे मिळाले? या मालाची मूळ किंमत व प्रवासखर्च जेवढा झाला त्याचे दहा टक्के देखील हे पैसे नाहीत!" दयानिधीने व्यापाऱ्यांकडून किती पैसे मिळाले हे सांगून त्याने कैद्यांना सोडविण्यासाठी सरकार सारा किती भरला हे सांगितले.

ते ऐकून रत्नाकरला राग आला. म्हणाला–"हा काय व्यापार झाला. तू चार दिवसांत माझे दिवाळेच काढशील. चालता हो माझ्या घरातून!"

गुणवतीला ते कळले तेव्हां तिने मुलांच्या वतीने नवऱ्याजवळ क्षमा मागून मुलाला




क्षमा करायला सांगितले. रत्नाकरने दया-निधीला पुन्हा एक जहाज देऊन त्यावर माल भरला व व्यापारासाठी परदेशात पाठविले.

या खेपेस प्रवासाच्या सुरवातीलाच एक विघ्न आले. दयानिधीचे जहाज ज्या बंदरात होते. त्या बंदरात आणखी एक जहाज होते. त्यात कित्येक स्त्रीपुरुषांना बसविण्यात येत होते. ते लोक रडत ओरडत जहाजात चढत होते.

दयानिधीने चवकशी करून पाहिले तेव्हां त्याला कळले की ते सर्व लोक गुलाम आहेत. त्यांना परदेशी विकायला घेऊन



चालले आहेत. तो त्या जहाजाच्या मालकाला भेटला व म्हणाला–"माझ्या जहाजावरचा सर्व माल घेऊन या सर्व गुलामांना सोडा." जहाजाचा मालक त्या गोष्टीस कबूल झाला.

जे गुलाम गुलामीतून सुटका मिळाल्याने बाहेर आले दयानिधीने सर्वांची चवकशी करून त्यांना त्यांच्या गावी परत पाठविले. त्या गुलामांत फक्त दोन बायका उरल्या होत्या. एक तरुण स्त्री होती व दुसरी म्हातारी. त्याने त्यांना विचारले–"कोण तुम्ही? कुठल्या राहणाऱ्या?"

ती तरुण स्त्री काहीच बोलली नाही. ती मान खाली करून नुसती उभी राहली. म्हातारी म्हणाली–"मी यांची दासी आहे."

"या कोण?" दयानिधीने पुन्हा विचारले. पण म्हातारीने त्या प्रश्नाचे काहीच उत्तर दिले नाही. "तुम्हांला कोठे पाठवायचे?" दयानिधीने विचारले.

"आम्हांला कोठे जावयाचे नाही." म्हातारी म्हणाली. शेवटी नाइलाजाने दयानिधी त्यांना आपल्या घरी घेऊन गेला आणि आपल्या वडिलांना घडलेली गोष्ट सांगितली.

आता रत्नाकरला जास्त विचार करावा लागला नाही. व्यापार करण्याचे दूरच राहले. रस्त्यावर चाललेल्या एका गुलाम पोरीवर स्वारी भाळली व हातातले काम सोडून तिला वाचविण्यासाठी एवढा माल फुकटात देऊन मोकळी झाली. अशा मुलाचे लग्न करून दिले तर काय उपयोग? त्याने जास्त विचार केला नाही व मुलाला घराबाहेर काढले. गुणवतीला काही बोलता आले नाही.

दयानिधीच्या मित्रांना तो घराबाहेर पडलेला कळले तेव्हां त्यांनी त्याला मदत केली. त्यांनी त्याला एक घर ठरवून दिले व व्यापारासाठी थोडेसे भांडवल पण उभे केले. त्या दोघां बायकांना बरोबर घेऊन दयानिधी त्या घरात राहून लागला. त्याला व्यापारात फायदा होऊ लागला. एका वर्षाच्या आत त्याने आपल्या मित्रांचे कर्ज फेडले. व्यापारात जो फायदा होई त्यातला काही भाग दानधर्मासाठी तो निराळा राखून ठेवू लागला. त्याचा व्यापार धंदा वाढत गेला.



दयानिधीकडे राहणारी ती तरुण मुलगी दुसरी तिसरी कोणी नसून विजयपूरची राजकन्या होती. ती म्हातारी तिची दासी होती. त्या दोघांना चोर पळवून घेऊन गेले व गुलामांचा व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांच्या हाती त्यांना विकून टाकले. लाजेमुळे राजकन्येने हे सर्व सांगितले नाही. आपण गुलामासारखे विकले गेलो ही गोष्ट तिच्या वडिलांना अपमानस्पद आहे व कुळाला कलंक लागण्यासारखी आहे असे तिला वाटले. तिला वाटत होते की इतर गुलामां-बरोबर दयानिधीने तिला देखील विकत घेतले असावे. परंतु खरी गोष्ट कळल्यावर हळूहळू त्याच्या विषयी तिच्या मनात आदराची भावना वाढत गेली. म्हणून त्याच्या आश्रयास राहून अज्ञातवासातच आयुष्य कंठायचे तिने मनाशी ठरविले.



परंतु विजयपूरचा राजा स्वस्थ बसला नाही. त्याची मुलगी नाहीशी झाल्याचे त्याला कळले तेव्हांपासून त्याने तिच्या शोधार्थ सारे जग पालथे घातले. त्याचे दूत राजकन्येचा शोध करीत राजशेखर-पूरला आले व रत्नाकरचा मुलगा दयानिधी याने शेकडो गुलामांना सोडविले, त्यात एक तरुण मुलगी व एक म्हातारी दोघी होत्या आणि त्या दोघी त्याच्याच-कडे रहात आहेत हे कळल्यावर ते दयानिधीच्या घरी आले आणि राज-कन्येला व तिच्या दासीला त्यांनी ओळखले.

राजकन्येने त्यांच्याबरोबर वडिलांकडे जाण्यास नकार दिला. म्हणाली–

"आम्ही आहो तेथे सुखी आहो. आज नाही तर उद्यां मला माझे वडील परक्या घरी पाठवणारच. या शिवाय माझ्यामुळे माझ्या वडिलांची अपकीर्ती झालेली मला पसंत नाही. मी येथे सुखी आहे, असे त्यांना सांगावे."

राजकन्या राजशेखरपूरला असल्याची वार्ता राजाला कळली. तो स्वतः तेथे आला व दयानिधीला म्हणाला–"ही माझी मुलगी आहे. हिला घेऊन जाण्यासाठी आलो आहे."

"मला हे पूर्वीच कळले असते की ह्या कोण आहेत तर मी स्वतः त्यांना सुखरूप आपणांकडे पोचते केले असते. परंतु यांनी मला ह्या कोण काय हे काही एक कळू दिले नाही. राजवाड्यातल्या सुखसोयी सोडून ह्यांना माझ्या सारख्या गरिबाच्या घरी इतके दिवस काढावे लागले. या बद्दल मला फार वाईट वाटते." दयानिधीने राजाला नम्रपणे सर्व वृत्त सांगितले.

"परंतु माझी मुलगी माझ्याबरोबर जायलाच तयार नाही, म्हणते. तिला हेच घर पसंत आहे. तुम्हांला हरकत नसेल तर आपण तिचे पाणिग्रहण करावे." राजा म्हणाला.

दयानिधी चकित होऊन राजाकडे पाहूं लागला. काय उत्तर द्यावे हे त्याला सुचेना.

त्यावर राजा म्हणाला–"खुळा रे खुळा! राजकन्या तुझ्याशीच लग्न करणार म्हणते आहे." राजाने दयानिधीच्या वडिलांना भेटून त्यांच्या संमतीने दयानिधीशी राजकन्येचा विवाह करून दिला. आपल्या मुलीला व जावयाला भेट म्हणून अनेक मूल्यवान वस्तू देऊन राजा आपल्या राजधानीस परतला.

# मेंढरांचा कळप

मंदरगिरीचा राजा मंदरवर्मा याला वाटे की त्याचा राज्यकारभार व कर्तबगारी यामुळे त्याची प्रजा विवेकी आणि सुखी आहे व सर्वत्र शांतता नांदत आहे. ही गोष्ट तो आपल्या मंत्र्यांना नेहमी मोठ्या गर्वाने सांगे. ती गोष्ट ऐकून प्रधानाला राग आला. शेवटी तो एकदा राजाला म्हणाला–"महाराज! आपण क्षमा करावी, पण आपणाला वाटत असले तरी त्याचे कारण ते नाही. राज्याचा खरा भार आपल्या मंत्र्यांवर व अधिकारीवर्गावर आहे. हा अधिकारी वर्ग सदाचरणी व इमानदार आहे तोपर्यंतच प्रजा त्यांचे अनुकरण करत राहील. प्रजेचे पाऊल वांकडे पडणार नाही. प्रजा ही मेंढरांच्या कळपासारखी आहे. लाचलुचपत वाढू लागली, बेइमानी वाढली म्हणजे प्रजादेखील त्याच मार्गावर चालू लागेल. अधिकारीवर्ग न्याय व नीतीने वागला तर प्रजापण न्यायनीतीने वागेल. अगदी मेंढरांचा कळप असतो तशी ही प्रजा आहे. पुढची खड्ड्यात पडली की मागची पण खड्ड्यात."

प्रधानाने आपले म्हणणे खोडून प्रजेला मेंढरांचा कळप म्हटले ही गोष्ट राजाला आवडली नाही. म्हणाला–"प्रजा ही मेंढरांच्या कळपासारखी आहे तर ते तुम्ही मला पटवून दिले पाहिजे. सहा महिन्यांचा अवधी देतो. जर ते होऊ शकले नाही तर शिरच्छेद होईल."

पण राजाच्या या धमकीची मंत्र्याला मुळीच भीती वाटली नाही. तो सरळ तरुंगाकडे गेला. दुसऱ्या दिवशी कोणाला सुटका मिळणार आहे हे विचारून त्याने त्या कैद्याला बोलावून घेतले व त्याच्याजवळ एकांतांत काही तरी बोलून मंत्री घरी निघून गेला.

दहा वर्षे कैदेची शिक्षा भोगून आलेला तो कैदी दुसऱ्या दिवशी पहाटे सुटला. एका संन्याश्याचा वेष धारण करून राजवाड्या पासून थोड्या अंतरावर एका झाडाखाली डोळे मिटून बसला. सूर्योदय झाल्यावर मंत्री राजधानीच्या पर्यवेक्षणासाठी निघाला. त्याच्या बरोबर त्याचे शिपाई पण होते. त्याने त्या संन्याश्याला लवून नमस्कार केला. ते पाहून त्या वाटेने येणाऱ्या नागरिकांनी पण त्या संन्याश्याला नमस्कार करून त्याच्या समोर फळे व फुले व इतर वस्तू ठेवायला सुरवात केली.

संन्याश्याविषयी राजधानीभर चर्चा सुरू झाली. दिवसेदिवस येणाऱ्या नागरिकांची गर्दी वाढतच गेली. राजाने मंत्र्याला बोलावून विचारले—"आपल्या राजधानीत कोणी थोर महापुरुष आला आहे असे ऐकतो."

"होय महाराज! मी सुद्धां त्यांच्या दर्शनाला जाऊन आलो." प्रधान म्हणाला.

"तरमग आम्ही सुद्धा जावे म्हणतो." राजा म्हणाला. त्यानंतर राजा सपरिवार संन्याश्याच्या दर्शनाला गेला.

त्यानंतर त्या संन्याश्याच्या दर्शनास येणाऱ्यांची गर्दी वाढतच गेली. तीर्थयात्रेसारखे देशातल्या दूरदूरच्या गावाहून लोक दर्शनास येऊ लागले. काही लोकांनी स्वतःकडे संन्याश्याचे शिष्यत्व घेतले व येणाराजाणारांची राहण्याची, जेवणाची, त्यांनी आणलेल्या भेटी स्वीकारण्याची, वगैरे व्यवस्था पाहू लागले.

सहा महिन्यांचा काळ संपत आला. एकदां प्रधान राजाला म्हणाला—"महाराज! एक चूक झाली. तो संन्यासी पळून गेला. दहा वर्षे शिक्षा भोगून आलेला तो एक गुन्हेगार होता."

त्यानंतर राजाने 'प्रजा मेंढरांचा कळप आहे' ही गोष्ट पटवून देण्याचा आग्रह दाखविला नाही.





# पडकें देऊळ

[ १४ ]

[ वाघाच्या पिंजऱ्याजवळ दबा धरून बसलेल्या शिखीमुखने भूतनायक गोंड मांत्रिकाला पकडले. तिकडे गोंड नागमल्लीला घेऊन आकाशगुहेत गेले. भूतनायकाने प्राणभयाने शिखीमुखला मदत देण्याचे कबूल केले. शबर वाघाचा पिंजरा ओढून नेऊ लागले. पुढे—]

शिखीमुख व विक्रमकेसरी या दोघांच्या पाठीमागून येणाऱ्या शबर व नागजातीच्या लोकांनी वाघाच्या पिंजऱ्याजवळ जाताच वाघाला भाला बरछी दाखवून खिजवण्याचा यत्न केला. वाघ आपले पंजे पिंजऱ्याबाहेर काढून मोठमोठ्याने ओरडू लागला. शिखीमुखने वाघाला त्रास देऊ नका असे त्यांना सांगून वाघाकडे एकदा लक्षपूर्वक पाहिले व आपल्या खांद्यावरचे कातडे हलवून वाघाला दाखविले. ते पाहून वाघ पिंजऱ्याच्या एका कोपऱ्यात जाऊन बसला.

"वाघालासुद्धा दहशत बसविणाऱ्या या कातड्याचा आपल्याला चांगलाच उपयोग होणार आहे. मला असेदेखील वाटू लागले आहे की गोंड नायकाने हे कातडे मंत्रवून ठेवले असावे." असे म्हणत शिखीमुख हसला.



विक्रमकेसरीने शिखीमुखच्या हातातले कातडे व कवटी दोन्हींना स्पर्श केला व डोके दुखल्यासारखे दाखवून म्हणाला– “यात हात लावल्याबरोबर विस्तवाला हात लागल्यासारखा चटका बसला. तो भूतनायक त्या पुजाऱ्यासारखाच मांत्रिक असावासा वाटते.” ते ऐकून सर्व लोक जोराने हंसू लागले.

त्यानंतर सर्व जंगलाच्या वाटेने थोडे अंतर चालून गेले व एका पाऊल वाटेने आकाशगुहेकडे निघाले. वाघाचा पिंजरा ते ओढून नेत होते, परंतु ओढून नेणे त्यांना तेवढे सोपे नव्हते. त्यांनी धीर सोडला नाही. त्यांच्या नायकाचा मुलगा त्या पिंजऱ्याच्या मदतीने काही तरी दिव्य करणार आहे असे समजून त्यांनी आपल्या शक्तीची पराकाष्ठा दाखवून तो पिंजरा बराच वर ओढून नेला. वाघ काही वेळ डरकाळ्या फोडून शेवटी दमला व एका कोपऱ्यात जाऊन बसला.

आकाशगुहेजवळ पोचताच शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांनी आपल्या अनुयायांचे दोन गट केले. एक गट पळून जाणाऱ्या गोंडांना अडविण्याच्या कामावर नेमण्यात आला. दुसरा गट गोंडांच्या वस्तीच्या काटेरी कुंपणानजीक राहून संधी पाहून त्या वस्तीवर हल्ला करण्यासाठी किंवा वस्तीबाहेर येणाऱ्या गोंडांना अडवून ठेवण्यासाठी नेमण्यात आला. शिखीमुखने सर्वांना सावध केले. नागमल्ली सुखरूप परत येईपर्यंत शक्यतोवर रक्तपात होऊ नये असे त्याने सर्वांना समजावून सांगितले. त्यानंतर वाघाचा पिंजरा कांटेरी कुंपणाजवळ आणून ठेवण्यात आला.

गोंडांच्या वस्तीत एकूण चाळीस पन्नास झोपड्या होत्या. त्यांच्या चारीबाजूला कांटेरी झाडांचे पाच सहा फूट





उंचीचे कुंपण होते. त्याच्या अलीकडे उंच उंच झाडे होती. झाडांच्या फांद्या कुंपणापलीकडे वस्तीत पसरलेल्या होत्या. म्हणून झाडांवरून चढून पलीकडे वस्तीत शिरणे शक्य होते. शिखीमुख व विक्रमकेसरी एका झाडावर चढून आत चालू असलेली गडबड कशासाठी होती हे पाहू लागले.

गोंडांचा नायक झोपडीत रहात नसून आपल्या मुलांबाळांसह एका गुहेत रहात होता. गुहेला बाहेरून व आंतून चांगला रंग लावलेला होता व त्या रंगावर निरनिराळी चित्रे काढलेली होती. गुहेसमोर बऱ्याचशा शेकोट्या जळत होत्या. त्यांच्या चारीबाजूला गोंड स्त्रीपुरुषांचे आनंदाने नृत्य-गायन चालू होते. एका उंच जागी बसून पडक्या देवळाचा पुजारी ते दृश्य पहात होता. गोंडांचा सरदार भूतनायकाशी दूर उभा राहून काही तरी बोलत होता.

“शिखी, हीच ती आकाशगुहा. नाम तर सुंदर आहे. पण हे सर्व काय करत आहेत कळले नाही.” विक्रमकेसरी म्हणाला.

“त्यांचा कोणता तरी उत्सव दिसतो आहे. आपण येथे पोंचू तोपर्यंत येथे सर्व शांत असणार अशी माझी समजूत होती. माझा सर्व बेत फिसकटला. तरी पण भूतनायकाने कबूल केल्याप्रमाणे नागमल्लीला सांगितलेल्या जागी आणून ठेवले आहे की नाही, पाहून येतो.” असे सांगून शिखीमुख झाडावरून खाली उतरला आणि कुंपणाच्या फाटकाकडे निघाला.

फाटक बंद होते. परंतु शिखीने हलक्या हाताने ते ढकलले तेव्हां ते उघडले. तो आंत गेला. तेथून थोड्याच अंतरावर एक लहान झोपडी होती. आत दिवाबिवा नव्हता. झोपडीसमोर कोणी पाहारेकरी पण नव्हता. भूतनायक वचन दिल्याप्रमाणे



नागमल्लीला या झोपडीत ठेवून गेला असावा, असे शिखीमुखला वाटले. म्हणून तो थोडा सावधपणे त्या झोपडीच्या दारापर्यंत गेला. आतून कोणाचा आवाज येत नव्हता. म्हणून त्याने हळूच दार उघडले. आंत कोणी नाहीं असे पाहून त्याने आंत पाऊल टाकले.

आंत काळोख होता. त्याने दगडावर दगड मारून कापसावर ठिणगी पाडून उजेड करून पाहिले. त्याला त्या अंधुक प्रकाशात झोपडीच्या एका बाजूला काही दोऱ्या दिसल्या. याच दोऱ्यांनी नागमल्लीला गोंडांनी बांधून आणले असावे आणि भूतनायकाने सांगितल्याप्रमाणे नागमल्लीला याच झोपडीत आणले असावे असे त्याला वाटले. पण तिला येथून त्यांनी कोठें व कां नेले असावे बरे? शिखीमुख विचारात पडला.

परंतु विचार करण्यात फुकट वेळ घालविणे तितकेच धोक्याचे आहे असा विचार करून तो विक्रमकेसरी उभा होता तेथे परत आला व त्याने जे पाहिले ते सर्व त्याला सांगून म्हणाला–"आपल्याला भूतनायकाने फसविले तरी आहे किंवा त्याला कोणी तरी फसविले आहे."

"तसे असेल तर आपण सर्वच आत शिरू या. आणि गोंडांची कत्तल करू या. नागमल्लीला ज्या झोपडीत त्यांनी ठेवले आहे ती हुडकून काढून तिला सोडवून आणू या." विक्रमकेसरी म्हणाला.

शिखीमुख थोडा वेळ विचार करून म्हणाला–"विक्रम! तुझे म्हणणे बरोबर आहे. परंतु मला वाटते की या गोंडाना जिंकणे तुला वाटते तितके सोपे नाही. ते सर्व मिळून आपल्यापेक्षां जास्तच आहेत. याशिवाय आपण हल्ला केला तर ते नागमल्लीला आणखी कोठे उचलून नेणार नाहीत कशावरून? मी दुसरीच युक्ती



करावी म्हणतो." असे शिखीमुख म्हणाला व विक्रमला वाघाचे कातडे व कवटी दाखवून त्याला काही कळले का अशा दृष्टीने त्याच्याकडे पाहू लागला.

"काय करणार आहेस? हीं कसली युक्ती?" विक्रमकेसरीने विचारले.

"प्रथम, या कुंपणाला एक वाट वाघाला आत शिरण्यासाठी तयार करून ठेवली पाहिजे. त्या दाराजवळ आपल्याला पाहिजे तेव्हां वाघाचा पिंजरा आणून पिंजऱ्याचे दार उघडले म्हणजे वाघ वस्तीत शिरेल. मी त्याच्या आधी हळूच आंत शिरून नागमल्लीला कोठे लपवून ठेवले आहे ते पाहून येईन. एका गोंडाला जरी आपण आपल्या [illegible]ला वळवून घेऊ शकलो तरी त्याच्या सहाय्याने आपल्याला ते कळेल." शिखीमुख म्हणाला.

"तू एकटयाने आत गेलास तर त्यात धोका आहे." विक्रमकेसरी म्हणाला.

"तसे भिण्याचे काहीच कारण नाही. वाघाचे हे कातडे व कवटी आहेतच. पहा तर काय गंमत होते ती. तोपर्यंत तू वाघाच्या पिंजऱ्याजवळचे कुंपण छाटून वाघाला आत शिरायला वाट करून सर्व तयार ठेव. मी कवटी गोंडांच्या अंगावर



फेकली म्हणजे तीच खूण समज." शिखीमुख म्हणाला.

विक्रमकेसरीने आपल्या दोघां तिघां शबर अनुयायांच्या मदतीने कुंपण छाटून वाघाच्या पिंजऱ्याजवळ वाघाला आत शिरायला वाट केली. शिखीमुख झाडांच्या फांद्यावर चढून पलीकडे गेला व कोणाच्या लक्षात आल्याशिवाय काळोखात झोपड्या होत्या त्या बाजूला जाऊ लागला. इतक्यात त्याला तो स्वत: ज्या झोपडीतून नागमल्लीला कोणीतरी उचलून नेल्याच्या संशयाने बाहेर आला होता त्या झोपडीकडे एक गोंड लहानशी मशाल घेऊन जात असलेला दिसला.



तो मशालवाला गोंड हळूच दार उघडून आत गेला. शिखीमुख दाराआड उभा राहला. तो गोंड झोपडीत जाऊन व काही तरी शोधून ते न दिसल्यामुळे आश्चर्यचकित झाल्यासारखा गुणगुणत उभा राहला. शिखीमुखला वाटले की तो नागमल्लीच्या शोधार्थच तिकडे आला असावा. लगेच तो मांजराच्या पावलांनी हळूच त्या झोपडीत शिरला व उडी मारून त्या गोंडाची मानगुटी धरून तोंड दाबले. त्या गोंडाला तो म्हणाला– "तुला जिवंत रहायचे असेल तर ओरडू नकोस." त्या गोंड माणसाच्या हातांतली मशाल खाली पडली. त्या गोंडाने स्वत:ला सोडवून घेण्याचा यत्न केला नाही. जागच्या जागी सरळ उभा राहला. शिखीमुखने आपली पकड थोडी सैल करून त्याला विचारले–"तू येथे कशासाठी आला आहेस?"

त्या गोंड माणसाने भूतच मानगुटीस बसले आहे अशातऱ्हेने भीतभीत शिखीमुख-कडे पाहिले व कांपऱ्या स्वरात म्हणाला– "माझ्या सरदाराने शबर नागमल्लीला आणण्यासाठी मला पाठविले आहे. म्हणून मी येथे आलो होते.

"नागमल्लीला येथे लपवून ठेवले आहे, हे तुझ्या सरदाराला कोणी सांगितले?" शिखीने विचारले.

"भुतांच्या सरदाराने!" गोंड म्हणाला.

"मग नागमल्ली कोठे आहे? खरे बोल, नाही तर..." असे सांगून शिखीमुखने कंबरेची कटचार काढून त्याला दाखविली.

"मला नका मारू! मी गोंड नायकाचा मनुष्य नाही. भूतनायकाचा अनुयायी आहे. त्याने मला येथे नागमल्लीला लपवून ठेवायला सांगितले होते, आणि कुंपणाचे फाटक उघडून ठेवायला सांगितले होते. मी त्या प्रमाणे सर्व केले होते..." गोंड म्हणाला..

"भूतनायकाने तसे करायला तुला का सांगितले होते, माहीत आहे का तुला?" शिखीने विचारले.

"मला नक्की माहीत नाही. पण तिला आकाशदेवाची पुजारीण करण्यासाठी आणले आहे असे म्हणाला होता व असे पण बजावून सांगितले होते की ही गोष्ट कोणाला कळता कामा नये. मी हे सर्व खरे सांगतो आहे. माझा जीव घेऊ नका." असे म्हणत गयावया करून गोंड शिखी-मुखचे पाय धरू लागला.

शिखीमुख त्याला धाक दाखवून म्हणाला– "तू मला येथे भेटला होतास किंवा पाहिले होतेस हे कोणाला सांगू नकोस, खबरदार! अन् जा आता!"

गोंड निघून गेला. शिखीमुख वाघाचे कातडे पांघरून रांगत रांगत आकाश गुहे-जवळच्या झोपड्यांकडे जाऊ लागला. इतक्यात गोंडांचा सरदार रहात होता त्या बाजूला आरडा ओरडा सुरू झाला. शिखी-मुख काळोखातून वाट काढीत त्या बाजूला जाऊ लागला तेव्हां त्याला भूतनायक व पडक्या देवळाचा पुजारी यांचे आपसात काहीतरी भांडण चालू असल्यासारखे ऐकू आले. त्यांच्या शेजारी गोंडाचा नायक उभा होता. तो ओरडत होता–" फितुरी! धोका!"



त्या भांडणाचे कारण कळावे या साठी शिखीमुख थोडा आणखी पुढे गेला. तेव्हां त्याच्या अंगावर शेकोटयांचा उजेड पडला. लगेच एक दोन गोंड ओरडले–"वाघ! वाघ! पळा!"

गोंडाचा नायक, भूतनायक व पुजारी आकाशगुहेकडे पळाले. त्यांना भाल्याने ठार करण्याच्या गर्दीत शिखीमुख उठून उभा राहिला. म्हणून त्याच्या अंगावरचे वाघाचे कातडे खाली पडले. पळणारे गोंड थांबले व ओरडले–"वाघ नाही, मनुष्य!" असे सांगून ते सर्व शिखीमुख होता त्या बाजूला धावले.

शिखीमुख एक एक पाऊल मागे टाकीत गोंडांकडे भाला रोखून कुंपणाच्या बाजूला जाऊ लागला. गोंडांचा आवाज ऐकून त्यांचा नायक पुन्हा शेकोटया जळत होत्या तिकडे धावत आला. पडक्या देवळाचा पुजारी दांत ओठ चावून म्हणाला–"वाघाचे कातडे पांघरून येणारा कोण आहे, मी ओळखतो त्याला. त्याला जिवंत पकडा. ते शक्य झाले नाही तर ठार करा." पुजारी ओरडून सांगत होता.

गोंड आपापले भाले उगारून शिखीमुखकडे धावले. धोका आहे हे ओळखून शिखीमुखने पुजाऱ्याच्या अंगावर कवटी फेकली व जोराने ओरडला. दुसऱ्या क्षणाला विक्रमकेसरीने पिंजऱ्यातल्या वाघाला सोडले. तो डरकाळ्या फोडीत पुजारी व इतर लोक होते तिकडे उड्या टाकीत निघाला.

"पळू नका, वाघाचे कातडे पांघरून येणारा हा दुसरा कोणी दिसतो आहे." पुजारी ओरडून सांगू लागला. वाघाने, समोर जे दोन गोंड दिसले त्यांना ठार केले व तो पुजारी उभा होता तिकडे निघाला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)





# पराभव

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो परत झाडाजवळ आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे नेहमीसारखा निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझ्या बळ व पराक्रमाविषयी मला मुळीच संशय नाही. जय किंवा पराजय यांच्या आधारे बळ व पराक्रम यांचा निर्णय घेणे शक्य नाही. याचे प्रमाण म्हणून मी तुला वैशालीची राजकन्या कुवलयेश्वरीची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला–

"वैशालीच्या राजाला फार उशिरा एक मुलगी झाली. मुलीलाच मुलगा मानून व तिलाच गादीला वारस करण्याचे ठरवून राजाने तिला त्या योग्य सर्व शिक्षण देण्याचे ठरविले. तिचे नाव कुवलयेश्वरी असे होते. राजकन्या घोडयावर बसणे, धनुर्विद्या,



तलवार, भाला इत्यादि शस्त्रे चालविण्यात पटाईत झाली. त्याच बरोबर तिने राजनीती, दंडनीती, राज्यकारभार वगैरे राजपुरुषाला साजतील अशा सर्व विद्यांचा सखोल अभ्यास केला.

कुवलयेश्वरी लग्नाला योग्य झाली तेव्हां राजाने तिच्या लग्नाची तयारी सुरू केली. राजकन्या आपल्या बाबांना म्हणाली– 'बाबा मी लग्नाला तयार आहे, परंतु युद्धविद्येत माझा पराभव करील त्याच्याशीच मी विवाह करायला तयार आहे." राजाने तिची ती अट मान्य केली आणि तिच्या स्वयंवराची तयारी सुरू केली.

स्वयंवरात भाग घेण्यासाठी अनेक राजकुमार आले. सर्वांसमक्ष राजकन्येने आपल्या शस्त्रविद्येचे व बल पराक्रमाचे प्रदर्शन केले. रानटी घोडयांना ताळ्यावर आणून त्यांच्यावर स्वारी करून दाखविली. राजकन्येप्रमाणे घोडेस्वारी व इतर शस्त्रविद्येत प्राविण्य दाखवून अगदी शेवटची परीक्षा म्हणजे खड्गयुद्धात जो राजकन्येचा पराभव करील त्याला राजकन्या स्वयंवराची माळ घालील असे जाहीर करण्यात आले.

काही राजकुमारांना रानटी घोडयांना ताळ्यावर आणता आले नाही. काही राजकुमार शब्दभेदी बाण मारू शकले नाहीत किंवा मत्स्यभेद करू शकले नाहीत. एक दोघे सर्व विद्येत प्राविण्य प्रदर्शित करून शेवटी कुवलयेश्वरीशी खड्गयुद्धात हारले. परंतु मंगलपुराच्या राजकुमाराने सर्वप्रकारच्या युद्धविद्येत प्राविण्य दाखवूनच नव्हे तर राजकन्येशी खड्गयुद्धात ही तिचा पराभव करून तिच्याशी स्वयंवरास तो योग्य असल्याचे साबित केले. त्याचा तलवारीचा वार सहन न होऊन राजकन्येची तलवार खाली जमिनीवर पडली.

कुवलयेश्वरी आपला पराभव स्वीकारून मान खाली करून एका बाजूला उभी राहिली. सर्वांनी टाळ्या वाजवून मंगलपूरच्या राजकुमाराचे अभिनंदन केले. विजयी राजकुमार जसा शस्त्रविद्येत प्रवीण होता तसाच तो रूपवान पण होता. म्हणून राजाला आनंद झाला व त्याने स्वयंवराची वरमाळा त्याच्या गळयात घालायला राजकन्येस सांगितले.

त्यावर मंगलपूरचा राजकुमार राजशेखर म्हणाला–"थांबा! या स्पर्धेत भाग न घेणारे कित्येक राजे किंवा राजकुमार आहेत त्यांपैकी कोणी मला खड्गयुद्धात हारविले तर माझा हा जय फुकट आहे. म्हणून ज्या कोणाला माझ्याशी द्वन्द्व करण्याची इच्छा असेल त्याने पुढे यावे." ते ऐकून दोघे तिघे तरुण पुढे आले व ते देखील राजशेखरशी खड्गयुद्धात हारले. हळू हळू काळोख पडू लागला. त्या दिवसाचा कार्यक्रम अर्धाच राहला व दुसऱ्या दिवशी पुढे चालू ठेवण्याचे ठरले. सर्व आपापल्या निवासस्थानी निघून गेले.

दुसऱ्या दिवशी राजशेखरने इतरास खड्गविद्येसाठी आव्हान केले. तेव्हां तेजवर्मा नावाचा एक तरुण पुढे आला.

दोघांचे खड्गयुद्ध झाले. थोडया वेळाने राजशेखर तेजवर्माच्या हाती हारला. प्रेक्षकांनी टाळ्या वाजवून त्याचे अभिनंदन



       



केले. राजशेखरने म्हटल्याप्रमाणे त्याचा पराभव करणाऱ्या राजकुमाराला कुवलयेश्वरीशी विवाह करता आला असता.

राजाने त्याप्रमाणे वरमाळा तेजवर्माच्या गळ्यात घालण्यास राजकन्येला सांगितले.

परंतु तेजवर्माने राजाला थांबायला सांगितले. म्हणाला—"नियमानुसार खड्ग-युद्धात जो राजकुमारीचा पराभव करील त्यालाच तिच्याशी विवाहाचा अधिकार आहे. मी राजकुमारीचा पराभव केलेला नाही. म्हणून मी तिच्याशी विवाह करणे अटीविरुद्ध ठरेल." तो आक्षेप ऐकून राजाला राग आला व म्हणाला—"तर मग, ये राजकन्येशी युद्धाला ये!"

तेजवर्मा व कुवलयेश्वरी यांचे खड्गयुद्ध झाले. त्यात तेजवर्मा हारला. राजाने राजशेखरला विजयी जाहीर करून त्याच्या गळ्यात वरमाळा घालण्यास राजकन्येला सांगितले. त्याप्रमाणे राजकन्येने वरमाळा घातल्यावर विवाह समारंभ संपला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! या गोष्टीतल्या एक दोन गोष्टी मला नाही कळल्या कुवलयेश्वरीचा पराभव करून राजशेखर तृप्त झाला नाही. त्याने इतर राजकुमारांना खड्गयुद्धासाठी आव्हान का केले आणि त्याचा पराभव करणाऱ्या तेजवर्माने स्वयंवराची माळ घालून घेण्यास कां नकार दिला? त्याने राजकन्येशी खड्ग-युद्ध कां केले? त्या युद्धात तो कसा काय हारला? राजशेखर, तेजवर्मा व राजकुमारीने परस्परांस खड्गयुद्धात जिंकले. मग त्यांच्यापैकी खरोखरी शूर व पराक्रमी कोण? या शंकांचे उत्तर माहीत असून समाधानकारक उत्तर तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला—"ही खड्गयुद्धे नकली वाटतात. राजशेखर सुंदर होता. म्हणून राजकुमारी त्याच्या हाती स्वच्छेने हारली: परंतु राजशेखर राजकन्येशी लग्नाला तयार नसावा. म्हणून दुसऱ्याच्या हाती आपण हारलो असे दाखवून आपली सुटका करून घेण्याच्या हेतूने त्याने इतरांना खड्ग युद्धास आव्हान केले असावे. एक दोघे पुढे आले. पण त्यांनी त्याला हारण्याची संधी दिली नाही. तेजवर्माने असावधपणे किंवा राजशेखरचा खरा हेतू न कळल्यामुळे राजशेखरचा पराभव केला. राजशेखर जाणूनबुजूनच त्याच्या हाती हारला. जिंकल्यानंतर तेजवर्माला कळले कीं आता राजकुमारी बरोबर त्याला विवाह करावा लागणार. त्याच्या मनात तिच्याशी विवाह करण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्याला राजकुमारीशी खड्ग युद्ध करावे लागणार हे कळताच त्याने मूळ अटीची आठवण करून देऊन आपली सुटका करून घेण्याचा यत्न करून पाहिला. पण त्याला युद्ध करावेच लागले., तेव्हां तो हारला या सर्व प्रकरणात राजकुमारीचा अदूरदर्शीपणाच प्रत्ययास आला."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# भिकाऱ्याचा खजिना

एकदा एक शेतकरी शेतात काम करीत असता दमून भागून घरी आला व देवाला नमस्कार करून त्याने देवाजवळ मागणे मागितले–"देवा ! मला एक लहानसा खजिना दे !"

लगेच त्याच्यासमोर एक थैली येऊन पडली आणि एक आवाज ऐकू आला–"या थैलीत तुला एक सोन्याचे नाणे मिळेल. ते काढून घेतलेस की त्याच्या जागी दुसरे एक नाणे तुला मिळेल. अशातऱ्हेने तू जितक्यावेळा एकेक नाणे काढीत जाशील तितक्या वेळा तुला एकेक नवे नाणे मिळत जाईल. तुला ज्या वेळी पैशाची गरज उरणार नाही, किंवा तुझे मन भरेल तेव्हां ही पिशवी नदीत टाकून दे. पण एक गोष्ट लक्षात ठेव, तू ही थैली जो पर्यंत नदीत फेकून देणार नाहीस तोपर्यंत या थैलीतून मिळालेले धन तू खर्च करता कामा नये. पण जर तू या पिशवीतून मिळालेले धन खर्च करू लागलास तर सर्व धन नाहीसे होईल."

शेतकरी खूष झाला. रात्रभर थैलीतून सोन्याची नाणी काढीत राहिला. दुसऱ्या दिवशी त्याला घरात काही खायला नव्हते. थैली नदीत फेकून देईपर्यंत जवळचे खर्चून काही विकत घेणे पण त्याला शक्य नव्हते. त्याने विचार केला, आणखी एक रात्रभर जागून आणखी एक पोते भरून सोने जमवावे व नंतर थैली नदीत फेकावी. अशा प्रकारे कित्येक दिवस लोटले. सोन्याने पोती भरत गेली. शेतकरी रोज भिक्षा मागून आपले पोट भरत राहिला. शेवटी एका दिवशी तो मेला. शेजार पाजारच्या लोकांनी घरात येऊन पाहिले, घरात कित्येक पोती सोन्याच्या नाण्यांनी भरलेली होती. भिकाऱ्याचा तो खजिना पाहून सर्व चकित झाले.





# खुळा ब्राह्मण

प्राचीन काळी काशी येथे एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याने चार पैसे जमा केले होते ते घेऊन परगावी जाऊन रहावे असे त्याने ठरविले. त्याने एक रेशमी कापडाचा तुकडा विकत घेतला व त्यात सर्व धन बांधून ठेवले. वाटखर्चासाठी आवश्यक तेवढेच पैसे कनवटीला ठेवले. वाटेत एक जंगल लागले. तो पैशाची पुरचुंडी या हातातून त्या हातात खेळवीत जाऊ लागला.

वाटेत त्याला काही प्रवासी यात्रेकरू भेटले. ते त्याला म्हणाले–"वेड्या ब्राह्मणा ! पैशाच्या गाठोड्यांशी असा खेळू नकोस. या वाटेवर चोर व लुटेरे आहेत.

त्याने मनांत विचार केला, "मी तरी खुळा आहे का? मी ते असे उंच धरून ठेवीन मग ते चोरांच्या हाती कसे बरे लागेल?" असा विचार करून त्या खुळ्या ब्राह्मणाने एका काठीच्या टोकाला गाठोडे बांधून उंच धरून निघाला.

थोडे अंतर चालून गेल्यावर त्या खुळ्या ब्राह्मणाला चार चोर भेटले. तो त्यांना म्हणाला–"काय हो! या रस्त्यावर चोर व भामटे आहेत म्हणे. सावध रहा, बरं का! मी पहा, चोरांच्या हाताला येणार नाही अशा तऱ्हेने पैशांचे गाठोडे काठीला बांधून ठेवले आहे."

खुळ्या ब्राह्मणाचे ते बोलणे ऐकून चोर खदखदां हसू लागले. एकाने ब्राह्मणाच्या मुस्कुटात मारली. "मेलो, मेलो!" म्हणून ब्राह्मण ओरडला. चोर ब्राह्मणाचे ते पैशाचे गाठोडे घेऊन पळून गेले.

"तरमग चोर हेच होते तर! हे खुळे माझा तो रेशमी कापडाचा तुकडा स्वस्तात कोठे तरी विकून टाकतील." असा विचार करून तो मोठ्याने ओरडून म्हणाला–"ए



चोरांनो तुम्ही पैसे चोरलेत ते चोरलत, पण तो रेशमी कापडाचा तुकडा मात्र मलाच विका बरं का? मी त्याची किंमत देईन."

चोरांना त्यावरून ब्राह्मणाकडे आणखी पैसे आहेत हे कळले. ते परतले व ब्राह्मणाने कोनवठीला खोचून ठेवलेले पैसे त्यांनी काढून घेतले.

ब्राह्मणाला वाईट वाटले. त्याने वर्षभरात जमा केलेली ठेव चोरांनी एका क्षणार्धात लुबाडून घेतली. त्याने विचार केला, पण तीच ठेव एका क्षणात चोरांनी मिळविली. तेव्हां चोरीचा धंदाच जास्त फायदेशीर आहे. असा विचार करून त्याने चोरांना पुन्हा बोलाविले व म्हणाला– "चोर मित्रहो! मला सुद्धा बरोबर घेऊन चला."

चोरांनी त्याला होकार दिला. सर्व मिळून एका गांवी गेले. चोरांनी मातीच्या भिंतीच्या एका घराला भोक पाडले आणि प्रथम ब्राह्मणाला आत पाठविले.

ते एका म्हाताऱ्या ब्राह्मण बाईचे घर होते. सरस्वती पूजनाचा तो दिवस होता. म्हातारी वडे तळायला बसली होती. तिच्या छातीत दुखू लागले म्हणून शेजारच्या खोलीत जाऊन जरा आडवी झाली व जागच्या जागी गार झाली.

ब्राह्मणाला वड्यांचा खमंग वास आला. त्याला भूक पण लागली होती. चोर बाहेर वाट पहात आहेत ही गोष्ट तो पार विसरून गेला. स्नान संध्यादी आटोपून म्हातारी मरून पडली होती तेथे गेला ती झोपत असावी असे समजून म्हणाला– "आजी! मला जेवायला वाढता का?"

म्हातारी हलली डुलली देखील नाही. म्हातारीच्या अंगाला हात लावून तिला जागे करणे अशिष्टपणा होईल असे समजून तो सैंपाकघरात गेला व कढईतले थोडे तेल पळीत घेऊन आला व म्हातारीच्या हातावर चार थेंब पाडले. तरी देखील म्हातारी हलली नाही. त्याने म्हातारीला हाताने हळूच जागे करण्याचा प्रयत्न केला. म्हातारीचे डोळे उघडे होते. पण ती मेलेली होती.

ब्राह्मणाच्या ते लक्षात आले. तो घाबरून मोठ्याने ओरडला. आणि खांबावर चढून खांब घट्ट धरून बसून राहला. चोरांनी ब्राह्मणाच्या ओरडण्याचा आवाज ऐकला व तो त्यांना बोलावण्यासाठी ओरडत असावा असे समजून ते घरात गेले. शेजारच्या लोकांनी पण त्याचा आवाज ऐकला व ते म्हातारीच्या घरात धावत आले. चोर खाटेखाली लपून बसले.

म्हातारी मेली असल्याचे शेजाऱ्यांनी ओळखले. एक जण म्हणाला–"म्हातारी एकाएकी मेली कशी?" दुसरा म्हणाला– "अहो आजारी पडली असती तर सरस्वतीच्या पुजेसाठी एवढे वडे कसे केले असते? कशी मेली हे त्यालाच माहीत!" असे म्हणून त्याने देवाकडे म्हणून वर हात केला.

"बरोबर आहे तुमचे म्हणणे ते सर्व त्यालाच माहीत!" सर्व होकार देत म्हणाले. ते ऐकून ब्राह्मण–"म्हणजे मी तिला ठार केले? मला काही एक माहीत नाही, मी खरे सांगतो. पाहिजे तर खाटेखाली चोर लपून बसले आहेत त्यांना विचारून पहा." स्वतःचे देहभान विसरून खांबाला धरून बसलेला ब्राह्मण म्हणाला.

चारही चोरांना शेजाऱ्यांनी पकडले. गावातल्या न्यायाधिशाने ब्राह्मणाची साक्ष ऐकून घेऊन चोरांजवळचे पैसे त्याला परत दिले. गावातल्या वैद्यांनी नाडी परीक्षा करून म्हातारी उतारवयामुळे हृदय विकाराने मरण पावल्याचे सांगितले. म्हणाला–"देवी होती, या शुभदिनी तिला मरण आले.



## ससाणा व गरुड

एका जमिनदाराच्या घरी खंड द्यायला एका खेडूत आला. त्या जमिनदाराने त्याला विचारले–"एक ससाण्याचे पिल्लू पाळावे, म्हणतो. तुझ्या गावात ससाणे आहेत का ?"

"कां नाही, आमच्या घराच्या मागे एका टेकडीवर ससाण्याचे घरटे आहे. त्यात पिल्ले पण आहेत." तो खेडवळ मनुष्य म्हणाला.

"बरे तर, मी येईन तेव्हां ससाण्याचे पिल्लू घेऊन येईन." जमिनदार म्हणाला.

त्या खेडवळ माणसाने आपल्या गावी जाऊन जमिनदाराशी त्याचे जे बोलणे झाले होते ते सांगितले. ते ऐकून सर्व चकित होऊन म्हणाले–"जमिनदार साहेब आले तर त्यांच्या उतरण्याची खाण्यापिण्याची व्यवस्था कशी काय करायची बुवा ? त्यांचा खर्च आपल्याला कसा काय झेपेल ? तू नसती ब्याद घेऊन आला आहेस."

बिचारा तो खेडवळ मनुष्य काळजीत पडला. काही तरी उपाय करून जमिनदार न येईल असा काही तरी उपाय योजला पाहिजे, असा त्याने विचार केला. म्हणून दोन तीन आठवड्यांनी तो पुन्हां जमिनदाराकडे गेला. पोचतांच जमिनदाराने विचारले–"कायरे ! ससाण्याची पिल्ले आता खूप मोठी झाली असतील नाही ?"

"मोठी होऊ लागली आहेत. आतांपासूनच ती "कुऽऽण्ण" "कुऽऽण्ण" अशी ओरडू पण लागली आहेत." तो खेडवळ मनुष्य म्हणाला.

"ती ससाण्याची पिल्ले नव्हेत. गरुड आहेत. मला नकोत ते." जमिनदार म्हणाला.





## काय शिक्षा?

आजोबांकडे फिर्याद गेली की छोटूने आईला डोक्यात काहीतरी मारले. आजोबांनी छोटूला विचारले–"होय का रे? तू आईला मारलेस? कां रे मारलेस?"

"मी आईला पेपरमिट विकत घ्यायला दहा पैसे दे म्हणालो, आईने दिले नाहीत आजोबा!" छोटूने ओकसा बोक्शी रडत उत्तर दिले.

"हात्तिच्या! एवढेच? हे घे दहा पैसे आणि वर पांच पैसे पण?" असे म्हणत आजोबांनी कनवटीला ठेवलेले पांचचे एक व दहा पैशाचे एक नाणे काढून छोटूला दिले.

बाकी मुलांना आश्चर्य वाटले. त्यांनी आजोबांना विचारले–"काय हो आजोबा! त्याने आईला मारले, त्याला शिक्षा झाली पाहिजे, उलट त्याला पैसे कां दिलेत?"

"अरे तुम्ही एका सुलतानाची गोष्ट नाही का ऐकलीत?" आजोबांनी तपकिरीची डबी काढीत विचारले.

"नाही ऐकली ती गोष्ट! सांगा ती गोष्ट, सांगा ती गोष्ट!" मुले छोटूला शिक्षा देण्याची गोष्ट विसरले आणि गोष्ट सांगायला आग्रह करू लागले. आजोबांनी तपकीर दोन्ही नाकपुड्यात कोंबून झाल्यावर गोष्ट सांगायला सुरवात केली–

एका गावी एका सुलतानाचे राज्य होते. त्या सुलतानाच्या वाड्याभोवती एक मोठे उद्यान होते. त्यात निरनिराळ्या प्रकारची आंब्याची कलमें होती. एक जहांगीर नावाच्या जातीचा आंबा होता. सुलतान आपल्या वजिरांबरोबर रोज सायंकाळी त्या उद्यानात फिरायला जात असे व राज्य-कारभाराच्या किंवा इतर गोष्टी बोलत असे. हा त्याचा नित्य कार्यक्रम असे.

श्री. का. रा. देसाई




त्या गावात एक भिकारी रहात असे. तो साऱ्या शहरात हिंडून फिरून भीक मागत असे. त्यावरच त्याचा उदरनिर्वाह पण चाले. उन्हाळ्याचे दिवस होते. एकदा दिवसभर हिंडून आला तरी त्या भिकाऱ्याला काही भीक मिळाली नाहीं. भुकेने जीव कासावीस होऊ लागला. म्हणून संध्याकाळी तो त्या सुलतानाच्या बगिच्यात शिरला. बागेत पुष्कळ आंबे लागले होते. उन्हाळ्यातच आंबे खायला मिळतात. आंबे पाहून भिकाऱ्याची भूक जास्तच वाढली. एक आंब्यांचा घोस एका जागी त्याला दिसला. त्याने एक दगड उचलून त्याला मारला. दोन आंबे खाली पडले. सुदैवाने दोन्ही पिकलेले होते. तो घाई घाईने आंबे खाऊ लागला.

परंतु गोष्ट येथवरच राहली नाही. त्याने जो दगड आंब्याला मारला होता तो दगड सुलतान जेथे बसला होता तर्थे पडला आणि सुलतानाच्या डोक्याला लागला. भली मोठी जखम पडली.

सुलतान रागाने ओरडला–"कोण आहे तो चोर! पकडा त्याला आणि ओढून आणा माझ्या समोर!" सुलतानाचे शिपाई चोराला धरून आणायला धावले.

शिपायांना एक भिकारी आंबा खात असलेला दिसला. त्याने दगड मारला असावा असे त्यांना वाटले. त्यांनी त्याला धरून आणले आणि सुलतानासमोर हजर केले.



"काय रे दुष्टा! तूच मारलास नाही का दगड मला?" असे म्हणत सुलतानाने भिकाऱ्याला दगड दाखविला.

"होय मालक! मीच तो दगड मारला." थरथर कापत भिकारी म्हणाला.

"कां मारलास?" सुलतानाने भिकाऱ्याला विचारले.

"मालक! मला भूक लागली होती. दिवसभर काही खायला मिळाले नव्हते. मी बागेत शिरलो. समोर आंबे दिसले. म्हणून दगड उचलून मारला. दोन आंबे खाली पडले. मी आंबे खाऊन आपली भूक भागविली." भिकारी खरे बोलला.

सुलतान काही वेळ विचार करीत राहला. नंतर आपल्या खजिनदाराकडे वळून म्हणाला–"या भिकाऱ्याला दर महिन्याच्या पहिल्या तारखेला दहा दिनार देत जा, हा जिवंत असे पर्यंत."

सर्व वजीर चकित होऊन सुलतानाकडे पाहू लागले. सर्व एकदम म्हणाले–"जहांपनाह! या दुष्टाने आपल्याला दगड मारला. याला शिक्षा देण्याऐवजी इनाम?"

"तुमच्या डोक्यात नुसते बटाटे भरले आहेत, बटाटे! आंब्याचे झाड मोठे की मी मोठा?" सुलतानाने विचारले.

"हा काय प्रश्न झाला बादशाह? आपण कोठे आणि हे आंब्याचे झाड कोठे? दोन्हींची बरोबरी कशी?" वजीर म्हणाले.

"दगड फेकल्यावर या झाडाने त्याची भूक मिटविली. त्याची भूक कायमची मिटविण्याची जबाबदारी व अक्कल मला हवी की नको? हाच दगड मला सुद्धा लागला नाही का?" सुलतान म्हणाला.

सुलतानाच्या त्या विवेकबुद्धीबद्दल वजीर चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले.





# राजासमोर प्रश्न

एका गावी एक राजा राज्य करीत असे. त्याला समजूत किंवा अक्कल थोडी देखील नव्हती. एके दिवशी एक ब्राह्मण राजवाड्यात पुराण वाचीत होता. ब्राह्मणाने यमलोकाचे वर्णन सांगताना केलेल्या पापकर्माची शिक्षा कशी भोगावी लागते याचे वर्णन केले. जो पाप करतो त्याला कर्माचे फळ भोगावे लागते, असे पुराणिकाने सांगितले.

पुराण वाचन संपल्यावर राजाने पुराणिक बुवांना विचारले—"काय हो पुराणिक बुवा, तुम्हांला स्वर्गाची व नरकाची चांगली माहिती आहे, असे दिसते. पण मला एक शंका आहे. त्या शंकेचे समाधान करावे. आपल्या डोक्यावर आकाश आहे व खाली जमीन आहे. या भूलोकात निरनिराळ्या जातीचे प्राणी आहेत. त्यांच्या पैकी काही स्वर्गात जातात तर काही नरकात, तर ते कां? असे कां होते हे नीट समजावून सांगावे."

तो प्रश्न ऐकून पुराणिकबुवा चकित झाले. उत्तर न दिले तर राजा रागवेल व काय वाटेल ते करील अशी भीती पण त्यांना वाटली. म्हणून पुराणिक बुवा म्हणाले—"महाराज! आपण विचारलेला प्रश्न सामान्य नाही. शास्त्रग्रन्थ चाळून पहावे लागतील. म्हणून मला थोडा अवधी द्यावा." असे सांगून पुराणिक बुवा निघून गेले.

दुसऱ्या दिवशी राजाला पुराणिक बुवा पळून गेल्याचे कळले. आपल्या प्रश्नाचे उत्तर देता आले नाही म्हणूनच स्वारी पळून गेली आहे. तेव्हां राजाला वाटू लागले की आपण विचारलेला प्रश्न महत्वाचा आहे. नाहीतर इतका मोठा विद्वान पंडित त्याचे उत्तर कां देऊ शकला नाही? तो विचार मनात आल्यावर राजा जो भेटेल त्याला तोच प्रश्न विचारू लागला.

राज्यात चहूकडे राजाच्या त्या प्रश्नाची चर्चा सुरू झाली. पुराणिक बुवाना एक मुलगा होता. उनाड आणि उडाणटप्पू होता. तो नेहमी आईला येऊन त्रास देई. एकदा त्याची आई गहू दळायला बसली असता तो आईला त्रास देऊ लागला.

आई त्याला रागाने म्हणाली—"राजासमोरचा प्रश्न तू सोडवू शकला असतास तर किती बरे झाले असते?"

"राजाच्या समोर कसला आला आहे प्रश्न! कोणता प्रश्न आहे तो!" मुलाने आईला विचारले आणि तो सुद्धा आई बरोबर दळायला बसला.

"आपल्याला वर आकाश दिसते आहे व या पृथ्वीवर कोट्यावधी प्राणी आहेत. यांच्या पैकी काही स्वर्गात जातात व बाकी नरकात जातात. तर ते कां व कसे? हाच प्रश्न राजासमोर आहे." असे सांगत असता त्या मुलाच्या आईने खुंटासकट जात्याची तळी उचलून एकदां पाहिली. ते मुलाने पाहिले. त्याला जात्याच्या आत पिठाबरोबर काही दाणे जसेच्या तसे व काही फुटलेले दिसले. ते पाहून त्याला काही तरी सुचल्यासारखे झाले. तो सरळ राजवाड्यात गेला आणि द्वारपालकाला म्हणाला—"राजाचे दर्शन आतांच्या आतांच करावयाचे आहे."



त्या मुलाचा वेष पाहून द्वारपालक म्हणाले—"महाराज तुझ्यासारख्यांना भेटतील असे वाटते होय तुला? जा जा!"

"मी राजाचा प्रश्न सोडविण्यासाठी आलो आहे. ही गोष्ट राजाला जाऊन सांग" ब्राह्मणाच्या मुलाने सांगितले.

राजाला जेव्हां तो निरोप कळला तेव्हां मुलाला राजवाड्यात जाण्याची परवानगी मिळाली. परंतु त्या मुलाकडे पाहून तो

सौ. सरलाबाई तांबे

     

मुलगा आपल्या प्रश्नाचे उत्तर कसे काय देणार याविषयीं राजाला शंका वाटली.

"माझ्या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी हे सांग, तुला माझ्या प्रश्न कळला का?" राजाने त्या मुलाला विचारले.

"मी तोंडी उत्तर देणार नाही. प्रत्यक्ष कृतीने उत्तर देईन." ब्राह्मणाचा मुलगा म्हणाला.

राजाने लगेच दरबार बोलाविला. दरबारात मुलाला बोलावण्यात आले व त्याला प्रश्नाचे उत्तर दे म्हणून सांगण्यात आले.

मुलाने सांगतल्यावरून जाते व गहू मागविण्यात आले. ब्राह्मणाच्या मुलाने मूठभर गहू जात्यात घातले व दळू लागला. म्हणाला–"महाराज! हे पहा, जात्याची फिरणारी तळी हे आकाश आहे. खालची न फिरणारी तळी जमीन म्हणजे पृथ्वी आहे. यात घातलेले गहू, म्हणजे पृथ्वीवरचे प्राणी. जात्यात गहू ओतणारा तो देव, हाताची पाच बोटे म्हणजे यमदूत. जात्याचा खुंटा म्हणजे यम. ते पापी माणसाला अशा तऱ्हेने कष्ट देतात. म्हणजे नरकवास हा असा असतो. पण काही दाणे जसेच्या तसे आहेत. हे यमाच्या कचाट्यांतून वांचलेले प्राणी आहेत. ते स्वर्गसुख भोगत आहेत."

राजाला फार आनंद झाला. त्याने विचारले–"तू मोठा ज्ञानी दिसतोस की रे! बोल, कोणाचा मुलगा आहेस तू?"

"महाराज, आपल्या वाड्यात पुराण प्रवचनाला पुराणिक बुवा येतात ना? त्यांचा मुलगा मी." ब्राह्मणाचा मुलगा म्हणाला.

"तू तर आपल्या बापापेक्षां मोठा विद्वान व ज्ञानी दिसतोस की रे!" असे म्हणत राजाने त्याला एक काश्मीरी शाल बक्षिस देऊन त्याचा सत्कार केला. त्या दिवसापासून तो मुलगा एक हुशार नागरिक म्हणून गणला जाऊ लागला.





# दोघे मित्र

रंगपूर संस्थानात रामू व सोमू नावाचे दोन शेतकरी रहात असत. दोघांची घरे शेजारी शेजारीच होती. दोघांची परस्परांशी फार मैत्री पण होती, जणुकाही सख्खे भाऊच.

रामूने आपल्या घराच्या परसात एक बाग केली. सोमूने भाजीपाला लावला. दोघे शेतकीच्या कामांत हुशार होते. दोघांनी पुष्कळ पैसे व नावलौकिक मिळविला.

एकदां सोमू आपल्या मुलीला भेटण्यासाठी तिच्या सासरी निघाला तेव्हां रामूला पण बरोबर बोलावून घेऊन गेला. दोघे तेथे दोन दिवस राहाले. वाटेत एका गावी आठवड्याचा बाजार लागला होता. दोघांनी थोडे फार सामान विकत घेतले. एका जागी फळझाडे विकायला ठेवली होती. त्यांत लिंबाची दोन झाडे होती. रामूने एक झाड विकत घेतले. दुसरे झाड सोमूने विकत घेतले. सोमूने दुसरे झाड विकत घेतले ती गोष्ट रामूला आवडली नाही. कारण दोघांचे असे ठरले होते की रामूने फळझाडे लावायची व सोमूने भाजीपाला. दोघांची परस्परांशी स्पर्धा वाढायला कारण उरणार नाही, हा हेतु होता. परंतु सोमूने रामूसारखेच लिंबाचे झाड विकत घेतले. रामूला ती गोष्ट आवडली नव्हती तरी उघड तो काहींच बोलला नाही. दोघे परस्परांशी जणुंकाही विशेष काही घडले नाही अशातऱ्हेने परस्परांशी गप्पा मारीत आपल्या गावी परतले.

काही वर्षें लोटली. रामू लिंबाच्या झाडाची गोष्ट पार विसरून गेला. रामूने जे झाड लावले होते त्याला फुले पुष्कळ येत, फळे मुळीच येत नसत. म्हणून त्याला वाटले आपल्या झाडाला फळे लागत नाहीत तर सोमूच्या झाडाला तरी काय लागणार?

श्री. ए. सी. सरकार, मॅजिशियन



पण एकदा सोमूच्या मुलाने टोपलीभर लिंबे आणून रामूच्या घरी दिली आणि म्हणाला– "बाबांनी ही देऊन यायला सांगितले."

"अरे कुठली रे ही लिंबं एवढी?" रामूने त्याला विचारले.

"कां, आमच्या झाडाची!" सोमूचा मुलगा म्हणाला.

रामूला ते ऐकून सोमूचा हेवा वाटू लागला. त्याने आपल्या झाडाच्या चारी बाजूला खोल खणून खत घातले. दोन दिवसांनी झाड पार वाळून गेले.

रामूच्या मनात डोंब उभा राहिला. सोमूचे सर्वस्व नष्ट करण्याचे त्याने मनाशी ठरविले. परंतु ते कसे करायचे हे त्याला कळेना. कारण त्याला कारण आपण आहो हे कोणाला कळता कामा नये.

लवकरच रामूला तशी संधी मिळाली. एकदा राजकन्या आजारी पडली. तिच्या आजाराचे निदान होऊ शकले नाही. वैद्यांनी पुष्कळ औषध पाणी केले. रामूचा मामा राजाच्या पदरी नोकरीला होता. म्हणून तो एकदा आपल्या मामाच्या बरोबर दरबारात गेला. राजाला अभिवादन करून म्हणाला– "महाराज, राजकन्येचा आजार बरा व्हायला मी एक औषध सांगतो. आपल्याला हरकत नसेल तर प्रयोग करून पहावा."

राजाने होकार दिला.

"माझ्या शेजारी सोमू नावाचा एक शेतकरी राहतो. त्याच्या बागेत लिंबाचे एक विचित्र झाड आहे. त्या झाडाची फळे मोठी आहेत. त्यात रक्तवर्धक धातूदेखील आहे. त्या झाडाच्या मुळांचा रस काढून तो राजकन्येला पाजल्यास नक्कीच आजार बरा होईल." रामू म्हणाला.

"अरे लिंबाच्या रसात रक्तवर्धक धातू कोठून असणार? मी स्वत: त्याची परीक्षा करून पाहिल्याशिवाय ते मला पटणार नाही राजा म्हणाला."

रामू लगेच सोमूच्या घरी गेला. त्याच्याकडून एक लिंब मागून घेऊन आला आणि एक चाकू घेऊन राजाच्या दरबारात आला. ते फळ पाहून चकित होऊन राजा म्हणाला–"हे फळ विचित्र दिसते बुवा!"

"याचा रस तर पहा." असे म्हणत रामूने चाकू घेऊन ते लिंब कापले. त्या लिंबातून रक्तासारखा तांबडा रस बाहेर आला. रामू म्हणाला ते राजाला खरे वाटले. त्याने आपल्या शिपायांना सोमूच्या घरी जाऊन त्याच्या परसातले लिंबाचे झाड उपटून आणायला सांगितले. सोमूने अनेक प्रकारे विनवण्या केल्या तरी त्याची पर्वा न करता राजाचे शिपाई ते झाड उपटून घेऊन गेले. लिंबाच्या झाडाची मुळे काढून राजाने त्याचा रस काढविला व तो राजकन्येला प्यायला दिला. परंतु तिचा आजार कमी झाला नाही.

रामूला तरी ती चांगली बरी होईल असे कोठे वाटले होते. त्यांचा हेतु दुसराच होता. तो साध्य झाला, सोमूचे लिंबाचे झाड समूळ नष्ट झाले. त्याच्या मनाचे समाधान व्हायला तेवढे पुरे होते. राजाने त्याला विचारले–"काय रे तुझे हे औषध पण निरुपयोगी झाले." तेव्हां तो उडवा-उडवीचे उत्तर देत म्हणाला–"महाराज!



औषधाला एका आठवड्याने नक्कीच गुण पडेल." पण एक आठवडा होऊन गेला तरी गुण पडला नाही, उलट आजार वाढला.

राजाने रागाने रामूला कैद करवून तुरुंगात टाकले.

सोमूला, रामूने हे सर्व कां केले असावे, हे कळायला वेळ लागला नाही. रामूने अविचाराने जी गोष्ट केली होती त्याचा परिणाम काय होईल ह्याची त्याला कल्पना नव्हती. असा विचार केल्यावर सोमूला रामूची कीव आली. सोमूच्या बापाला औषधी वनस्पतींची चांगली माहिती होती. त्याने एका साधूकडून वैद्यकशास्त्राचा अभ्यास केला होता. त्या साधूकडून राजकन्येचा इलाज करवून तिला वांचविता आले तर रामूवरचा राजाचा कोप दूर करून त्याला सोडविता येणे शक्य आहे. असा विचार करून सोमू त्या साधूच्या शोधार्थ निघाला. त्याला भेटून, राजकुमारीच्या आजाराची सर्व लक्षणे सांगून व त्याची कृपा संपादन करून घेऊन सोमू, त्या साधूने दिलेले औषध घेऊन आला आणि ते औषध राजकन्येला दिले. ते औषध घेतल्यावर राजकन्या चांगली बरी झाली.

राजाला परमानंद झाला. तो सोमूला म्हणाला—"तू माझ्या मुलीला वांचविले



आहेस. या ऋणातून उतराई होणे कठीण. तरी तुला काय हवे ते मागून घे!"

"महाराज! राजकन्या आजारातून बऱ्या झाल्या, त्याला मी कारण मात्र झालो. ही सर्व त्या साधूची कृपा आहे. आतां आपण मागायलाच आज्ञा केलीत म्हणून मागतो. रामूला तुरुंगातून सोडून द्यावे. त्याने द्रोहबुद्धीने राजकुमारीच्या विरुद्ध काही केले नाही. मी शपथ घेऊन ही गोष्ट सांगत आहे." सोमू म्हणाला.

राजाने रामूला तुरुंगातून मुक्त केले. सोमूने राजाजवळ त्याला तुरुंगातून सोडण्यासाठी विनंती केली होती व म्हणून आपल्याला सुटका मिळाली. हे जेव्हां रामूला कळले तेव्हां त्याला आपल्या चूकीबद्दल फार पश्चात्ताप वाटला. तो सोमूला भेटला आणि ओक्साबोक्शी रडू लागला. तेव्हां सोमू त्याला म्हणाला—"झाले गेले होऊन गेले. ते सर्व आठवून मनाला दु:खी करून घेऊ नकोस. काय वाटेल ते झाले तरी आपण दोघे मित्रच आहो. आपण परस्परांना मदत केली पाहिजे. पण मला हे सांग लिंबाचा रस रक्तासारखा लालभडक कसा काय झाला. त्याचे गुपित मला सांग."

"चाकूला मी तांबड्या जवाकुसुमाच्या पाकळ्या प्रत्येकी दहा दहा वेळा घासल्या. जवा पुष्पाच्या रसाने भिजलेल्या चाकूचे पाते लागताच लिंबाचा रस लाल भडक झाला. मी ही गोष्ट एका जादुगाराकडून फार पूर्वी शिकून घेतली होती. आता मला कळले की अशी विद्या शिकून घेतल्याने कधी कधी तिचा उपयोग होतो. परंतु मी उपयोग केला तो मात्र स्वत:च्या दुष्टपणाने दुसऱ्याचे नुकसान करण्यासाठी. त्याची फळे पण मला भोगावी लागली.

त्यानंतर रामू व सोमूची मैत्री पहिल्यासारखीच दाट झाली व ते परस्परांना मदत करू लागले.



# आणखी एक जाड पाय

एका गावी एक जमिनदार रहात असे. त्याच्या घरी लग्न होते. त्याने शिंप्याला बोलावून लग्नासाठी जरूर असलेले कपडे शिवायला टाकले. शिंप्याने कपडे शिवून आणले व सर्व लोक कपडे अंगात घालून पाहू लागले. तो शिंपी खाली बसला. तो एक पाय मोडून खाली बसला व दुसरा पाय सरळ पुढे पसरून ठेवला. त्याला हत्तीरोग होता.

जमिनदाराने चकित होऊन त्याचा विचारले–"काय रे, तुझा हा पाय इतका जाड कसा काय ?" शिंपी म्हणाला–"जमिनदार साहेब ! याच्याहून मोठा पाय आत आहे."

जमिनदाराला पण हत्तीरोग होता. त्याला वाटले की शिंप्याने कदाचित आपलाच पाय पाहून तसे म्हटले असेल. म्हणून रागाने तो म्हणाला–"याच्याहून जाड पाय शक्यच नाही. शंभर रुपयांची पैज. दाखव."

शिंपी म्हणाला–"कबूल आहे मी पैजेला. माझा दुसरा पाय पहा." असे सांगून त्याने अंगाखाली मोडून ठेवलेला पाय दाखविला. तो पाय खूपच जाड होता.

जमिनदाराने मुकाट्याने शंभर रुपये काढून दिले.





# मासळी चोर

कोळ्यांच्या एका वस्तीत शिवू व पारू नावाचे नवराबायको रहात असत. शिवू शंकरासारखा भोळा सांब होता. आणि पारू पार्वतीसारखी सुगृहिणी होती. संसाराचे गाडे आपल्या हुशारीने ती पुढे ढकलून नेत होती. शिवू मासे धरायला समुद्रात दूर जात असे. शिवू जे मासे धरून आणी ते विकून पारू घरातला सर्व खर्च भागवून घेई.

एकदा शिवूला मासळीची रसदार भाजी करून खावीसे वाटले. त्याने जेवढे मासे आणले होते तेवढे त्याने बायकोला नेऊन दिले आणि म्हणाला–"आज मासे विकायला बाजारात नेऊ नकोस. आज माशाची मसाले घालून छान भाजी कर."

"बरें तर, जाऊन हे मासे छान धूऊन आणा, वास जाईपर्यंत." पारू नवऱ्याला म्हणाली.

शिवूला आनंद वाटला, तो सर्व मासे तलावावर धुण्यासाठी घेऊन गेला. तेथे त्याला रघू भेटला. त्याने विचारले–"अरे, शिवू दादा ! हे काय करता ?"

"कारभारणीने हे मासे धुऊन आणायला पाठवले आहे मला. वास येतो आहे ना. आज माशांची मसालेदार भाजी होणार आहे." शिवू म्हणाला.

"अरे खुळ्या ! धुतल्याने का मासळीचा वास जातो ? पहा हे, माझ्याकडे सुके चार मासे आहेत. तू आपल्याजवळची मासळी देऊन पाहिजे तर हे घेऊन जा आणि छान भाजी करून खा." रघू म्हणाला.

रघूने आपल्याजवळचे सुके मासे देऊन शिवूजवळची मासळी घेतली आणि तेथून पाय काढला. खरी गोष्ट अशी होती की त्याच दिवशी एक मचवा त्या गावी व्यापारासाठी आला होता. त्यातले सुके

श्री. मा. मो. सोनार



मासे रघूने चोरून आणले होते. चोरीचा माल पकडला गेला तर आपण पकडले जाऊ, म्हणून त्याने भोळ्या भावड्या शिवूच्या गळ्यात सुके मासे बांधले व त्याच्याजवळची ताजी मासळी घेऊन पळून गेला होता. रघू ती सुकी मासळी घेऊन जाऊन बायकोला देत म्हणाला–"आता लवकर भाजी होऊ दे. भूक लागली आहे."

"अरे, ही तर सुकी मासळी आहे. आपली ताजी मासळी कोठे गेली?" पारूने विचारले. शिवूने घडलेली गोष्ट जशीच्या तशी सांगितली.

आपल्या नवऱ्याच्या भोळ्या स्वभावाची पारूला माहिती होतीच. तिला वाईट वाटले. ती म्हणाली–"हा, एक मासा भाजीसाठी घरात ठेवते बाकी विकून या बाजारात."

शिवूला बाजारात पाठवून पारूने तो सुका मासा चिरून पाहिला तर त्याच्या पोटातून एक हिरा निघाला.

मासळी घेऊन येणारे व्यापारी हिऱ्याचा व्यापार करीत. चोरांना कळू नये म्हणून त्यांनी माशांच्या पोटांत हिरे ठेवले होते. त्यांनी मासे मोजून पाहिले तेव्हां त्यांत चार मासे कमी निघाले. त्यांनी राजाकडे फिर्याद केली की चार मासे चोरीला गेले आहेत व प्रत्येकात एकेक हिरा होता.

राजाने शिपायांना पाठवून ज्यांच्याकडे सुकी मासळी सापडेल त्यांना धरून आणायला सांगितले. शिपायांनी शिवूला मासळी बाजारात पकडले व राजासमोर हजर केले. व्यापाऱ्याने आपली सुकी मासळी ओळखली व म्हणाला–"हीच ती मासळी. पहा, त्यांचे पोट चिरून, आत हिरे सापडतील!"

तिन्ही माशांच्या पोटातून खरोखरच एकेक हिरा निघाला.



"एक मासा आणखी चोरीला गेला आहे." व्यापारी म्हणाला.

"हे मासे तूच चोरलेस ना मचव्यातून?" राजाने शिवूला विचारले.

"मला नाही माहीत कोणाचा मचवा. रघूने माझ्याजवळून ताजी मासळी घेऊन ही सुकी मासळी मला दिली. मी एक मासा बायकोजवळ भाजी करायला सांगून घरात ठेवला व हे तीन मासे विकायला बाजारात घेऊन आलो. मला तेथे शिपायांनी धरले." शिवू म्हणाला. राजाच्या शिपायांनी शिवूच्या घरी जाऊन माशाच्या पोटातून निघालेला हिरा मागून आणला. तेव्हां मासा शिजत असलेला त्यांनी पाहिला.

राजाने रघूला धरून घेऊन यायला शिपायांना पाठविले. शिपायांनी त्याला धरून आणल्यावर राजाने रघूला विचारले–"काय रे तूच ही सुकी मासळी शिवूला दिलीस ना?"

रघू घाबऱ्या घाबऱ्या उत्तरला–"नाही सरकार! मला काही नाही माहीत या सुक्या मासळीविषयी!"

"या मासळीच्या पोटातून हिरे निघाले. शिवूने सांगितले की तुझ्याकडून त्याने हे मासे घेतले होते. मग हे हिरे पण तुझे नाहीत म्हणतोस. तर मग शिवूला देऊन टाकतो." राजा म्हणाला.

लगेच लोभाला बळी जाऊन रघू म्हणाला–"होय महाराज! मीच ही सुकी मासळी शिवूला दिली होती. त्यातले हिरे मलाच मिळाले पाहिजेत."

रघूच चोर असल्याचे सिद्ध झाले. त्याला योग्य शिक्षा देऊन राजाने हिरे व्यापाऱ्याला दिले. व्यापाऱ्याने रघूला बक्षिस म्हणून एका हिऱ्याची किंमत दिली. पैसे घेऊन शिवू घरी आला व आनंदाने नवरा बायको त्या दिवशी जेवली.












# शेरास सव्वा शेर

एका गांवी एक श्रीमंत पहेलवान रहात असे. त्या गावी त्याच्याहून बलवान कोणी दुसरा नव्हता. तो एकदां शंभर रुपये घेऊन घोड्यावर बसुन गाव गाव आपल्याहून बलवान कोणी आहे का याचा शोध काढीत हिंडु लागला. प्रत्येक गावी जाऊन कोणी पहेलवान आहे का त्यांच्या गावात असे तो विचारी.

शेवटी एका गावचे लोक म्हणाले–"होय, आमच्या गावी हनुमान नावाचा एक महाबली लोहार आहे."

तो श्रीमंत घोड्यावर बसून सरळ त्या लोहाराच्या दुकानाकडे गेला. लोहाराला पाहून तो श्रीमंत मनुष्य त्याला म्हणाला–"चिरूट सुलगवायला एक निखारा दे रे इकडे!"

लोहाराने बसल्याबसल्याच चिमट्याने एक निखारा उचलून श्रीमंताकडे तो केला. श्रीमंत पहेलवानाने निखाऱ्याने चिरूट सुलगावून चिमटा परत देत विचारले–"काय रे माझ्या घोड्याला नाल करून देतोस का?"

"करून तयार ठेवले आहेत. घ्या ना!" असे म्हणत लोहाराने एक नाल काढून श्रीमंत माणसाला दाखविला. त्या श्रीमंत माणसाने तो लगेच तोडून दाखविला व म्हणाला– "हा तुटला, दुसरा दे." त्याने दुसरा नाल पण तोडला व तिसरा हातात घेऊन हनुमान लोहाराच्या हातावर एक रुपया ठेवला. हनुमानने तो लगेच तोडून दाखविला व म्हणाला– "अरे, हा तुटला की. दुसरा द्या." त्या श्रीमंताने दुसरा रुपया दिला. हनुमानने तो देखील तोडला.

"तू आहेस खरा पहेलवान. ही घे थैली." असे सांगून त्या श्रीमंताने रुपयाची थैली हनुमानाला दिली आणि तेथून निघून गेला.





# खोड मोडली

अरबस्तानातील एका लहानग्या गावी गुलबीबी नावाची एक गरीब बाई रहात असे. तिचा नवरा उंटाची राखण करीत असे. गुलबीबी एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरी काम करीत असे. नवराबायको एका झोपडीत रहात असत. झोपडीला मातीच्या भिंती होत्या.

गुलबीबी ज्या व्यापाऱ्याच्या घरी काम करीत असे त्या व्यापाऱ्याची बायको नवऱ्याची नजर चुकवून घरातल्या वस्तु एकेक करून विकून पैसे जमा करून ठेवीत असे. महिन्याच्या शेवटी गुलबीबीला पगार द्यायच्या वेळी ती घरातली अमकी अमकी वस्तु हरवली म्हणून तक्रार करून गुलबीबीच्या पगारातून त्या वस्तूची किंमत कापून घेई. गुलबीबी नाइलाजाने पदरात जितका पगार मिळे तेवढा घेऊन घरी येई.

एकदा रात्री मुसळधार पाऊस पडला. पावसामुळे मातीची भिंत एका बाजूला पडली म्हणून उजाडल्यावर दोघे भिंत बांधायला म्हणून तेथे आली. तेव्हां त्यांना भिंतीत एक चांदीचा तांब्या सांपडला. तांब्याचे तोंड डाग लावून बंद केलेले होते. झांकण काढून पाहिले तर तांब्यात सुवर्णमुद्रा होत्या. आता पुढील आयुष्य सुखाने जाईल या आनंदात दोघं होती. गुलबीबीचा नवरा दोन सोन्याची नाणी घेऊन जरूरी सामान विकत घ्यायला बाजारात गेला. तो सराफाकडे सोन्याची नाणी मोडायला गेला.

त्या गरिबाकडे सोन्याची नाणी पाहून सराफाला त्याचा संशय आला. त्याला वाटले की चोरीचा माल असावा. म्हणून त्याने गुलबीबीच्या नवऱ्याला दुकानावरच बसायला सांगून गावच्या अधिकाऱ्याकडे जाऊन ती बातमी दिली.

सौ. यशोदाबाई कासार




तिकडे ही गोष्ट गुलबीबीच्या मालकिणीलापण कळली. ती नवऱ्याला बरोबर घेऊन अधिकाऱ्याकडे आली व म्हणाली– "या माणसाची बायको आमच्या घरी काम करते. ही सोन्याची नाणी माझी आहेत. तिने चोरून नेली होती."

गुलबीबीचा नवरा काही एक बोलला नाही. गप्प बसून राहला. त्याला भीती वाटली की खरी गोष्ट सांगितली तर ही गावातली मोठमोठी मंडळी सर्व सोन्याची नाणी आपसात वाटून घेतील. तेव्हां पाटलाला वाटले की व्यापाऱ्याची बायको म्हणाली ते खरे आसावे. त्याने ती नाणी व्यापाऱ्याच्या बायकोला दिली व गुलबीबीच्या नवऱ्याला तंबी देऊन घरी पाठवून दिले.

ही गोष्ट व्यापाऱ्याला विचित्र वाटली. त्याला हे कळेना की त्याच्या बायकोकडे सोन्याची नाणी कोठून आली? त्याने खरी गोष्ट काय आहे त्याची माहिती गुप्तपणे काढून घ्यायचे ठरविले.

गुलबीबीला जेव्हां हे सर्व कळले तेव्हां तिला व्यापाऱ्याच्या बायकोचा राग आला. रात्रभर तिला झोप आली नाहीं. शेवटी तिने व्यापाऱ्याच्या बायकोची खोड मोडायचे मनाशी ठरविले.

दुसऱ्यादिवशी गुलबीबी व्यापाऱ्याच्या घरी कामाला गेली तेव्हां व्यापाऱ्याच्या बायकोने तिला ढीगभर कपडे धुवायला म्हणून दिले. त्यातले चांगले चांगले कपडे निवडून ती आपल्या घरी घेऊन आली. ते घालून बुरखा घालून तिला चांदीच्या ज्या तांब्यात ती सोन्याची नाणी मिळाली होती तो तांब्या व नाणी घेऊन ती, ज्या सराफाने तिच्या नवऱ्याला पाटलाकडे नेले होते त्याच्याकडे गेली. काळोख पडू लागला होता. गुलबीबी व्यापाऱ्याच्या बायको इतकीच उंच व अंगाने जाड होती व तिचेच कपडे घालून गेली होती, म्हणून तो सराफ फसला. त्याला सोन्याची नाणी आणणारी बाई, गुलबीबीची मालकीणच असेल असे वाटले.

गुलबीबी, बरोबर आणलली सोन्याची नाणी त्या सराफाला देत म्हणाली– "माझ्या नवऱ्याने ही सोन्याची नाणी देऊन. चांदीची नाणी, म्हणजे मोड आणायला तुमच्याकडे मला पाठविले आहे."

त्या सराफाने सोन्याची नाणी मोजून घेतली व आठ हजार चांदीची नाणी मोजून दिली. ती नाणी घेऊन गुलबीबी आपल्या घरी आली. दुसऱ्या दिवशी ती व्यापाऱ्याच्या बायकोचे कपडे त्यांच्या घरात ठेवून म्हणाली–"आतां मी या घरात कामाला येणार नाही." आणि घरी परत आली.

त्याच दिवशी तो सराफ गुलबीबीच्या मालकिणीच्या नवऱ्याला भेटला तेव्हां त्याने त्याला विचारले–"मी सोन्याच्या नाण्याची मोड पाठविली ती बरोबर हो‍ती ना?"

व्यापाऱ्याला तो प्रश्न ऐकून आश्चर्य वाटले. म्हणाला–"सोन्याची नाणी? त्यांची मोड चांदीची नाणी, तुम्ही पाठविली म्हणता? ही काय भानगड आहे?"

"काल संध्याकाळी तुम्ही सोन्याची नाणी देऊन त्यांची मोड घेऊन यायला आपल्या मंडळींना पाठविले होते ना? ती नाणी म्हणतो मी!" तो सराफ म्हणाला.

व्यापाऱ्याला पहिल्यापासूनच त्याच्या बायकोच संशय होता. तो आता पक्का झाला. आपली नजर चुकवून या बयेने बरेच सोने जमा करून ठेवले होते तर. तो घरी आला. तो रागातच होता. त्याच वेळी त्याची बायको शेजारणीला घरातले काही तरी सामान विकत होती. रागाच्या भरात त्याने बायकोला झोडपून काढले व तिला माहेरी पाठवून दिले.

गुलबीबीला जे धन मिळाले होते ते त्या गरीब नवराबायकोला आयुष्यभर पुरले.



# मी कोण ?

एका गावी माधव नावाचा एक गरीब मनुष्य रहात असे. तो केरसुण्या तयार करून विकत असे. दर आठवड्याला केरसुण्यांची मोळी घेऊन तो आठवड्याच्या बाजाराला जाई व केरसुण्या विकून त्याला जे पैसे मिळत त्यावर त्याचा उदरनिर्वाह चाले.

पुढे काही दिवसांनी आठवड्याचा बाजार ज्या गावी चाले त्या गावचा प्रमुख अधिकारी एकाएकी मरण पावला. त्या पदावर कोणाला नेमावे या गोष्टीवर गावातली लहानथोर मंडळी आपसात भांडू लागली. त्यांचे ते भांडण पाहून राजाने कोतवालाला बोलाविले व म्हणाला–"अमुक दिवशी नगराचे फाटक उघडल्यानंतर जो आत प्रथम प्रवेश करील त्याला या गावाचा मुख्य अधिकारी नेमावे."

त्या दिवशी माधवच सर्वात प्रथम नगराच्या द्वाराने आत आला. म्हणून त्यालाच मुख्य अधिकारी म्हणून नेमण्यात आले. त्याला रहाण्यासाठी एक वाडा, नोकरचाकर, हिंडायला पालखी आणि मूल्यवान वस्त्रे देण्यात आली.

त्या दिवशी संध्याकाळपर्यंत माधवच्या बायकोने नवऱ्याची वाट पाहिली. परंतु तिचा नवरा गावचा मुख्य अधिकारी नेमला गेला असल्याचे तिला कळले तेव्हां ती आनंदाने धावत पळतच गावात आली. वाटेतच तिला तिचा नवरा भेटला. तो पालखीत बसून चालला होता. तिने पालखी थांबवली. विचारले–"कोण ? तुम्हीच का ?"

"होय मीच ! पण तू मला ओळखतेस हे कोणाला सांगू नकोस ? कारण अजूनपर्यंत मी कोण आहे, हे माझे मलाच कळले नाही." माधव बायकोला म्हणाला.





# कांट्याने कांटा

एका गावी एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याच्या पदरी नोकरीसाठी लोक दूर दुरून येत. पण ते फार दिवस टिकत नसत. तो श्रीमंत मनुष्य त्यांना फार दिवस नोकरीवर ठेवीत नसे.

एकदा त्या श्रीमंताकडे दोघेजण नोकरी-साठी आले. त्याने दोघांना एकेक टोपली दिली व म्हणाला–"तुम्ही दोघे बागेतल्या विहिरीवर जा व टोपलीभर पाणी घेऊन या. संध्याकाळपर्यंत काम केलेत तर एक एक रुपया मजुरी मिळेल."

दोघांनी चकित होऊन परस्परांकडे पाहिले. या कामात काहीतरी गुपित असेल असे समजून दोघे विहिरीवर गेले. वाटेत त्यांपैकी जो मोठा होता तो धाकट्याला म्हणाला–"मला वाटते, या गृहस्थाचे डोके फिरले असावे. नाहीतर टोपलीत पाणी भरून आणायला सांगण्याचा काय अर्थ ?"

धाकटा मनुष्य म्हणाला–"ही लहानशी गोष्ट माहीत नसेल का त्यांना ?"

दोघांनी पाणी भरभरून टोपलीत ओतायला सुरवात केली. टोपलीतून सर्व पाणी गळून जात होते. मोठा मनुष्य पोहऱ्याने पाणी ओतीत होता. त्याने चार पांच पोहरे ओतले व शेवटी कंटाळून गेला आणि म्हणाला–"हे काय काम झाले ? त्याचे डोके फिरले असेल, पण आपले नाही फिरले बुवा ! तुझे पण फिरलेले दिसते आहे. म्हणून तुला या निरर्थक कामात कंटाळा येत नसेल. तुला पाहिजे तर करीत रहा." असे सांगून त्याने पोहरा बाजूला टाकला व एका झाडाखाली जाऊन बसला.

परंतु धाकटा पाणी काढीत राहिला. संध्याकाळ झाली, तरी पाणी काढीत होता. शेवटी विहिरीतले पाणी संपले आणि विहिरीतला चिखल निघू लागला.

सूर्यास्त झाला. धाकट्याने पोहरा खाली ठेवला व टोपले घेऊन निघाला. टोपलीतल्या चिखलात काहीतरी चमकत असलेले त्याला दिसले. ती एक सोन्याची अंगठी निघाली. त्याने ती अंगठी घेतली व आनंदाने मालकाकडे निघाला. मोठा मनुष्य पण त्याच्या बरोबर गेला.

मालक त्यांना म्हणाला–"मी ही अंगठी काढवण्यासाठीच तुम्हांला हे काम सांगितले होते. ही घ्या तुमची मजुरी!" असे सांगून मालकाने धाकट्याच्या हातावर एक रुपया ठेवला व मोठ्याला म्हणाला– "मला वाटले होते की तू देखील कामाला आला आहेस. पण तू चार सहा पोहरे पाणी काढून झाल्यावर पोहरा टाकून देऊन स्वस्थ बसून राहलास."

"आपण टोपलीत पाणी भरायला सांगितलेत. किती बालड्या ओतल्या तरी पाणी काय भरणार, असा विचार करून मी पाणी काढायचे बंद केले." मोठा मनुष्य मान खाली करून म्हणाला.

"मी टोपली भरण्यासाठी त्यात पाणी ओतायला सांगितले, असे कां वाटले तुला? मी जे काम सांगितले ते करणे तुझे कर्तव्य होते. मी तुला पुरी मजुरी दिली असती. या कामात जे नुकसान झाले असते किंवा फायदा झाला असता त्याचा वांटेकरी मी होतो. मला त्याची काळजी होती. तू ती काळजी करीत बसण्याचे कारणच काय? तुला सेवाधर्म कसा असतो याची कल्पना नाही. तू नोकरीवर ठेवण्यायोग्य नाहीस." असे सांगून मालकाने त्याला थोडे पैसे दिले आणि त्याला घरी जायला सांगून धाकट्याला नोकरी दिली. त्याने इमाने इतबारे पुष्कळ दिवस काम केले व मालक त्याच्या कामावर खूष झाला. पुढे त्या श्रीमंताच्या पदरी नोकरी करूनच तो आपल्या मालकासारखाच श्रीमंत झाला.






द्रौपदी व कृष्णाच्या सर्व बायका अंतपुरातील इतर स्त्रिया मिळून गप्पा गोष्टीत गर्क असता दुसरीकडे सर्व पुरुष मंडळी बोलण्यासाठी जमलेली होती. त्या वेळी कित्येक ऋषी व मुनी कृष्णाला व बलरामाला भेटण्यासाठी आले. तेव्हां पांडवांनी व इतर राजांनी उठून त्यांना आदरपूर्वक नमस्कार केला. सर्वांबरोबर कृष्णदेखील उभा राहिला आणि त्याने सर्व मुनींचे अभिवादन केले.

मुनी कृष्णाला म्हणाले–"कृष्णा! आम्ही तत्ववेत्ते व ज्ञानी असलो तरी तू अवतारी पुरुष आहेस व तुझी मायाच सर्वत्र व्याप्त आहे. तिचा प्रभाव आमच्यावर पण आहेच."

वसुदेवाने मुनींच्या सल्लाप्रमाणे देवऋणातून मुक्त होण्यासाठी यज्ञ करण्याचे ठरविले.

यादवांनी यज्ञासाठी आवश्यक असलेली सर्व सामुग्री एकत्र केली. वसुदेव व त्याच्या अठरा पत्नींनी स्नान करून नवीन वस्त्रे परिधान केली व यज्ञदीक्षा घेतली मुनींच्या मदतीने वसुदेवाने प्रकृति-यज्ञ व विकृति यज्ञ केले. यज्ञपुरुषाची आराधना करून ऋत्विकांना गाई, जमिनी व कन्या दक्षिणा म्हणून दिल्या व त्यांना तृप्त केले.

यज्ञ संपल्यावर त्याने पुन्हा स्नान करून आपल्या सेवकांना वस्त्रदान केले व सर्व अतिथींना व नातेवाइकांना मेजवानी दिली.

३०. कृष्णाचे वैकुंठलोकी प्रयाण



एकदा देवकीच्या मनात सहज आले की कृष्ण व बलराम सामान्य पुरुष नसून दैवीशक्ती प्राप्त असलेले महापुरुष आहेत. त्यांनी आपल्या गुरूला गुरु-दक्षिणा म्हणून मृत गुरुपुत्राला जिवंत करून आणून दिले. तरमग कंसाने तिच्या ज्या मुलांचा एकेक करून वध केला त्यांना ते जिवंत करून कां आणून देऊ शकणार नाहीत?

तिने आपली ती इच्छा प्रकट केली. कृष्णबलराम दोघानी मातेची इच्छा पूर्ण करण्यासाठी योगमायेचे रूप घेतले व पाताळ लोकात गेले. तेथे बलीचे राज्य होते. बलीने दोघांचा सर्व प्रकारे सत्कार करून येण्याचे कारण विचारले.

तेव्हां कृष्ण म्हणाला–"महाराज! प्राचीन काळी स्वयंभू मनूने जेव्हां मन्वंतर केले तेव्हां मरीचीचे सहा पुत्र ब्रह्मदेव सरस्वतीवर मोहित झाला असल्याचे पाहून हसले. तेव्हां ब्रह्मदेव रागावला व त्याने राक्षस योनीत त्यांचा जन्म होईल असा त्यांना शाप दिला. तेव्हां स्मर, उद्गीथ, परिष्वंग, पतंग, क्षुद्रभू व घृणी नावाचे ते सहाजण प्रथम हिरण्यकश्यपूच्या पोटी जन्मले व त्यानंतर माझी आई देवकीच्या पोटी जन्माले. कंसाने त्यांचा वध केला. हल्ली ते आपल्या राज्यात वास करीत आहेत. आपण कृपा करून त्यांना पाठविल्यास मी मातेच्या मनाचे समाधान करून देईन व त्यांना उत्तम लोक देईन."

बलीने कृष्णाच्या इच्छेप्रमाणे त्या सहा जणांना कृष्णाबरोबर पाठविले. आपल्या त्या सहा मुलांना पाहून देवकीच्या मनाचे समा-धान झाले व कृष्णाच्या या अपूर्व शक्तीचे ती कौतुक करू लागली. कृष्णाच्या कृपेने त्याचे सहा भाऊ उर्ध्व लोकांत निघून गेले.

त्यानंतर बराच काळ लोटला. महा-भारताचे युद्ध झाले. कौरव आणि पांडव दोघांच्या बाजूचे लक्षावधी लोक हताहत झाले व पांडवांचा जय झाला. पांडवांचा मोठा भाऊ युधिष्ठिर याला सिंहासनावर बसवून कृष्ण द्वारकेला परत आला.

एकदां कृष्णाला भेटण्यासाठी विश्वा-मित्र, असित, कण्व, दूर्वासा, भृगु, अंगीरस, कश्यप, अत्रि, वसिष्ठ, नारद इत्यादी मुनिमंडळी आली. तेव्हां त्यांची थट्टा करण्यासाठी काही यादव तरुणांनी कृष्णाचा मुलगा सांब याला गर्भवती स्त्रीचा वेष देऊन मुनींसमोर आणला व नम्रपणाचा आव आणून त्यांना विचारले–"मुनिवर्य! आपण त्रिकालदर्शी ज्ञानी मुनी आहां. ही बाई गरोदर आहे. हिला मुलगा होईल की मुलगी आपण कृपा करून हे भविष्य वर्तवावे!"

यादव तरुणांच्या त्या उद्दंडपणाचा मुनींना मनस्वी राग आला. त्यांनी त्यांना शाप दिला–"मूर्ख हो! या बाईच्या पोटी जन्मलेले मुसळ यादव वंशाचा नाश करील."

तो शाप ऐकून यादव तरुण घाबरून पळून गेले. सांबाच्या पोटातून एक लोखंडाचे मुसळ बाहेर आले. ते त्याने आपल्या मित्र-मंडळीस दाखविले. सर्व पश्चात्ताप करू लागले. शेवटी त्यांनी उग्रसेनाला घडलेली गोष्ट सांगितली.





त्यानंतर मुसळाची गोष्ट व मुनींनी दिलेल्या शापाची गोष्ट सर्व यादवांना कळली. सर्व किंकर्त्तव्य विमूढ होऊन परस्परांकडे पाहू लागले. उग्रसेनाने यादवांना सांगितले की त्या मुसळाचा बारीक चुरा करून तो समुद्रात फेकून द्या. त्याप्रमाणे यादवांनी केले. परंतु ते चूर्ण समुद्रात बुडले नाही. समुद्राच्या लाटांबरोबर किनाऱ्याला येऊन लागले व जेथे जेथे ते पडले तेथे बोरू-सारखे गवत उगवले. मुसळाचा एक लहानसा तुकडा उरला होता तो तसाच यादवांनी समुद्राच्या पाण्यात टाकला होता. तो तुकडा एक माशाने गिळला. तो मासा एका कोळयाच्या जाळयात सापडला. त्या कोळयाने तो तुकडा एका शिकाऱ्याला विकला. शिकाऱ्याने त्या तुकड्याची अणी करून एक बाण तयार केला. तोच बाण पुढे यादव वंशाच्या नाशाला कारण झाला.

मुनींनी यादवांना शाप दिला त्या दिवसापासून द्वारकेला अनेक अपघात झाले, कित्येक अघटित गोष्टी घडल्या. तेव्हां कृष्णाने आपला दरबार बोलावला व सर्व यादवांना हजर राहण्यास विनंती केली. सर्व यादव सभेला हजर झाले तेव्हां कृष्ण म्हणाला–

"द्वारकेत अनेक अघटित गोष्टी घडत आहेत. हा सर्व अपशकुन आहे. मुलांच्या मूर्खपणामुळे मुनींचा कोप झाला व त्यांनी सर्व यादवकुळाचा नाश होईल असा शाप पण दिला आहे. म्हणून आतां द्वारकेत राहणे हिताचे नाही, उलट धोक्याचे आहे. बायकामुले व वृद्ध माणसे सर्वांना शंख-द्वारी पाठवून देऊ व आपण सर्व सरस्वती नदीच्या काठी प्रभासक्षेत्री जाऊ. तेथे स्नान करून उपोषण करू व देवांना प्रसन्न करू. ब्राह्मणांना गाई, सुवर्ण, वस्त्रे, हत्ती, घोडे व घरे दान करू. त्यांच्या हस्ते शांति करवू. देव, ब्राह्मण व गाईंची पूजा करून सर्व अरिष्ट टळण्यासाठी देवांची आराधना करू. तसे केल्यास सर्व अरिष्टे दूर होतील."

यादव वंशातील सर्व वृद्ध मंडळींनी कृष्णाने जे सांगितले ते कबूल केले. बायका मुलांना व वृद्ध मंडळींना पाठवून दिले व बाकी सर्व यादव मंडळी लहान मोठ्या होडक्यांत बसून समुद्रापलीकडे प्रभासक्षेत्री गेली. परंतु तेथे त्यांना देवमायेने घेरले. सर्व मद्यपान करून आपसांत भांडू लागले. हळू हळू या भांडणाला युद्धाचे रूप मिळाले. या युद्धात सर्व हत्ती व घोडे ठार झाले. रथादि वाहने मोडून गेली. नंतर यादव प्रमुखांचे परस्परांशी द्वन्द्वयुद्ध सुरू झाले. प्रद्युम्न व सांब दोघे भाऊ पण परस्परांशी युद्धाला तयार झाले. त्याच प्रमाणे अक्रूरचे भोजशी, अनिरुद्धाचे सात्यकीशी, सभद्रचे संग्रामजित याच्याशी आणि सुमित्राचे सुरभ याच्याशी द्वंद्वयुद्ध झाले. इतर लोकांचे पण परस्परांशी द्वंद्वयुद्ध झाले. बंधु-मित्र कोणी कोणाला ओळखत नव्हता. सर्वांची बुद्धी भ्रष्ट झाली होती. वेड्यासारखे मित्राला शत्रू समजून त्यांनी परस्परांचा वध केला. त्यांनी परस्परांचे धनुष्य बाण तोडले,



तलवार, गदा वगैरे शस्त्रांचा संहार केला. समुद्राच्या काठी त्यांना गवत उगवलेले दिसले. ते उपटून त्यानेच त्यांनी परस्पराला मारायला सुरवात केली. कृष्णाने त्यांना समजावून सांगण्याचा व शांत करण्याचा प्रयत्न केला. पण ते सर्व रागावले व कृष्ण बलरामांना मारायला धावले. म्हणून कृष्ण बलरामांना राग आला व त्यांनी समुद्र किनाऱ्यावरचे गवत उपटून त्याने आपल्या नातेवाइकांना मारायला सुरवात केली. अशातऱ्हेने मुनींचा शाप दावानला सारखा पसरला व त्यात यादव वंशाचा नाश होऊ लागला.



सर्व यादव ठार झाले. कृष्णाने ते भयंकर दृश्य पाहिले व म्हणाला–"पृथ्वीचा भार कमी झाला."

बलरामाने समुद्रकाठी योगसमाधी धारण केली व प्राणत्याग केला. कृष्णाला ते सर्व दृश्य पाहून फार वाईट वाटले. तो त्या मन:स्थितीत एका पिंपळाच्या झाडाला टेकून आपल्या उजव्या पायाच्या आधारे डावा पाय ठेवून बसला असता त्याचा तळपाय दुरून हरणाच्या तोंडासारखा जर नांवाच्या एका व्याधाला भासला. त्याने नेम धरून एक बाण मारला. त्या बाणाला कोळ्याने दिलेला लोखंडाचा तुकडा बसविलेला होता.

व्याध आपला नेम बरोबर बसला या आनंदात धावत आला. पण तेथे कृष्णाला पाहून त्याला फार वाईट वाटले व तो पश्चात्ताप करू लागला. तो कृष्णाला म्हणाला–"मालक! माझ्या हातून अज्ञाना-मुळे केवढी चूक झाली? क्षमा करावी."

कृष्ण त्या व्याधाकडे स्मित करून बघत म्हणाला–"तुला वाईट वाटून घेण्याचे कारण नाही. मी इच्छिल्याप्रमाणेच सर्व घडले आहे." असे व्याधाच्या मनाचे समा-धान करून देऊन कृष्णाने त्याला निरोप दिला. इतक्यात कृष्णाचा शोध काढीत दारुक रथ घेऊन तेथे आला. तो रथातून उतरून कृष्ण होता तेथे आला. तेव्हां कृष्ण त्याला म्हणाला–"तू द्वारकेला जा व आपल्या वंशातले सर्व लोक आपसात युद्ध करून मरण पावले असे सांग. बलरामाने समाधी घेतली व मी या स्थितीत आहे. तुमच्या पैकी कोणी आता द्वारकेला राहू नये. माझा मृत्यू झाल्यानंतर सर्व द्वारका समुद्रात बुडून जाईल. माझे आईवडील व इतर लोक इंद्रप्रस्थ नगरी अर्जुनाबरोबर राहतील. तुम्ही सर्व आता कोणाची चिंता करू नये आणि निर्लिप्त भावे ज्ञानमार्ग अवलंबून रहावे."

दारुकाने कृष्णाला नमस्कार करून त्याला तीनदां प्रदक्षिणा घातली आणि दु:खी मनाने द्वारकेकडे निघाला. तेथे पोंचल्यावर त्याने उग्रसेन व वसुदेव यांना नमस्कार केला व रडत यादवांच्या सर्वनाशाचे वृत्त सांगितले. सर्व शोक करीत यादवांचा संहार झाला होता तेथे आले. वसुदेव, देवकी व रोहिणीने कृष्ण बलराम कोठे तरी दिसतील म्हणून पुष्कळ शोध केला. पण त्यांना आपल्या लाडक्या मुलांचे देह दिसले नाहीत. आपल्या मुलांचा विरह असह्य झाल्याने त्या दु:खामुळे त्यांनी तत्क्षण देहत्याग केला.

यादवांच्या पत्नींनी आपापल्या पतीची मृत्युवार्ता ऐकून सहगमन केले. बलरामाच्या पत्नींनी पण सहगमन केले. कृष्णाच्या सर्व पत्नींनी पण तसेच केले.

अर्जुनाने प्रभास क्षेत्री येऊन आपल्या सर्व बंधुबांधवांची अन्त्येष्टी क्रिया केली. त्यानंतर द्वारकानगरी महापुरामुळे समुद्रात बुडली. द्वारकेचे मंदिर तेवढे समुद्रावर तरंगत असलेले दिसले.

अर्जुनाने उरलेल्या स्त्री पुरुषांना व मुलाबाळांना बरोबर घेतले व इंद्रप्रस्थ नगरी आला. त्याने वज्र याला गादीवर बसविले. त्यानंतर सर्व पांडव द्रौपदीसह हिमालयाच्या यात्रेला निघाले.

कृष्णावतार संपला त्यावेळी ब्रह्मदेव, इंद्र आणि इतर देव, प्रजापती, सिद्ध, विद्याधर आणि अप्सरा पण हजर होत्या. सर्व विमानात बसून येत होते, म्हणून आकाश विमानांनी जणुंकाही झाकले गेले होते. विमानांतून पुष्पवृष्टी होत होती. कृष्णाने विष्णूचे दिव्य रूप धारण केले व सर्वांकडे एकदां कृपाकटाक्षाने पाहिले. त्यानंतर सत्य, धर्म, धृती, श्री आणि कीर्ती यांच्यासह वैकुंठलोकी प्रयाण केले. (संपूर्ण)





# अरण्यपुराण

[ ३३ ]

मौवली त्या दिवशी रात्री व दुसऱ्या दिवशी दिवसभर झोपून होता. संध्याकाळी त्याची झोप मोडली. झोप मोडतांच त्याचा हात कट्यारीवर गेला. लगेच उठून उभा राहिला व जणुकाही कोणीशी तरी द्वंद्वयुद्धास ताठ उभा राहिला.

त्याला मनात एक तऱ्हेची अस्वस्थता भासत होती. त्याला खूप पळावेसे वाटले. पण धाकटा मुलगा त्याच्या हातातून खाली उतरायला तयार नव्हता. मेस्सुवा काही तरी निरर्थक गात होती व मौवलीचे केस विंचरीत होती. तेव्हां त्याला त्याच्या 'मोठ्या भावाचा' ओळखीचा आवाज ऐकू आला. मौवलीने लांडग्यांच्या भाषेत त्याला उत्तर दिले–"मी तुम्हांला बोलावले तेव्हां कोणी आलां नाही."

"तू आपल्या सर्व मित्रमंडळींना गोळा करू नकोस. तुझ्या हिताची गोष्ट मी सांगत आहे." मेस्सुवा मौवलीला म्हणाली.

"तुला भिण्याचे कारण नाही. तुम्ही दोघे कांजीरांगाला जायला निघालात तेव्हां माझ्या याच मित्र मंडळींनी तुम्हांला कळू दिल्याशिवाय लपतछपत जाऊन तुम्हांला वांचविळे होते. आई! मला आता गेले पाहिजे!" मौवली म्हणाला.

मौवली निघाला तेव्हां मेस्सुवा पुढे होऊन त्याला पोटाशी घट्ट आवळून धरून म्हणाली–"बाळ! परत ये! तू मला माझ्या स्वत:च्या जिवासारखा आहेस. पहा, हा धाकटा मुलगा! त्याला सुद्धा तू निघालेला आवडत नाही." मौवलीचा कंठ गदगद झाला. म्हणाला–"येईन, अवश्य परत येईन." आणि बाहेर येऊन आपल्या



'मोठ्या भावाला' म्हणाला–"मी तुम्हांला बोलाविले तेव्हां तुम्ही चौघे कां नाहीं आलात?"

"काल रात्रीच आम्ही नवे गाणे म्हटले. विसरलास का?" मोठ्या भावाने विचारले.

"होय, होय!" मौवली म्हणाला.

"तू काय रे केलेस? माणसांच्या कळपात शिरुन खूप खाऊन पिऊन झोपलास, होय ना?" मोठ्या भावाने त्याला विचारले.

मौवली काही उत्तर देणार एवढ्यात त्याला एक स्वच्छ पांढरे पातळ नेसून जात असलेली मुलगी दिसली. मोठा भाऊ एका बाजूला लपला. मौवली खूप उंच वाढलेल्या शेतात शिरला.

ती मुलगी भुताला पाहिल्यासारखी एकदम मोठ्याने ओरडली. नंतर धीर धरून एकेक पाऊल पुढे टाकू लागली. मौवली उंच वाढलेल्या पिकात लपत छपत ती मुलगी दृष्टी आड होईपर्यंत तिच्याकडे पहात राहिला.

नंतर तो आपल्या मोठ्या भावाकडे वळून म्हणाला–"मी मनुष्यांच्या वस्तीत गेलो तर तुम्ही येणार नाही का माझ्या-बरोबर?"

"आजपर्यंत आलो नाही तर आतां कां येऊ?" मोठा भाऊ म्हणाला. थोड्या तो वेळाने पुन्हां बोलू लागला–"काळ्या वाघाचे म्हणणे खरे निघाले तर! मनुष्य शेवटी मनुष्यात जाऊनच राहणार! 'आई' पण तेच सांगत असे."

"एकूपण तेच म्हणाला होता." मौवली म्हणाला.

"महाज्ञानी कावासुद्धा तेच म्हणाला होता." मोठा भाऊ म्हणाला.

"तुझे काय म्हणणे आहे?" मौवलीने मोठ्या भावाला विचारले.



"एकदा त्यांनी तुला दगड फेकून मारले तुला लालफुलात (विस्तवात) ढकलण्याचा यत्न केला." मोठा भाऊ म्हणाला.

"पण तुझे म्हणणे काय, हे नाही सांगितलेस!" मौवलीने विचारले.

"आम्ही तू सांगशील तसे करू. आम्ही सर्व एका आईची लेकरे आहो. पण जंगलाला काय उत्तर देणार?" मोठ्या भावाने उत्तर दिले.

"तू बरी आठवण करून दिलीस. तू सर्वांना डोंगराच्या टोकाला जमा कर. मी आपले मन उघडून एकदां त्यांना काय ते सांगणार आहे." मौवली म्हणाला.

"इतर वेळी मी एकदां हाक मारून सर्वांना एकत्र जमविले असते. नव्या गाण्याचा मोसम अजून संपला नाही."

"जंगलाचा अधिपती मनुष्य वस्तीत निघाला आहे. सर्वांनी डोंगराच्या शिखरावर जमावे!" मोठा भाऊ ओरडला.

मौवली धावत पळत डोंगराच्या शिखरावर जाऊन पोंचला तेव्हां तेथे फक्त त्याचे चौघे भाऊ आंधळे अस्वल व कावा हजर होते.

"तुझ्या मनातली शंका दूर झाली, माणसाच्या पिल्ला!" कावा म्हणाला.



मौवली दुःखावेगाने म्हणाला–"मी त्या कुत्र्यांच्या हाती कां मेलो नाही? माझ्या अंगातली शक्ती पार नाहीशी झाली आहे. झोपतो, पण झोप येत नाही, पाण्यात डुंबलो तरी अंगातून वाफा बाहेर येतात. माझी सर्व हाडें यांसासारखी मऊ झाली आहेत."

"अरे या सर्व गप्पा कशाला? त्या दिवशी एकू ०गाला होता–'मौवलीला माणसांच्या वस्तीत जाऊ द्या.' मी सुद्धा म्हणालो होतो. ह्या म्हाताऱ्याचे कोण ऐकतो. काळावाघ पण...काळावाघ कोठे आहे?" अस्वलाने विचारले.

"मला हे फारपूर्वी पासून माहीत होते, मनुष्य मनुष्यांच्या वस्तीत जाणार." काबा म्हणाला. चौघे भाऊ घाबरून जाऊन मौवली काय म्हणतो किंवा करतो हे कळावे म्हणून त्याच्याकडे पाहू लागले.

अस्वल मौवलीला म्हणाले–"मला डोळ्यांना दिसत नसले तरी माझ्या बुद्धीला सर्व कसे स्पष्ट स्वच्छ दिसते आहे. मौवली तू आपला मार्ग सुधार. मनुष्यांच्या समाजात आपली जागा मिळविण्याचा यत्न कर. तुला गरज वाटेल तेव्हां तू हाक मार, सर्व जंगल धावून येईल, तुझा हुकूम मान्य करील."

"स्वत: मला जावेसे वाटत नाही, पण माझे पाय मला ओढत आहेत." मौवली म्हणाला.

"पोळ्यातला मध संपला आहे. सोडून गेलेच पाहिजे." अस्वल म्हणाले.

"एकदा कात टाकली की पुन्हां त्यात कोणी शिरत नाही." काबा म्हणाला.

"पण काळा वाघ काय म्हणतो? बैल देऊन त्याने मला जवळ केले होते..."

मौवलीचे वाक्य पुरे देखील झाले नव्हते की काळा वाघ झुडपे बाजूला सारीत पुढे आला. रक्ताने माखलेला पंजा उचलून तो दाखवीत म्हणाला–"मला यायला म्हणून उशीर झाला. मी दोन वर्षाच्या एका बैलाला ठार केले. काळ्या वाघाचे प्रेम तुझ्यावर कमी झाले आहे असे वाटून घेऊ नकोस. अस्वल म्हणाले तेच मी म्हणतो."

अस्वलाने प्रेमाने मौवलीला पोटाशी धरले. त्याच्या खांद्यावर मान टाकून मौवली रडू लागला. "कात टाकणे किती कठीण असते!" काबा म्हणाला.

मोठा भाऊ आपल्या भावांना म्हणाला– "सर्व तारे आपापली तोंडे लपवू लागले आहेत. आपण आपल्या मार्गाला लागू."

(संपूर्ण)



# ८७. प्राचीन पनामा नगराचे अवशेष

प्राचीन पनामा नगर ई. स. १५१९ मध्ये निर्मिले गेले. सुमारे ३०० वर्षापूर्वी या स्पॅनिश नगराचा ध्वंस झाला. आज सेंट अनास्टियस कॅथेड्रल या चर्चच्या दगडाच्या भिंती तेवढ्या शिल्लक आहेत. नवीन पनामा नगराचा निर्माण या ओस पडलेल्या नगरापासून सहा मैलावर झाला आहे.





# वांटे

एका गरीब शेतकऱ्याला दोन मुलगे होते. लहानपणीच त्यांची आई वारली. तो शेतकरी वारला तेव्हां फक्त एक गाय, एक नारळाचे झाड व पांघरायला एक दुलई एवढेच काय ते उरले होते.

मोठा मुलगा आतल्या गाठीचा होता. धाकटा भोळा भाबडा होता. म्हणून मोठा आपल्या धाकट्या भावाला म्हणाला–"आपण दोघे मिळून बाबांनी आपल्या तिघांसाठी म्हणून जे सोडले आहे ते आपसात वांटून घेऊ. परंतु वांटताना कोणतीही वस्तू नष्ट होऊ देता कामा नये. गाईचे तुकडे करणेच शक्य नाही. नारळाच्या झाडाचे तुकडे केले तर ते झाड मरेल व दुलईचे तुकडे केले तर ती निरुपयोगी होईल. म्हणून मी अशी युक्ती सांगतो की बाबांच्या इस्टेटीतली एकही वस्तु नष्ट होणार नाही व त्यांचा उपयोग पण होईल. आपली ही गाय आहे. या गाईचा पुढला हिस्सा तुझा व मागचा माझा. तसेच हे नारळाचे झाड आहे. त्याचा खालचा हिस्सा तुझा व वरचा माझा. राहून राहली दुलई. ती दिवसा तुझी व रात्री माझी. अशी आपण वांटणी करून घेतली म्हणजे आपल्याला बाबांनी सोडलेल्या वस्तूचा उपयोग होत राहील व त्या वस्तूवर दोघांची मालकी पण राहील." धाकट्या भावाने मोठ्या भावाचे मतलबी म्हणणे कबूल केले.

धाकटा भाऊ रोज गाईला चरायला नेई व तिचा पुढचा भाग धुवून स्वच्छ ठेवी. मोठा भाऊ गाईचे दूध काढून एकटा पिऊन टाकी. धाकटा भाऊ रोज नारळाच्या झाडाला पाणी घाली व मोठा भाऊ नारळ तोडून खाई. धाकट्या भावाला दिवसा दुलईची गरजच नसे. मोठा भाऊ मात्र रात्री दुलई पांघरून झोपी जाई. दिवसा दुलाई उन्हात तापवून काळोख पडण्याच्या आत ती झाडून घडी घालून ठेवून देण्याचे काम धाकट्या भावालाच करावे लागे.

मोठा भाऊ अशा तऱ्हेने धाकट्या भावाला फसवीत असल्याचे गावातल्या एका वृद्ध गृहस्थाच्या लक्षात आले. मोठा भाऊ घरात नाही हे पाहून तो एक दिवशी धाकट्या भावाकडे येऊन म्हणाला–"काय रे धाकटू! तू रोज गाईला चरायला नेतोस तिला दाणा पाणी सर्व घालतोस. दूध कितीरे देते ती? तू किती दूध पितोस? तसेच नारळाच्या झाडाचे खत पाणी तूच करतोस शहाळी काढून पाणी पितोस की नारळच खातोस? आणि रोज दुलई उन्हात वाळवतोस मग ऊबदार पांघरुणात छान झोप येत असेल नाही?"

"नाही हो! गाईचा पुढलाच हिस्सा माझ्या वांटचाचा आहे आणि मागचा हिस्सा दादाचा आहे! तसाच नारळाच्या झाडाचा फक्त खालचा हिस्साच माझ्या वांटचाचा आहे आणि वरचा हिस्सा दादाच्या वांटचाचा. दुलई दिवसाच्या वेळी माझी व रात्रीच्या वेळी दादाची अशी वांटणी करून घेतली आहे आम्ही दोघांनी आपसात!" धाकटा म्हणाला.



"अरे खुळचा! तुझ्या दादाने मग तुला फसविले आहे. मी सांगतो तसे कर, म्हणजे त्याचे डोके ठिकाणावर येईल आणि त्याला अद्दल घडेल." असे सांगून म्हाताऱ्याने काय काय करायचे हे त्याला छान समजावून सांगितले आणि निघून गेला.

दुसऱ्या दिवशी मोठा भाऊ दूध काढायला आला तेव्हां धाकट्याने गाईच्या तोंडाला काठी मारली. तेव्हां मोठ्याने विचारले—"हे काय रे करतो आहेस?"

"गाईचा पुढला भाग माझ्या वांट्याचा आहे. मी काय वाटेल ते करीन. तुला काय त्याचे?" धाकटा म्हणाला.

मोठ्या भावाला कळले की कोणीतरी किल्ली फिरविलेली दिसते आहे. म्हणून म्हणाला—"गाईला मारू नकोस, तुला मी अर्धे दूध देईन."

थोड्या वेळाने मोठा भाऊ नारळ काढायला झाडावर चढला. तेव्हां धाकटा भाऊ कुऱ्हाड घेऊन झाड तोडू लागला. मोठ्या भावाने जेव्हां विचारले की काय रे करतो आहेस, तेव्हां तो म्हणाला—"हा भाग माझ्या वांट्याचा आहे, मी काय वाटेल ते करीन. तू कोण विचारणार?"

"मी अर्धे नारळ तुला देत जाईन!" अशी कबुली निमुटपणे मोठ्याने दिली.

रात्री मोठा भाऊ पांघरायला दुलई घेऊन निघाला तर ती भिजलेली होती.

"अरे! रजई अशी ओली कां? पांघरायची कशी?" मोठ्या भावाने विचारले.

"मी दिवसा दुलई घेऊन पांघरून निजावे म्हटले तर उकडू लागले. म्हणून थोडे पाणी शिंपडले होते." धाकटा म्हणाला.

"दुलई अशी भिजवली तर कामातून जाते! कधी कधी रात्री तू वापर कधी मी घेईन." मोठा भाऊ म्हणाला.

त्यानंतर मोठ्याने धाकट्याची फसवणूक करण्याचे सोडून दिले.





# मखमलीची टोपी

सिंहल देशात एक गरीब मनुष्य रहात असे. तो एक वासरू घेऊन बाजारात विकायला निघाला. वाटेत एका जागी जंगलात चोरांनी त्याला अडविले व विचारले—"कोठे रे चालला आहेस?"

"हे वासरू विकायला घेऊन चाललो आहे, बाजारात." तो म्हणाला.

"अरे, हे वासरू नाही, कोकरू आहे! खुळाच दिसतोस की रे!" चोर म्हणाले.

"हे कोकरू नाही, वासरू आहे! लहान आहे म्हणून तुम्हांला कळले नसेल." गरीब मनुष्य म्हणाला.

"आमची थट्टा करतो आहेस का रे? कोकरू कसे असते आणि वासरू कसे असते हे आम्हांला माहीत नाही होय बरे तर हे कोकरू आम्ही विकत घ्यायला तयार आहो. आम्ही तीन रुपये देऊ." चोर म्हणाले.

त्या गरीब माणसाने विचार केला की हे कोणी लबाड बदमाष दिसत आहेत. ते देतील तेवढे पैसे घेऊन सुटका करून घ्यावी. म्हणून त्याने चार रुपये मागितले व चोरांनी चार रुपये देऊन ते वासरू त्याच्याकडून विकत घेतले.

चोर वासरू घेऊन थोडे अंतर चालून गेल्यावर तो गरीब मनुष्य विचार करू लागला की या लबाडांनी मला लुबाडले आहे तर यांना अद्दल घडेल असे काही तरी केले पाहिजे. असा विचार करून तो धावत धावत गेला व म्हणाला—"मी एकटा गरीब आहे. मला सुद्धा तुमच्या बरोबर राहू देता का? तुम्ही सांगाल ते काम मी करीत राहीन."

चोरांनी होकार दिल्यावर तो त्यांच्याबरोबर राहून ते सांगतील ते काम करू लागला. काही दिवसांनी तो गरीब मनुष्य










बाजारातून एक मखमलीची टोपी विकत घेऊन ती घालून आला. त्याची ती टोपी पाहून चोर मोठ्याने हसू लागले.

"तुम्ही माझी टोपी पाहून हसता आहा. पण या टोपीचा प्रताप कळला की गप्प बसाल." गरीब मनुष्य चोरांना म्हणाला.

"सांग तर काय काय प्रताप आहे तुझ्या टोपीचा तो!" चोरांनी त्याला विचारले.

"मी ही टोपी घालून कोणाकडे गेलो की मला फुकट जेवायला मिळते आणि वर फुकटाचा आदरपण मिळतो. ही टोपी असली की चैनीत सर्व आयुष्य जाईल." गरीब मनुष्य म्हणाला.

"तुझ्या या गप्पा सोड आणि तुझ्या टोपीचा प्रताप काय आहे तो आम्हांला दाखव." चोर त्याला म्हणाले.

"चला, उद्याच दाखवतो." गरीब मनुष्य म्हणाला. त्यादिवशी रात्री तो गरीब मनुष्य गावातल्या दोन खानावळवाल्यांकडे गेला व त्यांना पैसे देऊन त्यांनी काय करायचे हे सांगून परत येऊन झोपला.

दुसऱ्या दिवशी तो त्या चोरांना घेऊन एका खानावळीत गेला. खानावळीचा मालक धावत पुढे येऊन हात जोडून विचारू लागला—"काय सेवा करू आपली?" आणि त्यांना जेवणाच्या खोलीत घेऊन गेला.



"आम्ही चौघे आहो. चार ताटे घेऊन या, स्पेशल बरं का?" गरीब माणसाने मोठ्या तोऱ्यात हुकूम सोडला.

खानावळवाल्याने त्यांना उत्तम जेवण वाढले. खाऊन पिऊन ते जाऊ लागले तेव्हा विनयपूर्वक म्हणाला—"आपण असेच रोज येत रहावे."

तो आदर सत्कार पाहून चोर चकितच झाले. खानावळवालादेखील पैशाशिवाय रोज जेवायला या म्हणतो आहे. या मखमलीच्या टोपीचाच प्रताप असला पाहिजे.

त्या दिवशी संध्याकाळी तो गरीब मनुष्य आपल्या तिघां मित्रांना दुसऱ्या खानावळीत घेऊन गेला. तेथे देखील त्यांचा तसाच आदर सत्कार झाला. खानावळीचा मालक त्यांना निरोप देते वेळी म्हणाला—"आपण अशीच कधी कधी कृपा करावी या गरिबावर!"

चोरांना टोपीचा प्रताप किती मोठा आहे, याबद्दल थोडी देखील शंका उरली नाही. ती टोपी जादूची तरी असावी किंवा तिच्यात दुसरे काही तरी गुपित असावे, अशी त्यांनी खात्री पटली. चोर त्या गरीब माणसाच्या पाठीस लागले की ही टोपी आम्हांला विकून टाक. तू मागशील ती किंमत द्यायला आम्ही तयार आहो.












"अहो पण मी ही टोपी विकून टाकली तर माझे पुढे कसे चालेल?" गरीब म्हणाला.

"हे पहा, आमच्या जवळ जे काही आहे ते सर्व आम्ही तुला देतो, तू तेवढी टोपी आहांला दे." चोर गरिबाला म्हणाले.

जणुकाही त्यांच्यावर उपकारच करतो आहे असे दाखवून तो गरीब चोरांना म्हणाला–"तुम्ही चांगली माणसे आहां म्हणून मी ही टोपी द्यायला तयार होतो आहे." असे सांगून चोरांकडून त्यांचे सर्व पैसे काढून घेऊन त्याने त्यांना टोपी दिली आणि काही बोलल्या शिवाय निघून गेला.

दुसऱ्या दिवशी तिघे चोर आपल्या हातात मखमलीची टोपी घेऊन एका खानावळीत गेले. पोटभर पक्वान्ने झोडली आणि पैसे दिल्याशिवाय जाऊ लागले तेव्हां खानावळीचा मालक पैसे मागू लागला. ते चकित होऊन विचारू लागले–"पैसे कसले?" खानावळीच्या मालकाने खूप शिव्या हासडून त्यांच्याकडून सर्व पैसे वसूल केले.

तिघे चोर बाहेर आले आणि परस्परांची तोंडे पहात विचार करू लागले, असे कां बरे झाले? त्यांना वाटले की टोपी जवळ ठेवून काय उपयोग? कोणी तरी एकाने ती डोक्याला घातली पाहिजे, तरच या टोपीचा प्रताप प्रगट होईल.

त्या दिवशी रात्री त्यांच्या पैकी एकाने टोपी घातली व खानावळीत गेले. तिघांनी खूप खाऊन पिऊन घेतले आणि पैसे दिल्या शिवाय ते निघाले तेव्हां खानावळीच्या मालकाने त्यांच्या जवळ पैसे मागितले. पण त्यांच्या जवळ पैसेच उरले नव्हते. खानावळीच्या मालकाने त्यांना चांगला चोप देऊन बाहेर हाकलून लावले.

तेव्हां कोठे चोरांना कळले की त्या गरीब माणसाला त्यांनी फसविले होते त्याबद्दल त्याने त्यांना अशा तऱ्हेने फसविले.





# पडकें देऊळ

[ १५ ]

[ शिखीमुख व त्याचे अनुयायी आकाशगुहेजवळ पोचले. गोंड लोक नाचगाण्यात मग्न होते. शिखीमुखने एका गोंड माणसाला धरले. त्याच्याकडून थोडी माहिती कळल्यावर शिखीमुख वाघाचे कातडे पांघरून पुढे आला. पुजाऱ्याने त्याला ओळखले. तिकडे विक्रमकेसरीने पिंजऱ्यातून वाघाला सोडले. पुढे–]

पडक्या देवळाच्या पुजाऱ्याला प्रथम नकली वाघ असेल असा संशय होता. परंतु तो खरा वाघ निघाला. वाघ पुजाऱ्यावर आणि गोंड सरदारावर झडप मारायला धावला. त्याने चार पांच जणांना पंज्याने मारून जमिनीवर लोळवले. तेथे राहणे धोक्याचे आहे हे ओळखून पडक्या देवळाचा पुजारी आकाशगुहेजवळच्या एका खडकाआड पळू लागला. गोंड सरदारपण आकाश गुहेकडे पळत जात अनुयायांना ओरडून सांगत होता–"मूर्ख हो! पळता काय? आगीतली लाकडे घेऊन वाघाच्या अंगावर धावा."

गोंड लोक त्याप्रमाणे आगीतली लाकडे घेऊन वाघावर धावले. विस्तव पाहून वाघ मागे फिरला. इतक्यात पुजारी ओरडला–"ए नागगिधाडा!"

एकाएकी वाघ आल्याने जी गडबड उडून गेली होती त्यामुळे आकाशगुहेकडे पुजारी




पळून गेल्याचे शिखीमुखला कळले नाही. त्याने गोंडनायकालाच पाहिले व तो त्याच्या पाठोपाठ धावला. पण शिखीमुखला पुजाऱ्याने पाहिले व आपल्या नोकराला बोलाविले. पुजाऱ्याचा आवाज ऐकून नागगिधाड ओरडून म्हणाला—"मालक! मी हा येथे आहे. हा पहा, आलो!"

"आपण येथे ज्या कामासाठी आलो होतो ते झाले. आता आपण ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्यात गेले पाहिजे." असे म्हणत पुजारी पळत डोंगर चढू लागला.

तेव्हां नागगिधाड म्हणाला—"धनी मी आकाशात उडतो."

"या काळोखात उडणे धोक्याचे आहे. तू चटई गुंडाळून घेतलीस? दोरखंड डोंगराच्या शिखरावरच्या खडकाला बांधलेस?" पुजाऱ्याने विचारले.

"आपल्या हुकमाप्रमाणे सर्व तयार ठेवले आहे. मालक! आपण उडत खाली खोऱ्यात जायचे का?" नागगिधाडाने विचारले.

"असला मूर्खपणा करून हात पाय मोडून घेशील. दोरखंडाला धरून मी पहिल्याने खाली खोऱ्यात जातो. तू गुंडाळलेली चटई उचलून घेऊन माझ्या मागून ये." पुजारी म्हणाला.

दोघे डोंगराच्या टोकाला चढून वर पोचले होते. तेथे एका खडकाला दोरखंड बांधलेले होते. त्या खडकाजवळ चटईत नागमल्लीला गुंडाळून ठेवले होते. तिच्या तोंडात बोळे कोंबून ते पट्टीने बांधले होते.

पुजाऱ्याने एकदा खात्री करून घेण्यासाठी नागमल्लीकडे पाहिले. नंतर खडकाजवळ जाऊन दोरखंड घट्ट बांधले आहे की नाही हे पाहून घेतले. नंतर उभा असलेल्या नागगिधाडाला म्हणाला—"खोऱ्यात उतरून जाण्यास दोरखंड पुरेल का?"





"खोऱ्यापर्यंतच मालक! आपण मंत्र-प्रयोग केलात तर ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यापलीकडे देखील पोचेल." नागगिधाड म्हणाला.

"मूर्ख! ही काय बटबट चालविली आहेस? आज रात्री पिऊ नकोस म्हणून तुला मी बजावून सांगितले होते. तरी तू ताडी पिऊन आला आहेस. बटबट बंद कर व माझ्या पाठी मागून गुंडाळलेली चटई खांद्यावर घेऊन उतरू लाग." असे सांगून पुजारी दोरखंड धरून त्याच्या मदतीने डोंगर उतरू लागला.

नागगिधाडाने एकदोनदा हातवारे करून "ही सर्व पुजारी धन्याची आज्ञा आहे!" म्हटले व चटईत गुंडाळून ठेवलेल्या नाग-मल्लीला खांद्यावर घेऊ लागला. तेव्हां आकाशगुहेकडून आरडाओरडा ऐकू आला.

नागगिधाडाने भीत भीत एकदा त्या बाजूला पाहिले व पुजाऱ्याला विचारले—"मालक! शिखीमुखचे अनुयायी गोंड नायकावर हल्ला करीत आहेतसे दिसते! आपण नको का जायला त्याच्या मदतीला?"

"अरे, त्या बदमाष गोंडनायकाच्या मदतीला जायचे म्हणतोस? तोंड बंद कर व मुकाट्याने माझ्या पाठीमागून ये! त्या



गाढवाने मी सांगितल्याप्रमाणे एक काम तरी केले का? त्याला भूतनायकाने दगा दिला. मी मंत्रबळाने दोघांना चकविले आणि नागमल्लीला आपल्या ताब्यात करून घेतले. आतां त्या मूर्खाचा या डोंगरावरून कडेलोट झाला तरी मला फिकीर नाही." पुजारी म्हणाला.

"बिचारा गोंडनायक, चांगला होता हो तो! कदाचित शिखीमुखच्या हाती त्याचे मरण लिहिले आहे." नागगिधाडाची बटबट चालू होती. तो नागमल्लीसकट चटई उचलून घेऊन दोरखंड धरून खाली खोऱ्यात उतरू लागला.



नागगिधाडाला वाटले त्याप्रमाणेच आकाश गुहेजवळ शिखीमुख व त्याच्या अनुयायांनी गोंड नायक व त्याच्या टोळीला घेरले. त्या गडबडीत दोघेतिघे गोंड घायाळ होऊन पडले. शक्य झाल्यास विशेष रक्तपात होऊ न देता नागमल्लीला गोंड लोकांच्या मदतीने सोडवून आणावे, असा शिखीमुखचा विचार होता. म्हणून तो गोंड नायकाला दरडावून म्हणाला– "आपल्या अनुयायांना हातातली शस्त्रे खाली टाकायला सांग! फुकट रक्तपात करण्याची आमची इच्छा नाही. नाग-मल्लीला सोडवून घेऊन जाण्यासाठी आम्ही आलो आहो. तुमच्या केसालाही आमच्या कडून धक्का पोचणार नाही."

"नागमल्लीला एकटीला नाही, त्या दुष्ट पुजाऱ्याला पण आमच्या ताब्यांत दिले पाहिजे!" विक्रमकेसरी गोंड नायकावर भाला रोखून म्हणाला.

गोंड नायक थरथर कापत होता. घाबरट आवाजात म्हणाला–"यात आमचीच चूक. आम्ही पैशाच्या मोहाळा बळी पडून नागमल्लीला धरून आणले. तिच्या बापाकडे पुष्कळ पैसे आहेत. त्याच्याकडून पैसे काढून घेऊन नागमल्लीला परत करण्याचा आमचा विचार होता. पण शेवटी आम्हीच असे तोंडघशी पडलो."

"आता पुढे जे होईल ते आतां तरी लक्षात आले का? चांगले डोळे उघडून पहा! प्रथम हे सांग तो लबाड पुजारी कोठे आहे व तो भूतनायक कोठे आहे? त्यांना तू कोठे लपवून ठेवले आहेस?" असे दटावून विचारीत शिखीमुख गोंड नायक उभा होता तिकडे दोन पावले पुढे गेला.

गोंड नायकाचे सर्व अंग भीतीने थरारले. तो काही बोलणार इतक्यात कुंपणानजीक भूतनायक रडक्या आवाजात ओरडू लागला–"वाघाची गोष्ट विसरलात का? मालक! धावा! मला वांचवा! मला खाणार आहे हा!"

भूतनायकाचा आवाज ऐकून विक्रमकेसरी दोघा तिघा शबरांना बरोबर घेऊन तिकडे धावला. वाघ कुंपणाला टेकून उभा होता. भूतनायक गुडघे टेकून एक विझत आलेले लाकूड त्याला दाखवून स्वतःचा बचाव करीत होता. वाघ ते लाकूड पाहून थोडा भ्याला असावा. एकदम झडप मारण्याची हिंमत होत नव्हती त्याला. फक्त बसल्या बसल्या गुरगुरत होता.

"या भूतनायकाला उद्यां वाघापुढे टाकू. आज त्याची आपल्याला गरज आहे. उचला जळती लाकडे आणि वाघाला पुन्हा पिंजऱ्यात कोंडण्यासाठी घेरा." विक्रमकेसरी म्हणाला.

विक्रमकेसरीचा तो हुकूम कानी पडतांच तीनचार शबर शेकोटयांजवळ धावले व जळती लाकडे घेऊन वाघाला पिंजऱ्यात कोंडण्याच्या प्रयत्नाला लागले. भूतनायक पळून जाऊ नये म्हणून विक्रमकेसरीने दोघां शबरांना त्याच्यावर नजर ठेवण्यास नेमले होते. वाघाने एकदां मोठ्याने डरकाळी फोडली व नंतर कुंपणाला चिकटून हळूहळू चालू लागला. तो पिंजऱ्याजवळ पोंचताच एका शबराने त्याला अडविले. वाघ प्रथम





त्याच्यावर उडी मारण्यास सरसावला, पण भिऊन गुपचूप पिंजऱ्यात शिरला. लगेच विक्रमकेसरीने पिंजऱ्यावर चढून पिंजऱ्याचे दार जोराने बंद केले.

विक्रमकेसरी परत आला तेव्हां भूत नायक भ्रमिष्टासारखा आपले केस उपटून ओरडत काही तरी बडबड करीत होता. विक्रमकेसरीने शबर पाहरेकऱ्याला जवळ बोलावून विचारले–"काय रे बडबड करतो आहे तो? याने पळण्याचा प्रयत्न तर नाही ना केला?"

"मालक! याला वेड लागल्यासारखे दिसते आहे. मी, 'पुजारी कोठे आहे रे?' असे त्याला विचारले, तेव्हां त्याचे लक्ष दुसरेच कोठे तरी होते व तो बडबडू लागला–'तो उचलून घेऊन गेला! मरणार, नक्कीच मरणार!' असे काही तरी तो बडबडतो आहे." तो शबर पाहरेकरी म्हणाला.

विक्रमकेसरीने जवळ जाऊन भूत-नायकाचा खांदा धरून तो हासडला व विचारले–"बोल, कोणाला उचलून नेले? कोण मरणार? नागमल्लीला तू कोठे लपवून ठेवले आहेस?"

तो प्रश्न ऐकून भूतनायक जणुकाही स्वप्नातून जागा झाल्यासारखा विक्रम-केसरीकडे एक टक पहात म्हणाला–"मी नागमल्लीला ज्या झोपडीत लपवून ठेवले होते तेथून तिला पुजारी उचलून घेऊन गेला. मी शिखीमुखाला वचन दिले होते की नागमल्लीला वांचवीन. पण ती आता नाही. ती आता तेथे नाही. शिखीमुख नक्कीच मला वाघाच्या तोंडी देणार." भूतनायक रडकुंडीस येऊन बोलत होता.

भूतनायक म्हणाला ते ऐकून पुजाऱ्याने नागमल्लीला आणखी कोठे तरी लपवून ठेवले असावे असा विक्रमकेसरीला संशय



आला. आकाशगुहेत ती नक्कीच नाही. तो भूतनायकाला धरून शिखीमुख होता तेथे गेला आणि शिखीमुखला भूतनायकाकडून त्याला जे कळले होते ते सांगितले.

रागाच्या भरात भाला रोखून शिखीमुख भूतनायकाला म्हणाला–"ए भूतनायका! तुझे मरण आता जवळ आले आहे. देवाचे नाव घे! तू व तो पुजारी दोघे लबाड भामटे आहां! आम्ही त्याला हुकडले. पण तो आम्हांला कोठे दिसला नाही. बोल, कोठे लपून बसला आहे तो?"

"मालक! प्रभो! तो माझा शत्रू आहे. ही गोष्ट पाहिजे तर गोंड नायकाला विचारून पहा! आपण सांगितले होते तेथेच, त्याच झोपडीत मी नागमल्लीला आणून ठेवले होते. काळोख पडू लागल्यावर त्या दुष्टाला व त्याच्या नोकराला डोंगराच्या बाजूने जातांना मी पाहिले होते. तिकडेच कोठे तरी..." असे म्हणत भूतनायक बोलता बोलता गप्प झाला.

शिखीमुख भूतनायकाची मान धरून त्याला धक्के देत म्हणाला–"चल, दाखव ती जागा! पाय उचल?"

भूतनायक डोंगर चढू लागला. त्याच्या पाठोपाठ शिखीमुख विक्रमकेसरी व शबर



मशाली घेऊन धावले. मशालीच्या उजेडात त्यांना एका मोठ्या खडकाला दोरखंडाचे एक टोक घट्ट बांधलेले दिसले. लगेच खाली वाकून शिखीमुखने ते दोरखंड ओढून पाहिले. ते दोरखंड मजबूत व पिळदार होते. नंतर त्याने दोरखंडाला कान लावून पाहिला व म्हणाला–"या दोरखंडाच्या आधारे पुजारी वगैरे खाली खोऱ्यात उतरत आहेत. यात मला तरी शंका उरलेली नाही."

"तर मग कापून टाक दोरखंड! तो मूर्ख दरीत पडून आपोआप मरेल." गोंड नायक त्याच वेळी धावत तेथे येऊन म्हणाला.











"गोंड नायका! अशी घाई करून चालणार नाही. दोरखंड कापून टाकले तर एकटा पुजारीच नव्हे तर त्याच्या बरोबर नागमल्ली पण मरणार! कारण तिला घेऊन तो चालला आहे." शिखीमुख म्हणाला.

शिखीमुख म्हणाला ते ऐकून काही गोंड लोकांनी आपल्या हातातल्या मशाली दरीत फेकल्या. त्यांच्या उजेडात दोरखंडाच्या आधारे दरीत उतरणारा पुजारी, तो नागगिधाड व त्याच्या खांद्यावर गुंडाळलेली चटई सर्व स्पष्ट दिसू लागले.

"शिखी! बोल, आता काय करू या! तो दुष्ट आपल्या सर्वांच्या देखत आपल्या डोळ्यात धूळ फेकून नागमल्लीला उचलून घेऊन चालला आहे." विक्रमकेसरी म्हणाला.

"मी आणखी एका दोरखंडाच्या मदतीने खाली जातो आणि त्याचा पिच्छा पुरवितो. या दोरखंडाला चार जणांचे वजन कदाचित पेलणार नाही. गोंड नायका! तू लवकर एक दोरखंड आणून दे." शिखीमुख म्हणाला.

गोंड नायकाने त्याप्रमाणे एक दोरखंड दोन तीन मिनिटांत मागवून दिले. शिखीमुखने त्याचे एक टोक खडकाला घट्ट बांधले व दुसरे दरीत सोडले. त्याला धरून तो खाली उतरतांना गोंडांना म्हणाला—"तुम्ही मशाली उजेडासाठी खाली फेकत जा. पण दोरीला किंवा ती धरून उतरणारांपैकी कोणाला मशालीचा जाळ लागता कामा नये!"

गोंड त्या प्रमाणे मशाली फेकू लागले. त्यांच्या उजेडात, पुजारी व नागगिधाड जवळजवळ डोंराच्या पायथ्याला दरीत पोचत असल्याचे शिखीमुखला दिसत होते. शिखीमुख वेगाने सरसर दोर खंडाच्या मदतीने खाली सरकू लागला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# दोन वैद्य

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला आणि झाडावरून प्रेत काढून खांद्यावर ठेवून स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! सामान्य मनुष्य भूत व पिशाच यांच्याशी मैत्री करण्यास धजणार नाही. कोणी तसे साहस दाखविलेच तर त्याचा जीव समीरसारखा धोक्यात पडल्याशिवाय राहणार नाही. तुला कंटाळा येऊ नये म्हणून त्या समीरची गोष्ट सांगतो, ऐक!" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी समीर नावाचा एक वैद्य एका गावी रहात असे. त्या गावी नीहार नावाचा दुसरा एक वैद्य येऊन राहू लागला. दोघांनी परस्पर सहकाराने रोग्यांची चिकित्सा करून जी प्राप्ती होईल ती सारखी सारखी वाटून घ्यायचे ठरविले.



समीरचे लग्न झाले होते. त्याची बायको रूपवती होती. नीहार अविवाहित होता. एकदां त्यांच्याकडे एका लहान आजारी मुलाला लोक घेऊन आले. त्याच्या मानेला एक जखम झाली होती, पण अंगावर रक्ताचे डाग नव्हते. त्याची नाडी मंद पडली होती. त्याचे रक्त वाहून गेल्यासारखे वाटत होते.

नीहारने त्या मुलाला काही शक्तिवर्धक औषधे दिली व त्या मुलाला आपल्याच घरी ठेवून घेतले. तो स्वतः एका कोपऱ्यात धनुष्यबाण घेऊन पाहण्यासाठी लपून बसला. मध्यरात्रीच्या समारास त्याला एक पिशाचीण खिडकीतून आत शिरतांना दिसली. नीहारने तिला एक बाण मारला. तो बाण तिच्या डाव्या मांडीला लागला. तेव्हां ती खिडकी बाहेर उडी मारून निघून गेली.

त्या राक्षसिणीनेच मानेला चावा घेऊन त्या मुलाचे रक्त शोषून घेतले असावे, यात नीहारला संशय उरला नाही.

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर समीरने बायकोला जातांना पाहिले. तिच्या मांडी-जवळ तिच्या लुगड्याला त्याला रक्ताचे डाग दिसले. त्याने बायकोला विचारले–"हे रक्ताचे डाग कसे काय ग?"

ती म्हणाली–"मी पहाटे पाणी आणायला नदीवर गेले होते. कोणीतरी बाण मारला तो मला लागला. विशेष लागले नाही."

समीरने लगेच बायकोच्या जखमेला औषध लावून पट्टी बांधून ठेवली. नंतर नीहारच्या घरी जाऊन मुलाची तब्येत कशी काय आहे, या गोष्टीची चवकशी केली. तेव्हां मुलाला रात्रभर छान झोप लागली असल्याचे नीहारने सांगितले.

समीर आपल्या मित्राला म्हणाला–"अलीकडे गावात काही काही विचित्र अघटित घडते आहे. आज पहाटे माझी बायको पाण्याला गेली होती तेव्हां तिला कोणीतरी बाण मारला व तिच्या मांडीला एक मोठी जखम झाली आहे. मी औषध लावून आलो आहे."

"कोणत्या मांडीला जखम झाली आहे रे?" नीहारने समीरला विचारले.

"कां? डाव्या मांडीला." समीर म्हणाला.

"एक अप्रिय असे सत्य तुझ्या हिताचे म्हणून सांगत आहे. तुझी बायको एक पिशाचीण आहे!" नीहार म्हणाला. बाण मारणारा कोण होता हे मात्र त्याने सांगितले नाही.

समीरचे बायकोवर अपरंपार प्रेम होते. तिच्याविषयी ते अप्रिय सत्य ऐकून त्याला मनस्वी राग आला. तो मोठ्याने ओरडून म्हणाला–"खोटे, सपशेल खोटे."

"माझ्या बोलण्यावर तुझा विश्वास बसणार नाही. पण आज रात्री तू झोपण्याचे सोंग करून तुझी बायको काय करते ते पहात रहा. तुला खरे काय ते आपोआप कळेल." नीहार म्हणाला.

नीहार म्हणाला तसा समीर रात्री झोपण्याचे सोंग करून पडून राहला व बायको काय करते हे पाहू लागला.



मध्यरात्रीच्या सुमारास समीरची बायको हळूच उठली आणि एका पिशाचिणीचे रूप घेऊन खिडकीतून उडी मारून नाहींशी झाली. एका तासाभराने ती परत आली आणि तिला पुन्हां स्वतःचे रूप आले. तिचे तोंड रक्ताने माखलेले होते.

'नीहार म्हणाला ते खरे आहे तर,' समीरची खात्री पटली. उजाडल्यावर तो नीहारच्या घरी गेला आणि म्हणाला–"तू म्हणाला होतास ते खरे ठरले. माझी बायको खरोखरच पिशाचीण आहे. आता काय करू, तूच सांग." त्याने रात्री घडलेले सर्व वृत्त सांगून सल्ला विचारला.



"तिचा गळा दाबून टाक आणि मोकळा हो." नीहार म्हणाला.

"ते नाही माझ्या हातून होणार." समीर म्हणाला. कारण त्याचे बायकोवर इतके प्रेम होते की त्याला ते फार मोठे पापकर्म वाटले.

"तुला ते शक्य नसेल तर मी ते करतो. आज दुपारी तू घराबाहेर कोठे तरी निघून जा." नीहार म्हणाला.

दुपार होण्यापूर्वीच समीर घराबाहेर पडला. त्याला वाटत होते की तो परत येण्यापूर्वीच त्याच्या बायकोचा खून झालेला असणार. याहून जास्त पत्नीद्रोह आणखी काय असणार? नीहारने हे सर्व सांगितलेच नसते तर माझा संसार सुखाचा झाला असता. याशिवाय नीहारची व माझी मैत्री झाली तेव्हांपासून माझे नुकसानच झाले. मला जी प्राप्ती होते तिच्यातली अर्धी त्याला फुकटात मिळते. त्याच्या मैत्रीमुळेच बायको पिशाचीण असल्याचे कळले. मैत्री केलीच नसती तर बायकोचे गुपित मला कळले नसते व हे विघ्न आले नसते.

हळूहळू समीर नीहारचा द्वेष करू लागला आणि थोड्या वेळाने त्याचा कांटाच दूर करण्याचा त्याने मनातल्या मनात निश्चय केला. तो सरळ गावच्या न्यायाधिशाकडे गेला आणि म्हणाला–"महाप्रभो! नीहार माझ्या बायकोचा खून करण्यासाठी माझ्या घरात शिरला आहे. त्याचे गुप्त प्रेम तिच्यावर होते व त्यात त्याला निराश व्हावे लागले." न्यायाधिशाने दोघा तिघां शिपायांना समीरबरोबर त्याच्या घरी पाठवून दिले.

ते समीरच्या घरी पोचले त्याच वेळी नीहार समीरच्या बायकोला ठार करून बाहेर येत होता. शिपायांनी त्याला लगेच अटक केली. समीरने नीहारवर जो आरोप लावला होता तो खरा ठरला.

नीहार समीरला म्हणाला–"मित्रा! तू माझ्याहून जास्त वस्ताद निघालास! तू आपल्या बायकोच्या हातून स्वत:ला सोडवून घेण्यास माझा उपयोग करून घेतलास. दुसरी गोष्ट म्हणजे वैद्यकीच्या धंद्यात मिळणारी सर्व प्राप्ती स्वत:स मिळावी म्हणून माझा कांटा अशा तऱ्हेने दूर करतो आहेस होय ना? ठीक, आपल्या प्रयत्नात तुला यश मिळो!" असे सांगून नीहार मोठ्याने खदखदां हसला व पिशाच रूप घेऊन अदृश्य झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! समीर व नीहार दोघांनी परस्परांना फसविले. यात कोणी कोणाला जास्त फसविले. या शंकेचे समाधान माहीत असून करून दिले नाहीस, तर तुला त्याचा जो परिणाम होईल तो माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"दोघांनी परस्परांस फसविले, परंतु ही फसवणूक निरनिराळ्या प्रकारची होती. स्वत: पिशाच असल्याची गोष्ट नीहारने समीरला सांगितली नाही. वैद्यकीच्या धंद्यात दोघे भागीदार होते. त्या धंद्यात नीहारने समीरला फसविले नाही. समीरची बायको एक पिशाचीण आहे ही गोष्ट कदाचित नीहारला चांगली माहीत होती. पण त्याने ती गोष्ट कधी उघड केली नाही. ज्यावेळी वैद्यकीच्या धंद्यात विघ्न येत असल्याचे त्याला दिसून आले तेव्हां त्याने ती गोष्ट उघड सांगितली. पण पिशाचीण बायकोला ठार करून त्याच्यावर ज्या मित्राने उपकार केला होत त्या मित्राचा द्रोह समीरने केवळ स्वत:च्या स्वार्थासाठी केला. म्हणून त्याचा हा मित्रद्रोह अक्षम्य ठरतो."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)










# खरा पुतळा

एका राजाकडे एकदा दोन शिल्पकार आले. दोघे आपल्या धंद्यात प्रवीण होते. राजाने दोघांची परीक्षा घेण्यासाठी आपल्या मुलीचा पुतळा एकाच तऱ्हेचा करण्यास सांगितले. राजकन्या हातात एक फळांचे ताट घेऊन उभी आहे असे पुतळे दोघांनी तयार केले.

दोन्ही पुतळे एकाच सारखे होते. स्वत: राजकुमारीच हातात फळांचे ताट घेऊन उभी आहे असे पाहणाऱ्याला वाटे. सर्व दरबारी दोन्ही पुतळे पाहून आश्चर्यचकित होऊन म्हणाले– "ही तर राजकन्याच उभी दिसते आहे. सोन्याचे ताट हातात आहे व हातातली फळे कशी ताजीच वाटत आहेत." दोन्ही पुतळे एकसारखे होते. दोघांना ठरलेले बक्षिस सारखे वाटून द्यावे, असे सर्वांचे् मत पडले.

परंतु राजा म्हणाला–"आपण दोन्ही पुतळे सखोल दृष्टीने पाहू या." त्याने दोन्ही पुतळे जवळ जवळ आणून ठेवविले आणि आपल्या पाळलेल्या पोपटांपैकी एकाला पिंजऱ्यांतून सोडले. त्याने एका पुतळ्याच्या हातातल्या फळावर झडप मारली व त्यातली फळे खाण्यासाठी त्यांच्यावर चोच मारू लागला. परंतु हताश होऊन परत उडून पिंजऱ्यात जाऊन बसला.

राजाने दुसऱ्या पोपटाला सोडले. तो देखील निराश होऊन परतला.

सर्व म्हणाले–"त्याच शिल्पकाराची कला अद्वितीय आहे."

"नाही! दुसऱ्याची शिल्पकला जास्त चांगली आहे. मी त्यालाच इनाम द्यायचे ठरविले आहे." सर्व चकित होऊन राजाला त्याचे कारण विचारू लागले.

"पहिल्या पुतळ्यावर पुतळा समजूनच पोपट जाऊन बसले. दुसरा पुतळा पाहून ती स्वत: राजकन्याच आहे असे वाटल्यावरून भीतीमुळे दोघांपैकी एकदेखील तिकडे फिरकला नाही. तुम्ही जवळ जाऊन पहा, दुसऱ्या पुतळ्याच्या डोळ्यात जी चमक आहे ती पहिल्या पुतळ्याच्या डोळ्यात नाही. राजाचा तो निर्णय सर्वांना योग्य वाटला.







# भाटीचे लग्न

सुवर्णगिरीचा राजा जयचंद्र याला चंद्रावती नावाची एक मुलगी होती. राजाचे मुलीवर फार प्रेम होते. तो तिचे सर्व लाड पुरवी. परंतु तिला समजूत कमी होती.

तिने एक भाटी पाळली होती, ती भाटी चंद्रावतीला मैत्रिणीसारखीच वाटे.

चंद्रावतीच्या रूपाचे वर्णन ऐकून तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने अनेक राजकुमारांकडून निरोप येऊ लागले. त्यांच्यापैकी पद्मपुरीचा युवराज जयंत आपल्या मुलीला योग्य वर होईल असे जयचंद्रला वाटले. जयंत देखणा व हुशार होता.

जयचंद्रने लग्नाची गोष्ट काढल्यावर तिच्या भाटीचे लग्न आधी करून देण्याबद्दल मुलीने हट्ट धरला.

"त्यात काय मोठे से? त्याला किती वेळ लागतो? तुझे लग्न ठरले की एका मिनिटात तुझ्या भाटीचे लग्न लावून देतो." राजा म्हणाला.

पण ती अर्धवट मुलगी हट्ट धरून बसली व म्हणाली–"माझ्या भाटीचे लग्न पण एका योग्य बोक्याशीच झालं पाहिजे. असा बोका शोधून आणणाऱ्या राजकुमाराशीच मी लग्न करीन." राजाने अनेक प्रकारे तिची समजूत घालून खुळ्यासारखा हट्ट सोडून देण्यास सांगितले. पण मुलगी ऐकेच ना. म्हणून राजाने मंत्र्याला बोलावून त्याचा सल्ला घेतला.

"राजकन्येला खुष करायला आपण एक नाटक करू या. त्यात आपला हेतू साध्य होईल. मंत्री म्हणाला."

"ते सर्व तूच कर बाबा! मला तर काही सुचत नाही." राजा म्हणाला.

दुसऱ्या दिवशी मंत्र्याने राजधानीभर दवंडी पिटविली आणि त्याच दिवशी

श्री. रमाकांत सावकार

जयंतच्या नावी एका दूताच्या हाती पद्मपुरीला एक निमंत्रण पत्र पाठविले. दवंडी पिटविली, त्यातला मजकूर असा होता–"राजकन्येच्या भाटीला योग्य वर असा बोका घेऊन येणाऱ्या राजकुमाराशी राजकन्या लग्न करण्यास तयार आहे."

दवंडी राजकन्येला ऐकू जाईल अशा तऱ्हेने पिटविण्यात आली. राजकन्या दवंडी ऐकून खूष झाली.

राजधानीतले अनेक तरुण एकेक बोका घेऊन राजवाड्यात आले. मंत्र्याने एकेकाला बोलाविले व म्हणाला–

"बाळ! मी एक गोष्ट तुला प्रथमच सांगून ठेवतो, तेवढे लक्षात ठेव म्हणजे झाले. तुझा बोका राजकन्येच्या भाटीला योग्य वर आहे की नाही हे स्वतः राजे-सरकार, राणी सरकार व राजकन्या तिघे मिळून ठरविणार आहेत. या तिघांपैकी एकाने देखील तुझा बोका योग्य वर नाही असे सांगितले तर तुझे डोके उडविण्याची जबाबदारी राजे सरकारांनी माझ्यावर टाकली आहे. म्हणून ठीक विचार करून काय ते ठरव."

ते ऐकून एकेक करून सर्व तरुण आपापला बोका घेऊन घरी परतले.



असल्या राजकन्येशी लग्न करण्याची दुर्बुद्धी आपल्याला कोठून झाली याबद्दल ते पश्चात्ताप करू लागले.

आपल्या भाटीला योग्य वर घेऊन येणारा एक देखील तरुण येत नाही हे पाहून राजकन्येला फार वाईट वाटू लागले. तेव्हां राजा तिला म्हणाला–"मुली! अशी घाबरून जाऊ नकोस. घाई केल्याने का काम भागते? अग, तुझी भाटी म्हणजे सामान्य जातीचे मांजर आहे का? तेव्हां थोडा उशीर झाला तरी तिला योग्य वर खात्रीनेच मिळेल."

एका आठवड्याने जयंत पद्मपुरीहून आला. त्यापूर्वीच मंत्र्याने एक सुंदर बोका आणून त्याला खूप साय व लोणी खायला घालून त्याच्या अंगालापण लोणी चोळून ठेवले. त्या बोक्याला जयंतच्या हातात देऊन त्याला बरोबर घेऊन चलायला मंत्र्याने सांगितले आणि जयंतला व बोक्याला घेऊन तो राजवाड्यात आला.

राजकन्येने आपल्या भाटीला बोक्या-जवळ नेऊन ठेवतांच ती बोक्याचे अंग चाटू लागली. चंद्रावतीला परमानंद झाला ती आनंदाच्या भरात टाळ्या वाजवून म्हणाली–"माझ्या भाटीला काय पण योग्य वर मिळाला पहा!"

"हा बोका हेच घेऊन आले." असे म्हणत मंत्र्याने चंद्रावतीची जयंतशी ओळख करून दिली.

देवाने मला सुद्धा योग्य पतीच निवडून दिला आहे, असे मनातल्या मनात म्हणत चंद्रावतीने आपल्या वडिलांना आपली संमती कळविली.

मंत्र्याने केलेली युक्ती उपयोगी पडली व चंद्रावतीच्या इच्छेप्रमाणे तिला नवरा मिळाला आणि राजाला पण तो मुलगा आवडला.

जयंत चंद्रावतीचा लग्नसमारंभ मोठ्या थाटामाटाने पार पडला.





# भविष्यवाणी

एका गावी अनंताचारी नावाचे एक वैद्यबुवा रहात असत. वैद्यकशास्त्राची त्याला विशेष माहिती नव्हती. परंतु कोणी गरोदर स्त्री आली की तिची नाडी पाहून तो तिला मुलगा होईल की मुलगी हे अचूक सांगत असे.

वैद्यबुवांची कीर्ती त्यांच्या गावातच नव्हे, तर जवळपासच्या पंचक्रोशीत पसरली होती. वैद्यबुवांनी ज्या ज्या गरोदर स्त्रीची नाडी परीक्षा करून तिला मुलगा होईल की मुलगी सांगितलेले असे तिचे नांव गांव व तिला ज्या दिवशी व ज्या घटकेला त्यांनी तपासले असे ते एका रोजनिशीत ते स्वतःच टिपून ठेवीत. त्यांच्याकडे येणारी प्रत्येक स्त्री रिकाम्या हाताने वैद्यबुवांकडे येत नसे. पैसे, फळे किंवा कापड, जे काही तिला आणता येई ते ती बरोबर आणी. गरीब शेतकऱ्याच्या बायका भाजीपालाच आणून देत व वैद्यबुवांना नमस्कार करीत. वैद्यबुवा सांगत त्याप्रमाणे मूल झाल्यावर मुलाच्या बारशाच्या दिवशी त्या बाईच्या घरची मोठी मंडळी वैद्यबुवांना आदरपूर्वक बोलावून आणीत–आणि त्यांना धोतरजोडा व उपरणे देऊन त्यांचा सत्कार करीत.

कधी अनंताचारीचे भविष्य चुकीचे ठरे तेव्हां लोक त्याला विचारीत की काय हो तुम्ही सांगितलेले भविष्य चुकीचे निघाले की तो आपली रोजनिशी काढून त्यात त्याने काय लिहून ठेवले आहे ते दाखवी व आपले भविष्य खरे निघाल्याचे पटवून देई.

अशीच काही वर्षे लोटली. अनंताचारीच्या बायकोलाच दिवस राहले. तिने नवऱ्याला विचारले–"आता आपल्याला पण मूल होणार. माझी नाडी पाहून मुलगा होणार की मुलगी सांगता का?"

"हे कशाला हवं आहे आपल्याला? अपत्यच इतके दिवस नव्हते. आता मुलगा होवो की मुलगी, मला तरी त्यात सारखाच आनंद वाटेल." अनंताचारीने बायकोची समजूत घालण्याचा यत्न केला.

"असं काय म्हणता? आतापर्यंत तुम्ही हजारो गरोदर बायकांना मुलगा होणार की मुलगी हे सांगितलेत आणि आतां मीच विचारते आहे तर ते सांगायला काय हरकत आहे?" बायको म्हणाली.

बायकोच्या आग्रहाला मान देऊन अनंताचारीने बायकोची नाडी तपासली, पण उत्तर काहीच दिले नाही. गप्प बसून राहला. तेव्हां त्याची बायको म्हणाली–"असे काय हो गप्प आहांत, बोला ना!"

"काय सांगू? आपलीच मान खाली होणार! तुला मुलगी होणार आहे." अनंताचारी म्हणाला. बायकोच्या मनात मुलगाच व्हावा असे फार होते. पूर्वी ज्या ज्या बाईला त्याने मुलगी होईल असे भविष्य सांगितले होते. तिच्या कपाळाला आठ्या पडलेल्या त्याने पाहिल्या होत्या.

मुलगी होणार आहे, हे सांगण्यात अनंताचारीच्या बायकोला कमीपणा वाटे. म्हणून कोणी विचारले की काय हो यजमानांनी काही भविष्य सांगितले का? की ती












शांतपणे व उत्तर देई–"नाही बाई, मी नाही आपली नाडी दाखविली."

यथासमयी अनंताचारीची बायको प्रसूत होऊन तिला एक सुंदर मुलगा झाला. अनंताचारीला, बायको भविष्य खोटे ठरल्याचे सांगणार या गोष्टीची भीती वाटू लागली. तिला काय उत्तर द्यायचे याविषयी तो विचार करू लागला.

शेवटी एकदां तिने नवऱ्याला विचारलेच– "काय हो, तुम्ही जगातल्या कित्येक स्त्रियांचे भविष्य कसे अचूक सांगितलेत आणि मी विचारल्याबरोबर अशी कां तुमची तिरपीट उडून गेली?"

अनंताचारीचे तोंड फिक्के पडले. म्हणाला–"आजवर मी जे भविष्य सांगितले ते खरे निघत गेले असे का तुला वाटते?"

"सर्व म्हणतात, तुम्ही सांगितलेले भविष्य खरेच निघाले!" बायको म्हणाली.

"अग, लोक खुळे आहेत. मला ज्या ज्या बाईने येऊन नाडी दाखविली तिला मी, तोंडाला आले ते भविष्य सांगितले. कधी मुलगा तर कधी मुलगी! ती बाई गेल्यावर मी आपल्या रोजनिशीत ठीक उलटे भविष्य लिहून ठेवी. मी सांगितले तसेच मूल, म्हणजे मुलगा किंवा मुलगी झाली तर प्रश्नच नाही. पण त्याच्या उलट झाले व कोणी येऊन विचारले की काय हो, असे कसे काय झाले? तर मी त्यांना रोजनिशी प्रमाण म्हणून काढून दाखवी. त्यांना वाटे की त्यांनी ऐकले तेच चूक होते. लोकांचा हा खुळेपणा नाही तर काय? मुलगा होणार की मुलगी, हे सांगणारा वैद्य आजपर्यंत जन्मालाच नाही, या जगात." अनंताचारी बायकोला आपल्या भविष्यवाणीचे गुपित सांगून टाकून मोकळा झाला.





# मोहनमाळ

एका गावी एका गृहस्थाला पुष्कळ मुले होती. मोठ्या मुलाचे नाव रामू होते. रामू स्वभावाने आळशी व भित्रा होता. इतर मुले बापाच्या कामात थोडाफार हातभार लावीत, पण रामू एक देखील काम करीत नसे. म्हणून रामूवर बापाचा राग होता. बरेच दिवस गम खाऊन एके दिवशी बाप त्याला म्हणाला–"बैला सारखा दिवसभर चरत असतोस. बैल देखील काम करतो, पण तू?"

बापाने असे म्हटल्यावर रामू खांद्यावर एक कांबळे टाकून कोणाला काही सांगितल्या शिवाय घराबाहेर पडला. पाय नेतील तिकडे तो जात होता. काळोख पडू लागला तेव्हां आपण एका जंगलात असल्याचे त्याच्या लक्षात आले. सुदैवाने त्याला एक मोठे झाड दिसले. त्याला एक मोठी पोकळी होती. तो त्या पोकळीत कांबळे पांघरून झोपला.

मध्य रात्रीच्या सुमारास त्याला काही तरी आवाज ऐकू आला. तोंडावरचे पांघरूण थोडे बाजूला सारून त्याने बाहेर पाहिले. समोर दोन चोर दिव्याच्या उजेडात दागिने वांटून घेत असलेले त्याला दिसले.

एक चोर हिऱ्याचा हार हातात घेऊन म्हणाला–"हा एक हार एकाच्या वांट्याचा व उरलेले सर्व दागिने दुसऱ्याच्या वांट्याचे. हा रत्नहार मी राजकन्येच्या गळ्यातून काढून आणला. राजकन्या झोपली होती. तिला मी केव्हां हार काढून घेतला, कळले सुद्धा नाही. माझे नशीब बलवत्तर नाहीतर आज माझा जीवच जायचा!"

चोरांच्या बोलण्यावरून रामूला ती चोरी राजवाड्यात झाली असल्याबद्दल शंका उरली नाही.

रामू त्या सर्व गोष्टी बद्दल आश्चर्य करीत असता त्याला एकाएकी अशा किती









तरी शिका आल्या. एका मागून एक चोरांनी भीत भीत त्या बाजूला पाहिले तेव्हां त्यांना काळे कांबळे दिसले.

"बाप रे बाप, अस्वल आहे अस्वल!" दोघे ओरडत दागिने तेथेच जसेच्या तसेच टाकून जीव घेऊन पळून गेले.

रामू उतरून खाली आला. दागिन्यांचे गाठोडे बांधून घेतले आणि विचार करू लागला, राजाला दागिने चोरीस गेल्याचे कळल्यावर किती वाईट वाटले असेल? आणि त्याला हे मिळाले तर किती आनंद होईल? असा विचार करून तो ते गाठोडे घेऊन राजवाड्याकडे निघाला. छान उजाडले होते. त्याने पाहरेकऱ्याला, महाराजांना भेटायचे आहे असे सांगितले.

पाहरेकऱ्याने रामूकडे न्याहाळून पाहिले. राजाला भेटायला येणारा हा खेडवळ कोण? त्याला आश्चर्यच वाटले. म्हणून त्याने त्याला विचारले—"काय रे, राजाला भेटायला येणारा कोण रे तू?"

"राजवाड्यात चोरी झाली होती. दागिने चोरीला गेले होते. ते दागिने मी घेऊन आलो आहे. स्वतः सरकारांकडे द्यावे म्हणून आलो आहे." रामू म्हणाला.

पाहरेकऱ्याने लगेच दुसऱ्या एका पाहरेकऱ्याला बोलावून त्याला पाहऱ्यावर उभे केले व रामूला बरोबर घेऊन आपल्या घरी गेला. तो रामूला म्हणाला—"सरकार स्वारी शिकारीला गेली आहे. तू खाऊन पिऊन घे व थोडा आराम कर. सरकार स्वारी आल्याबरोबर मी तुला बोलावून घेऊन जाईन."

भोळ्या रामूला पाहरेकरी म्हणाला ते खरे वाटले. पाहरेकऱ्याने त्याला जेवायला वाढले त्यांत भूल येणारे औषध टाकले होते. जेवण होताच रामू बेशुद्ध झाला. पाहरेकऱ्याने त्याच्या जवळचे दागिन्यांचे गाठोडे लपवून ठेवून दिले व रामूला रानात





एका निर्जन जागी नेऊन ठेवून तो परत आपल्या कामावर निघून गेला.

संध्याकाळच्या सुमारास रामूला शुद्ध आली. हळूच उठून कोठे निवाऱ्याची जागा दिसते का पाहू लागला. तेव्हां त्याला एक म्हातारीचे झोपडे दिसले. त्याला तहान लागली होती. तो झोपडीत गेला म्हातारीने त्याला प्यायला पाणी दिले. त्याने घडलेली गोष्ट म्हातारीला सांगितली. म्हातारी म्हणाली—"तू तर चांगला गुणी मुलगा दिसतो आहेस. मग तुला बापाची बोलणी कां ऐकावी लागतात? माझ्या घरी राहतोस का? मी तुला आपला नातू मानून तुला जेवायला खायला वाढीत जाईन."

रात्री पाहरेकरी घरी परत आला तो पर्यंत त्याच्या बायकोने दागिन्यांचे गाठोडे सोडून पाहिले होते. त्यात दागिने पाहून तिला फार आनंद झाला. तिने हिऱ्यांची माळा आपल्या गळ्यात घालून पाहिली. तिला ती फार आवडली. त्याच वेळी पाहरेकरी आला. बायकोच्या गळ्यात ती मोहनमाळ पाहून तो म्हणाला—"अग, हे सर्व दागिने राजवाड्यातले आहेत. ही मोहनमाळ कोणाच्या नजरेस पडली तर तुला व मला फाशी होईल."

"मी घरातच ही माळ घालणार आहे. चुकून सुद्धा बाहेर जाणार नाही." पाहरेकऱ्याची बायको म्हणाली. रात्रभर तिच्या गळ्यातच ती माळा होती. दुसऱ्यादिवशी आंघोळीला जातांना तिने ती एका जागी काढून ठेवली. थोड्या वेळाने तिचा तीन वर्षांचा मुलगा नेमका तेथे आला व ती माळा घेऊन काहीतरी खात घराबाहेर आला. तेवढ्यात तेथे एक कावळा आला आणि मुलाच्या हातातली ती माळा घेऊन उडून गेला. तो कावळा उडत उडत येऊन म्हातारीच्या झोपडीवरच बसला. रामू त्यावेळी बाहेर बसलेला होता. त्याला










कावळ्याच्या चोचीत काहीतरी चकचकीत वस्तू दिसली. थोड्यावेळाने तो उडून गेला तेव्हां त्याच्या चोचीत ती माळा नव्हती. रामूने झोपडीवर चढून ती मोहनमाळ खाली काढून आणली.

ती माळा घेऊन तो पुन्हा राजवाड्यात गेला. मुख्यद्वारावर तोच पाहरेकरी उभा होता. त्याला तो म्हणाला–"काल सरकार स्वारी शिकारीला गेली होती. आज तू ते दागिन्यांचे गाठोडे राजाला नेऊन दिले असशील नाही? पण ही पहा, त्या गाठोड्यातली माळा. कावळा घेऊन आला होता."

पाहरेकरी चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागला. दुसऱ्या क्षणाला काहीतरी सुचल्यासारखा तो मोठ्याने "चोर चोर" म्हणून ओरडू लागला व त्याने रामूला एका हाताने धरले. राजाचे शिपाई धावले. त्यांनी रामूला चारीबाजूनी घेरले. पाहरेकरी त्यांना म्हणाला–"हा पहा चोर! याने राजवाड्यात शिरून चोरी केली आहे. ही पहा, मोहनमाळा!"

राजाच्या शिपायांनी रामूला कैद करून राजासमोर हजर केले. रामूने घडलेले वृत्त जसेच्या तसे राजाजवळ निवेदन केले. राजाने पाहरेकऱ्याची लबाडी ओळखली. त्याने आपल्या शिपायांना ताबडतोब त्या पाहरेकऱ्याच्या घरी पाठवून त्याच्या घराची झडती घ्यायला सांगितले तेथे राजवाड्यात झालेल्या चोरीतले सर्व दागिने सापडले.

राजाने त्या पाहरेकऱ्याला कैदेत टाकले व रामूला मोठे इनाम देऊन त्याला आपल्या दरबारात मोठी नोकरी दिली. रामूला जे इनाम मिळाले ते त्याने म्हातारीला नेऊन दिले. म्हातारीने चांगलेसे घर विकत घेतले व रामूबरोबर त्या घरात सुखाने राहू लागली.





# फिर्याद

फार पूर्वी धर्मवर्धन नावाचा एक न्यायशील राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्याच्या एका कोपऱ्यातल्या गावी दंडी नावाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याची लहानशी शेतीभाती होती. एकदां त्याने आपले शेत नांगरण्यासाठी एका शेतकऱ्याकडे जाऊन त्याचे बैल मागून आणले. शेत नांगरून झाल्यावर दंडी बैलांना घेऊन त्या शेतकऱ्याच्या घरी गेला. त्या वेळी तो शेतकरी जेवायला बसणार होता. त्याने बैल आणलेले पाहिले होते. दंडीने विचार केला, शेतकरी जेवायला बसणार आहे, त्याला कशाला त्रास द्यावा? त्याने बैलांना त्या शेतकऱ्याच्या गोठ्याजवळ जायला म्हणून सोडले आणि आपल्या घरी निघून गेला.

शेतकरी खाऊन पिऊन बाहेर येऊन पाहतो तर बैल जागेवर नव्हते. तो तसाच दंडीच्या घरी गेला व 'बैल कोठे आहेत रे' म्हणून त्याला विचारले.

"मी तुझ्या गोठ्याजवळ सोडले होते, कोठे गेले आता मला काय माहीत?" शेतकरी म्हणाला.

"ते सर्व नाही मला माहीत. माझे बैल परत आणून दे." शेतकरी त्याच्याशी भांडू लागला.

"मी तुझ्या बैलांना परत तुझ्या घरी पोचविले ते तू पाहिले होतेस. मी काय त्यांना आपल्या घरात चोरून आणून ठेवले आहे का? येऊन पहा, पाहिजे तर घरात." दंडी म्हणाला.

"मला ते सर्व काही नको. मला माझे बैल परत आणून दे. नाही तर, चल राजाकडे. तोच काय तो न्याय निवाडा करील."

शेवटी नाइलाजाने दंडीला त्या शेतकऱ्याबरोबर राजाकडे जावे लागले.











वाटेत एक नदी लागली. एक सुतार आपला वसुला दातात धरून नदीतून पोहोत येत असलेला त्यांना दिसला.

"काय रे नदीत पाणी जास्त आहे का?" दंडीने त्या सुताराला विचारले.

"खोल पाणी नसते तर मला पोहात येण्याची गरजच काय होती?" सुताराने विचारले.

बोलण्यासाठी तोंड उघडल्यामुळे तोंडात धरलेला वसुला पाण्यात पडून तळाशी गेला.

"पहा, तुझ्यामुळे माझा वसुला नदीत बुडाला मला दुसरा वसुला आणून दे." सुतार म्हणाला.

"अरे, पण त्यात माझी काय चूक? तोंड उघडलेस म्हणून वसुला पाण्यात पडला. त्याला आता मी काय करू?" सुताराने विचारले. "तू विचारलेस म्हणून मला उत्तर द्यावे लागले. तू वसुला देतोस की नाही सांग, नाही तर मी राजाकडे फिर्याद करतो." सुतार धमकी देत म्हणाला.

"आम्ही राजाकडेच जातो आहो, तू पण चल." शेतकरी सुताराला म्हणाला. तिघे मिळून आणखी थोडे पुढे गेले. त्यांना एक धनगर व त्याच्या बकऱ्या व मेंढरे दिसली. बकऱ्या व मेंढरे झाडाखालीच उभी राहून चरत होती.



"काय रे धनगरदादा! समोर एवढे हिरवेगार कुरण असता तुझ्या बकऱ्या झाडाखाली उभ्या राहून कां रे चरत आहेत?" दंडीने त्या धनगराला विचारले.

"मला नाही माहीत! त्यांना झाडाखालीच चरणे आवडते. त्याचे कारण फक्त राजाला माहीत आहे." धनगर म्हणाला.

"ठीक, मी राजाला विचारून कारण सांगतो." दंडी म्हणाला. आणखी पुढे गेल्यावर त्यांना एका वारुळाजवळ एक मनुष्य उभा असलेला दिसला. "कां रे तू या वारुळाजवळ उभा राहून त्या बिळात इतके लक्ष देऊन काय पाहतो आहेस?" दंडीने विचारले.

"या बिळातून थोड्या वेळापूर्वी एक साप आला. परंतु परत आत जातांना तो अगदी हळू हळू सरकत आत चालला होता. मला याचे कारण नाही समजले." तो मनुष्य म्हणाला.

"त्याचे कारण कदाचित राजालाच माहीत असेल!" दंडी म्हणाला.

त्यानंतर ते सर्व राजाकडे गेले. राजा धर्मवर्धन शेतकऱ्याची फिर्याद ऐकून त्याला म्हणाला—"दंडी बैलांना घेऊन आलेला तू पाहिले होतेस. पण तू त्यांना बांधून ठेवले नाहीस की ठेवविलेस नाहीस. म्हणून मी तुझे डोळे काढवतो. दंडीने तुला हे नाही



सांगितले की बैलांना गोठ्यात सोडून जातो आहे. म्हणून त्याची जीभ कापून टाकायला सांगतो. आहे ना कबूल तुला?" राजाने शेतकऱ्याला विचारले.

"नको महाराज! मी बैलांना हुडकून काढतो व आपली फिर्याद मागे घेतो."

नंतर राजाने सुताराची फिर्याद ऐकून विचारले–"तोंडात वसुला असून तू बोललास. त्या चुकीबद्दल मी तुझी जीभ उपटून काढवतो. तू पोहोत होतास हे पाहिले होते तरी पाणी खोल आहे का हें दंडीने विचारले. म्हणून मी त्याचे डोळे काढवतो आहे ना कबूल?"

सुताराने घाबरून आपली फिर्याद मागे घेतली.

त्यानंतर दंडीने राजाला विचारले–"एका झाडाखाली काही बकऱ्या चरत होत्या. त्या जागेपेक्षा चांगला चारा बाजूला होता. तरी बकऱ्या झाडाखालीच चरत होत्या. त्याचे कारण त्यांना चरायला नेणाऱ्या धनगराला पण माहीत नाही."

त्या झाडावर मधाची पोळी होती. त्यांतून मध गळत होता. म्हणून बकऱ्या तेथेच चरत होत्या. लवकरच त्या झाडावरची पोळी काढवतो म्हणजे बकऱ्या कुरणात चरू लागतील." राजा म्हणाला.

"आणखी एक विचित्र गोष्ट पाहिली महाराज! एका वारुळातून एक साप सरसर बाहेर आला, पण वारुळात परत जाते वेळी हळू हळू गेला. त्याचे काय कारण असावे?" दंडीने राजाला विचारले.

"तो भूक लागल्यावर बाहेर येतो. पोट भरून खातो, म्हणजे गिळतो. म्हणून परत जाते वेळी त्याला त्रास होतो. राजाने कारण सांगितले. त्यानंतर दंडी, शेतकरी, सुतार वगैरे त्यांच्या मनाचे समाधान झाल्यावर त्याचा निरोप घेऊन राजाच्या चातुर्याची प्रशंसा करीत आपापल्या घरी परतले.





# न उलगडलेले कोडे

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. तो चिक्कू मारवाडी होता. त्याच्या घरी पुष्कळ काम असे. दोन माणसे कामाला असली तरी काम पुरे होणे शक्य नव्हते. परंतु तो श्रीमंत मनुष्य नोकर ठेवायला तयार झाला नाही. त्याला एकच एक मुलगी होती. तिच्याकडून सर्व काम करून घेई. कधी बाहेर कामाला नोकर ठेवलाच तर त्याच्याकडून कसून काम करवून घेई आणि त्याला पुरी मजुरी देत नसे. महिना संपल्यावर नोकराने पगार मागितला की तो म्हणे–"अरे, तुला जेवायला घालतोच आहे. पगाराची गरजच काय? तू माझ्याकडची नोकरी सोडून निघालास की देईन तुझा सगळा पगार एकदम."

त्या श्रीमंताच्या घरी काही लोक फुकटची नोकरी करायला येत देखील नसत. काही लोक पदरात पडली ती दोन तीन महिन्यांची मजुरी घेऊन निघून जात.

एकदा रघू नावाचा एक भोळाभावडा तरुण नोकर त्याच्या घरी नोकरी मागायला आला. त्या श्रीमंताने त्याला नोकर म्हणून ठेवून घेतले. धन्याने किती कठीण काम सांगितले तरी तो सहज करून टाकी. त्याला आईवडील कोणी नव्हते. त्याचे लग्न पण झाले नव्हते. त्याचे काम पाहून पहिल्याच दिवशी तो श्रीमंत मनुष्य खूष झाला. तो त्याला म्हणाला–"काय रे रघू! तुला घरचे कोणी नाही, मग रहा आमच्याच घरी. तुला दोन वेळचे जेवण व कपडे देत जाईन आणि वर पगार दहा रुपये दर महिन्याला देत जाईन."

रघू कबूल होऊन नोकरीला लागला. त्याने महिनाभर काम करून आपला पगार मागितला. त्या वेळी तो श्रीमंत मनुष्य

काही प्रमुख गावकऱ्यांशी त्या वेळी बोलत होता. तो म्हणाला–"अरे खुळ्या! पगार मागायची ही वेळ का. समज, मी आतांच देऊन टाकला पगार तर तू काय करणार? तुझे लग्न होईल तेव्हां मागितलेस तर चार पैसे जमा तरी होतील. म्हणून तुझ्या पगाराचे पैसे मी जमा करीत जाईन. एकदम मोठी रक्कम मिळाली तर उपयोगी तरी पडेल." तो श्रीमंत जे म्हणाला ते बरोबर असल्याचे गावकरी पण म्हणाले.

इतक्या लोकांसमक्ष धन्याने सर्व पगार जमा करून ठेवून एकदम लग्नाच्या वेळी देतो हे कबूल केले आहे तेव्हां नक्कीच मिळेल असा विचार करून नोकर काहीच बोलला नाही. काही दिवसांनंतर रघूला दिसून आले की मालक फक्त त्याच्या कडूनच कसून काम करवून घेत नाही तर आपली एकुलती एक मुलगी गिरिजा हिच्याकडून सुद्धा खूप काम करवून घेतो. तिला एक क्षणभरदेखील विश्रांती मिळत नाही. मुलगी दोन नोकरांचे काम करी. तिचे लग्न करून दिले तर आणखी दोन नोकर ठेवायला लागतील, म्हणून तो श्रीमंत मनुष्य मुलीचे लग्न पण टाळीत होता.

रघू गिरिजाच्या कामात सुद्धा हातभार लावू लागला. दोघे परस्परांच्या मेहनती



स्वभावाचे कौतुक करीत व परस्परांच्या कामात मदत करीत. हळूहळू त्यांचे परस्परांवर प्रेम जडले.

एकदा गिरिजा रघूला म्हणाली–"तुम्ही पगार बाबांकडे जमा करून ठेवीत आहां. परंतु त्यांच्या हातून पैसा सुटेलसे मला नाही वाटत. जिवापलीकडे त्यांना पैसा वाटतो. तुम्हांला तेव्हां सुटका नाही व मला पण नाही. आपले लग्न झाले तर दोघांना सुटका मिळेल. म्हणून तुम्ही, लग्न करावयाचे आहे असे सांगून बाबांच्याकडून पैसे मागून घ्या आणि निदान आपली सुटका करून घ्या."

"पण माझे लग्न कोठे ठरले आहे. मी अजून मुलगी सुद्धा पाहिली नाही." रघू म्हणाला.

"ते सर्व बाबांना सांगण्याची गरजच काय आहे? पगार घेऊन तुम्ही आपली प्रथम सुटका करून घ्या. लग्न करायला मुलगी का मिळणार नाही. तुमच्यांत कोणत्या गोष्टीची उणीव आहे." गिरिजा म्हणाला.

"बरे तर मी आज मागतो." रघू म्हणाला.

त्याप्रमाणे एकदां रघू मालकाला म्हणाला–"मालक! मी कामाला लागून














दहा महिने झाले. माझे लग्न ठरले आहे. म्हणून माझ्या पगाराचे पैसे द्यावे. पगाराचे ठीक शंभर होतात. ते तुम्ही द्यालच. लग्न कार्याला थोडा खर्च जास्तच होईल म्हणून दहा वीस जास्तच द्या. पगारातून कापून घ्या."

आता इतका चांगला नोकर काही दिवस कामावर राहणार नाही हे पाहून मालकाला फार वाईट वाटले पण वरकरणी हंसून म्हणाला—"वा रे वा! आम्हांला कोणाला काही कळलेच नाही, आणि केव्हां रे लग्न ठरवून टाकलेस? देतो बरं तुझा पगार!"

नंतर त्याने रुपयांची थैली काढली व एकेक रुपया जमिनीवर ठेवीत विचारले—"कोण रे मुलगी पाहिली आहेस? आणि केव्हां पाहिलीस?"

"रोजच पाहतो आहे. तुमचीच मुलगी!" रघू लाजत लाजत म्हणाला.

मालकाचा हात जागच्याजागी थांबला. त्याने आतल्या दाराकडे पाहिले. तेथे मुलगी उभी होती. त्याने मुलीला विचारले—"होय ग, तू होकार दिलास का?"

गिरिजा स्मित करून "हे काय हो बाबा!" असे म्हणत घरात पळून गेली. सूज्ञ बापाला सर्व कळले. त्या श्रीमंत माणसाच्या तोंडावर स्मित झळकले. त्याने बाहेर काढलेले रुपये पुन्हां थैलीत ठेवले व म्हणाला—"मी तरी नकार कां देईन बरं तर मी बोलावतो भटजींना आणि ठरवतो मुहूर्त."

दुसऱ्याच महिन्यात रघू व गिरजाचे लग्न झाले. आता नोकर जावई झाला. आतां त्याला पगार भत्ता काही देण्याची गरजच नाही. गिरजा नेहमीसारखे घरातले काम पाही व जांवई बाहेरचे काम पाही. 'मालक' खूष व 'नोकर' पण खूष. घरात सर्वत्र आनंदी आनंद.





# पाहुणा

मलकापुराहून गोपाळपुरास जाण्याच्या वाटेवर कित्येक गावे लागतात. त्यात ब्राह्मणवाडी नावाचे एक गाव होते. त्या गावी रामशर्मा नावाचा एक गरीब ब्राह्मण रहात असे. एकदां संध्याकाळी रामशर्माला मलकापूरच्या इनामदारांच्या घरी गांव-जेवण असल्याचे कळले.

रामशर्माची पहाटेच झोंप मोडली. आंघोळ संध्या वगैरे आटोपून तो मलकापूरला जाण्यासाठी निघाला. दोन कोस चालून गेल्यावर लक्ष्मणपूर गाव लागले. तेथे काही ब्राह्मण मंडळी समोरून येत असलेली भेटली.

रामशर्माने चकित होऊन त्यांना विचारले—"काय हो! मलकापूरच्या इनामदारांच्या घरी आज ब्रह्मभोज आहे, तुम्ही उलट्या वाटेने कोठे निघालात?"

"अहो, तुम्हांला कळले नाही का, गोपाळपूरच्या इनामदारांच्या घरी त्यांच्या मुलीचे लग्न आहे. त्यांच्याकडे जेवणच काय वर मोठी दक्षिणा पण मिळणार आहे." ब्राह्मणमंडळी रामशर्माला म्हणाली.

रामशर्मा विचारात पडला. काही तरी मनाशी ठरवून त्या ब्राह्मणमंडळींबरोबर परत गोपाळपूरला निघाला. तो एक कोस चालत गेला असेल, त्याला ब्राह्मणांची एक मोठी गर्दी दिसली.

"काय हो, गोपाळपूरला ब्रह्मभोज आहे व वर दक्षिणापण मोठी मिळणार आहे, तुम्ही सर्व तिकडे का नाही जात?" रामशर्माने त्यांना विचारले.

"दक्षिणाच म्हणाल तर मलकापूरच्या इनामदारांचा हात धरू शकणारा एक देखील यजमान आपल्या पंचक्रोशीत नाही! गाड्या भरभरून फणस मागविले आहेत. गोपाळपूरच्या इनामदाराकडची दक्षिणा मलकापूरच्या इनामदाराकडच्या फणसांच्या

बरोबर देखील नाही." असे सांगून ती ब्राह्मणमंडळी पूर्वेकडे निघाली.

रामशर्मा मनातल्या मनात पश्चात्ताप करू लागला, आपण केवढी मोठी चूक केली? आपण मलकापूरला आतापर्यंत पोचलो सुद्धा असतो. दक्षिणा आणि चांगले जेवण हातचे गेले. असा विचार करून तो मलकापूरच्या वाटेने चालू लागला.

आणखी एका तासाभराने त्याला समोरून ब्राह्मणमंडळी ढेकरा देत परत येत असलेली दिसली. त्यांनी रामशर्माला पाहून विचारले–"काय हो! कोठे निघालात? मलकापूरची जेवणावळ संपली. आजपर्यंत जन्मात अशी बासुंदी खायला नव्हती मिळाली. जेवण असावं तर असं!"

रामशर्माला काय करावे, हे सुचेना. निदान गोपाळपूरचे जेवण तरी पदरात पडते का पाहू या असा विचार करून तोपरत फिरला.

तो आपल्या गावी पोचला तोपर्यंत सर्व ब्राह्मणमंडळी गोपाळपुराहून जेवून परत आली होती. त्यांनी त्याला विचारले– "काय हो, तुम्ही मलकापूरला गेला होता वाटते, जेवायला? तेथे जेवण चांगले दिले इनामदाराने, कळले आम्हांला. पण गोपाळपूरचे जेवण तरी काही विचारूच नका. अहो पुरणपोळी होती व द्रोण भरभरून तूप वाढले होते. तिथले इनामदार मलकापूरच्या इनामदाराची बरोबरी करू शकणार नाहीत कदाचित, पण त्यांनी दक्षिणामात्र खूप दिली होती."

"जेवणे चालू आहेत का अजून?" रामशर्माने घाबऱ्या स्वरात विचारले.

"आमची पंगतच शेवटची होती." ब्राह्मणमंडळी म्हणाली. रामशर्मा उपाशी असल्याचे कळल्यावर सर्व म्हणाले–"दोन घरचा पाहुणा शेवटी उपाशीच!"





# चाणाक्ष वजीर

मलाया देशाच्या मलक्का नावाच्या राज्याच्या गादीवर मुझफ्फरशाह नावाचा सुलतान राज्य करीत होता. त्याच्या राजवटीत राज्याची खूप भरभराट झाली. राजधानीचे शहर फार सुंदर होते. ते पाहून सयाम देशाच्या लोकांच्या पोटात गोळा उठत असे. खुश्की मार्गाने मलक्का राज्यावर स्वारी करणे शक्य नव्हते. कारण वाटेत फार मोठे जंगल होते. त्या वाटेने सैन्य घेऊन गेल्यास एक देखील सैनिक जिवंत परतणार नाही हे त्यांना चांगले ठाऊक होते.

म्हणून सयाम देशावासियांनी समुद्री मार्गाने मोठे आरमार घेऊन मलाक्कावर स्वारी केली. मलाक्का राज्याशी दूर दूरच्या देशांचे व्यापारी संबंध होते. सयामचे आरमार येत असलेले विदेशी व्यापाऱ्यांना प्रथम कळले. त्यांनी मलाक्काच्या सुलतानाला ती गोष्ट कळविली. सयामचे आरमार प्रथम पूर्वेकडील किनाऱ्याला वेढा घालून नंतर पश्चिमेकडे वेढा घालण्यास जात होते. ही बातमी व्यापाऱ्यांनी मलाक्काच्या राजाला दिल्यामुळे त्याला तयारी करायला वेळ मिळाला. सयाम देशाचे सैन्य मलायाच्या किनाऱ्याला पोचताच मलाक्काच्या सैन्याने तो हल्ला परतविला. मलाक्काच्या गोळीबारासमोर सयामच्या सैन्याची दाणादाण उडून गेली व ते त्यांच्या जहाजावर जो दाणा गोटा व शस्त्रास्त्रे होती ती समुद्रात फेकून देऊन पळून गेले.

परंतु सयामचे लोक स्वस्थ बसले नाहीत. त्यांनी अनेक वेळा हल्ले केले आणि प्रत्येक वेळी त्यांना पळून जावे लागले. या खेपेस ते रात्रीच्या वेळी काळोखात निघाले व उजाडण्यापूर्वी सिंगापूरला येऊन पश्चिमी किनाऱ्यावर पोचले.

तोपर्यंत मलाक्काच्या सुलतानाला शत्रूच्या हल्ल्याची वार्ता देखील नव्हती. तो घाबरला. सैन्य उभे करण्याला पुरेशी सवड नव्हती. दोन प्रहर रात्र उलटण्याच्या आत शत्रूचे आरमार राज्याच्या सीमेवर येऊन थडकणार हे निश्चित होते. म्हणून सुलतानाने आपला वजीर वेंदहार व सेनापती बिजधीरज यांना बोलावून सल्ला घेतला.

सेनापतीने आपल्या धाकट्या मुलाला बोलावून त्याला एका लहान नावेत किनाऱ्या किनाऱ्याने जाऊन शत्रूचे आरमार किती आहे व सैन्य बळ कसे काय आहे याची माहिती काढून आणायला सांगितले. त्याप्रमाणे सेनापतीचा मुलगा वेष पालटून शत्रूच्या आरमाराच्या मधून पलीकडे जाऊन परत आला. त्याने शत्रूची किती जहाजे आहेत व सैन्य बळ कितपत आहे हे पाहून घेतले होते. त्याला एक सामान्य नाविक समजून संशयावरून देखील कोणी पकडले नाही. सयाम देशाचे आरमार मोठे होते. इतके मोठे आरमार रात्रभरात तयार करणे शक्य नव्हते. सेनापती काळजीत पडला.

परंतु वजीर म्हणाला–"सेनापती! माझ्याबरोबर या!" असे सांगून सेनापती-बरोबर आपल्या लहानशा मचव्यात बसून बटू पहाट नामक किनाऱ्यावर आला. तेथे समुद्रतटावर 'मांगोव' नावाचा वृक्ष समूह होता. त्या सर्व झाडांवर वजिराने मशाली लावून ठेवायला सांगितले.

त्याप्रमाणे सेनापतीने आपल्या अनुया-यांच्या मदतीने रात्रीच मशाली बांधून ठेवविल्या. सयामच्या सैन्याला त्या मशाली व त्यांचे पाण्यात पडलेले प्रतिबिंब दिसले. त्यांना वाटले की असंख्य शत्रु सैन्य येत आहे. त्यांच्या छातीत धडकीच भरली. त्यांनी आपले आरमार मागे फिरविले व सरळ सयामचा तट गाठला.





# योग्य वर

प्रभाकर नगरच्या राजाला फार उशिरा एक मुलगी झाली. मुलीचे नांव प्रियंवदा होते. मुलगी लग्नाला योग्य झाली तोंपर्यंत राजाचे उतार वय झाले होते. राजाला काळजी वाटू लागली. तो मुलीला म्हणाला– "मुली! तुझ्या लग्नाची काळजी वाटते! तुझे लग्न होऊन गेले म्हणजे मी आनंदाने डोळे मिटीन." "बाबा! तुम्ही म्हणतां ते सर्व बरोबर आहे, पण मी लग्न कोणाशी करू म्हणता?" प्रियंवदेने विचारले.

"तुझ्याशी जो लग्न करील तो एकतर तुझ्या पसंतीचा असला पाहिजे व राज्य संभाळण्यास पण योग्य असला पाहिजे! म्हणून आपण तुला पसंत असलेल्या राज-कुमारांना बोलावून त्यांची परीक्षा घेऊ या. त्यात यशस्वी होईल तो तुझ्या पसंतीचा होईल व माझ्या पसंतीचा पण असेल." राजाने मुलीला विचारले.

प्रियंवदाने होकार दिला व तिने तिघां राजकुमारांविषयी आपली पसंती दर्शविली. त्यांच्यापैकी वडिलांना देखील जो पसंत पडेल त्याच्याशी तिचे लग्न होणार होते व तोच राज्याला वारस म्हणून मान्य होणार होता.

राजाने त्या तिघांना बोलावण्यासाठी राजदूत पाठविले. तिघे रूपगुणसंपन्न व राजकन्येला सर्व प्रकारे योग्य वर शोभतील असेच होते. विद्याभ्यासात व शस्त्रास्त्र विद्येत पण ते परस्परांपेक्षा कमी नव्हते.

तिघे राजकुमार आल्यावर राजा त्यांना म्हणाला–"राजकुमार हो! मी माझी मुलगी प्रियंवदा हिच्या स्वयंवरासाठी तुम्हांला निमंत्रण पाठवून बोलाविले आहे. तुम्हां तिघां पैकी ती कोणाची निवड करील त्या पूर्वी तुम्ही तिघे निरनिराळ्या दिशेने जाऊन एका महिन्याने तिला आवडेल अशी



"एक भेट घेऊन या. आज पौर्णिमा आहे. पुढल्या पौर्णिमेपर्यंत तुम्ही परत या." राजा तिघां राजकुमारांना म्हणाला.

तिघे राजकुमार त्याच दिवशी निघाले. एक महिना पूर्ण झाला व पौर्णिमेचा दिवस उजाडला.

रत्नपुरीचा राजकुमार रत्नकेतु एक चामड्याची पिशवी भरून रत्ने घेऊन आला आणि राजाच्या हातात देत म्हणाला—"यात हिरे, माणिक्ये, पाचू व अनेक प्रकारचे मणी आहेत. मी ही सर्व रत्ने जडवून एक सुंदर किरीट व रत्नहार तयार करवून देईन."

अयोध्येचा राजकुमार शूरजितवर्मा एक बंदूक घेऊन आला. तो बंदूकीचे वर्णन करून म्हणाला—"ही विलायतेतून आणलेली बंदूक आहे. याच्या तोडीचे शस्त्र दुसरे नाही. याच्या समोर तीर, भाले परशु, गदा वगैरे निरुपयोगी ठरतील. या बंदुकीच्या मदतीने सर्व जग जिंकता येईल."

तिसरा राजकुमार सुवृत देशाचा युवराज होता. त्याचे नाव तत्व गुणनिधी असे होते. तो रिकाम्या हाताने परत आला.

राजाने, तू काय घेऊन आला आहेस या अर्थी त्याच्याकडे पाहिले तेव्हां तो म्हणाला—"महाराज! क्षमा करा, मी एकही भेट राजकन्येसाठी घेऊन आलो नाही. मला त्या विषयी विचार करायला वेळच मिळाला नाही. काल रात्री मी चंद्राकडे पाहिले तेव्हां आज महिना पुरा होऊन पौर्णिमा आज असल्याचे आठवले."

"असे कोणते जरूरीचे काम होते की तुला दुसरे काही सुचलेच नाही. काय झालं काय राजकुमार? सर्व सविस्तार सांग!" राजाने त्याला विचारले.

"मी ज्या दिवशी येथून निघालो त्याच्या दुसऱ्याच दिवशी दुःखी लोकांची गर्दी मला एका जागी दिसली. त्या गर्दीत बायका व मुलेंच जास्त होती. त्यांची ती केविलवाणी स्थिती पाहून मी त्यांना विचारले—"काय झाले तरी काय?" तेव्हां ते म्हणाले की त्यांच्या वस्तीवर पेंढारी लोकांनी हल्ला केला आणि अनेक धडधाकट पुरुषांना त्यांनी ठार केले. त्यांच्या हातातून जे सुटले ते स्वतःचा जीव घेऊन पळून गेले. पेंढारी लोकांनी आमची घरेदारे लुटली होती. मी त्यांना धीर देऊन त्यांना त्यांच्या गांवी पोंचते केले. वाटेत कित्येक शस्त्रधारी लोक आमच्या मदतीला आले. आम्ही सर्वांनी मिळून पेंढारी टोळीला पळवून लावले. आम्हांला त्यांच्याबरोबर कित्येक तास युद्ध करावे लागले. त्या गावचे लोक गावात जायला भीत होते. पण आम्ही त्या गावी राहून त्यांची घरेदारे बांधून देण्याला मदत केली. जी घरे उध्वस्त झाली होती ती पुन्हां बांधून काढायला उशीर लागला. मेलेल्यांची अंत्येष्टी करावी लागली. या गडबडीत राजकन्येसाठी भेट आणायची गोष्ट मी पार विसरून गेलो." गुणनिधी म्हणाला.

राजाला गुणनिधीने दाखविलेले शौर्य व साहस पाहून आनंद झाला. त्याने दाखविलेली कर्तव्यनिष्ठा व दुःखी लोकांच्या उद्धारासाठी धोका असूनही त्यात उडी घेण्यासाठी दाखविलेली तयारी पाहून राजाच्या मनात त्याच्याविषयी आदर वाढला. त्याला राजा म्हणाला—"मुला! तुझ्यासारखा राजकुमार एकाद्या राज्याच्या गादीवर बसला तर ते राज्य सुखी होईल यात मला शंका नाही. मी अशाच राजकुमाराच्या शोधार्थ होतो. आज आमच्या भाग्याने तू भेटलास."

त्यानंतर प्रियंवदेने वरमाळा त्याच्या गळयात घातली. दोघांचा विवाहसमारंभ थाटामाटाने झाला.



# नास्तिकाचे स्वप्न

एका गावी एक नास्तिक रहात असे. तो फार आजारी पडला व तो जगण्याची आशा उरली नाही. त्याच्या नातेवाईकांनी भटजींना बोलविले व भटजी वेळेवर आले पण.

तो भटजींना म्हणाला–"भटजी! मी लवकरच मरणार हे खरे आहे. पण माझा स्वर्गावर किंवा नरकावर विश्वास नाही. म्हणून माझी अन्त्येष्ठी वगैरे करण्याची काही गरज नाही. मला सुखाने मरू द्या म्हणजे झाले."

"तू सरळ नरकात जाशील!" असा शाप देऊन भटजी निघून गेले.

परंतु नास्तिकाला तेव्हा मरण आले नाही. हळूहळू त्याची तब्येत सुधारत गेली व तो चांगला बरा झाला.

एकदा त्या भटजींची व नास्तिकाची गाठ पडली तेव्हां भटजींनी त्याला विचारले– "तू मृत्युमुखांतून बाहेर आलास म्हणायचा!"

"नाही हो! यमदूत मला आपल्या धन्याकडे घेऊन गेले होते. यमाने मला विचारले–'काय रे तुझी अन्त्येष्ठी वगैरे काही झाले नाही वाटते?' मी म्हणालो– 'यमराज! जरूर असेल तर भटजींना बोलावून करवून घ्या!' त्यावर यम म्हणाला– 'भटाभिक्षुकांना नरक लोकात उकळत्या तेलाच्या कढयांत टाकले आहे. तू भूलोकी परत जाऊन तेथे काही दिवस राहून ये. म्हणून मी परत आलो आहे." नास्तिकाने उत्तर दिले.





# महाभारत

नैमिशारण्यात अनेक ऋषी व मुनी रहात असत. त्या सर्वांचे कुलपती महामुनी शौनक ऋषी होते. त्यांनी एकदा बारा वर्षे एक सत्र यज्ञ केला. अनेक ऋषी मिळून ते यज्ञकार्य करीत असता तेथे रोमहर्ष यांचा मुलगा उग्रश्रवसु नावाचा सूत आला. सूत समस्त पुराण गाथांचा ज्ञाता होता.

सूताला आलेला पाहून सर्व मुनींना आनंद झाला. त्याच्या सत्काराला सर्व पुढे आले आणि म्हणाले–"आपल्या आगमनाने आम्हां सर्वांना अत्यंत आनंद होत आहे. आपल्याकडून अनेक पुराण कथा ऐकायला मिळतील."

सूत म्हणाला–"मुनिवर्यहो! परीक्षित राजाचा मुलगा जनमेजय याने नागयज्ञ केला होता तेव्हां वैशंपायन मुनींनी जनमेजय राजाला महाभारताची कथा सांगितली होती. महाभारत कथा वैशंपायनाचे गुरू वेदव्यास यांनी लिहिली. मी तो कथा ऐकून तीर्थयात्रा करीत कौरव-पांडवांचे जेथे युद्ध झाले होते त्या शमंतक-पंचक नावाच्या तीर्थ क्षेत्राचे दर्शन करून इकडे आलो."

झाले, शौनकादि मुनींनी, व्यासांनी लिहिलेली महाभारत कथाच सांगावी अशी सूताजवळ विनंती केली.

सूत म्हणाला–"सांगतो, महाभारताची रचना कशी झाली, माहीत आहे का तुम्हांला? कृष्ण द्वैपायन व्यास मुनींनी चार भागात वेद विभक्त करून झाल्यावर



हिमालय पर्वतात दीर्घकाळ तपश्चर्या केली. धृतराष्ट्राच्या पिढीतले सर्व लोक निवर्तल्यावर सर्वांस वाचनीय होईल अशा तऱ्हेने महाभारताची रचना कशी काय करावी या विचारात व्यासमुनी असता तेथें ब्रह्मदेव आला. व्यास मुनींनी ब्रह्मदेवाला प्रणाम करून विचारले–"देवाधि देवा ब्रह्मदेवा! मी वेद व वेदांग यांचे सारभूत अशा महाभारताची कथा मनात रचली आहे. पण सर्वजन सुलभ ती होईल अशा तऱ्हेने लिहिणारा कोणी दिसत नाही."

"गणेशाजवळ प्रार्थना कर. तो ते लेखन कार्य करील." ब्रह्मदेव म्हणाला.

व्यास महर्षींनी गणेशाचे स्मरण केल्या बरोबर त्याने प्रत्यक्ष दर्शन देऊन व्यास मुनींना स्मरण करण्याचे कारण विचारले. महर्षींनी महाभारताचे लेखन कार्य करण्याची विनंती केली. तेव्हां गणपती म्हणाला–"मी लेखन कार्य करण्यास एका अटीवर कबूल आहे. मी लेखणी हातात धरली की मध्ये ती खोळंबून ठेवण्याची गरज राहता कामा नये!" व्यास मुनींनी त्यावर निवेदन केले–"ते मला मान्य आहे, पण हे गणाधिपा! मी जे बोलत जाईन ते तू विचार करून, त्यात काही चूक नाही ना एवढेच पाहून मग टिपीत जा म्हणजे झाले." गणरायाने ते मान्य केले. याप्रमाणे व्यास मुनींनी महाभारत कथा रचून सांगितली व श्रीगणनायकाने ती लिहून काढली. त्या महाभारताचा प्रचार देवलोकात नारदाने, पितृलोकात असित याने आणि गंधर्वादि लोकात शुक्ल याने केला. जनमेजय राजाने नागयज्ञ केला तेव्हां वैशंपायनाने त्याचे वाचन करून भूलोकात महाभारत कथेचा प्रचार केला. शौनकादि मुनींनी महाभारताची रचना व त्याचा प्रचार कसा झाला याचा वृत्तांत ऐकून सूताला विचारले–"कौरव व पांडव यांचे युद्ध ज्या युद्ध



क्षेत्रात झाले त्याचे नाव शमंतपंचक असे का पडले?"

सूताने त्याचे उत्तर दिले ते असे–"सत्य युग" व "त्रेता युग" व द्वापर युग यांच्या मध्यंतर काळात राजे लोक आपल्या कर्त्तव्य पालनातून च्युत झाले. तेव्हां परशुरामाने एकवीस वेळा सर्व पृथ्वी निःक्षत्रिय करून टाकली. त्यांच्या रक्ताने पांच कुंड करून त्या कुंडात आपल्या पितरांच्या नावे तर्पण केले. तेव्हां त्याच्या पितरांनी त्याला वर दिला की ती पाच कुंडे पवित्र तीर्थ क्षेत्रे म्हणून प्रसिद्ध होतील. त्याच क्षेत्रात महाभारत युद्ध झाले व कुरु वंश नष्ट झाला. म्हणून त्याचे नाव कुरुक्षेत्र असे झाले.

परीक्षित राजाचा मुलगा जनमेजय याने त्याच कुरु क्षेत्रात आपले धाकटे भाऊ श्रुतसेन, उग्रसेन व भीमसेन यांच्या मदतीने सत्र यज्ञ केला. त्या वेळी सरम या देव शुनकाचा म्हणजे देवलोकांतील कुत्र्याचा मुलगा सारमेय याला यज्ञवाटिकेत हिंडत असलेला पाहून त्याच्यावर मारहाण केली. त्या कुत्र्याने आपली आई सरम हिला ते जाऊन सांगितले. तेव्हां ती रागावून म्हणाली–"गरीब व साधुजन यांना कोणी त्रास दिला तर तो फुकट जात नाही."



जनमेजय राजाला ती जे म्हणाली तो शापच ठरेल की काय अशी भीति वाटली. म्हणून त्या साठी शांत करण्याच्या हेतूने तो एका पुरोहिताच्या शोधार्थ हस्तिनापुरला आला. तेथे तो अरण्यात शिकारीला गेला असता तेथे त्याला श्रुतश्रव मुनींचा आश्रम दिसला. त्या मुनींच्या मुलाचे नाव सोमश्रव. राजाने श्रुतश्रव मुनींना, मुलाला पौरोहित्य करण्यास पाठवू शकाल का विचारले.

श्रुतश्रव म्हणाला–"माझ्या मुलाचे एक व्रत आहे. कोणी ब्राह्मणाने त्याच्याकडे येऊन काही मागितले तर ते तो देतो. त्याचे हे व्रत मोडणार नसेल तर त्याला



खुशाल पौरोहित्य करायला घेऊन जा." जनमेजयने ती अट मान्य केली आणि हस्तिनापुरला जाऊन अनेक यज्ञ केले.

एके दिवशीं जनमेजयाकडे उदंक नामक एका ऋषीने येऊन प्रश्न केला—"राजा! तू आपले कर्त्तव्य सोडून हे काय करीत बसला आहेस?"

राजाने विचारले—"मुनिवर्य! मी कोणते कर्तव्य पालन केले नाही?"

"तू नागयज्ञ कर. दुष्ट तक्षक भस्म झाला पाहिजे. हाच तक्षक तुझ्या बापाला चावला होता व त्या मुळेच तो मेला. तुझ्या बापाच्या रक्षणार्थ येणाऱ्या काश्यपाला अपार धनलोभ दाखवून त्या तक्षकानेच तर परतवले होते!" उदंक म्हणाला.

उदंक देखील तक्षकाचा शत्रूच होता. त्याचे एक कारण होते. उदंकने वेद नामक ऋषीं जवळ विद्याभ्यास केला होता. त्याने गुरूचा निरोप घेते वेळी गुरूला गुरुदक्षिणा काय देऊ असे विचारले. तेव्हां, गुरुपत्नीला विचार असे गुरु म्हणाले.

गुरुपत्नी म्हणाली—"आज पासून चवथ्या दिवशी मी पुण्यक व्रत करणार आहे त्यावेळी कर्णकुंडल घालून ते करावे म्हणते. परंतु मला हवी असलेली कुंडले पौष्य राजाच्या राणीच्या कानात आहेत. तुला शक्य असेल तर ती मला आणून दे."

उदंकने पौष्य राजाच्या राणीजवळ जाऊन मागताच तिने ती दिली. पण त्या कुंडलांवर तक्षकाची दृष्टी आहे. ती चोरून घेऊन जाण्यासाठी तो टपलेला आहे, तेव्हां सावध रहा असे तिने बजावून सांगितले.

उदंक ती कुंडले घेऊन निघाला. एका सरोवराच्या काठी ती कुंडले ठेवून तोंड धुण्यासाठी तो सरोवरात उतरला. ती संधी साधून त्याच्या पाठीमागून येणाऱ्या तक्षकाने ती कुंडले चोरली व पळू लागला. एक नग्न मानव कुंडले घेऊन पळत असलेला पाहून उदंक त्याला पकडण्यासाठी धावला. तत्क्षण तक्षकाने नागरूप धारण केले आणि एका बिळात शिरला.

उदंकने एक काठी घेऊन ते बीळ खणून काढले आणि पाताळ लोकी गेला. तेथे त्याला एक घोडेस्वार दिसला. तो घोडा म्हणजे स्वतः अग्नि होता व त्याच्यावर बसलेला स्वार इंद्र होता. उदंकला ते माहीत नव्हते. त्या घोडेस्वाराने उदंकला विचारले—"काय पाहिजे तुला?" तेव्हां उदंक म्हणाला—"नागलोक स्वाधीन करून घ्यावयाचा आहे." त्या बरोबर घोड्याच्या अंगातून ज्वाळा येऊ लागल्या. तेव्हां नागलोक नष्ट होणार हे पाहून तक्षकाने निमूटपणे कुंडले आणून दिली. ती कुंडले उदंकने गुरुपत्नीस नेऊन दिली.

उदंकच्या तोंडी जनमेजयाला तक्षकाने परीक्षताला चावून त्याचे प्राणहरण कसे केले हे कळले तेव्हां जनमेजयाने आपल्या मंत्र्यांना तक्षक कां चावला हे विचारले. मंत्र्यांनी ती कथा सांगितली. म्हणाले—

"महाभारत युद्ध संपल्यावर मृत अभिमन्यूची बायको उत्तरा हिला एक मुलगा झाला. तोच राजा परीक्षित. कृपाचार्यांजवळ तो अस्त्रविद्या शिकला व



त्यानंतर राज्यकारभार पाहू लागला. त्याला शिकारीचा नाद होता. एकदां त्याने मारलेला बाण लागल्यावर सावज पळू लागले. त्या सावजाचा पाठलाग करीत असता त्याला एके ठिकाणी शमीक मुनी ध्यान मग्न बसलेले दिसले. परीक्षित राजाने शमीक ऋषींना, त्यांनी ते सावज कोठे पळत गेलेले पाहिले का, विचारले. पण शमीक ऋषी ध्यानमग्न होते. त्यांनी त्याचे उत्तर दिले नाही. त्या गोष्टीचा राजाला राग आला व त्याने तेथे मरून पडलेला साप बाणाच्या टोकाने उचलून शमीक ऋषींच्या गळ्याभोवती टाकला

आणि निघून गेला. थोड्या वेळाने शमीक ऋषींचा मुलगा श्रृंगी तेथे आला व वडिलांच्या गळ्यात तो मेलेला साप पाहून रागाच्या भरात त्याने शाप दिला–"आज पासून सातव्या दिवशी तक्षकाच्या दंशाने परीक्षिताला मरण येईल."

मुलाने असा भयंकर शाप परीक्षिता-सारख्या राजाला दिला असल्याचे जेव्हां शमीक ऋषींना कळले तेव्हां त्यांना फार वाईट वाटले. त्यांनी आपला शिष्य गौरमुख याच्या हाती परीक्षित राजाला ते वृत्त कळविले.

परीक्षित राजाला केलेल्या चुकीबद्दल पश्चात्ताप वाटला व त्या शापाचे भयपण वाटले. त्या तक्षकाच्या हातून स्वतःच्या रक्षणाचा काही उपाय आहे का राजाने आपल्या मंत्र्यांना विचारले. तेव्हां मंत्र्यांनी एका खांबावर उभा असलेला एक महाल बांधला. त्यात बाहेरून वायूला देखील प्रवेश मिळणे शक्य नव्हते. त्या महालात विष उतरविणारे वनस्पती आणून ठेवले. विष उतरविणारे वैद्य, मांत्रिक व सिद्ध पुरुषांना पण आणून ठेवले. राजाबरोबर सर्व मंत्री त्या एक स्तंभी महालात राहून राज्यकारभार पाहू लागले.



सहा दिवस निर्विघ्न पार पडले. सातव्या दिवशी काश्यप नावाचा एक ब्राह्मण राजाला सर्पदंश होणार असल्याची वार्ता ऐकून त्याचे विष उतरविण्यासाठी हस्तिनापुरला निघाला. त्याच वाटेने तक्षक राजाला कसे चावायचे याचा विचार करीत ब्राह्मण वेष धारण करून येत होता. तक्षकाने तिकडे येण्याचे कारण काश्यपाला विचारले. काश्यपाने ब्राह्मण वेषधारी तक्षकाला न ओळखून उत्तर दिले–"मी सर्पदंश उतरवितो. परीक्षित राजाला तक्षक चावणार असल्याचे ऐकून मी राजाला वाचविण्यासाठी व मोठे इनाम मिळविण्यासाठी जात आहे."





तेव्हां तक्षक म्हणाला–"हे ब्रह्मश्रेष्ठ मीच तो तक्षक आहे. मी ज्या पदार्थाला किंवा व्यक्तीला चावतो तत्क्षण तो भस्म होऊन जातो. तुझ्या मंत्रबळाने त्याला पूर्व रूप मिळणे अशक्य. तू व्यर्थ श्रम घेऊ नकोस, परत जा."

परंतु काश्यपाने ते ऐकले नाही तेव्हां तक्षकाने आपल्या विषाचा प्रताप दर्शविण्यासाठी जवळच्या वटवृक्षालाच चावला. तत्क्षण तो वृक्ष भस्म होऊन गेला. काश्यपने मंत्रबळाने तो वट वृक्ष पुन्हा जिवंत केला.

तेव्हां तक्षक म्हणाला–"तू माझ्या विषाचा प्रभाव दूर केलास, पण मी दिलेल्या शापापासून कोणाला मुक्ती नाही. एवढे मात्र लक्षात ठेव. तुला, राजाकडून जेवढ्या धनाची अपेक्षा आहे त्याच्याहून जास्त मी तुला देतो. तू परत फीर." त्याप्रमाणे काश्यपाला पुष्कळ धन देऊन तक्षकाने परत पाठवून दिले.

त्यानंतर तक्षकाने काही सापांना ब्राह्मण बटूंचे रूप देऊन त्यांच्या हाती काही फुले व फळे राजाकडे उपहार म्हणून पाठविली. त्यांनी नेऊन दिलेल्या फळांपैकी एकाला तक्षक चावला होता व त्यात आपले विष सोडले होते. त्या फळात त्या विषाची एक बारीक अळी झाली.

परीक्षित राजा आपल्या मंत्र्यांना व इतर लोकांना म्हणाला–"शापमुक्तीची वेळ जवळ आली आहे. थोड्या वेळाने सूर्यास्त होईल. आता मला चावलेच तर ही अळीच चावणार. सापाचे भय मला उरले नाही."

राजाच्या तोंडून तेवढे वाक्य बाहेर पडतांच ती अळी सापासारखी मोठी झाली. तोच तक्षक होता. राजाला तो चावला. त्याबरोबर राजा व त्याच्या बरोबर तो एक स्तंभी महाल पण भस्मी भूत झाला.





# गांधीचे चरित्र

गुजरात प्रांत हा अनेक दृष्टीने प्रसिद्ध आहे. कृष्णाने द्वारकेला यादवांचे राज्य स्थापन करून अनेक वर्षे राज्य केले. सोमनाथाचे इतिहास प्रसिद्ध देऊळ पण गुजरात प्रांतातच आहे. ही दोन्ही तीर्थक्षेत्रे म्हणून आपल्या सर्वांच्या परिचयाची आहेत. गुजराती जनतेवर जैन धर्माचा संस्थापक महावीर याच्या उपदेशांचा प्रभाव फार आहे. वल्लभ संप्रदायाचे अनुयायी गुजरात प्रांतात पुष्कळ आहेत. मीराबाईने अनेक भक्तिगीते गुजरातीत रचिली आहेत. हिंदू धर्माची सुधारणा करण्याच्या हेतूने आर्यसमाजाची स्थापना करणारे स्वामी दयानंद सरस्वती व पाकिस्तानाचे जन्मदाते महंमदअल्ली जिन्ना हे याच प्रांतात जन्मले.

गुजरात प्रांतातील काठियावाड या प्रदेशात इंग्रजांच्या राजवटीच्या काळात ३०० वर संस्थाने होती. त्यांत पोरबंदर हे एक संस्थान आहे. अठराव्या शतकात जुनागड संस्थानचे रहिवासी हरजीवन गांधी हे एक वाणी गृहस्थ पोरबंदरला आले व १७७७ साली एक घर विकत घेऊन ते व त्यांची मुले मिळून व्यापार करू लागले. हरजीवन यांचा उत्तमचंद नांवाचा एक मुलगा पोरबंदरचा राणा खीमाजी यांची मर्जी संपादन करून त्या राज्याचा दिवाण झाला. अशा तऱ्हेने गांधी घराणे प्रसिद्ध झाले.

उत्तमचंद हे राज्य कारभारात फार हुशार होते. म्हणून त्यांनी आर्थिक व राजकीय दृष्टीने राज्याच्या हिताची अनेक कामे केली. परंतु राणा खिमाजी हे अल्प वयांतच निवर्तल्यावर त्यांच्या मातोश्रींनी सर्व राज्यसूत्रे स्वतःच्या हाती घेतली. दिवाणांची स्वतंत्र वृत्ती व कडक स्वभाव राजमातेला आवडला नाही. या शिवाय



# खजिन्याचा चोर

सुमारे तीन हजार वर्षांपूर्वी रामिसीस तृतीय नावाचा राजा इजिप्त देशाच्या गादीवर बसला. त्याच्या कारकीर्दीत इजिप्त देशात सर्वत्र शांतता नांदत होती. म्हणून रामिसीस याने आपल्या खजिन्यात पूर्वजांपेक्षा जास्त धन व संपत्ति जमा केली. सोने, चांदी, हिरे व इतर रत्ने त्याच्या खजिन्यात जसजशी जमा होत गेली तसतसा त्याच्या मनात लोभ वाढत गेला. म्हणून त्याने स्थापत्यशास्त्रात प्रवीण अशा काही लोकांना बोलावून त्याने एक नवीन व मजबूत दगडी खजिना तयार करविला. त्या खजिन्यात जाण्यायेण्यासाठी एक गुप्त द्वार पण ठेवण्यात आले. राजा स्वत: त्या गुप्त द्वाराने खजिन्यात जाई व त्याला हव्या असलेल्या मूल्यवान वस्तु काढून घेऊन ते गुप्तद्वार बंद करी आणि त्याच्यावर आपली मोहर पण लावून ठेवी.

तो खजिना बांधून तयार करणारा स्थापत्यशास्त्री फार हुशार होता. त्याने राजाला मुद्धां कळू न देतां खजिन्याच्या दगडी भितीत चोर दरवाज्यासारखा उपयोगी पडणारा एक दगड गुप्तपणे बसवला होता आणि त्या चोर दरवाज्यापर्यंत जाण्यासाठी एक चोरवाट पण करून ठेवली होती. त्यानंतर खजिन्याच्या वरच्या बाजूस त्याने एक पिरॅमिड बांधला. खजिना बांधून झाल्यानंतर तो शिल्पशास्त्री फार दिवस जगला नाही. परंतु मृत्यु येण्यापूर्वी त्याने खजिन्यातले थोडे धन चोरले होते. मरणसमयी त्याने आपल्या दोघां मुलांना बोलावून त्या चोर वाटेचे गुपित सांगितले होते. बाप वारल्यावर दोघे भाऊ, जेव्हां जेव्हां त्यांना पैशाची गरज भासे त्यावेळी त्या चोरवाटेने जाऊन त्यांना जरूर तेवढे धन घेऊन येत. राजा दररोज खजिन्यात



जाऊन खजिन्यातल्या वस्तू सर्व बरोबर आहेत की नाही याची खात्री करून घेत असे. म्हणून चोरी होत असल्याची गोष्ट त्याच्या नजरेस आली. तो जाई त्या गुप्तद्वारावर त्याची मोहर जशीच्या तशी असे. खजिन्याच्या भिंती इतक्या बळकट होत्या की मुंगीला सुद्धा आत प्रवेश मिळणे शक्य नव्हते. म्हणून चोर खजिन्यात कोणत्या वाटेने शिरतो, ह्याचा उलगडा राजाला होईना. म्हणून राजाने चोराला धरण्यासाठी खजिन्यात एक सांपळा तयार करून ठेवला.



त्यानंतर एकदां दोघे भाऊ चोर वाटेने खजिन्यात शिरले तेव्हां मोठ्या भावाचा पाय त्या सापळ्यात सापडला. काळोख असल्या कारणाने त्याला तो सांपळा दिसला नाही. पुष्कळ प्रयत्न करून पाहिला तरी सापळ्यातून सुटणे शक्य होईना. म्हणून तो आपल्या धाकट्या भावाला म्हणाला—"धाकटू! माझा पाय सांपळ्यात सापडला आहे. माझे मरण निश्चित आहे. दोघे स्वत:चा जीव देऊन आईला दु:खी करणे बरोबर होणार नाही. तू माझे मुंडके कापून घेऊन जा. म्हणजे मला कोणी ओळखू शकणार नाही. मीदेखील निश्चितपणे ह्या जगाचा निरोप घेईन."

मोठा भाऊ म्हणाला त्यात त्याचा विवेक स्पष्ट दिसत होता. तो सल्ला धाकट्या भावाच्या लक्षात चटकन आला. त्याने आपल्या मोठ्या भावाचे डोके कापून घेतले आणि चोर दरवाजा नेहमीप्रमाणे नीट बंद करून घरी गेला आणि आईला घडलेली गोष्ट सांगितली. त्यानंतर त्याने भावाचे मुंडके पुरून टाकले.

दुसऱ्या दिवशी राजा खजिन्यात गेला तेव्हां त्याला चोराचे धड दिसले. त्याच्या अंगावर कपडे नव्हते की त्याला डोके नव्हते. तो आत आला कसा हे कळायला देखील मार्ग नव्हता. परंतु राजाला एक



गोष्ट कळली, चोराचा एक साथी आहे. त्याने आपल्या मित्राचे डोके कापून नेले आहे. त्याला पकडण्याचे राजाने मनाशी ठरविले. राजाने मृत चोराचे धड किल्लयाच्या भितीला टांगून ठेवले व त्याच्यावर पहारा ठेवला आणि पाहरेकऱ्यांना बजावून सांगितले की हे धड उचलून नेण्याचा कोणी प्रयत्न केला किंवा या धडाला पाहून कोणाच्या डोळ्याला टिपे आल्याचे कळले तर त्याला लगेच अटक करून माझ्यासमोर हजर करावे.

आपल्या मुलाचे धड किल्लयाच्या भितीला टांगून ठेवल्याची गोष्ट चोरांच्या आईला कळली. तेव्हां ती आपल्या धाकट्या मुलाला म्हणाली–"माझ्या मुलाचे शरीर अंत्येष्टी शिवाय असे लोंबकळत राहले तर पितृलोकात त्याच्या आत्म्याला किती दु:ख होईल? म्हणून तू जाऊन त्याचे शरीर घेऊन ये. राजाकडे जाऊन ते मागून येईन."

"आई! आपल्या शरिरात डोकेच मुख्य असते नाही का? मी ते शास्त्रोक्त विधी प्रमाणे पुरले आहे." धाकटा मुलगा आईला म्हणाला. पण तिने हट्टच धरला तेव्हां भावाचा देह काय वाटेल ते करून आणण्या शिवाय त्याला दुसरा उपाय सुचला नाही.

धाकटा भाऊ एका म्हाताऱ्या व्यापाराचा वेष घेऊन एका गाढवावर दारूचे दोन बुदले ठेवून गाढवाला हाकीत धड टांगलेले होते त्या जागी पोचला. त्याने एका बुदल्याला एक भोक पाडले व मोठमोठ्याने रडू लागला. त्याला रडत असलेला पाहून पाहरेकरी धावून आले व विचारू लागले– "म्हाताऱ्या! काय रे झाले?"

"माझी सर्व दारू गळून चालली आहे! दारू फार किमतीची आहे हो!" त्याने रडत उत्तर दिले. तो असे देखील म्हणाला– "दुकानापर्यंत पोचेतो सर्व दारू गळून जाईल. ते ऐकून पाहरेकऱ्यांनी दारूची चव घेऊन पाहिली व आवल्यावर मिटक्या मारून सर्व दारू पिऊन टाकली.

"हा दुसरा बुदला गाढवाच्या पाठीवर कसा काय राहणार? म्हणून तो तुम्ही रिकामा केलात तरी चालेल." व्यापारी म्हणला.

दुसऱ्या बुदल्यातली दारू पिऊन झाल्यावर पाहरेकरी झिंगून लोळू लागले. काळोख पडू लागला होता. धाकटा भाऊ आपल्या भावाचा मृतदेह गाढवावर घालून त्यावर पिशव्या व पोती टाकून घरी गेला व रीती प्रमाणे भावाच्या देहाला मूठमाती दिली.

प्रेत चोरीला गेल्याचे कळल्यावर संपाताने राजाचे सर्व अंग थरथर कापू लागले. आपल्या हुकमाप्रमाणे न वागणाऱ्या पाहरेकऱ्यांना त्याने चाबकाने झोडपून काढले आणि त्यांना कैदेत टाकले. चोराला पकडण्याचा त्याने मनाशी पक्का निश्चय केला. म्हणून त्याने एक युक्ति योजली.

त्याने एका राजकन्येला किल्लयाच्या फाटकाबाहेर सुंदर कपडे घालून बसविले. स्वत:ला एक परदेशी असल्याचे सांगू तिने असे जाहीर केले की ज्या कोणी भयंकरात भयंकर असे कृत्य केले असेल त्याच्याशी मी लग्न करीन.



धाकट्या मुलाने त्याला पकडण्यासाठी राजाने टाकलेले ते एक जाळे आहे हे चटदिशी ओळखले. आपण हुशारीत राजाहून कमी नाही हे दाखविण्यासाठी काळोख पड-ल्यावर तो राजकन्येला पाहायला निघाला. तिकडे जात तो असतां वध्यस्थानी त्याच दिवशी फाशी दिलेल्या एका आरोपी चाहात कापून तो शालदुडीत लपवून ठेवून निघाला.

राजकुमारीजवळ आल्यावर तो तिला म्हणाला–"मी तुझ्याशी लग्न करायला आलो आहे." तेव्हां राजकन्येने त्याला विचारले–"तू आपल्या आयुष्यात साहसाचे कोणते काम केले आहेस?"

तो म्हणाला–"मी आपल्या वडील भावाचे डोके कापून त्याचे शरीर युक्ती लढवून पळवून नेले." वडील ज्या चोराच्या शोधार्थ आहेत तो हाच चोर आहे, हे ओळखायला राजकुमारीला वेळ लागला नाही. ती म्हणाली–"ठीक! मी तुझ्याशी लग्नाला तयार आहे. तुझा हात पुढे कर!" धाकट्या मुलाने प्रेताचा कापून आणलेला हात शालीतून पुढे केला. राजकुमारीने तो हात घट्ट धरला व मोठ्याने ओरडली–"चोर सांपडला! चोर! चोर! पकडा!"

पाहरे करी धावत आले. धाकटा मुलगा तो प्रेताचा हात तसाच सोडून मागच्या बाजूने उडी मारुन निघून गेला होता. काळोखात तो कोठे गेला कोणाला कळले नाही.

राजाला जेव्हां हे कळले की हाती लागलेला चोर हातावर तुरी देऊन पळून गेला तेव्हां त्याच्या चातुर्यावर खूष होऊन त्याने जाहीर केले की जर चोर स्वत: येऊन आपली ओळख सांगेल तर त्याला दंड न देता आपल्या मुलीबरोबर त्याचे लग्न करून देईन आणि त्याला आपल्या दरबारांत मानाची जागा देईन." त्याप्रमाणे खजिन्याचा चोर खरोखरच राजाचा जांवई दरबारीव एक झाला.





# कोणी वांचत नाही

एका राजाच्या बागेत एक विचित्र गुलाबाचे झाड होते. वर्षातून फक्त एकदा त्याला एक कळी येई, परंतु ती फुलण्याच्या आधी कीड लागून जाई. कित्येक माळी बदलले, परंतु कीड लागण्याचे थांबले नाही. शेवटी एका माळ्याने ती कळी पाहून अशी प्रतिज्ञा केली की त्या कळीला तो वांचवू शकला नाही तर त्याचे डोके उडवावे.

माळी ज्या महिन्यात नोकरीला लागला त्याच महिन्यात त्या गुलाबाला एक कळी लागली. दुसऱ्या दिवशी ती कळी उमलणार होती. माळी रात्रभर त्या गुलाबाच्या झाडाजवळ डोळ्यात तेल घालून बसून राहला. उजाडण्यापूर्वी एक किडा येऊन झाडावर बसला. पण माळी जेव्हा त्या किड्याला मारू लागला तेव्हां एक पाखरू उडत आले आणि त्या किड्याला उचलून घेऊन गेले. दुसऱ्या दिवशी ती कळी उमलली. खरोखरच ते एक सुंदर फूल होते. माळ्याने आनंदाने ते फूल तोडून राजाला भेट म्हणून दिले.

"तू कसे रे वांचविलेस याला?" राजाने माळ्याला विचारले.

"किड्याला मी मारायला गेलो तेवढ्यात त्याला एक पाखरू उचलून घेऊन गेले, महाराज!" माळी म्हणाला.

राजा सुस्कारा सोडून म्हणाला–"त्या किड्याला पाखरू उचलून घेऊन गेले, उद्यां त्या पांखराला कोणी दुसरा प्राणी खाऊन टाकील. कोणी वांचत नाही."

दुसऱ्या वर्षी त्या गुलाबाला आणखी एक कळी लागली. या खेपेस पण किडा आला. तो कळीवर बसण्यापूर्वीच पाखरू त्याला चोचीत धरून उडाले व दूर जाऊन बसले. त्याच क्षणाला बिळातून एक साप बाहेर आला व त्याने त्या पांखराला धरले.

श्री. बा. म. कासार

माळ्याने गुलाबाचे फूल राजाला भेट करते वेळी जे घडले ते थोडक्यात वर्णन करून सांगितले. तेव्हां राजा म्हणाला– "कोणी वांचत नाही! या खेपेस त्या सापाची पाळी आहे."

त्यानंतरच्या वर्षी गुलाबाच्या कळीसाठी किडा आला. त्या किड्याला एका पाखराने धरले. त्या पांखराला सांपाने धरले आणि त्या सांपाला माळ्याने ठार केले.

माळ्याने गुलाबाचे फूल राजाला भेट करते वेळी त्याने सांपाला कसे ठार केले हे ऐटीत सांगितले, तेव्हां राजा सुस्कारा सोडून म्हणाला–"खरे आहे, कोणी वांचत नाही!" परंतु या खेपेस ते ऐकून माळ्याला फार वाईट वाटले.

एकदां माळी झाडावर चढून फळांना कापड बांधून ती झांकून ठेवीत होता, तेव्हां राणी आपल्या सखींबरोबर आली. तेथे एक सरोवर होते. सर्वजणी आंघोळीला पाण्यात उतरल्या. राणीसरकारांना आपण झाडावर आहो हे कळू नये म्हणून तो झाडाला चिकटून आपले तोंड लपवून बसला. परंतु त्याच्या दुर्दैवाने राणीने पाण्याबाहेर येतांना त्याला पाहिले. राजाने ती गोष्ट कळल्यावर रागाच्या भरात माळ्याचे डोके कळल्यावर उडविण्याचा हुकूम सोडला.

राजाच्या शिपायांनी माळ्याला धरून आणले. माळ्याने निवेदन केले–"महाराज! आपण जे म्हणालात ते खरे आहे. गुलाबाची कळी खाणारा किडा वांचला नाही, त्याला खाणारे पांखरू वांचले नाही. त्याला खाणारा सांप वांचला नहीं, माझ्या हाती ठार झाला! मी देखील कोठे वांचतो आहे? आपल्या हाती मला मरण आहे! कोणी वांचत नाही, खरे आहे!"

माळी जे म्हणाला ते ऐकून राजाचा नखशिख देह कांपला. त्याने माळ्याला दिलेली शिक्षा रद्द केली.





# पडकें देऊळ

[ १६ ]

[ बांघाने जेव्हां गोंड लोकांच्या आकाश गुहेवर हल्ला केला तेव्हां गोंड लोक जीव घेऊन पळाले. शिखीमुखला नागमल्ली कोठे आहे हे कळेना. भूतनायकाने, तिला उचलून पुजारी घेऊन गेल्याचे सांगितले. दोरखंडाच्या सहाय्याने पळून जाणाऱ्या पुजाऱ्याचा शिखीमुखने पाठलाग सुरू केला. पुढे–]

शिखीमुखने खोऱ्यात उतरून पाहिले. त्याला पुजारी किंवा नागमल्लीला चटईत गुंडाळून घेऊन जाणारा तो नागगिधाड दोघांपैकी एक जण ही दिसला नाही. ते दोघे थोड्याच वेळापूर्वी खोऱ्यात उतरले होते. शिखीमुखने एकदा चारी बाजूला पाहिले तेव्हां त्याला एका बाजूने घोड्याच्या खेकाळण्याचा आवाज ऐकू आला. लगेच तो त्या बाजूला धावत गेला. परंतु काळोखात घोड्याच्या टापांचा आवाज मात्र दूर दूर जाऊ लागलेला ऐकू आला.

शिखीमुख हताश होऊन, पुढे काय करावे या विचारात होता. त्याच वेळी विक्रमकेसरी दोरखंड धरून खाली उतरून आला होता, त्याने जवळ येऊन त्याला हाक मारली–"शिखी!"

तो ओळखीचा आवाज ऐकून त्याने मागे वळून पाहिले. तेवढ्यात विक्रमकेसरीने



त्याच्या खांद्यावर हात ठेवून विचारले— "तो दुष्ट निसटून गेला वाटते?"

"अरे नुसता निसटलाच नाही, तो दृष्टीस देखील पडला नाही. दुरून घोडा पळत गेल्याचा आवाज मात्र ऐकू आला." शिखीमुख म्हणाला.

"तो पुजारी नाही तर तो नागगिधाड कोणीतरी तिला घोड्यावर उचलून घेऊन पळून गेला असावा. त्या पुजाऱ्याला मदत करणारे लोक या प्रदेशात असले पाहिजेत. नाही तर त्यांना घोडा कोठून मिळाला?" विक्रमकेसरीने त्याला वाटलेली शंका व्यक्त केली.

"ते शक्य आहे, पण आपण या गोष्टीचा शोध लावण्यात वेळ फुकट घालविणे बरोबर होणार नाही. जवळ पास त्यांचा शोध लावून पाहू या. आपले साथी डोंगर उतरून येतच आहेत." शिखीमुख म्हणाला.

"येत आहेत, पण त्यांना यायला थोडा वेळ लागेल. घोड्यांच्या टापांचा आवाज तू कोण त्यादिशेला जातांना ऐकलास?" विक्रमकेसरीने विचारले.

शिखीमुखने जवळच्या झाडांच्या बाजूला हाताने खूण करून दाखविली. दोघे काही बोलल्याशिवाय त्या बाजूला जाऊ लागले. ती जागा खोऱ्यापासून थोड्या उंच जागी होती. त्या काळाखालदेखील त्यांना झाडांमधून जाणारी एक पाऊलवाट दिसली. त्या वाटेने ते थोडे पुढे गेल्यावर त्यांना पाऊलवाटेच्या एका बाजूला दूर झाडीत दिव्याचा उजेड दिसला.

शिखीमुखने त्या दिव्याकडे बोट दाखविले व म्हणाला—"त्या बाजूला कोणी शेकोटी पेटवून बसले आहेतसे वाटताहेत. जंगली जनावरांच्या भीतीने चोर डाकू सुद्धा जाळ करून रात्रीच्या वेळी त्याच्याजवळ बसून राहतात. हे कोण आहेत,



आपण पुढे जाऊन पाहू तर या." असे सांगून शिखीमुख मांजराच्या पावलांनी त्या बाजूला जाऊ लागला. विक्रम त्याच्या पाठीमागून जाऊ लागला.

शिखीमुख व विक्रमकेसरी झाडांच्या आड ती शेकोटी होती तिच्या बरेच जवळ पोचले तेव्हां त्यांना तेथे दोघे जण दिसले. त्यांच्या पेहरावावरून ते जंगली चोर होते, हे स्पष्ट कळत होते. ते, त्यांच्याजवळची चांदीची नाणी मोजीत होते. शिखीमुखने त्या चोरांच्या पाठीमागे झाडीत लपून बसायला सांगितले व स्वतः कटयार काढून एकदम चोरांसमोर जाऊन दरडावून म्हणाला—"खबरदार, जागचे हलाल तर!"

दोघांचे हात तलवारीच्या मुठीवर गेले. पण समोर शिखीमुखला पाहून भयभीत होऊन ते त्याच्याकडे पहात किंकर्तव्य विमूढ स्थितीत जागच्या जागी बसून राहिले. कारण त्याच वेळी विक्रमकेसरी तलवार उपसून पाठीमागून येऊन दरडावून म्हणाला—"खबरदार! येथून पळून जाण्याचा प्रयत्न केलात तर!"

चोर मध्ये सापडले होते. शिखीमुखने पुढे होऊन त्यांच्या तलवारी म्यानेतून काढून दूर फेकून दिल्या व विचारले—



"बोला, पडक्या देवळाचा पुजारी कोठे आहे? बोला लवकर, नाही तर दोघांची डोकी उडवितो."

एक जण तोंड वेंगाडून म्हणाला—"पडक्या देवळाचा पुजारी! आम्ही तर हे नाव देखील आजपर्यंत कधी ऐकले नाही."

"तुम्ही ते नांव ऐकलेत आणि त्याच्या जवळून ही चांदीची नाणी पण घेतलीत. आमच्या जवळ तुमची ही लबाडी चालणार नाही." शिखीमुख म्हणाला व विक्रमकडे वळून पुढे म्हणाला—"या लबाडांकडून खरे वदविणे तेवढे कठीण नाही! जो येथून निसटून जाण्याचा प्रयत्न करील त्याला



जागच्या जागी ठार कर!" असे सांगून शिखीमुखने एकाच्या डोक्याचा फेटा सोडून त्यानेच त्याचे हात बांधले. "आतां तू खरे काय ते बोलशील!" असे म्हणत शिखीमुख एक जळत असलेले लाकूड घेऊन एका चोराजवळ गेला.

जीव धोक्यात पडलेला पाहून तो चोर घाबरून म्हणाला–"मला नका मारू मी खरे तेच सांगतो. आम्हांला तो कोण हे मुळीच माहीत नाही. आम्ही त्याला एक घोडा विकला व त्याने जे पैसे दिले ते आम्ही आपसात वांटून घेत होतो."

"अस्सं! म्हणजे तुला एवढेच माहीत आहे तर! तुझ्या या मित्राला आणखी काय माहीत आहे ते पाहू या." असे सांगून शिखीमुखने ते जळत असलेले लाकूड दुसऱ्या चोराच्या अगदी खांद्याजवळ नेले.

दुसरा चोर मोठ्याने ओरडून म्हणाला–"मला असा जिवंत जाळू नका. मी खरे ते सांगतो. त्या पुजाऱ्याबरोबर एक गले लठ्ठ मनुष्य होता. तो एका चटईत कोणाला तरी गुंडाळून घेऊन आला. पुजारी त्या चटईतल्या व्यक्तीला घोड्यावर टाकून स्वतः घोड्यावर बसून निघून गेला."

"नाही, तुम्हांला आणखी पुष्कळ माहिती आहे. विक्रम घेऊन ये आणखी एक लाकूड." शिखीमुख म्हणाला.

विक्रमकेसरी आणखी एक लाकूड घेऊन आला व पहिल्या चोराजवळ जाऊन म्हणाला–"पाठीला चटका देण्यापेक्षा यांच्या कपाळाला चटका दिला तर डोके ठिकाणावर येईल यांचे." असे म्हणत विक्रमकेसरीने ते जळते लाकूड पहिल्या चोराच्या डोक्याजवळ नेले.

तो चोर आतां थरथर कापू लागला. म्हणाला–"मालक! आमचा जीव नका घेऊ. आम्हांला जे काही माहीत आहे ते











सर्व आम्ही सांगतो. तो पुजारी व तो लठ्ठ मनुष्य आपसात जे बोलत होते त्यावरुन आम्हांला ते रात्रीच्या रात्री ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात जावयास निघाले असल्याचे कळले. मी हे जे सांगतो आहे ते आमच्या देवीची शपथ घेऊन सांगतो. एक अक्षर देखील खोटे नाही."

"शिखी! या मूर्खांना वाटत असेल की ब्रह्मपुत्र नदीचे खोरे जवळच इकडे कोठे तरी असेल! जरा एकदा चटका बसून 'चर्रर्र' झाले की खरे बाहेर पडेल." असे सांगून विक्रमने लाकूड पुन्हां दोघांच्या डोक्याजवळ नेले.

"मालक! आम्ही खरे बोलतो आहो! अगदी खरे! फुकट आमचा जीव घेऊ नका!" मोठ मोठ्याने ओरडून दोघे सांगू लागले. ते पाहून शिखीमुखने विक्रमला थांबायला सांगितले व म्हणाला-"मला वाटते की यांना यापेक्षा जास्त काही माहीत नसावे. यांनी पैशाच्या मोहाला बळी पडून पुजाऱ्याला तो घोडा विकला." असे विक्रमला सांगून शिखीमुख चोरांकडे वळून म्हणाला-"बरे तर आतां तुम्ही जा! आम्ही तुम्हांला सोडतो. पण लक्षात ठेवा तो पुजारी किंवा त्याचा साथी दोघांपैकी तुम्हाला कोणी कधी दिसला तर लगेच जाऊन शबरजातीच्या वस्तीत ती बातमी पोचती करा. जर तसे केले नाही, तर तुमची चामडी लोळवू."

"मालक! तुम्ही आम्हांला जीवदान दिले आहे. आम्ही शपथ घेऊन सांगतो, आम्हांला तो पुजारी कोठे दिसला तर लगेच आम्ही ती बातमी शबरांच्या वस्तीत पोचती करु." चोरांपैकी एकजण म्हणाला.

शिखीमुख होकारार्थी मान हलवून विक्रमकेसरी बरोबर थोडा बाजूला जाऊन म्हणाला-"विक्रम! या लबाडांनी एक गोष्ट आपल्याला सांगितली नाही. या





लोकांनी पुजाऱ्याला घोडा विकला हे खरे आहे. पण तो पुजारी कोठे आहे, हे यांना माहीत नाही, हे मानायला मी तयार नाही. प्राणभय दाखविले असूनदेखील यांनी आपल्याला काही तरी उत्तर देऊन फसविले नसेल कशावरून? म्हणून त्यांच्या पाठी मागून जाऊन मला खरी गोष्ट काय आहे, याचा शोध काढावयाचा आहे. तू येथेच उभा रहा. आपले लोक आले म्हणजे त्यांना याच जंगलांत पुजाऱ्याचा शोध करायला सांग व तू येथेच मी परत येईपर्यंत उभा रहा."

विक्रमकेसरी त्याप्रमाणे त्या जागी थांबला व शिखीमुख झाडीत लपून चोरांच्या पाठोपाठ निघाला. चोरांनी चांदीची नाणी आपसात वांटून घेतली व त्यांची लहान लहान गाठोडी कमरेला बांधून घेऊन काळोखात आपल्या तलवारी हुडकून काढल्या आणि पाऊलवाटेने हंसत आनंदाने जाऊ लागले. शिखीमुख त्यांच्या पाठोपाठ निघाला.

विक्रमकेसरी जागच्या जागी उभा राहून किंवा मधून मधून येरझाऱ्या घालीत आपल्या अनुयायांची वाट पाहू लागला. पंधरा मिनिटे होऊन गेली. अकस्मात् त्याला कुत्र्याचे भुंकणे ऐकू आले. त्याने तो आवाज ओळखला. तो शिखीमुखच्या लाल कुत्र्याचा होता. याचा अर्थ जिवाजी किंवा शबरांच्या वस्तीतली शिखीचे नातेवाईक मंडळी तिकडून येत असावीत.

विक्रम लगेच कुत्र्याचा आवाज येत होता त्या बाजूला निघाला. थोड्याच वेळात त्याला जिवाजी नागनायक लठ्ठूसिंह आणि चारपाच शबर व नाग खोऱ्यातून वर डोंगर चढून येत असलेले दिसले. एक शबर लालकुत्र्याची दोरी धरुन येत होता. कुत्रा दोरी ओढत पुढे धावत जाण्यासाठी उतावीळ दिसत होता.

जिवाजीने विक्रमकेसरीला पाहताच विचारले–"विक्रम! तू खुशाल आहेस ना? शिखी कोठे आहे? तो दुष्ट पुजारी नागमल्लीला उचलून घेऊन गेला, हे खरे का?"

विक्रमकेसरी काही उत्तर देणार एवढ्यात लट्ठूसिह ओरडून आवेशाने म्हणाला–"कोठे आहे तो पुजारी? त्याचे चामडे लोळवतो!"

जिवाजी त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला शांत करीत म्हणाला–"अशी घाई करू नकोस लट्ठूसिह! पहिल्याने सर्व परिस्थिती तर कळू देशील!"

विक्रमकेसरीने जंगलांत पाऊल ठेवल्या पासून आकाश गुहेत प्रवेश करण्यापर्यंत घडलेले वृत्त थोडक्यात सांगितले आणि म्हणाला शिखी चोरांच्या पाठीमागून ते कोठे जातात व काय करतात हे पहायला गेला आहे."

"एकट्याने चोरांचा पाठलाग करण्यात धोका आहे. तरी त्याने जे केले ते बरोबरच आहे असे म्हटले पाहिजे. काय वाटेल ते झाले तरी या काळोखात त्या पुजाऱ्याला पकडणे अशक्य! उजाडल्यावर सर्व डोंगर व रान पालथे घालू या." असे सांगून जिवाजीने लट्ठूसिहची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. म्हणाला–"तू घाबरू नकोस, लट्ठूसिह! नागमल्ली त्या दुष्टाच्या हातून स्वतःचा बचाव स्वतःच्या बळावर करून नक्की परत येईल. मला तरी त्यांत शंका वाटत नाही. तसे झालं नाही तरी पुजारी आमच्या जाळ्यातून सुटणे अशक्य."

जिवाजी ते बोलतच होता की खोऱ्याच्या बाजूला एका उंचवट्यावर त्यांना एक मशाल दिसली. कोणीतरी हवेत हलवून काही तरी खूण करीत होता. जिवाजी व त्याच्या बरोबरच्या सर्वांनी ते पाहिले. तेव्हांच त्यांना एक शिट्टीचा आवाज ऐकू आला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)





# कारस्थान

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ म्हणाला–"तुझ्या सारख्यांच्या विरुद्धच कारस्थाने रचली जातात. म्हणून तुला या रात्रीच्या वेळी किती कष्ट सहन करावे लागत आहेत बघ. तुला अंमळ हलके वाटावे म्हणून उज्जैनच्या राजाच्या विरुद्ध झालेल्या कारस्थानाची गोष्ट मी तुला सांगतो. ऐक!" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी उज्जैन येथे वज्रगुप्त नावाचा एक रत्नपारखी व्यापारी रहात असे. त्याच्याकडे हिरे चांगले मिळत म्हणून मोठमोठे श्रीमंत सावकारच नव्हे तर राजेमहाराजेपण त्याच्याकडे हिरे विकत घ्यायला येत.

## वेताळाच्या गोष्टी



तो समुद्र पार देखील प्रवास करी व हिरे खरेदी करून आणी.

एकदा त्याने क्रौंच द्वीपात 'शिरीषक' नामक एक अपूर्व हिरा विकत घेतला. तो पन्नास लाखांला विकायचा असे मनाशी ठरवून तो स्वदेशी परतला.

उज्जैनच्या राजाला वज्रगुप्ताकडे शिरीषक नावाचा हिरा असल्याचे जेव्हां कळले तेव्हां राजा त्याला बोलावून म्हणाला–"वज्रगुप्त! हा हिरा पंचवीस लाख रुपयाला मी खरेदी करतों."

वज्रगुप्त घाबरला. त्याने त्या हिऱ्याची जी किंमत द्यायचे ठरविले होते त्याची अर्धी किंमतच राजा द्यायला तयार झाला होता. राजाने ज्या किमतीला हिरा मागितला त्याच्याहून जास्त किंमत मागितल्यास राजाला राग येणार. वज्रगुप्त मोठ्या पेचात सांपडला, काही बोललाच नाही.

वज्रगुप्त काही बोलत नाही हे पाहून राजाने त्याला विचारले–"आम्ही सांगितलेली किंमत कमी वाटली का?"

"तसे नव्हे महाराज! या हिऱ्यावर ग्रहांचा प्रभाव आहे. काहींना हा लाभणार नाही ज्यांना लाभत नाही त्यांचे सर्व वैभवच नव्हे तर प्राणहानी होण्याची सुद्धा भीती आहे." वज्रगुप्त म्हणाला.

वज्रगुप्त ते साफ खोटे बोलला हे राजाने ओळखले. म्हणून त्याने स्वतःचे जन्मनक्षत्र सांगून वज्रगुप्ताला विचारले–"माझ्या जन्म नक्षत्राप्रमाणे हा हिरा घेतल्यास त्याचा काय परिणाम होईल असे तुला वाटते?"

वज्रगुप्त लगेच म्हणाला–"महाराज! आपणांस या हिऱ्यामुळे प्राणभय आहे!"

त्यावर राजा स्मित करून म्हणाला–"मला मरणाचे भय नाही. मरणाला तयार होऊनच मी हा हिरा विकत घ्यायला तयार झालो आहे."



वज्रगुप्ताला तो शिरीषक हिरा राजाच्या हाती विकावा लागला.

ही सर्व माहिती युवराज प्रसेन याला कळली. तो महत्वाकांक्षी व दुष्ट होता. तो वज्रगुप्ताकडे जाऊन म्हणाला–"वज्रगुप्त! महाराजांनी तुझा हिरा फार स्वस्तात विकत घेतला नाही का? तू महाराजांना भीति दाखविलीस की तो हिरा त्यांना लाभणार नाही व त्यामुळे त्यांना प्राणभय पण आहे. परंतु त्यांनी त्याची फिकीर केली नाही. झाले ते ठीकच झाले. तू माझे एक लहानसे काम करून दिलेस तर मी तो हिरा तुला परत मिळवून देईन. 'हिरा विकून तुला' जी पंचवीस लाख रुपयांची रक्कम मिळाली आहे तीदेखील परत करण्याची गरज नाही. मी सांगतो ते करशील का?"

"बोला तर युवराज! आपली आज्ञा तर होऊ दे." वज्रगुप्त म्हणाला.

"मला, महाराजांचा मृत्यु इतका लवकर होईलसे वाटत नाही आणि माझा राज्याभिषेक होण्याची चिन्हे पण दिसत नाहीत. आतां काहीतरी उपाय करून राजाचा कांटा दूर झाला तर आपल्यावर कोणी संशय घेणार नाही. तो त्या हिऱ्याचा दोष मानून लोक स्वस्थ राहतील. तसे तू सांगितलेच





आहे की हा हिरा महाराजांना लाभत नाही. हिरकणी खाल्ल्याने मनुष्याचा जीव जातो इतर विषासारखा हिरकणीला रंग किंवा वास पण नसतो. हिऱ्याचा चुरा तुझ्याजवळचा दे. मी तो दुधात घालून राजाला प्यायला देतो." युवराज म्हणाला.

वज्रगुप्त थोडा वेळ विचार करीत राहून नंतर म्हणाला–"माझ्याजवळ हिऱ्याचा चुरा आहे. पण हे पहा, तुम्ही तो स्वतःच दुधात घालून राजाला प्यायला द्या. दुसऱ्या कोणाच्या हाती देऊ नका."

प्रसेनने वज्रगुप्ताचा सल्ला मान्य केला आणि हिऱ्याचा चुरा घेऊन गेला.

काही वेळाने वज्रगुप्त गुप्तपणे महाराजांकडे गेला आणि म्हणाला–"महाराज! आपण फार सावध रहावे, आपल्याला विष देण्यासाठी आपला शत्रू संधी पहात आहे. माझी अशी विनंती आहे की वैद्यांकडून तपासून घेतल्याशिवाय आपण कोणत्याहि खाद्य पदार्थाला तोंड लावू नये.

हा सल्ला राजाच्या हिताचा होता. म्हणून तेव्हांपासून तो खाण्याचा किंवा पिण्याचा प्रत्येक पदार्थ वैद्यांकडून तपासून घेऊन मगच त्याचे सेवन करू लागला. ही गोष्ट नियमितपणे होऊ लागली.

एके दिवशी राजा रात्री झोपायला निघाला तेव्हां त्याच्या शयनगृहात प्रसेन स्वतः दुधाचा पेला घेऊन आला.

राजाने मुलाला विचारले–"बाळ! तू स्वतः आज दूध घेऊन आलास! नोकराच्या हाती कां नाही पाठविलेस?" आणि दुधाचा पेला घेऊन तोंडाला लावणार इतक्यात त्याला वज्रगुप्ताने दिलेला सल्ला आठवला. राजा दुधाचा पेला घेऊन आपल्या खास महालात गेला. तेथे वैद्यांनी दुधाची परीक्षा करून त्यात हिऱ्याचे चूर्ण असल्याचे सांगितले.

दुसऱ्याच दिवशी राजाने युवराजाला राजद्रोही म्हणून आरोप लावून त्याला



जन्मठेप तुरुंगवासाची शिक्षा दिली आणि वज्रगुप्ताला अनेक बक्षिसे व इनाम देऊन त्याचा गौरव केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! वज्रगुप्ताने प्रसेनच्या कारस्थानात असे विघ्न कां आणले? त्यामुळे त्याचे नुकसानच झाले, फायदा काहीच झाला नाही. याचे उत्तर माहिती असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

त्याचे उत्तर म्हणून विक्रमादित्य म्हणाला–"वज्रगुप्त राजद्रोही नाही. त्याने युवराजाला हिऱ्याचा चुरा दिला हे खरे आहे. त्याने हिऱ्याचे चूर्ण दिले नसते तरी युवराजाने आणखी काही तरी कारस्थान करून राजाचा वध केला असता. राजा मेल्यावर सर्व शिरीषक हिऱ्याची निंदा करू लागले असते. त्या शिरीषक हिऱ्या साठी तो जे खोटे बोलला होता ते युवराजाच्या रक्षणार्थ सहाय्यक झाले असते. परंतु स्वामिभक्त वज्रगुप्ताने विचार केला की त्याला फायदा होवो किंवा न होवो, निदान राजाचे रक्षण तरी होईलच. ते कर्तव्य त्याने पाळले व आपली स्वामिभक्ति दर्शविली. म्हणून त्याने राजाला सावध केले. अशा तऱ्हेने त्याने स्वतःचेदेखील रक्षणच केले. कारण राज्यलोभाने आपल्या बापाचा जीव घ्यायला तयार झालेला प्रसेन राजा झाल्यावर त्या कारस्थानाची माहिती असणाऱ्या वज्रगुप्ताला जिवंत सोडणार नाही हे त्याला ठाऊक होते. काही असो, वज्रगुप्ताने केले ते इष्टच होते."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# पराचा कावळा

एका गावी एक श्रीमंत गृहस्थ रहात असे. त्याला नेहमी खोटे बोलण्याची व फुशारक्या मारण्याची संवय होती. एकदा त्याला एका गाडीवानाची गरज होती. एक मनुष्य गाडी हाकायला नोकरी देता का विचारायला आला. श्रीमंताने त्याला विचारले–"काय रे पराचा कावळा करता येतो का तुला?"

"वेळ आली की का नाही करता येणार महाराज?" गाडीवान म्हणाला.

"कारण तुझ्या गप्पा चालू असताना मी गाडीत असणार, म्हणून विचारले." तो श्रीमंत म्हणाला.

काही दिवसांनी तो श्रीमंत मनुष्य एका शेजारच्या गावी गेला आणि तिथल्या पाटलाला म्हणाला–"मी हवेत एकदा तीन ससे ठार केले होते, माहीत आहे तुम्हांला?"

"हे अशक्य आहे!" पाटील म्हणाला.

"होय, अगदी खरे आहे, पाटील साहेब! एकदा आमचे धनी शिकारीला गेले. कुंपणावरून एका सशाने उडी मारली. तो खाली जमिनीवर पडण्यापूर्वीच आमच्या धन्याने गोळी मारून त्याला ठार केले. आम्ही त्याचे पोट चिरून पाहिले तर त्यात दोन आणखी ससे होते, हो!" गाडी हांकणारा म्हणाला.

"असे म्हण!" गाडी वाल्याने जी लोणकडी ठोकून दिली होती तिच्यावर विश्वास करून पाटीलसाहेबांना मनाचे समाधान करून घ्यावे लागले.





# आरोप

साकेतपुर येथे एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याला सुदर्शन नांवाचा एक मुलगा व सुनीता नांवाची एक मुलगी होती. मुलांच्या लहानपणीच त्यांची आई वारली. म्हणून त्या व्यापाऱ्यावरच मुलांचा सर्व भार येऊन पडला. परंतु त्याने आनंदाने मुलांचे सर्व लाड पुरविले आणि त्यांना उत्तम शिक्षण देवविले. मरणसमयी त्याने आपल्या मुलाला जवळ बोलावून म्हटले–"बाळ! मी व्यापार करून लाखो रुपये मिळविले आहेत. आता मला देवाघरचे बोलावणे आले आहे. तेव्हां एक दोन हिताच्या गोष्टी तुला सांगून ठेवतो. आपल्या जवळ किती धन व वैभव असले तरी त्यात नित्य भर पडत गेली तरच ते कायम राहील. स्वस्थ बसून चैनीत दिवस काढायचे ठरविलेस तर कापरासारखे हे वैभव पाहतां पाहतां नाहीसे होईल. श्रीपुर येथे माझ्या ओळखीचे एक व्यापारी मित्र आहेत. ते मला सख्ख्या भावासारखे आहेत. त्यांचे नाव लक्ष्मीगुप्त आहे. ते तुला व्यापारात मार्गदर्शन करीत रातील."

सुदर्शनने वडील वारल्यावर अंत्येष्टी वगैरे सर्व धार्मिक विधी करून वडिलांच्या नावाने पुष्कळ दानधर्म केला. नंतर आपल्या बहिणीला म्हणाला–"सुनीता! बाबांनी सांगितल्याप्रमाणे व्यापार धंदा सुरू करण्याचे मी ठरविले आहे. मी श्रीपुरला जाऊन बाबांचे एक मित्र लक्ष्मीगुप्त यांना भेटून व्यापार सुरू करावा, म्हणतो."

सुदर्शनला बहिणीला घरी एकटीला ठेवून जावे लागले. तरी त्याने तिच्या सोबतीला म्हणून एका म्हाताऱ्या मोलकरणीला ठेवून दिले. त्याने आपला एक फोटो बहिणीजवळ ठेवून दिला व तिचा आपल्याजवळ ठेवून

सौ. कमलाबाई पाटील



घेतला. नंतर तो काही विश्वासपात्र नोकरांना बरोबर घेऊन श्रीपुरला निघून गेला.

आपल्या मित्राच्या शोकपूर्ण मृत्यूची वार्ता कळल्या पासून लक्ष्मीगुप्ताचे मन कोणत्याच कामात लागत नव्हते. त्याला मूलबाळ नव्हते. म्हणून सुदर्शन जेव्हां आला तेव्हां लक्ष्मीगुप्त व त्याची बायको दोघांना परमानंद झाला.

लक्ष्मीगुप्तवर श्रीपुरच्या राजाची फार मर्जी होती. म्हणून तो एकदां राजाच्या भेटीस निघाला तेव्हां बरोबर सुदर्शनला पण घेऊन गेला आणि त्याने राजाशी सुदर्शनची ओळख करून दिली.

राजाला प्रताप नांवाचा एकुलता एक मुलगा होता. सुदर्शन व प्रताप दोघांची परस्परांशी फार लवकरच मैत्री जमली. म्हणून सुदर्शन दररोज राजवाड्यात जात येत असे, तेथेच तो जेवत पण असे व आपल्या मित्राबरोबर गप्पा मारीत बराच वेळ बसे.

एकदां सुदर्शन लक्ष्मीगुप्तला म्हणाला—"काका! मी पुष्कळदां, जवळ जवळ दररोज युवराजच्या बरोबर जेवत आलो आहे. एकदां त्याला आपल्या घरी जेवायला बोलावू या का?"

"अवश्य बोलाव, मुला!" लक्ष्मीगुप्त म्हणाला. सुदर्शनने प्रतापला आपल्या घरी जेवायला बोलाविले व राजा व राणी दोघांनी त्याला त्याच्या मित्राच्या घरी जेवायला जायला परवानगी दिली.

मेजवानीच्या दिवशी लक्ष्मीगुप्तने जेवणाची व पाहुण्यांच्या आदरातिथ्याची उत्तम व्यवस्था केली. युवराजांच्या इतमामाला शोभेल अशी पंचपक्वान्ने तयार करवून मनोरंजनाची पण सर्व व्यवस्था उत्तम केली. आपल्या मित्राच्या आग्रहावरून प्रताप रात्री त्याच्याच घरी राहिला.

तो झोपायला निघाला तेव्हां त्याने सुदर्शन, भिंतीवर टांगलेल्या सुनीतेच्य तसबिरीकडे पहात आहे हे ओळखले. त्याची दृष्टी पण त्या तसबिरीवर गेली. त्याची दृष्टी त्या तसबिरीवरच खिळून राहिली. त्याला त्या दिवशी रात्री झोपच आली नाही.

दुसऱ्या दिवशी प्रताप आपल्या घरी निघाला तेव्हां त्याचा चेहरा उतरलेला दिसला. ते पाहून सुदर्शनने त्याला विचारले—"मित्रा! तू काल दिवसभर कसा हंसत आनंदात होतास, पण आतां असा उदास कां? माझ्या हातून काही चूक झाली असली तर सांग! मी पुन्हा ती चूक न होऊ देण्याबद्दल तुला वचन देतो."

"तू आपल्या मनातले गुपित इतके दिवस माझ्यापासून असे लपवून कां ठेवलेस?" प्रतापने विचारले.

"लपवायला माझ्याकडे कांही गुपित असेल तर ना?" प्रतापने चकित होऊन विचारले.

"ती तसबीर कोणाची होती रे? काय पण सुंदर मुलगी आहेती! तू तिच्या विषयी माझ्याजवळ एक चकार शब्द कधी उच्चारलास का?" प्रतापने विचारले.

सुदर्शन जोराने हंसला व म्हणाला—"अरे ती माझी बहीण सुनीता मी तिच्याविषयी तुला सांगितले होते?"





सुदर्शनने मागे एकदां सुनीता नांवाची त्याला एक बहीण असल्याचे सुदर्शनला सांगितले होते. परंतु ती अप्सरेसारखी सुंदर असेल असे स्वप्नात देखील प्रतापला वाटले नाही. आतां लग्न करायचे तर तिच्याशीच असे त्याने मनाशी ठरविले.

घरी परत आल्यावर प्रताप खिन्न मनाने अंथरुणावर पडून असल्याचे राजा व राणी दोघांना कळले व दोघं चवकशीला आली. त्यांना वाटलें की लक्ष्मीगुप्ताच्या घरी युवराजाच्या मनासारखे आदरातिथ्य झाले नसावे. म्हणून त्यांनी प्रतापला कारण विचारले तेव्हां प्रताप थोडा लाजत व संकोच करीत म्हणाला—"सुदर्शनची बहीण सुनीता हिच्याशी माझा विवाह झाला नाही तर मी या पुढे दुसऱ्या कोणत्याही मुलीशी लग्न करणार नाही."

राजा व राणी म्हणाले—"युवराज! एका सामान्य व्यापाऱ्याच्या मुलीशी लग्न करणार?"

"मला राजकन्या नकोत. मी लग्न करणार तर फक्त सुनीताशीच!" प्रतापने निक्षून सांगितले. नाइलाजाने राजा व राणी दोघांनी लक्ष्मीगुप्त व सुदर्शन दोघांना बोलवून घेतले. राजा म्हणाला—"माझा मुलगा प्रताप याची सुनीताशीच लग्न करण्याची इच्छा आहे. तुला त्यात काही हरकत नाही ना?"

"याहून जास्त आनंदाची गोष्ट ती काय असणार महाराज? प्रताप माझा जीवश्च कंठश्च मित्र आहे. त्याने माझ्या बहिणीशी लग्न करण्याची इच्छा प्रगट केली असल्यास ती गोष्ट आमच्या भाग्याचीच मानली पाहिजे!" सुदर्शन म्हणाला.

त्यानंतर राजाने आपला मंत्री नागामात्य याला बोलावून त्याला युवराजाच्या विवाहाची सर्व तयारी करण्यास सांगितले.

नागामात्याला सर्व काही पूर्वीच कळले होते. सुनीता अनुपम सुंदरी आहे हे त्याला माहीत होते. तिच्याशी लग्न करण्याची त्याच्या मनात इच्छा होती. म्हणून त्याने युवराजांच्या लग्नात विघ्न आणण्यासाठी एक युक्ती योजली आणि राजाकडे जाऊन नम्रपणे म्हणाला—"महाराज! आपण या विवाहासाठी इतकी घाई करणे इष्ट नाही. साकेतपूर येथे सुनीताचा प्रेमसंबंध अनेकांशी असल्याचे ऐकिवात आहे."

ते ऐकून राजा लगेच लक्ष्मीगुप्त व सुदर्शन दोघांना बोलावून म्हणाला—"मी आपल्या मुलाशी सुनीताच्या लग्नाची गोष्ट विचारली तेव्हां ती सदाचरणी नसल्याची गोष्ट तुम्ही माझ्या पासून लपवून ठेवलीत. मला देशाच्या राजाला फसविता आहा का?"

सुनीतावर असा खोटा आरोप केल्याबद्दल रागावून सुदर्शन म्हणाला—"महाराज! माझी बहीण दुराचारणी आहे याचे प्रमाण कोणी दिले तर मी फांशी जायला तयार आहे. परंतु हा आरोप खोटा ठरला तर ज्याने आपल्या मनांत हे विष कालविले आहे त्याला फाशीची शिक्षा झाली पाहिजे."

"मी याची बहीण दुराचारिणी असल्याचे प्रमाण द्यायला तयार आहे." नागामत्य म्हणाला.





नागामात्य त्याच दिवशी साकेतपूर गेला व सुनीताच्या घरी जाऊन द्वारपालकाच्या हाती असा निरोप कळविला की सुनीताच्या भावाने एक पत्र देऊन पाठविले आहे व मी तिला भेटण्यासाठी आलो आहे."

सुनीताने द्वारपालकाच्या हाती परत निरोप पाठविला की मी प्रथम ते पाहून नंतरच पत्र घेऊन येणाऱ्याशी भेटावे की नाही हे कळवीन. नागामात्याने एक खोटे पत्र तयार करून आणले होते ते त्याने द्वारपालकाच्या हाती सुनीताकडे पाठविले. सुनीता ते पत्र वाचून द्वारपालकाला म्हणाली–"हे पत्र कोणीतरी लबाड घेऊन आला आहे. त्याला धक्के मारुन हाकलून द्यावे."

नागामात्याचा तो बेत फसला. पण तो निराश झाला नाही. त्याने सुनीताच्या दासीच्या हातात काही सुवर्णमुद्रा देऊन तिच्या करवी चोरीने सुनीताची सोन्याची अंगठी मागविली आणि तो श्रीपुर निघून गेला. राजाने विचारल्यावर तो म्हणाला–"महाराज! राजवाड्यात युवराणी म्हणून येणाऱ्या सुनीताकडे मी स्वत: राहून आलो आहे. तिने आपल्या प्रेमाची खूण म्हणून आपली ही अंगठी मला दिली आहे."

राजाने सुदर्शनला बोलावून नागामात्याने आणून दिलेली अंगठी दाखवून विचारले–"ही तुझ्या बहिणीचीच अंगठी आहे ना? माझा मंत्री एक रात्र तिच्या घरी राहून तिची ही अंगठी तिच्याकडून घेऊन आला आहे. याचे उत्तर तुझ्याकडे काय आहे?"

सुदर्शला आश्चर्य वाटले. तो राजाला म्हणाला–"महाराज! मी फांशी जायला तयार आहे. परंतु मला एका आठवड्याचा अवधी देण्याची कृपा करावी."

राजाने सुदर्शनला फांशीची शिक्षा देण्याचे ठरवून एक आठवड्याचा अवधी दिला. सुदर्शनने आपल्या बहिणीच्या नावी एक



पत्र लिहिले. पत्राचा मजकूर असा होता–"आपले पावित्र्य विकून तू आपल्या कुळाचे नाव कलंकित केलेस. तू आपले पावित्र्य घालविलेस, मी आपला प्राण गमावीत आहे. मी आपला प्राण पणास कां लावीत आहे हे कळविण्यासाठीच हे पत्र लिहिले आहे."

भावाचे ते पत्र पाहून सुनीता घाबरली. कारण श्रीपुराहून कोणी आला होता, त्याला आपण भेटलो नाही. तो कशासाठी ते खोटे पत्र दाखवून भेटायला आला होता व त्याने कसे काम साधले हे तिला माहीत नव्हते. त्यानंतर दोनच दिवसांनी तिची अंगठी चोरीला गेली. तिच्या दासीशिवाय इतर कोणाच्या हाती ती अंगठी जाणे शक्यच नव्हते दासीने आणाशपथा घेतल्या. सर्व घर हुडकून पाहिले तरी अंगठी सांपडली नाही. अशाप्रसंगी तिच्या भावाचे, तिच्या आचरणाविषयी शंका व्यक्त करून लिहिलेले पत्र मिळाले. त्यावरून हे सर्व कपट कारस्थान ती चिट्ठी घेऊन येणाराचेच असले पाहिजे हे तिने ओळखले.

तिच्यावर जो आरोप लावला गेला होता त्यामुळे स्वत:च्या अपकीर्ती पेक्षां खोटा आळ भावाच्या मरणाला कारण होत आहे हे ऐकून तिला फार वाईट वाटले. म्हणून



तिने आपल्या घराला कुलूप लावले व सरळ श्रीपूरला आली. तेथे आल्यावर, मंत्र्याने ती दुराचारिणी असल्याचे प्रमाण दिल्यावरूच राजाने त्याच दिवशी तिच्या भावाला फाशी देण्यास हुकूम काढला असल्याचे तिला कळले.

सुनीता सरळ वध्यस्थानी गेली. सुदर्शनला फाशी देण्याच्या जागी उभे करण्यात आले होते. थोड्याच वेळाने राजा व मंत्री तेथे आले. सुनीताने सरळ राजाकडे जाऊन नम्रपणे निवेदन केले–"महाराज! माझी आपणांजवळ एक विनंती आहे. आपण या मंत्र्याच्या बोलण्यावर व लबाडीवर विश्वास करून एका निरपराध माणसाला








फाशी देत आहां! पण आपला मंत्री चोर व लुच्चा आहे. तो साकेतपूरला माझ्या घरी येऊन माझ्या घरातले दाग दागिने चोरून घेऊन गेला आहे."

नागामात्य साकेतपुरला गेला होता, ही गोष्ट राजाला सुद्धा माहीत होती. म्हणून त्याने मंत्र्याला विचारले–"काय नागामात्य! तू या बाईच्या घरून हिचे दागिने चोरून आणले होतेस का?"

"खोटे, साफ खोटे! मी कधी हिचे तोंडसुद्धा पाहिले नाही, आजपर्यंत!" नागामात्य म्हणाला.

"तू माझे तोंड देखील पाहिले नाहीस म्हणतोस, आणि तू माझ्या घरी एक रात्र काढली होतीस असे या गावातला प्रत्येक मनुष्य सांगतो आहे, आणि माझ्या प्रेमाची खूण म्हणून मी दिलेली अंगठी पण तुला मिळाली आहे. मग हे सर्वच खोटे का?" सुनीताने नागामात्याला दरडाबून विचारले.

राजाने सुनीताचे ते सर्व बोलणे शांतपणे ऐकून चकित होऊन विचारले–"मुली! तू कोण हे नाही कळले मला!"

"महाराज! तुमच्या मंत्र्याने दुराचारिणी म्हणून आरोप लावलेली सुनीता ती मीच! निष्कारण फाशी जाणाऱ्या निरपराध सुदर्शनची मी बहीण!" हे सांगून तिने सुरवाती पासून मंत्र्याने काय काय केले ते सांगितले व तिच्यावर निष्कारण लागलेल्या खोट्या आरोपाबद्दल आपल्या भाग्याला दोष देत रडू लागली.

नागामात्याचा चेहरा पांढरा फट्ट पडला. राजाने सुनीता निर्दोषी असल्याचे ओळखले. त्याने सुदर्शनला सोडून देण्यास सांगून त्याची व सुनीताची क्षमा मागितली व मंत्र्याला फांशीची शिक्षा दिली.

त्यानंतर सुनीता व प्रताप यांचा विवाहसमारंभ सुमुहूर्तावर थाटामाटाने पार पडला.





# पांघरलेला खुळेपणा

एकदा एका राज्यात मोठा दुष्काळ पडला. खायला अन्न नाही की प्यायला पाणी नाही. त्याच काळात राजाचा एक उंट कोठे तरी नाहीसा झाला. त्याच्या शोधार्थ राजाने आपल्या शिपायांना पाठविले.

त्याच राज्यात एक खुळी रहात असे. तिला तीन मुलगे होते. त्यातला मोठा शेतीभाती करी. दुसऱ्याने मळा लावला होता व तिसरा विणकाम करून उदरनिर्वाह करी. राजाचा उंट त्यांच्या घराच्या बाजूला आला तेव्हां त्या तिघांनी त्या उंटाला धरले आणि त्याला कापून त्याच्या पोटातले पाणी मडक्यांत आणि त्याचे मांस मोठमोठ्या भांड्यात लपवून ठेवून दिले.

हा सर्व प्रकार त्यांची खुळी आई पहात होती. तिच्या तोंडात कोणती ही गोष्ट लपत नसे. म्हणून मुलांनी तिला सांगितले की आई आज आम्ही तुला नवी नवेली करून तुझे लग्न लावून देणार आहो. तुझ्या लग्नाच्या वेळी या उंटाचे मांसच शिजवून पाहुण्यांना वाढणार आहों.

राजाचे शिपाई शेतीभाती करणाऱ्या भावाकडे आले आणि त्यांनी उंटाविषयी चवकशी केली तेव्हां तो म्हणाला–"अहो, तुम्हांला दिसत नाही का, मी एक सामान्य शेतकरी आहे. मी शेत नांगरतो आहे, दिसत नाही का तुम्हांला?"

"पण राजाचा उंट हरवला आहे. तू पाहिलास का कोठे?" शिपायाने विचारले.

"एका दिवसात दोन एकर शेत नांगरून होत नाही, मग पंधरा एकर कसे होणार?" त्याचे ते उत्तर ऐकून शिपायांना वाटले की वेडा बिडा असावा आणि त्याचा नाद सोडून ते मळेवाल्याकडे गेले. तो त्या वेळी आंबे तोडीत होता.

"तू राजाचा उंट पाहिला आहेस का रे?" शिपायांनी त्याला विचारले.

सौ. कमलाबाई नामजोशी

"तुम्ही पाहतांच आहां मी आंबे तोडतो आहे." माळी म्हणाला.

"तू आंबे तोडतो आहेस हे आम्हांला दिसते आहे. परंतु आम्ही विचारतो आहों की तू राजाचा उंट या बाजूला आलेला पाहिलास का?" शिपायांनी विचारले.

"आमच्या आंब्याला भोपळ्याएवढे आंबे लागतात हो!" माळी म्हणाला.

ही स्वारीदेखील वेडीच दिसते आहे असा विचार करून ते विणकराकडे गेले आणि त्याला त्यांनी विचारले—"काय रे, तू राजाचा उंट या बाजूला आलेला पाहिलास का?" तो देखील वेड्यासारखाच काहीतरी बोलला. म्हणाला—"कधी कधी एक ठाण विणतो तर कधी एक वारभर कापड सुद्धा विणून होत नाही."

"ते नव्हे रे, तू राजाचा उंट कुठे पाहिलास का इकडे आलेला?" शिपायांनी पुन्हां त्याला विचारले.

"लग्न सराईच्या वेळी मिळतात चार पैसे जास्त! नाहीतर व्यापारी कोठे देतो पुरी किंमत?" तो म्हणाला.

"त्या तिघांच्या उत्तराला कंटाळून शिपाई त्यांच्या आईकडे गेले. ती खुळी दारात उभी राहून त्या शिपायांकडेच पहात उभी होती. त्यांनी जवळ जाऊन तिला तोच प्रश्न विचारला—"म्हातारे! राजाचा उंट पाहिलास का ग?"

"कां नाहीं, पाहिला तर! माझ्या मुलांनी त्याला ठार केले." म्हातारी म्हणाली.

"केव्हां ठार केले म्हातारे?" शिपायांनी विचारले.

"ज्या दिवशी मला नवी नवेली केले त्यांनी त्याच दिवशी." म्हातारी म्हणाली.

शिपायांना वाटले की या खुळीजवळ आपण चवकशी केली हा आपलाच मूर्खपणा!"





# भुतांचे झोत

फार पूर्वी कोशल देशाच्या सीमेवर रंगपुरी नामक एक लहानसे राज्य होते. त्या गावातले लोक फार गरीब होते. याचे कारण गावाच्या तीन बाजूची जमीन ओसाड होती. फक्त उत्तरेकडे सुपीक जमीन होती. पण गेली आठदहा वर्षे गावकऱ्यांनी त्या जमिनीत लागवड करण्याचे सोडून दिले होते. मोलमजुरी करून जे पैसे मिळत त्यावर त्यांना आपला उदर निर्वाह करावा लागे. कारण उत्तरेकडील जमिनीत भुताटकी सुरू झाली तेव्हांपासून तिकडे त्यांनी जाणेच सोडून दिले. काही जण हिंमत करून तिकडे गेले. त्यांच्या पैकी काही परतलेच नाहीत, आणि जे परतले ते वेडे होऊन परतले. म्हणून गांवकऱ्यांना दहशत बसली आणि त्यांनी तिकडे जाणे येणे सोडून दिले. अशा तऱ्हेने ती जमीन ओसाड पडून राहली.

त्या गावात सुधीर नावाचा एक तरुण युवक रहात असे. तो लहानपणी काशीला विद्याभ्यासासाठी गेला होता. षड्शास्त्राचा अभ्यास करून तो नुकताच परत आला होता. गावकरी फक्त मजुरी करतात हे ऐकून सर्व गावकऱ्यांना बोलावून त्याने त्याचे कारण विचारले व ते ऐकल्यावर त्याला गावकऱ्यांच्या भोळेपणाबद्दल आश्चर्य वाटले. गावकरी म्हणाले—"शेताच्या मध्यभागी एक मोठे वडाचे झाड आहे. त्या झाडावर भुते रात्री मशाली लावून शेतात हिंडतात. ही गोष्ट कोणी सांगून आम्ही ऐकली असे नसून आम्ही स्वत: डोळ्यांनी पाहिली आहे."

सुधीरने त्यांना उलट सुलट सर्व प्रकारचे प्रश्न विचारले तेव्हां ते म्हणाले—"ती पालखी घेऊन शेतात नाचतात, हसतात व खिदळतात."











ते सर्व ऐकून घेऊन सुधीर कोणाला काही सांगितल्याशिवाय रात्री काळोख पडल्यावर त्या भुतांच्या शेताकडे निघाला. गावाबाहेर आल्यावर त्याला दुरूनच ते वडाचे मोठे झाड दिसले. त्या झाडाच्या टोकाला त्याला काही तरी पांढरे हालत असलेले दिसले. त्या पांढऱ्या वस्तूजवळच त्याला एकदम कसला तरी जाळ झाल्या सारखा दिसला. तो जाळ फार वेळ टिकला नाही. कोणी तरी मोठ्याने हसल्याचा आवाज पण ऐकू आला. नंतर पुन्हां सर्व सामसूम. सुधीरने ते सर्व एक गंमत म्हणून पाहिले व दातओठ चावून 'थांबा, खोड मोडतो तुमची!' असं मनातल्या मनात म्हणून व काही तरी करण्याचे ठरवून तो घरी येऊन झोपला.

दुसऱ्या दिवशी दुपारी जेवणखाण झाल्यावर सर्व आपापल्या घरी गप्पा मारीत आराम करीत असता सुधीरने त्याला जरूर असलेले सामान घेतले व त्यांचे एक गाठोडे बांधून घेऊन निघाला. वाटेत कोणी विचारले की कोठे निघालास तर त्याला तो परगावी जातो आहे असे सांगून पुढे निघून गेला.

सूर्यास्ताच्या आधी सुमारे दोन तास सुधीर भुताच्या शेताकडे गेला. त्याने जवळ पासची जागा लक्षपूर्वक पाहिली तेव्हां त्याला माणसांच्या पावलांच्या खुणा दिसल्या. त्या खुणा जुन्या नव्हत्या. त्यावरून तिकडे लोक येतजात असावेत असे त्याला वाटले.

सूर्यास्ताच्या सुमारास सुधीरने आपले गाठोडे सोडून त्यांत ठेवलेले काळे कपडे काढून अंगात घातले आणि गाठोडे घेऊन झाडावर चढला. एका उंच फांदीवर बसून त्याने स्वत:भोवती दोरी बांधून घेतली. बसल्या बसल्या डुलक्या घ्याव्या लागल्या तर चुकून खाली पडण्याचा प्रसंग येऊ नये म्हणून त्याने ती व्यवस्था केली होती. काळोख पडल्यावर त्याने बरोबर खायला आणलेले खाद्य पदार्थ खाऊन घेतले आणि भुतांची वाट पहात बसला.

मध्यरात्रीच्या सुमारास काही लोक त्या भुतांच्या शेतात आले. त्या लोकांना ती जागा चांगली माहीत असल्याचे स्पष्ट दिसत होते. ते एकंदर पाच जण होते. त्यांनी एका जागी एक शेकोटी पेटविली. त्यात त्यांनी कसली तरी पूड टाकली. त्या बरोबर एकदम मोठा जाळ झाला व विझला. त्यानंतर त्यांनी सैपाक केला. एकाने एक मोठी काठी घेतली. काठीला मोठे पांढरे कापड बांधले आणि वडाच्या झाडाजवळ थोडा वेळ हालवीत राहून नंतर ते खाली ठेवले. मधून मधून एक मनुष्य कोल्ह्या-सारखा ओरडत राहला अन् आणखी एक जण मोठमोठ्याने हसत राहला.

अशा तऱ्हेने ते काही वेळ भुताटकीचे नाटक करीत राहले. काही वेळाने आणखी दहाजण तेथे आले. त्यांच्या पैकी प्रत्येका-जवळ गाठोडी होती. ते एक जळणारे लाकूड घेऊन वडाच्या झाडाखाली एका जागी मोठा दगड होता तेथे आले. त्यांनी सर्वांनी मिळून तो दगड बाजूला सरकवला



आणि त्याच्या खाली खणले. थोडी माती खणून झाल्यावर खड्ड्यात काही गाठोडी दिसली. त्या दहा जणांनी आपापली गाठोडी त्या खड्ड्यात ठेवून खड्डा बुजवला आणि दगड पुन्हा त्या खड्ड्यावर सरकवून ठेवला. नंतर सर्वांनी मिळून एकत्र बसून बरोबर आणलेले खाण्याचे पदार्थ खाऊन घेतले. नंतर काही वेळ भुतांचे खेळ खेळत तेथून निघून गेले.

ते लोक चोर होते हे सुधीरने ओळखले. चोर निघून गेल्यावर सुधीर निश्चित होऊन झाडावरच झोपला. त्याची झोप मोडली तेव्हां सूर्य बराच वर आला होता.



त्याने स्वतः भोवती बांधून घेतलेली दोरी सोडली व खाली उतरून गावात गेला.

गावातल्या तरुण मंडळींनी सुधीरला विचारले–"काय रे, तू गांवाबाहेर कोठे तरी गेला होतास म्हणे? कोठे गेला होतास व इतका लवकर परत कसा काय आलास?"

"मी कोठे दूर नव्हतो गेलो. भुतांच्या शेतात भुतांच्या बरोबर होतो." सुधीर म्हणाला.

भुतांनी तुला जिवंत कसे काय सोडलं बुवा?" गावकरी चकित होऊन विचारू लागले.

"अरे ती भुते आपल्यासारखीच भुते आहेत. आपण हिंमत करून तिकडे गेलो तर ती सर्व पळून जातील. तुम्हांला एक गंमत मी दाखवणार आहे आज!" सुधीर म्हणाला.

सुधीर काहीतरी मूर्खपणा करून आपल्या सर्वांना धोक्यात ढकलणार असे पुष्कळांना वाटले. परंतु काही तरुण मंडळी सुधीर बरोबर भुतांच्या शेतात जायला तयार झाली. त्यांनी भुतांचे शेत हिंडून पाहिले. 'भुते' कोठे सैपाक करतात. त्यांनी शेकोटी कोठे पेटविली होती. एकदम जाळ कसा झाला व कसा तो विझला, एका 'भुता'ने हातात काठी घेऊन त्याला पांढरे फडके घेऊन कोठे व कसे हलवले व त्याच्या बरोबर 'भुते' कशी ओरडली व हसली वगैरे वर्णन करून सुधीर म्हणाला–"ही 'भुते' एकंदर पंधरा आहेत. मी हे सर्व झाडावर बसून पाहिले. ही 'भुते' नसून चोर आहेत. भुतांसारखे खेळ करून त्यांनी गावकऱ्यांना दहशत बसेल असे केले आहे. हे चोरून आणलेला माल या झाडाखाली एका खड्डयात पुरून ठेवतात. गावकऱ्यांना हे सर्व कळू नये व त्यांचा धंदा निर्विघ्न चालू रहावा यासाठी ह्या चोरांनी भुताटकीचे हे नाटक रचलं आहे.



नंतर सर्वांनी मिळून तो दगड बाजूला सारला व खड्डा खणून पाहल्यावर त्यांना सुधीरने सांगितल्याप्रमाणे शंभरावर गाठोडी दिसली. सुधीरने ती सर्व गाठोडी तरुण मित्र मंडळींच्या मदतीने उचलून गावात नेली. त्याने सर्व गावकऱ्यांना एकत्र जमवून भुतांच्या शेताचे गुपित समजावून सांगितले. गावकऱ्यांना तो म्हणाला ते कबूल करावे लागले व स्वतःच्या मूर्खपणाबद्दल पश्चात्ताप करावा लागला.

सुधीर म्हणाला–"आपल्या गावाला फसविणाऱ्या या चोरांना अद्दल घडेल असे काही तरी केले पाहिजे. नाही तर हे आपले गाव सोडून दुसऱ्या गावी जाऊन पुन्हा त्या गावाच्या लोकांना त्रास देतील."

त्यांनी सर्वांनी मिळून त्यांना मिळालेला तो सर्व ठेवा राजाला देण्याचे ठरविले. त्या प्रमाणे त्यांनी राजाकडे ती सर्व गाठोडी नेऊन दिली.

त्या दिवशी रात्री चोर आपली गाठोडी घेऊन त्या वडाच्या झाडाजवळ आले तेव्हां झाडाखाली रिकामा खड्डा पाहून त्यांना आश्चर्य वाटले. ते किंकर्तव्यविमूट स्थितीत उभे असता सुधीरला पुढारी करून गावातल्या पन्नासवर तरुण मंडळींनी काठ्या घेऊन त्या चोरांवर हल्ला केला व सर्व चोरांना खूप चोप दिला आणि त्यांना कैद करून राजाकडे घेऊन गेले.

राजा गावकऱ्यांवर खूष झाला. त्या चोरांनी कित्येक वर्षे राज्यात धुमाकूळ माजविला होता. सुधीरने चातुर्याने चोरांना पकडवून दिले याबद्दल राजाने त्याला शाबासकी दिली आणि गावकऱ्यांना चार महिने पुरेल एवढे धान्य दिले.

त्या वर्षी रंगपुरीच्या शेतकऱ्यांनी शेत नांगरून पुन्हा पीक काढले. अशा तऱ्हेने गांवावरचे संकट कायमचे टळले व गावकरी सुखी झाले.





# भिकाऱ्याची काठी

एका गावी एक भिकारी रहात असे. त्याच्या हातात पितळी मूठ असलेली एक काठी नेहमी असे. काठीचे दुसरे टोक पण पितळी होते.

त्या गांवच्या रामूने एक गोष्ट पाहिली, तो भिकारी एक क्षणभर देखील ती काठी दूर ठेवीत नसे. तसा तो भिकारी म्हातारा नव्हता अन् आंधळा पण नव्हता. मग नेहमी स्वत:जवळ तो ती काठी कशासाठी ठेवतो बरे? कदाचित त्या काठीत तो पैसे जमवून ठेवीत असावा, असे समजून रामूने ती काठी केव्हां तरी लांबविण्याचे मनाशी ठरविले. एकदा रामू, भिकारी झोपत असे तेथे रस्त्याचा बाजूला स्वत: पण जाऊन झोपला. भिकारी या कुशीवरुन त्या कुशीवर वळलेला पाहून रामूने ती काठी हळूच उचलून घेतली आणि तेथून पाय काढला.

वाटेत रामूला एक वाणी भेटला. तो माल विकत घ्यायला बाजारात चालला होता. त्या वाण्याजवळ पैशाची थैली रामूला दिसली. रामूने त्या वाण्याला आड वाटेला अडवले व दरडावून पैशाची पिशवी मागितली. वाण्याने नकार दिला.

रामूने पुन्हां दरडावून विचारले– "मुकाट्याने देतोस की नाही?" आणि त्याच्या कपाळात ती काठी मारली. काठीचा मार डोक्यात बसल्यामुळे वाणी बेशुद्ध होऊन खाली पडला.

वाणी बेशुद्ध होऊन पडलेला पाहून रामूला वाटले की तो मेला असावा. आपल्या हातात काठी पाहून आपल्यावर कोणी संशय करू नये म्हणून रामूने ती काठी तेथेच टाकली आणि पळून गेला.

थोड्या वेळाने वाणी शुद्धीवर आला. त्याची पिशवी नाहीशी झालेली होती. परंतु एक काठी जवळ पडलेली होती. वाण्याने काठी उचलून पाहिली. त्याला ती आकाराच्या मानाने जड वाटली. काठीची दोन्ही टोके पितळी होती. त्याने विचार केला त्या काठीचा काही तरी कल्पित महिमा सांगून ती काठी वीस रुपयांला विकता येईल. त्याच्या पिशवीत दहाच रुपये होते.

असा विचार करुन त्या वाण्याने शेजारच्या गावी एका सोनाराच्या हाती ती काठी वीस रुपयाला विकली. सोनाराला म्हणाला–"या काठीत हिरे ठेवलेले आहेत. माझ्या जन्मकुंडलीप्रमाणे हे हिरे मला लाभत नाहीत. म्हणून स्वस्तात विकायला तयार झालो. तू ही काठी विकत घेऊन आत जे हिरे आहेत ते ठेवून घे."

वाण्याच्या भुलावणीला भुलून जाऊन सोनाराने ती काठी वीस रुपयांला विकत घेतली.

वाणी व सोनार दोघांचे बोलणे दुरुन दोन चोर ऐकत होते. रात्री त्या चोरांनी ती काठी चोरली. काठी घेऊन चोर गावा-बाहेर गेले. काठीची पितळी मूठ व टोक काढून आतले हिरे काढून सारखे वाटून घ्यायचे दोघांनी ठरविले होते. परंतु ती मूठ किंवा टोक काढणे त्यांना शक्य झाले नाही. या शिवाय कोणी किती हिरे



श्री. गा. वा. वाटवे

घ्यायचे या प्रश्नावर दोघांची मारामारी पण झाली. त्यांची ती मारामारी पाहून राजाच्या शिपायांनी त्यांना धरले आणि राजासमोर नेऊन त्यांना हजर केले. त्यांचे भांडण त्या काठीत लपवून ठेवलेल्या हिऱ्यां-साठी आहे आणि ती काठी त्यांनी कोठून तरी चोरून आणली आहे, हे राजाला कळले. म्हणून राजाने त्या दोघांना कैदेत टाकले. त्यानंतर राजाने आपल्या राज्यात अशी दवंडी पिटविली की जो कोणी काठीच्या आत काय ठेवले आहे व ते कसे काढावयाचे हे सांगेल त्याला मोठे इनाम दिले जाईल.

ती दवंडी ऐकून रामू, वाणी, सोनार व भिकारी चौघे राजाकडे आले. रामू म्हणाला–"महाराज! या काठीत सोने लपवून ठेवले आहे."

"नाही महाराज, हिरे आहेत!" वाणी म्हणाला. "बरोबर आहे महाराज, हिरेच आहेत." सोनार पण म्हणाला.

"महाराज! ही काठी माझी आहे. ती माझी मला परत द्यावी." भिकाऱ्याने राजाजवळ प्रार्थना केली.

"यात काय आहे, हे प्रथम सांग!" भिकाऱ्याला राजा म्हणाला.

"महाराज! भिकाऱ्याच्या काठीत काय असणार? एका थोर पुरुषाने या काठीच्या दोन्ही टोकांना पितळी टोपणे बसवून दिली होती." भिकारी म्हणाला.

भिकारी जे म्हणाला ते राजाला खरे वाटले. त्याच्या बोलण्यात कृत्रिमपणा नव्हता. रामू, वाणी व सोनार तिघां-पैकी एकालाही काठीत काय आहे हे सांगता आले नाही. म्हणून राजाने सर्व गोष्टींची चवकशी करून व काठी त्या भिकाऱ्याचीच असल्याबद्दल खात्री करून घेऊन ती काठी त्याला दिली आणि तिघांकडून शंभर रुपये दंड वसूल केला.





# राजदंड

विक्रमसिद्धी जेव्हां कलिंग देशाच्या गादीवर बसला तेव्हां त्याने सर्व प्रथम आपल्या राज्याच्या चारी बाजूला जे शत्रु राजे होते त्या सर्वांना जिंकून आपले राज्य सुरक्षित केले. परंतु भुवनगिरीचा मांडलिक राजा जयदेव याने, बंड पुकारले. त्याचे पारिपत्य करण्यासाठी विक्रमसिद्धीने आपला विश्वास पात्र व हुशार सेनापती शक्तिसिंह याला पाठविले. शक्तिसिंह निघाला तेव्हां राजाने आपला राजदंड त्याच्या हातात दिला व म्हणाला–"हा राजदंड माझा प्रतिनिधी आहे. हा दंड तुझ्या हातात असेपर्यंत तू जो जो निर्णय घेशील तो माझाच निर्णय आहे असे समज. तू विजयी होशील!"

शक्तिसिंह एक मोठे सैन्य घेऊन भुवन-गिरीच्या किल्ल्यापासून एका मैलावर येऊन पोंचला. स्वारी करून तो किल्ला जिंकणे त्याला कठीण वाटले.

म्हणून शक्तिसिंहने लढाई करून किल्ला जिंकण्याचा विचार सोडून दिला आणि जयदेवशी संधीची बोलणी सुरू केली. त्याने दोघांच्या भेटीसाठी किल्ल्यापासून थोड्या अंतरावर एक तंबू उभा केला व त्या तंबूत दोघांची भेट होण्याचे ठरले. त्याने तंबूत मोठमोठ्या शंभर पेट्या आणून ठेवल्या. मोजक्या अंगरक्षकांबरोबर तो तंबूत पोंचला व जयदेवची वाट पाहू लागला. थोड्या वेळाने जयदेवदेखील काही अंगरक्षकांबरोबर आला.

शक्तिसिंह जयदेवला सामोरा गेला. तो त्याला म्हणाला–"मी आपल्या अंगरक्ष-कांना दूर जायला सांगतो, तू पण त्यांना दूर राहायला सांग. मी एक देखील शस्त्र घेऊन आलो नाही. तू देखील निःशस्त्र भेटीला ये. आपण काय बोलतो हे कोणाला कळता कामा नये." जयदेव त्या गोष्टीस कबूल झाला.

श्री. जां. दे. पाटील

आता फक्त दोघेच डेऱ्यात उरले. तेव्हां शक्तिसिंह जयदेवला म्हणाला– "महाराजांनी माझ्यावर पहा, एकदम केवढी जबाबदारी टाकली आहे. तुझा किल्ला जिंकणे मला शक्य वाटत नाही. पराभव होऊन मी परतलो तर माझी मान उडविली जाईल. तू महाराजांविरुद्ध बंड पुकारलेले पाहून तुझ्या शौर्य व साहसाचे जेवढे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. कधी कधी असे वाटते की मी तुझ्याच सारखे बंड करून तुझी मैत्री मिळवून एक स्वतंत्र राज्य कां स्थापू नये."

"याहून जास्त आनंदाची गोष्ट ती काय असणार? तू एक शूर योद्धा आहेस. आपण दोघे मिळून कलिंग राज्य जिंकू या. माझ्या साम्राज्यात माझ्यानंतर माझ्या बरोबरीच्या पदाचा अधिकारी तूच होशील. पण तू माझ्याशी दगा करणार नाहीस याची काय खात्री?" जयदेवने शंका केली.

"मी शपथ घेऊन शपथेची किंमत इतकी स्वस्त करू इच्छित नाही." शक्तिसिंह म्हणाला.

"तू माझ्या पदरी काम करण्यास तयार असशील तर तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास बसेल." जयदेव म्हणाला.

"त्याला मी कबूल आहे. पण मी या सर्वांहून अधिक मूल्यवान वस्तू तुला द्यायला तयार आहे." असे सांगून शक्तिसिंहने आपल्या एका अनुचराला बोलावून त्याला एका पेटीकडे बोट दाखवून त्या पेटीचे कुलूप तोडण्यास सांगितले.

त्या पेटीत सोनेच सोने होते. ते दाखवून शक्तिसिंह म्हणाला महाराजांनी या पेटया युद्धाच्या खर्चासाठी मला दिल्या आहेत. कुलूप फोडले ती पेटी तेवढी मागे सोड, बाकी पेटया तू किल्ल्यात घेऊन जा. आपण साम्राज्य स्थापन करू तेव्हां प्रजेच्या सुख–सोयीसाठी पैसा खर्च करावा लागेलच. इनामे वांटून शत्रु पक्षांतील लोकांस फितूर करून घेण्यास या पैशांचा उपयोग होईल. या शिवाय हे सर्व सोने तुला देऊन टाकल्यावर धनाभावे माझ्या सैन्याने माझ्या विरुद्ध बंड केले तरी त्या सैन्याला जिंकणे अशक्य नाहीं. या पेटया घेऊन जायला दोनशे शिपाई मी पाठवितो. त्यांच्याजवळ शस्त्रे राहणार नाहीत. त्यानंतर तू मला बोलावल्यावर किल्ल्यावर येऊन तुला भेटेन." शक्तिसिंहाने आपली योजना जयदेवाला समजावून सांगितली.

जयदेव ती सर्व योजना ऐकून खूष झाला. सर्व पेटया किल्ल्यात घेऊन जाण्या साठी
















कलिंग देशाचे दोन दोन सैनिक होते. जयदेवने आपल्या अंगरक्षकांपैकी एकाला सांगितले की किल्ल्याच्या दरवाज्यावर पाहरा देत असलेल्या पाहरेकऱ्यांना पेट्या आत घेऊन जाणारांस पेट्यांसह प्रवेश देण्यास सांगावे.

सैनिक निघून गेल्यावर दोघे परस्परांशी बोलू लागले. त्यावेळी जयदेव शक्तिसिंहाला म्हणाला–"तुला आपला राजदंड देऊन महाराजांनी पाठविले आहे, असे ऐकतो. यापुढे तो राजदंड माझ्याजवळ ठेव!"

शक्तिसिंह होकार देऊन राजदंड घेऊन आला व म्हणाला–"हा एक अपूर्व राजदंड आहे. हा ज्याच्या हाती असेल त्याला कोणी जिंकणेच शक्य नाही. जो राजद्रोह करील त्यांचा वध करण्यास हा वज्रायुधा सारखा भयंकर आहे." असे म्हणत शक्ति-सिंहने एका क्षणार्धात तो राजदंड जयदेवच्या डोक्यावर इतक्या जोराने मारला की जयदेव तत्काळ मरण पावला.

तिकडे किल्ल्यात पोचल्यावर सर्व पेट्या शिपायांनी उघडल्या त्यांतून एकेक शिपाई व शस्त्रास्त्रे बाहेर आली. पेटी-तल्या शिपायाने ती शस्त्रे पेट्या आण-णाऱ्या शिपायांना दिली. अशातऱ्हेने त्या तीनशे शिपायांनी एक जुटीने युद्ध करून किल्ल्यातील मुख्य दारांवर अधिकार मिळविला.

तिकडून कलिंग देशाच्या सैन्याने त्याच वेळी किल्ल्यात प्रवेश केला व किल्ला काबीज केला.

शक्तिशिंह इतक्या चातुर्याने बंडखोर भुवनगिरीच्या मांडलिक राजाचा वध करून त्याचा किल्ला जिंकील असे कलिंग देशाच्या राजाला स्वप्नातदेखील वाटले नव्हते. त्याने शक्तिसिंहाला जयदेवाचे राज्य देऊन त्याला आपला एक मांडलिक राजा म्हणून नेमले व त्याला अनेक पदव्या बहाल करून भूषित केले.





# धुळीचे पाय

मुले संध्याकाळपर्यंत खेळून घरी परत आली. आजोबा म्हणाले–"आला का रे मुलांनो हात पाय धुवून?"

सर्व मुले भराभर हातपाय धुवून आली. एकटा छोटू हातपाय धुवायला नाही गेला असे मुलांनी आजोबांना सांगितले. त्याला त्याचे आजोबा म्हणाले–"छोटू, बाळ, जा स्वच्छ पाय धुवून ये. पहा, पायावर केवढी धूळ जमा झाली आहे!"

"तो कधी पाय धुवीत नाही, आजोबा! तसाच येऊन अंथरुणावर लोळू लागतो." मुलांनी त्याच्या विरुद्ध तक्रार केली.

"पाय धुतले तरी पुन्हां माती लागते पायाला, आजोबा!" छोटू म्हणाला आणि पाय आपटीत जाऊन हात पाय धुवून आला.

"फार पूर्वी छोटू सारखाच एक राजा होता." आजोबांनी म्हटले मात्र, मुले 'गोष्ट गोष्ट' म्हणत आजोबांच्या चारी बाजूला घोळका करून चिकटून बसली. छोटूने विचारले–"कोण होता हो तो राजा?"

"सांगतो हं!" असे म्हणत आजोबांनी तपकीर नाकात कोंबली व गोष्ट सांगू लागले,–"त्या राजाला धूळ आणि मातीच्या नांवाने राग येत होता. पायाला थोडीशी धूळ लागली की तो लगेच पाय धुवीत असे, पण पायाला पुन्हां माती लागे.

म्हणून एकदां राजाने आपल्या मंत्र्याला बोलावून हुकूम सोडला–"मी तुला एका महिन्याचा अवधी देतो. राज्यात धुळीचा किंवा मातीचा एक कणदेखील कोठे दिसतां कामा नये. जर दिसला तर तुझे डोकेंच उडवीन."

राजाची आज्ञा ऐकून मंत्री घाबरला. त्याने दरबारातल्या पंडितांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. सर्वांनी मिळून असे

सौ. शारदाबाई मानकर

ठरविले की एक लाख केरसुण्या घेऊन राज्याची सफाई सुरु करावी.

एक लाख मजूर केरसुण्या घेऊन सफाई करु लागल्यावर इतकी धूळ उडू लागली की श्वासोच्छ्वास घेणे कठीण झाले. राजाला तर शिंकांवर शिंका येऊ लागल्या. राजाने मंत्र्याला बोलावून दरडावून विचारले–"हे तू काय आरंभविले आहेस? तुला धूळ नाहीशी करायला सांगितले होते आणि आकाशच धुळीने धुंद झाले आहे. आजच्या आज धूळ खाली बसली नाही तर तुझे डोके उडवीन." मंत्री घाबरला व त्याने पुन्हा दरबारी पंडितांचा सल्ला घेतला. सर्वांनी एक मताने सल्ला दिला की धुळीचा शत्रू पाणी आहे. दहा लाख बालद्या पाण्याने राज्यभर पाण्याचा शिडकाव करावा.

त्याप्रमाणे दहा लाख लोक दहा लाख बालद्या घेऊन विहिरींतून पाणी काढून शिडकाव करू लागले. थोड्याच वेळाने सर्व विहिरी कोरड्या पडल्या. जागोजागी लहान डबकी व तलाव तयार झाले.

ते कळल्यावर राजा पुन्हा मंत्र्याला बोलावून त्याला दरडावून म्हणाला–"तुला एक समस्या सोडवायला सांगावी तर तू दुसरी उभी करतो आहेस. उद्या या वेळे-



पर्यंत ही समस्या सुटली नाही तर तुला तुझे डोके तुझ्या खांद्यावर दिसणार नाही. लक्षांत ठेव."

आता मात्र मंत्र्याची गाळणच उडून गेली. त्याने सर्व दरबारी पंडितांची सभा बोलाविली. त्यांच्या पैकी एकाने सल्ला दिला–"आपल्या राज्यात जेथे जेथे म्हणून मनुष्य चालतात तेथे तेथे कातडी अंथरून ठेवावी."

सर्वांनी त्याच्या बुद्धिमत्तेची वाखाणणी केली.

मंत्र्याने राजाजवळ जाऊन त्याने जो उपाय करण्याचे ठरविले होते ते सांगितले.

राजाने त्याला शाबासकी दिली व म्हणाला–"छान! आजपर्यंत या सर्वांची अक्कल कोठे गेली होती? जा, सर्व चांभारांना सांगा, असेल तेवढे चामडे घेऊन या."

राजाच्या हुकमाने राज्यभर दवंडी पिटविण्यात आली. सर्व चांभार राजवाड्या-समोर हजर झाले. राजा त्यांना म्हणाला–"रस्ते व वाटा, जेथे जेथे आपण मनुष्य जातो येतो ती सर्व जागा कातडे अंथरून झांकून टाकावयाची आहे. तेव्हा एवढ्या वाटेवर अंथरायला किती कातडी लागतील हे मला सांगा."



तेव्हां एक म्हातारा चांभार समोर येऊन हात जोडून नम्रपणे म्हणाला–"महाराज! पहिल्याने हर्व रस्त्यांची लांबी रुंदी मापून पाहिली पाहिजे. तेव्हां किती कातडे लागेल हे सांगता येईल. हे काम एका आठवड्यात किंवा पंधरवड्यात पुरे होईल असे नाही मला वाटत."

राजाने क्रुद्ध मुद्रेने एकदा मंत्र्याकडे पाहिले, जणुकाही तो म्हणत होता की तू आतापर्यंत जो जो उपाय केलास त्यामुळे फुकट वेळ गेला आणि व्यर्थ खर्च व श्रम करावा लागला.

इतक्यात एक तरुण चांभार पुढे येऊन हात जोडून म्हणाला–"महाराज! माझी एक विनंती आहे. मला वाटते, सर्व रस्त्यांवर कातडी अंथरत बसण्याची गरजच नाही. त्या ऐवजी पाय झाकण्या पुरेसे चामडे वापरले तर पुरेल. आपली आज्ञा असेल तर मी उद्यांच तसे चामडे शिवून तयार करून दाखवितो."

"असे म्हणतोस होय? बरं तर उद्या तयार करून घेऊन ये." राजा म्हणाला.

दुसऱ्या दिवशी तो तरुण चांभार चामड्याच्या वहाणा तयार करून घेऊन आला आणि त्या राजासमोर ठेवून म्हणाला–"पायात घालून पहा, महाराज!" त्या वहाणा खालीवर चामड्याच्या पट्ट्या लावून पाय झाकतील अशा होत्या. राजाने त्या वहाणा घालून चार पावले चालून पाहिले. रस्त्यावर जाऊन आला व पाय बाहेर काढून पाहिले. पाय स्वच्छ होते. धुळीचा एक कणदेखील पायावर नव्हता.

त्या तरुण चांभाराची पाठ थोपटून राजा म्हणाला–"अरे! तू तर माझ्या मंत्र्याहून हुशार निघालास! तू माझ्या दरबारातल्या सर्व दरबाऱ्यांसाठी वहाणा तयार करून घेऊन ये."

त्या दिवसापासून सर्व लोक वहाणा, चपला किंवा जोडे घालू लागले.





# महाभारत

आपल्या वडिलांचा मृत्यु कसा झाला आता हे जनमेजय राजाला कळले. बालपणीच मंत्र्यांनी त्याचा राज्याभिषेक केला, तारुण्य येताच काशीनरेशाची मुलगी वपुष्ठा हिच्याशी त्याचे लग्न करून दिले. त्यानंतर त्यांनी त्याला सुचविले की महाराज, आपल्या वडिलांचा मृत्यु तक्षक नावाच्या सर्पाच्या दंशाने झाला आहे. म्हणून उदंक ऋषींनी सांगितल्याप्रमाणे आपण नागयज्ञ करावा.

म्हणून जयमेजय राजाने नागयज्ञ करून तक्षकादि सर्पांची त्यात आहुती देण्याचे ठरविले. राजपुरोहित व ऋत्विकांना बोलावून नागयज्ञ कसा करावा हे विचारले. त्यांनी सुचविल्या प्रमाणे आवश्यक सर्व यज्ञसामुग्री जमविण्यात आली. यज्ञ वेदिका तयार करण्यात आली. यज्ञाची तयारी चालु होती तेव्हां लोहिताक्ष नावाच्या सूताने येऊन भविष्य वर्तविले–"हा यज्ञ पुरा होण्यापूर्वी एक ब्राह्मण हा यज्ञ थांबवील."

जनमेजय राजाने लोहिताक्षाच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले, एवढेच नव्हे तर कोणाला यज्ञ चालू असता यज्ञमंडपात प्रवेश मिळणार नाही याचा बंदोबस्त करून ठेवला. त्यानंतर जनमेजय राजाने वपुष्ठा महाराणीसह यज्ञ दीक्षा घेतली नागयज्ञासाठी चंडभार्गव होता म्हणून आणि पिंगल, उध्वर्य व कौटसु हे उद्‌गाता म्हणून नेमले गेले. ठरलेल्या मुहूर्तावर यज्ञ आरंभ झाला. सर्व दिशांचे लक्षावधी साप येऊन यज्ञकुंडात पडू लागले.



तक्षक घाबरून इंद्राकडे आश्रय मागायला धावला तेव्हां इंद्र त्याला म्हणाला–"या नागयज्ञाचा ताप काही थोर नागांना होणार नाही असे स्वत: ब्रह्मदेवाने मला सांगितले आहे. तेव्हां तू भिण्याचे कारण नाही. तू माझ्या आश्रयास निश्चितपणे रहा.

नाग व सर्प यांचा संहार चाललेला पाहून वासुकी घाबरला. त्याने त्याची बहीण जरत्कारु हिला भेटून तिला म्हटले–"तुझे लग्न जरत्कारु मुनींशी अशा प्रसंगातून मुक्ति मिळावी म्हणूनच तर करून देण्यात आले होते. म्हणून तू आपला मुलगा आस्तिक याला पाठवून हा यज्ञ थांबव."

मातेच्या आज्ञेने आस्तिक यज्ञमंडपात आला. स्वस्ति वचन सांगून त्याने राजा, अग्नि आणि ऋत्विक सर्वांचा स्तोत्रपाठ केला. राजाला जनमेजय ते स्तोत्र ऐकून खूष झाला–"हा लहान किशोर वय आहे. पण मोठा ज्ञानी पुरुष दिसतो आहे. हा मागेल तो वर मी देईन."

लगेच आस्तिकाने नागयज्ञ बंद करावा अशी विनंती केली.

जनमेजय त्याला म्हणाला–"हा एक वर सोडून तू पाहिजे तो दुसरा मागून घे." पण आस्तिक त्याला कबूल झाला नाही. इतर लोकानी वचन पालन करावे असा सल्ला दिला. अशा तऱ्हेने नागयज्ञ थांबला.

त्या वेळी जनमेजय राजाने सर्व ब्रह्म-वृंदांना दक्षिणा दिली. व्यास मुनी जेव्हां आपल्या शिष्यांसह वर्गाबरोबर तेथे आले तेव्हां वैशंपायनांच्या तोंडून राजाने आपल्या पूर्वजांचा वृत्तांत ऐकला.

भारत वंशाचा मूळपुरुष वैवस्वत मनू हा होता. तो अदितीचा नातू होता. वैवस्वताची मुलगी इला हिला पुरूरवा नांवाचा मुलगा झाला. पुरूरवा व ऊर्वशी यांना सहा मुल झाले त्यांत आयु नांवाचा एक मुलगा होता. त्याला नहुष वगैरे चार



मुलगे झाले. शंभर यज्ञ करून नहुषाने इंद्र पद मिळविले. त्याला सहा मुलगे झाले. ययाती हा त्याचा दुसरा मुलगा. मोठा मुलगा यती तपश्चर्या करून मोक्षाच्या शोधार्थ गेला तेव्हां दुसरा मुलगा ययाती हा गादीवर बसला.

ययातीं राज्य करीत असतां शुक्राचार्य राक्षसांचे पौराहित्य करीत होते. देव व दानव यांच्या युद्धात जे राक्षस मरत त्यांना शुक्र संजीवनी मंत्राचा प्रयोगन करु जिवंत करी. देवांचा गुरु बृहस्पती याला संजीवनी विद्या अवगत नव्हती. म्हणून देवांनी बृहस्पतीचा मुलगा कच याला संजीवती विद्या शिकून घेण्यासाठी शुक्राकडे पाठविले.

कचने गुरुची भक्तिपूर्वक सेवा केली व गुरुपुत्री देवयानी हिचे मन स्वत:कडे ओढून घेतले. पुढे काही दिवसांनी कच हा बृहस्पतीचा मुलगा असल्याचे राक्षसांना कळले. एकदां कच आपल्या गुरूच्या गाई चरायला घेऊन गेला असता राक्षसांनी त्याचा वध केला आणि त्याच्या शरिराचे तुकडे करून लांडग्यांना खायला घातले. ती गोष्ट देवयानीला कळताच शुक्रातार्यांनी संजीवनी विद्येचा प्रयोग करून त्याला जिवंत केला. दुसऱ्या खेपेस कच देवयानी



साठी फुले आणायला गेला होता तेव्हां राक्षसानी त्याचा वध करून त्याला समुद्रात फेकून दिले. देवयानी रडू लागली. तेव्हां शुक्राचार्यांनी त्याला पुन्हां जिवंत केले.

तिसऱ्या खेपेस राक्षसांनी कचाचा वध करून त्याला जाळून त्याचे भस्म मद्यांत घालून ते स्वत: शुक्राचार्यांना पाजले. या खेपेस संजीवनी विद्येचा प्रयोग शुक्राचार्यांनी केला तेव्हां तो त्यांच्याच पोटात होता. तो जिवंत झाला, पण बाहेर आला असता तर शुक्राचार्यांचाच जीव गेला असता. म्हणून नाइलाजाने शुक्राचार्यांनी त्याला प्रथम संजीवनी विद्या शिकवून बाहेर आल्या-

वर आपल्या गुरूला जिवंत करायला सांगितले.

कचने त्या प्रमाणे गुरूचे पोट चिरून बाहेर आल्यावर शुक्राचार्यांना त्याच संजीवनी विद्येचा प्रयोग करून जिवंत केले.

कच ज्या कामासाठी आला होता ते पुरे झाले होते. म्हणून त्याने गुरूचा निरोप घेतला. तेव्हां देवयानी त्याला म्हणाली–"मी तुझ्या तीनदां जिवंत करविले. म्हणून तू आतां माझ्याशी लग्न कर."

कच म्हणाला–"तू गुरुपुत्री म्हणजे भगिनीसारखी आहेस. तुझ्याशी विवाह हे महापाप होईल."

"तर मग तुला संजीविनी विद्येचा काही उपयोग होणार नाही." असा शाप देवयानीने त्याला शाप दिला.

"बरे तर तुझ्याशी कोणी ब्राह्मण लग्न करणार नाही." असा कचने तिला प्रति दिला आणि देवलोकात निघून गेला.

तेव्हां राक्षसांचा राजा वृषपर्व हा होता. त्याला शर्मिष्ठा नावाची मुलगी होती. एकदा ती देवयानी बरोबर आपल्या सर्व सखींसह वनविहार करायला गेली. एका जागी त्यांना सुंदर सरोवर दिसले. सर्वांनी आपले कपडे काठावर काढून ठेवले व स्नानाला पाण्यात उतरल्या. तेवढ्यात सोसाट्याचा





वारा आला आणि त्यांची वस्त्रे एकत्र गुरफटून गेली. त्या पाण्याबाहेर आल्या तेव्हां घाईत शर्मिष्ठा देवयानीचीच साडी नेसली. देवयानीला नेसायला शर्मिष्ठेची साडीच उरली.

देवयानी घमेंडीत शर्मिष्ठेला म्हणाली–"तू किती झाले तरी राक्षसीणच. मी ब्राह्मण स्त्री आहे. तुझी साडी मी नाही नेसणार."

ते ऐकून शर्मिष्ठेला राग आला व ती म्हणाली–"ए पोरी! तोंड बंद कर. तुझा बाप माझ्या बापाने दिलेल्या भिक्षेवर जगतो आहे. मग मी सोडलेली साडी नेसण्यात तुला कां ग लाज वाटते?" तिने रागाच्या भरात देवयानीला एका विहिरीत ढकलले आणि आपल्या सखींबरोबर राजवाड्यात परत गेली.

थोड्या वेळाने ययाती राजा शिकार करून दमल्यामुळे विसावा घेण्यासाठी त्याच विहिरीजवळ आला. प्यायला पाणी काढू लागला तेव्हां त्याला विहिरीत पडलेली देवयानी दिसली.

"कोण तू? आणि विहिरीत कशी काय पडलीस?" ययातीने देवयानीला विचारले.

ती म्हणाली–"मी राक्षसांचे गुरु शुक्राचार्य यांची मुलगी. माझे नाव देवयानी मला वर काढा." असे म्हणत देवयानीने आपला हात वर केला. ययातीने तिचा हात धरून तिला वर काढले आणि आपल्या राजधानीस निघून गेला.

त्याच वेळी घूर्णिका नामक एक दासी देवयानीला शोधत तेथे आली. देवयानी तिला म्हणाली–"बाबांना जाऊन सांग की मी वृषपर्वाच्या राजधानीत पाऊल देखील टाकणार नाही. शर्मिष्ठाने माझा जो अपमान केला आहे." त्यानंतर देवयानीने दासीला सांगितले. वृत्त कळल्यावर शुक्राचार्य



मुलीला भेटायला धावत आले. त्यांनी तिला विचारले–"मुली! तू शर्मिष्ठेला काही म्हणालीस का? नाहीतर तिनें तुला असे उगाच विहिरीत कां ढकलले?"

देवयानीने जे घडले ते सर्व वडिलांना सांगून शर्मिष्ठेने तिच्या वडिलांच्या गुरूला अपमानास्पद असे जे शब्द उच्चारले ते देखील सांगितले. ते ऐकून शुक्राचार्य म्हणाले–"तू राजधानीत प्रवेश केला नाहीस तर मी तरी कसा काय करीन?"

तिकडे वृषपर्व राजाला पण सर्व वृत्त कळले. तो स्वत: विहिरीजवळ धांवत आला व मुलीच्या चुकी बद्दल क्षमा मागून दोघांना राजधानीत यायला विनंती केली.

गुरु शुक्राचार्य म्हणाले–"राजा! तुझ्या अनुयायांचा व्यवहार माझ्याशी बरोबर नाही. तुझ्या अनुयायांनी माझ्या शिष्याला तीनदां ठार केले आणि आतां तुझ्या मुलीने माझ्या मुलीचा अशातऱ्हेने अपमान केला. या पुढे मी तुझे पौरोहित्य करण्यास तयार नाही."

वृषपर्वाने शुक्राचार्यांची अनेक प्रकारे क्षमा मागून नगरात येण्यास विनंती केली तेव्हां ते म्हणाले–"राजा! देवयानीने येण्याचे कबूल केले तर मी येईन."

राजाने देवयानी जवळ नगरात येण्यास विनंती केली तेव्हां ती म्हणाली–"शर्मिष्ठा व तिच्या दासी माझ्या दासी होऊन माझ्याबरोबर रहायला तयार असतील तर मी नगरात प्रवेश करीन." वृषपर्वाने ती गोष्ट मान्य केली. शर्मिष्ठा देवयानीची दासी झाली. देवयानीचे शिव्याशाप ती निमूटपणे सहन करू लागली.

एकदा देवयानी आपली दासी शर्मिष्ठा व इतर दासींबरोबर त्याच वनात गेली. त्यादिवशी सुद्धा ययाती शिकारीसाठी त्या वनात आला होता. शर्मिष्ठा व देवयानी





मुलीला भेटायला धावत आले. त्यांनी तिला विचारले–"मुली! तू शर्मिष्ठेला काही म्हणालीस का? नाहीतर तिनें तुला असे उगाच विहिरीत कां ढकलले?"

देवयानीने जे घडले ते सर्व वडिलांना सांगून शर्मिष्ठेने तिच्या वडिलांच्या गुरूला अपमानास्पद असे जे शब्द उच्चारले ते देखील सांगितले. ते ऐकून शुक्राचार्य म्हणाले–"तू राजधानीत प्रवेश केला नाहीस तर मी तरी कसा काय करीन?"

तिकडे वृषपर्व राजाला पण सर्व वृत्त कळले. तो स्वत: विहिरीजवळ धांवत आला व मुलीच्या चुकी बद्दल क्षमा मागून दोघांना राजधानीत यायला विनंती केली.

गुरु शुक्राचार्य म्हणाले–"राजा! तुझ्या अनुयायांचा व्यवहार माझ्याशी बरोबर नाही. तुझ्या अनुयायांनी माझ्या शिष्याला तीनदां ठार केले आणि आतां तुझ्या मुलीने माझ्या मुलीचा अशातऱ्हेने अपमान केला. या पुढे मी तुझे पौरोहित्य करण्यास तयार नाही."

वृषपर्वाने शुक्राचार्यांची अनेक प्रकारे क्षमा मागून नगरात येण्यास विनंती केली तेव्हां ते म्हणाले–"राजा! देवयानीने येण्याचे कबूल केले तर मी येईन."

राजाने देवयानी जवळ नगरात येण्यास विनंती केली तेव्हां ती म्हणाली–"शर्मिष्ठा व तिच्या दासी माझ्या दासी होऊन माझ्याबरोबर रहायला तयार असतील तर मी नगरात प्रवेश करीन." वृषपर्वाने ती गोष्ट मान्य केली. शर्मिष्ठा देवयानीची दासी झाली. देवयानीचे शिव्याशाप ती निमूटपणे सहन करू लागली.

एकदा देवयानी आपली दासी शर्मिष्ठा व इतर दासींबरोबर त्याच वनात गेली. त्यादिवशी सुद्धा ययाती शिकारीसाठी त्या वनात आला होता. शर्मिष्ठा व देवयानी

चांदोबा ५४

       

एका उच्च कुळात झाला आणि विवाहाशिवाय तुला हे मातृत्व कसे काय लाभले?"

शर्मिष्ठा लाजेने मान खाली घालून म्हणाली–"मला एका महामुनीने हा पुत्र दिला."

ते ऐकून देवयानीने विचारले–"त्या महामुनीचे नाव ग काय?"

"त्या महामुनींचे दिव्य तेज पाहून त्यांचे नाव गाव विचारण्याचे भानच मला राहले नाही." शर्मिष्ठा म्हणाली.

एकदा राजा ययाती देवयानीबरोबर अशोकवनात शर्मिष्ठेच्या निवास स्थानाजवळून जाऊ लागला. शर्मिष्ठेच्या मुलांत ययाती राजाच्याच रूप लावण्याची झांक देवयानीला दिसली. तेव्हां तिने त्याला जवळ बोलावून विचारले–"खरे सांग! तुझ्या वडिलांचे नाव काय?" तेव्हां मुलाने ययाती राजा कडे पाहिले. देवयानीला परमावधीचा राग आला व ती जे तोंडाला आले ते शर्मिष्ठेला बोलली. म्हणाली–"तू राक्षसीणच खरी! तू माझ्याशी द्रोह केला आहेस!"

शर्मिष्ठा तितक्याचदृढ शब्दात म्हणाली–"मी अधर्म केलेला नाही. तू जसे राजाला वरण केलेस तसेच मी केले. तू माझ्याहून मोठी आहेस व ब्राह्मणकन्या आहेस. म्हणून मी तुझा आदर करीत आले. हे राजर्षी आहेत. म्हणून मी एक महामुनी कडून मला ही पुत्रप्राप्ती झाली असे म्हटले तर त्यात काय गैर केले?"

ते ऐकून देवयानी ययातीवर राग काढून म्हणाली–"तुम्ही माझ्याशी द्रोह केलात. म्हणून मी यापुढे तुमच्या बरोबर राहणार नाही." असे सांगून ती पतीगृह सोडून पितृगृही निघून गेली आणि शुक्राचार्यांना सर्व वृत्तांत सांगितला. शुक्राचार्यांनी ययातीला वार्धक्याचा शाप दिला. म्हणून तो एकाएकी म्हातारा झाला.





# गांधीचे चरित्र

[२]

**मो**हनदास गांधीनी कोठेतरी वाचले होते की दांपत्य जीवन हे पवित्र राखले पाहिजे. पतीने आपल्या बायकोला सोडून परस्त्रीचा विचारदेखील मनात येऊ देता कामा नये, तसेच पत्नीने पण पातिव्रत्याचे पालन केले पाहिजे. म्हणून गांधीजी कस्तुरबाला कोठे जाऊ येऊ देत नसत. देवळांत जायचे झाले तरी त्यांची परवानगी घेऊन जावे लागे. कुस्तुरबांना हे नियम असह्य वाटत. त्यांनी त्या विरुद्ध सत्याग्रह केला.

त्यानंतर कित्येक वर्षांनी गांधीजींनी स्वतः म्हटले होते–"मी बायकोवर अधिकार गाजवू लागलो आणि तिने सत्याग्रह शिकून घेतला. तिला माझा मूर्खपणा सहन करावा लागला हे कळल्यावर मला स्वतःचीच लाज वाटली. मी तिच्याजवळच अहिंसेचे शिक्षण घेतले."

गांधीजींना ते मोठ्यांची आज्ञा कधी मोडत नाहीत असा गर्व बालपणी होत असे. परंतु हळूहळू त्यांना हे कळू लागले की मोठ्यांचे अंधविश्वासाने अनुकरण करणे किंवा त्यांच्या म्हणण्याप्रमाणे डोळे झांकून वागणे हे मनुष्याने स्वतःच्या स्वतंत्र विचारांचे हनन करण्यासारखे आहे. त्यांनी त्या विरुद्ध 'बंड' केले. वैष्णव मतावलंबी गांधी कुटुंबातली मंडळी मांसखाणे किंवा सिगारेट पिणे याला महापाप मानीत. एका सहपाठ्याच्या संगतीत गांधीजी कोणाच्या नकळत मांस खाऊ लागले. परंतु घरी येऊन जेवले नाही तर आई विचारील. मग खोटे कसे बोलावयाचे? म्हणून त्यांनी मांस खाणेच सोडून दिले.

अगदी असेच गांधीची बालपणी आणखी एका मित्राच्या संगतीत सिगारेट ओढू



# भुताचा महाल

एका गावी एक श्रीमंत शेतकरी रहात असे. त्याला दोन मुलगे होते. मोठा मुलगा भोळाभाबडा होता व धाकटा धूर्त व हुशार होता. दोघांचे परस्परावर फार प्रेम होते. परंतु बापाला वाटे की दोघांची लग्ने होऊन त्यांच्या बायका आल्या व मुले बाळे झाली म्हणजे मोठा आपल्या भाबडेपणामुळे संकटात पडेल. म्हणून बापाने एक उपाय योजून गावच्या पाटलाला आपल्या घरी बोलावले.

पाटलाने इतक्या तातडीने बोलावण्याचे कारण विचारले तेव्हां तो शेतकरी म्हणाला–"मी आपली सर्व इस्टेट मोठ्या मुलाच्या नावे लिहून ठेवावी, म्हणतो. धाकट्याला एक पैदेखील देण्याची माझी इच्छा नाही."

"असा अन्याय आपल्या धाकट्या मुला-वर कां रे करतोस?" पाटलाने विचारले.

"मोठा मुलगा अगदी भोळा आहे. धाकटा हुशार आहे. धाकटा वडील भावाला फसविण्याची शक्यता आहे. दोघात मी म्हणतो तसे अंतर आहे की नाही स्वतःच पहा." असे सांगून त्याने आपल्या मोठ्या मुलाला बोलाविले.

तो आल्यावर बापाने त्याला विचारले–

"हे पहा, दोन फुट लांब व दोन फुट खोल खड्डा खणला तर त्यातून किती माती निघेल?"

"एक मोठी टोपलीभर निघेल, बाबा!" मोठ्या मुलाने उत्तर दिले.

"बरं तर तू जा व धाकट्याला पाठ-वून दे." बाप म्हणाला. धाकटा मुलगा आला. त्याला बापाने तोच प्रश्न विचारला.

"दोन फुट लांब व दोन फुट खोल खणलं तर म्हणता? माती काय निघणार? मुळीच निघायची नाही." धाकटा म्हणाला.

श्री. शा. सा. गोसावी

बापाने त्याला पाठवून दिले व पाट-लाला म्हणाला–"पाहिलात फरक दोघा-तला? मोठ्याला समजूत कमी आहे. धाकटा जाईल तिथे चार पैसे मिळवील."

त्यानंतर काही दिवसांनी तो श्रीमंत शेतकरी वारला. गावच्या पाटलाने दोघा मुलांना बोलाविले व म्हणाला–"तुमच्या वडिलांनी हे मृत्युपत्र लिहून ठेवले आहे, पहा. यात त्यांनी आपली सर्व इस्टेट मोठ्याच्या नावाने लिहून ठेवली आहे."

धाकट्या मुलाला, वडील इतका अन्याय करतील असे स्वप्नात देखील कधी वाटले नव्हते. कारण वडिलांनी कधी लहान थोर असा भेदभाव केलाच नव्हता. याचे काही तरी कारण असले पाहिजे असे विचार केल्यावर त्याला वाटले. पुढे कळेल कारण, असा विचार करून तो काही बोलला नाही.

बापाने मृत्यपत्रात जसे लिहून ठेवले होते त्यात अन्याय झाला असे मोठ्याला पण वाटले. तो आपल्या धाकट्या भावाला म्हणाला–"ही सर्व इस्टेट मी घेऊन काय करू? आपण सारखीसारखी वांटून घेऊ."

परंतु धाकटा त्या गोष्टीस कबूल झाला नाही. म्हणाला–"बाबांनी कोणत्या तरी





हेतूनेच असे केले असावे. ते बदलणे बरोबर नाही."

त्याच दिवशी धाकटा भाऊ उदर निर्वाहाच्या शोधार्थ गांव सोडून निघाला. तो एका मोठ्या गावी आला. त्या गावात नुकतेच बांधलेले एक नवीन घर होते. पण त्यात कोणी रहात नव्हते. त्याने गावकऱ्यांना त्याचे कारण विचारले.

गावकरी म्हणाले–"आमच्या राजाने दहा लाख रुपये खर्च करून हा वाडा बांधला. थोडयाच दिवसांपूर्वी हा बांधून तयार झाला. परन्तु त्या वाडयात एक भूत येऊन राहू लागले आहे. ते भूत गावकऱ्यांनी पुष्कळदां पाहिले पण आहे. रात्री कोणी त्या वाडयात पाऊल टाकले तर ते त्याला भेडसावते. म्हणून कोणी वाडयात पाऊल टाकायला तयार नाही."

"म्हणून राजाने इतका मोठा राजवाडा रिकामा सोडला आहे, म्हणता?" धाकटया भावाने आश्चर्य प्रगट केले.

"नाही हो, त्या भूताला पळविण्यासाठी राजाने पुष्कळ मंत्रतंत्र करविले. पण काही फायदा झाला नाही. शेवटी राजाने गावभर दवंडी पिटविली की या भूताला जो कोणी पळवून लावील त्याला एक लाख रुपये इनाम दिले जाईल. पण भूतांच्या वाटेला जायचे धाडस कोण दाखवणार, तुम्हीच सांगा." गावकरी म्हणाले.

धाकटा भाऊ राजाकडे गेला व म्हणाला–"महाराज! आपल्या नव्या वाडयातल्या भूताला पाहण्याची संधी मला एकदा द्यावी. जमल्यास मी त्याला पळवून लावीन."

राजा त्या गोष्टीस कबूल झाला.

त्या दिवशी रात्री धाकटा भाऊ नव्या राजवाडयाचे दार उघडून आत गेला व भूताची वाट पहात बसला.

मध्य रात्रीच्या सुमारास एक पुसट आकृती हवेत तरंगत त्याच्यासमोर आली व तिने धाकटया भावाला विचारले–"कोण तू?"

"मी कोण हे मागाहून सांगेन. पण प्रथम हे सांग या नव्या वाडयात शिरून तो बळकावणारा तू कोण?" धाकटयाने निधडेपणे प्रश्न केला.

"मला एका प्रश्नाचे उत्तर हवे आहे. तू उत्तर दिलेस तर मी हा वाडा सोडून निघून जाईन." भूत म्हणाले.

"विचार तुझा प्रश्न." धाकटा भाऊ म्हणाला.

"दोन फूट रुंद व दोन फूट खोल जमीन खणली तर किती माती निघेल?" भूताने विचारले.

धाकटा भाऊ तो प्रश्न ऐकून मोठ्याने ओरडून म्हणाला–"मुळीच निघणार नाही बाबा!"

"तू बरोबर उत्तर दिलेस. आता मी जातो." भूत म्हणाले.

रात्रभर धाकटा मुलगा वडिलांविषयीच्या विचारात गर्क होता. उजाडल्यावर राजाकडे जाऊन म्हणाला–"आपल्या राजवाडयातल्या भूताला मी पळवून लावले आहे."

राजाने चकित होऊन विचारले–"पळवून लावलेस? ते कसे काय?"

"भूत ज्या कामासाठी तुमच्या वाडयात येऊन राहू लागले होते ते मी पुरे केले. म्हणून ते स्वतःच निघून गेले." धाकटा भाऊ म्हणाला.

लागोपाठ एक आठवडा राजाच्या आज्ञेने राजाचे नोकर त्या राजवाडयात रात्री झोपले. आता भूत वाडयात येत नाही हे जेव्हां नक्की झाले तेव्हां राजाने धाकटया भावाला एक लाख रुपये बक्षिस म्हणून दिले व त्याला आपल्या दरबारी नोकरी दिली.



# एका गावचा पाटील

एका गावी एक पाटील बुवा रहात होते. त्यांना समजूत बेताचीच होती, एका शेतकऱ्याने पाटलांकडे फिर्याद केली की त्याच्या शेतात रोज एक बळू शिरतो व उभे पीक चरतो. काही तरी उपाय करून त्याला पळवून लावावे.

"मी आपल्या नोकराला पाठवून पळवून लावतो, बरं!" पाटील म्हणाले.

"मला एकच भीती वाटते, त्याने सर्व शेत तुडवून घाण करू नये, म्हणजे झाले." शेतकऱ्याने आपली शंका व्यक्त केली.

गावातली शेतकरी मंडळी परस्परांशी काही तरी बोलून व ठरवून पाटलाकडे येऊन म्हणाली–"पाटील! आपल्या गांवाबाहेरचे सांबाचे देऊळ एक वार भर मागे सरकवले तर बरे होईल."

"अरे त्यात काय मोठेसे? मी शंभर मजूर लावून ते करवितो." पाटील म्हणाले. त्याप्रमाणे त्यांनी शंभर मजूर लावून त्यांना आज्ञा केली–"हे देऊळ एक वार भर मागे सरकवा!" हे आपल्या समक्ष व्हावे असे पाटलांना वाटले. म्हणून आपली जरीची पगडी काढून देवळाच्या मागे ठेवली आणि स्वतः समोरच्या बाजूला येऊन उभे राहिले.

थोडा वेळ देऊळ सरकवण्याचा प्रयत्न करून पाटील बुवा देऊळ किती मागे सरकले हे पाहण्यासाठी देवळा मागे गेले. तेथे त्यांची पगडीच नव्हती. कोणीतरी चोरून नेली होती.

"अरे, अरे, अरे! थांबा, थांबा! माझी पगडी देवळाखाली गेली रे! जितके ढकलायला पाहिजे होते, त्यापेक्षा फुट भर जास्तच ढकललेत तुम्ही!" पाटील म्हणाले.





## शंका

एका गावी एक भिकारी रहात असे.

एकदा त्याने विचार केला की त्याला कोणी शंभर रुपये दिले तर त्याचे दारिद्र्य कायमचे जाईल.

तो विचार एकदा डोक्यात शिरल्यानंतर तो ज्या दारासमोर उभा राही किंवा रस्त्यात त्याला जो कोणी भेटे त्याच्या-जवळ शंभर रुपया मागू लागला. खूळबीळ तर नाही लागले बिचाऱ्याला, असे काहीं जणांना वाटले. कारण पूर्वी त्याच्या हातावर कोणी एक पैसा ठेवला की त्यात तो खूष होऊन सलाम करून पुढे जाई.

सर्व त्याची थट्टा उडवू लागले तेव्हां ते गाव सोडून तो दुसऱ्या गावी निघाला.

जात असता त्याला दूरून पुष्कळशी घरे दिसली. वाटेत त्याला जो कोणी भेटे त्याला तो त्या गावाचे नाव विचारी.

'विचित्रपूर' असे उत्तर त्याला मिळे.

या गावी कोणत्या विचित्र गोष्टी घडतात बुवा? पाहिले पाहिजे असा विचार करून तो भिकारी त्या गावाकडे वळला. शेतात काम करणाऱ्या एका शेतकऱ्याने त्याला हाक मारून विचारले–"त्या गावी चालला आहेस का?"

भिकारी म्हणाला–"होय, कां?"

"वाटेत तुला एक बाई डोक्यावर एक टोपली घेऊन येत असलेली भेटेल. तिला सांग, तुझा नवरा साप चावून मेला. त्याला न्याहरी घेऊन जायची जरूर नाही." शेतकरी म्हणाला.

भिकारी होकार देऊन पुढे निघाला.

शेतकऱ्याने सांगितल्याप्रमाणे एक बाई डोक्यावर एक टोपली घेऊन येत असलेली भेटली. भिकारी तिला थांबवून म्हणाला– "बाई, तुमचा घरधनी साप चावून मेला. न्याहरी घेऊन जाण्याची गरज नाही."

श्री. ना. रा. गांवकर

भिकारी जे म्हणाला ते ऐकून ती बाई परतली. ती मुकाट्याने, आरडा ओरडा केल्याशिवाय परत कशी काय गेली, हे पाहून भिकाऱ्याला आश्चर्य वाटले.

भिकारी त्या गावी पोचल्यावर एका गल्लीतून जात असता त्याला एक वृद्ध मनुष्य ओटयावर बसलेला दिसला. भिकाऱ्याला वाटले, हा मनुष्य आपल्याला शंभर रुपये कदाचित देऊ शकेल. त्याने त्याच्याजवळ शंभर रुपये मागितले पण तो वृद्ध काही बोलल्या शिवाय उठून घरात गेला आणि एका पिशवीत शंभर रुपये घेऊन आला आणि भिकाऱ्याला ती पिशवी दिली. ती गोष्ट पण भिकाऱ्याला विचित्र वाटली.

"कायरे तू विचारात पडल्यासारखा दिसतो आहेस. विचार, कोणती शंका तुझ्या मनात आली ती!" तो वृद्ध म्हणाला.

"या गांवात मला सर्व विचित्रच दिसते आहे. एका बाईला ती न्याहरी घेऊन शेत जात असता मी म्हटले की तिचा नवरा साप चावून मेला आहे. पण ती बाई रडली नाही व शांतपणे परत फिरली. मी आपणांजवळ शंभर रुपये मागितले व आपण माझे नावगाव सुद्धा न विचारता पैसे आणून दिलेत. हे विचित्र वागणे नाही का? हीच शंका माझ्या मनात होती." भिकारी म्हणाला.

तो वृद्ध म्हणाला—"तुझे बोलणे ऐकल्यावर मला पण आतां एक शंका वाटू लागली आहे की मी उद्या तुझ्याकडे हे पैसे परत मागितले तर तू काय उत्तर देशील नकळे." असे सांगून भिकाऱ्याच्या हातातली पैशाची ती पिशवी त्याने परत घेतली.

भिकाऱ्याने विचार केला की मूर्खपणाने विचारलेल्या प्रश्नाचा हा परिणाम झाला. मला हा चांगला धडा मिळाला.






# पडकें देऊळ

[१७]

[पडक्या देवळाचा पुजारी आपला नोकर नागगिधाड याच्या मदतीने नागमल्लीला उचलून घेऊन पळून गेला. जंगलात, पुजाऱ्याला घोडा विकून त्याला मदत करणाऱ्या चोरांना पाहून शिखीमुख त्यांच्या पाठोपाठ निघाला. जिवाजी व नागनायक लट्ठूसिंह त्या खोऱ्यात आले. त्यांनी दूर शिट्टी वाजलेली ऐकली. पुढे—]

जिवाजी मशालीच्या उजेडाकडे क्षणभर पहात उभा राहून आपल्या अनुयायांना म्हणाला—"हा मशालधारी कोण असावा बरे? ही शिट्टी ओळखीची, पूर्वी ऐकल्यासारखी वाटते."

शबर अनुयायांपैकी एक जण म्हणाला—"धनी! ती मशाल ज्या जागी आहे तेथेच गोंडनायकाची आराम करण्यासाठी तयार केलेली एक झोपडी आहे. आज संध्याकाळी मी त्याच बाजूने आलो त्यावेळी तेथे कोणी नव्हता."

त्याच वेळी ज्या बाजूने शिट्टीचा आवाज ऐकू आला होता त्या बाजूला कोणीतरी मशाल हालवून स्वत:कडे येण्यासाठी खूण करीत असल्यासारखे जिवाजीला वाटले. या खेपेस आणखी जोराने शिट्टीचा आवाज ऐकू आला. जिवाजीने लट्ठूसिंहाचा सल्ला घेतला व आपल्या अनुयायांना म्हणाला—



"तो कोणी का असेना, तो आपल्याला बोलावीत आहे, खास! चला जवळ जाऊन पाहू तर या!"

जिवाजी आपल्या अनुयायांसह व लट्ठूसिहाबरोबर तेथे येऊन पोचला तेव्हां तो शिट्टी वाजविणारा शिट्टी वाजविणे बंद करून आत गेला. जिवाजीने झोपडीच्या दरवाज्याजवळ जाऊन पाहिले, बांबूच्या कामटीचे दार बंद होते. खिडकीतून मशालीचा उजेड बाहेर पडत होता.

जिवाजीने दार हालवून विचारले– "कोण आहे आत? उघड दरवाजा!"

परंतु आंतून काहीच उत्तर आले नाही. तेव्हां जिवाजीने जोराने दार ढकलले. दार उघडले व उघडण्याचा मोठा आवाज झाला. झोपडीत एका चौकीवर पडक्या देवळाचा पुजारी बसला होता. जिवाजीला आत आलेला पाहून तो मिस्किलपणे हसून म्हणाला–"अस्सं! सर्व रानटी जातीचे नायक एकत्र होऊन मला भेटायला आले आहेत वाटते? मग मला तुमचे सर्वांचे स्वागत केलेच पाहिजे. यावं, यावं."

पुजाऱ्याची ती हिंमत व धाडस पाहून जिवाजी चकित झाला. नागनायक लट्ठूसिह हुंकारून आपली तलवार उपसून पुजाऱ्यावर झडप मारण्यास तयार झाला.

जिवाजीने त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला थांबायला सांगितले. म्हणाला– "अशी घाई नको करूस! हाती आलेला हा दुष्ट आपल्या हातांतून सुटणे शक्य नाही."

जिवाजीने समजावून सांगितल्यावर लट्ठूसिहाने तलवार म्यानेत ठेवली. त्याचे डोळे निखाऱ्यांसारखे लालबुंद झाले होते. संधी मिळायची खोटी पुजाऱ्याच्या देहाच्या ठिकऱ्या उडवायला जणुंकाहीं तो तयार होता.



जिवाजी पुजाऱ्याच्या थोडा जवळ जाऊन म्हणाला–"तू आमचे सर्वांचे जे नुकसान केले आहेस आणि आम्हां सर्वांना जो त्रास दिला आहेस, ते सर्व तर आहेच आहे, तू नागनायक लट्ठूसिहाच्या मुलीला पळवून घेऊन आला आहेस. दुष्टा! असे असून ही तुला इतक्या निधडकपणे इकडे आमच्यासमोर बसलेला पाहून आम्हांला आश्चर्यच वाटते."

त्यावर पडक्या देवळाचा पुजारी खोडसाळपणाने हसून म्हणाला–"तू लट्ठूसिहाहून अक्कलवान दिसतो आहेस तर! मला वाटते की आतांपर्यंत तुला माझ्या शक्तीसामर्थ्याची पुरेपूर कल्पना आली असावी."

पुजाऱ्याचे ते राक्षसी हास्य आणि त्याच्या बोलण्यातली ती हेटाळणी पाहून क्रोधाने जिवाजीचे सर्व अंग थरथर कापू लागले. त्याने दोन्ही हातांनीं पुजाऱ्याची मान धरून त्याला धक्के दिले आणि दरडावून म्हणाला–"चोरा! माझ्यासमोर तुझ्या या माकडचेष्टा चालणार नाहीत. लक्षात ठेव. बोल, कोठे ठेवले आहेस नागमल्लीला?"

पुजारी उत्तरादाखल काही बोलणार होता. परंतु जिवाजीने त्याचे नरडे असे




आवळले होते की त्याचे डोळेच बाहेर आले. जिवाजीने विचार केला की त्या मूर्खाचा जीव घेण्यापूर्वी नागमल्ली कोठे आहे हे कळले पाहिजे. म्हणून त्याने पुजाऱ्याच्या गळ्याची पकड थोडी सैल केली.

पुजारी दोन्ही हात आपल्या मानेवर फिरवीत पिसाळल्यासारखा ओरडला– "जिवाजी! शेवटी तू रानटी जातीचा आहेस हे आपल्या वर्तनाने सिद्ध केलेस. तुझ्या मित्राच्या पोरीला मी उचलून घेऊन आलो होतो तरी तुम्हांला मीच स्वत: इकडे कां बोलाविले ही साधी गोष्ट तुमच्या डोक्यात



शिरली नाही असे दिसते. आणखी एक गोष्ट. पडक्या देवळाच्या पुजाऱ्याचा पादस्पर्श सोडून त्याच्या अंगाच्या इतर कोणत्याही अवयवाला स्पर्श करण्याचे धाडस आजवर कोणी मानवाने दाखविले नाही. अशा माझ्या या पवित्र अंगाचा उच्च भाग माझ्या मानेचा स्पर्श करून तू स्वत:च्या व आपल्या कुळाचा सर्वनाशाला स्वत:च बोलावणे दिले आहेस."

"तुझी ही बटबट पुरे कर आणि प्रथम नागमल्लीला कोठे ठेवले आहेस हें सांग. सांगितले नाहीस तर मी तुझ्या या पापी शरिराला स्पर्शदेखील करणार नाही. माझा ह्रा कुत्रा, त्याला जेव्हां जेव्हां भूक लागेल तेव्हां तेव्हां लचके तोडून आपली भूक भागवेल." जिवाजी म्हणाला.

'कुत्रा' शब्द तोंडातून निघताच जिवाजी जवळ जाऊन जणुकाही त्याची काय आज्ञा होते आहे, हे कळावे म्हणून जिवाजीच्या तोंडाकडे पाहू लागला. जिवाजी कुत्र्याच्या तोंडाला व पाठीला हाताने कुरवाळून म्हणाला–"या दुष्टाचे सर्व अंग विषारी आहे. तू घाईत आपला जीव धोक्यात टाकशील! थांब जरा!"

"जिवाजी! मी ह्रा अपमान गिळून स्वस्थ बसाणारा नाही. तुझ्या भल्यासाठी म्हणून एक गोष्ट सांगायला मी स्वत: होऊन आपला जीव धोक्यात घातला. पण तुझे हे वर्तन पाहून मी काहीच बोलू इच्छित नाही. मी येतो." असे म्हणत पुजारी उठून उभा राहला.

तो पर्यंत आपला राग आवरून एका बाजूला उभा असलेला लट्ठूसिंह झडप घातल्यासारखा पुजाऱ्याला दोन्ही हातांनी वर उचलून त्याला जमिनीवर आपटून ठार करणार, इतक्यात जिवाजींनी पुढे जाऊन लट्ठूसिंहाच्या हातात तडफडणाऱ्या पुजाऱ्याची कंबर धरून त्याला खाली उतरविले व म्हणाला–"लट्ठूसिंह! थांब! पहिल्याने नागमल्ली कोठे आहे हे कळू दे. त्यानंतर तुला जे पाहिजे ते कर!"

पडक्या देवळाचा पुजारी त्या अनपेक्षित प्रसंगामुळे घाबरून जाऊन पण स्वत:ला सावरून थरथर कापत म्हणाला–"तुम्ही इतके मूर्ख आहां हे मला प्रथमच कळले असते तर मी इकडे आलोच नसतो. मी सरळ हिमालयात निघून गेलो असतो. बाकी, नागमल्लीचा जीव किती धोक्यात पडला आहे, याची कल्पना तुम्हांला काय असणार? तुमच्या सारख्या मूर्खांचा जीव घेण्याच्या कामी मी आपल्या मंत्रशक्तीचा अपव्यय करण्याइतका मूर्ख नाही. येथे मला मरण आले तर दुसऱ्या क्षणाला नागमल्लीच्या अंगाची शकले, नव्हे चिथड्या उडतील, समजलात काय? मी या सर्वांची व्यवस्था करून आलो आहे."

पुजाऱ्याचा धूर्तपणा जिवाजी व लट्ठूसिंहाच्या चांगला लक्षात आला. इकडे पुजाऱ्याच्या जिवाचे काही बरे वाईट झाले तर त्याचे साथी व नोकर तिकडे नागमल्लीचा वध करतील.

"पुजारड्या! कळला मला तुझा सर्व कावेबाजपणा! ठीक! तुझ्या जिवाला येथे कोणत्याहि प्रकारचा धोका किंवा अपाय





नाही, चालता हो आपल्या वाटेने, परंतु तू नागमल्लीला कोठे ठेवले आहेस हे सांग!" जिवाजी दरडावून म्हणाला.

"नागमल्लीला असे सहजी तुम्हांला सोपवायचे असते तर मी स्वतः तुम्हांला भेटायला इतका दूर येण्याचे कारणच काय? मला काय वेड लागलं आहे? विक्रमकेसरीने जी ताडपत्रे तुला आणून दिली आहेत ती आणून मुकाट्याने मला दिलीस तर नागमल्ली जिवंत तुमच्याकडे परत येईल. नाही तर उद्यां सूर्योदयाच्या वेळी तिचे प्रेत त्या डोंगराच्या वळणावर पिंपळाला टांगलेले दिसेल." पुजारी धमकावीत म्हणाला.

"ठीक, मी तुला ती ताडपत्रे मागवून देतो. पण तू नागमल्लीला सोडशील याचा काय विश्वास?" जिवाजीने विचारले.

"मी रानटी जातीचा नाही, देवीचा भक्त आहे. देवीचा भक्त कधी दिलेले वचन मोडीत नाही. त्या ताडपत्रांची पिशवी उजाडण्यापूर्वी त्या पिंपळाच्या फांदीला टांगलेली असली पाहिजे. माझ्या शिष्याच्या हाती ती येताच नागमल्ली तुम्हांला येऊन भेटेल." पुजारी स्पष्ट आवाजात म्हणाला.

"तू बोललास त्यावर कायम राहशील-ना?" जिवाजीने विचारले.

"या निरर्थक प्रश्नाचे उत्तर मी पहिल्यानेच दिले आहे. आणखी अर्ध्या तासात मी ठिकाणावर पोचलो नाही तर नागमल्लीचे प्रेत पिंपळाला टांगलेले असेल. ठीक, येतो तर मी! सूर्योदयापूर्वी.........लक्षात असू द्या!" असे म्हणत पुजारी झोपडीतून बाहेर निघाला व काळोखात दिसेनासा झाला.

पुजारी निघून गेल्यावर जिवाजी लट्ठूसिंहाला म्हणाला—"शेवटी या पाताळयंत्री पुजाऱ्याने आपली मान खालीच केली. नागमल्लीच्या जिवापेक्षा ताडपत्रे ज्यास्त



किमतीची नाहीत. परंतु मला दुःख वाटते आहे ते या गोष्टीबद्दल की माझ्या जुन्या मालकाच्या मुलाने जी ताडपत्रे आपल्या प्राणापेक्षा जास्त मूल्यवान म्हणून माझ्याकडे सुरक्षित राहतील यासाठी दिली होती, त्यांचे मी रक्षण करू शकलो नाही." असे म्हणत दरवाज्याजवळ उभा असलेल्या विक्रमकेसरीकडे वळून जिवाजी म्हणाला—"काय म्हणतोस विक्रम! तू एक शब्ददेखील बोलला नाहीस?"

"तुम्ही वडीलधारी मंडळी बोलत असतां लहान तोंडी मोठा घास घेणेमला गैर वाटले. नागमल्लीचा जीव वांचविण्यासाठी ती ताडपत्रे गेली तरी चालतील, असे मला देखील वाटते. नागमल्ली सुरक्षित परत आल्यावर ती ताडपत्रे परत मिळविण्यासाठी त्या पुजाऱ्याचा पाठलाग आपणांला करतां येईल." विक्रमकेसरी म्हणाला.

"तू तरुण आहेस, पण पोक्त माणसांसारखा बोललास." अशी विक्रमकेसरीला शाबासकी देत जिवाजीने आपल्या अनुचर शबरांना लवकर जाऊन ताडपत्रांची पिशवी घेऊन यायला पाठविले.

तिकडे शिखीमुख मांजराच्या पावलाने चोरांच्या पाठोपाठ जात त्यांच्या घरापर्यंत



पोंचला. चोरांनी दार वाजवल्याबरोबर दार उघडले गेले. शिखीने झोपडीलगतच्या झाडांच्या आडून खिडकीतून आत पाहिले. त्याला मशालींच्या उजेडात दोनचार आणखी चोर दिसले. नागमल्ली भिंतीला टेकून एका बाकावर बसली होती. तिचे दोन्ही हात दोरीने घट्ट बांधलेले होते.

ते दृश्य पाहून शिखीमुखचे सर्वांग खालपासून वरपर्यंत एकदा हादरले. त्या दुष्टांची डोकी उडवावी असे त्याला वाटले. परंतु लगेच तशी घाई करणे त्याच्या व नागमल्लीच्या जिवाला धोक्याचे आहे, हे त्याने ओळखले. म्हणून दुसरा विचार त्याच्या

मनात आला, लवकर जाऊन विक्रमकेसरी व इतर शबर अनुचरांना मदतीला बोलावून घेऊन यावे आणि झोपडीला वेढा घालून पुजाऱ्याच्या या अनुचरांचा वध करून नागमल्लीला सोडवून न्यावे.

त्याच वेळी त्याच्या मनात आणखी एक विचार आला' तो दुष्ट पुजारी आणि त्याचा नोकर तो नागगिधाड कोठे बरे असतील? पुजारी नागमल्लीला या चोरांच्या हाती देऊन स्वत: ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात पळून तर गेला नसेल?

विचार करीत वेळ घालविणे त्याला बरे वाटेना. तो खिडकीसमोरून बाजूला होऊन झाडीतून वाट काढीत पाऊलवाटेवर आला. त्याच वेळी त्याला घोड्याच्या टापांचा आवाज ऐकू आला. शिखीमुख लगेच रस्त्याच्या बाजूच्या झाडीत लपला. इतक्यात एका झाडाआडून नागगिधाड धावत पुढे येऊन ओरडला–"कोण तिकडे? झाडीच्या आड कोण लपला आहे?"

शिखीमुख धोक्याचा प्रसंग ओळखून थोडा आणखी दूर निघून गेला. त्याचवेळी तेथे पुजारी भरधाव घोड्यावरून आला आणि रागाने म्हणाला–"कोण आहे रे, नागगिधाडा! कशाला उगीच कंठशोष करतो आहेस? शत्रूला आपल्या झोपडीचा पत्ता लागावा म्हणून?"

"नाही, पुजारी धनी! झाडीच्या आड पावले वाजल्याचे ऐकले." नागगिधाड घाबरत म्हणाला.

"तो आवाज बाहेर नाही, तुझ्या टकलीत होतो आहे. मी कितीदा बजावले तरी तुझी ताडी सुटत नाही. बरे तर, आवाज कोठून आला, नीट पाहून लवकर ये." असे सांगून पुजारी घाई घाईने निघून गेला.

नागगिधाड आपला भाला घेऊन शिखीमुखचा माग घेत झाडीत शिरला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# इलाज

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही, तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, काही शक्ती अशा असतात की त्यांचा इतरांना फायदा होतो. पण त्यांचा वापर करणाऱ्याचे नुकसानच होते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला सुमंत नावाच्या माणसाची गोष्ट सांगतो. तुला आपला श्रम थोडा का होईना हलका वाटेल." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कामाख्या नगराचा कामपाल नावाचा राजा एकदा भयंकर चर्मव्याधीने आजारी पडला. त्याने अनेक प्रकारे औषधपाणी केले पण काही उपयोग झाला नाही. उलट त्याचा आजार वाढतच गेला. त्या काळजीने कामपाल अशक्त होत

वेताळाच्या गोष्टी



गेला. म्हणून राजाने अशी दवंडी पिटविली की जो कोणी राजाचा आजार बरा करील त्याला अर्धे राज्य दिले जाईल.

ते कळल्यावर शेजारच्या वंगदेशातील सुमंत नांवाचा एक वैद्य कामाख्या नगरी आला व राजाच्या रोगाची परीक्षा करून म्हणाला–"महाराज! मी लवकरच तुमचा आजार बरा करतो."

"किती दिवस इलाज चालू ठेवावा लागेल? औषधे कशी काय घ्यावी लागतील? हे मला आगाऊ कळलेले बरे." कामपाल राजा वैद्याला म्हणाला.

"आपल्याला औषध घ्यावेच लागणार नाही. मी सांगितल्याप्रमाणे विशिष्ट प्रकारचा व्यायाम मात्र करावा लागेल. तो सुद्धा फक्त एकदाच दुसऱ्याच दिवशी आजाराचे चिन्हसुद्धा राहणार नाही." सुमंत म्हणाला.

कित्येक दिवस निरनिराळ्या प्रकारची औषधे घेऊन जो आजार बरा झाला नाही तो असा एका दिवसात कसा काय बरा होणार बुवा? राजाला थोडे आश्चर्यच वाटले. तरी राजाने सुमंतला विचारले–

"वैद्यबुवा! तुम्ही म्हणालात तो व्यायाम मी केव्हां करावयाचा?"

"उद्या सकाळीच मी आपल्या दर्शनाला येईन. तेव्हां तो व्यायाम मी सांगितल्या-प्रमाणे केलात म्हणजे झाले." असे सांगून सुमंत निघून गेला.

त्याच दिवशी सुमंतने एका सुताराला बोलावून एक लाकडी गदा तयार करविली. गदेची मूठ आंतून पोकळ ठेवविली आणि त्या पोकळ जागी त्याने कसले तरी औषध भरून ठेवले. ती गदा घेऊन सुमंत दुसऱ्या दिवशी राजाकडे आला आणि म्हणाला–"महाराज! ही गदा घेऊन व्यायाम करावयाचा आहे." राजाने गदा घेऊन सुमंतने सांगितल्याप्रमाणे गदा फिरवून व्यायाम केला. थोड्या वेळाने राजाच्या सर्वांगातून घामाच्या धारा वाहू लागल्या.

"आता आपण थांबावे महाराज!" सुमंत राजाला म्हणाला. नंतर त्याने राजाला स्नान करायला सांगितले. स्नान झाल्यावर त्याने राजाला स्वस्थ झोपायला सांगितले. थोड्याच वेळाने राजाला स्वस्थ झोप लागली. दुसऱ्या दिवशी उजाडेपर्यंत जगात काय घडले हे देखील त्याला कळले नाही. त्याची झोप मोडली तेव्हां अंगावर त्याला एकदेखील फोड किंवा फोडाचा व्रण दिसला नाही. राजाचे सर्व अंग सोन्यासारखे चकाकत होते. पुनर्जन्म झाल्यासारखे त्याला वाटले.

दुसऱ्या दिवशी राजाने सुमंतला दरबारात बोलाविले व म्हणाला–"वैद्य-बुवा! तुमचा इलाज अपूर्व आहे! तुम्ही साक्षात् धन्वंतरी दिसता. औषधाशिवाय तुम्ही माझा आजार बरा केलात. तुमच्या या औषधाचे गुपित आम्हांला सांगता का?"

"महाराज! काल आपण व्यायामासाठी जी गदा घेतली होती तिच्या मुठीत मी औषध भरून ठेवले होते. ते तुमच्या हाताला लागून सर्वांगात पसरले व घामाच्या रूपाने सर्व शरिरातले रोगाचे





जंतू बाहेर आले. अशा तऱ्हेने तुम्ही चांगले बरे झालात. अशा जालिम औषधाचा प्रयोग मी अन्य प्रकारे करविला असता तर आपल्या प्राणावरच बेतले असते." सुमंत म्हणाला.

"शाबास! तुम्ही काय वाटेल ते मागून घ्यावे. मी, माझा आजार दूर करणाऱ्याला अर्धे राज्य देईन असे जाहीर केले होते. पाहिजे असेल तर मी आपले अर्धे राज्य द्यायला तयार आहे." राजा म्हणाला.

"महाराज! मी या जगात एकटा आहे. अर्धे राज्य घेऊन काय करू? आपली कृपा असली म्हणजे पुरे. या व्यतिरिक्त मला कोणत्याहि असली वस्तूची गरज नाही." नम्रपणे सुमंत म्हणाला.

राजाने सुमंतला आपला एक अंगरक्षक म्हणून नेमले आणि त्याला स्वतःच्या भावासारखा वागवू लागला.

असाच काही काळ लोटल्यावर एकदां राजाचा मंत्री राजाला एकांतात भेटून म्हणाला—"महाराज! एक सूचना करावी म्हणतो."

"बोला ना!" राजा म्हणाला.

"एका सामान्य वैद्याला असे डोक्यावर चढवून घेणे धोक्याचे आहे. त्याला तावडतोब निरोप द्यावा." मंत्री म्हणाला.

"तुमच्या या सूचनेचा अर्थ काय, मला नाही कळले. त्याचे माझ्यावर जे उपकार आहेत त्यांची फेड या आयुष्यात करणे मला शक्य नाही. म्हणून असला सल्ला किंवा सूचना करण्याची तसदी यापुढे घेऊ नका." राजाने मंत्र्याला बजावले.

आणखी काही दिवसांनी मंत्र्याने राजाला पुन्हां तोच सल्ला दिला.

"तुम्हांला सुमंतचा एवढा हेवा कशासाठी वाटतो, कळत नाही. त्याने तुझे काय वाईट केले?" राजाने मंत्र्याला विचारले.



"त्याने माझे काही एक वाईट केले नाही. त्याच्यामुळे आपला जीव पुढे कधी धोक्यात पडू नये, एवढेच मला वाटते. आपण या राज्याचे प्रजावत्सल महाराज आहां. आपल्या जिवावर काही अनपेक्षित संकट आले तर आपली प्रजा असहाय व पोरकी होईल. ज्या वैद्याने आपला तो भयंकर आजार इतका सहज बरा केला तो इतक्याच सहज रीत्या विषप्रयोग करून आपला जीव घेणार नाही कशावरून? आज त्याची वागणूक ठीक आहे. पण उद्या त्याच्या मनात आपले सर्व राज्य बळकावण्याची इच्छा उत्पन्न झाल्यास आश्चर्य नाही. आपल्या एखाद्या शत्रूने त्याला स्वतःकडे वळवून आपले राज्य जिंकण्याचा प्रयत्न केल्यास त्यात नवल वाटण्यासारखे काही नाही. आपण स्वतःच विचार करून पहावा. आपला मंत्री म्हणून आपणांला सावध करणे माझे कर्तव्य आहे." मंत्री म्हणाला.

मंत्री म्हणाला ते सर्व पटले नसले तरी मंत्री आपल्या हितासाठीच हे सांगत आहे त्यात तथ्यांश पण थोडासा आहे व असे राजाला वाटले. राजाचा सुमंतवर इतका विश्वास होता की त्याने मनात आणले



असते तर राजाचा वध करणे त्याला अशक्य नव्हते. राजाने त्याला अर्धे राज्य देऊ केले तरी त्याने ते स्वीकारले नाही. परंतु पुरे राज्य बळकावण्याची संधी मिळाल्यावर तो आपला जीव घेणार नाही कशावरून. राजाच्या मनात संशयाने घर केले.

एकदा संशयाला जागा मिळाल्यावर सुमंतच्या प्रत्येक कामाबद्दल राजाला शंका येऊ लागली. आजपर्यंत त्याला स्वतःच्या अंगरक्षकाच्या जागी नेमून तसे सबळ कारण काही नसता त्याला त्या जागेवरून काढणे पण राजाला रास्त वाटेना. त्याला काही कारणाशिवाय काढून लावणे धोक्याचे आहे



आणि त्याला शत्रू म्हणून बाहेर काढणे त्याहून जास्त धोक्याचे आहे.

म्हणून राजाने सुमंतचा वध करून त्याचा काटा दूर करण्याचे मनाशी ठरविले. राजाने त्यासंबंधी मंत्र्याचा सल्ला विचारला तेव्हां मंत्री म्हणाला–"महाराज! सुमंतला मंत्रविद्या प्राप्त आहे. म्हणून आपण त्याला जी शिक्षा द्यावयाची असेल ती पूर्णपणे गुप्त असू द्यावी. आपल्या हितासाठी व राज्याच्या हितासाठी तसे करणे आवश्यक आहे."

त्या दिवशी मध्य रात्रीच्या सुमारास राजाने आपल्या शिपायांना पाठवून सुमंतला समोर हजर करण्यास सांगितले. सुमंतने चकित होऊन मध्यरात्रीच्या वेळी असे अचानक बोलावण्याचे कारण राजाला विचारले.

"मी तुला शिरच्छेदाची शिक्षा देत आहे." राजा म्हणाला.

"मी असा कोणता राजद्रोह केला महाराज? एवढी मोठी शिक्षा द्यायला काही कारण असेलच की नाही?" सुमंतने विचारले.

"तू माझ्याशी जो द्रोह करणार आहेस त्याबद्दल ही शिक्षा आहे. सर्वांची नजर चुकवून तू माझ्या शरिरावर या पूर्वी जसा औषधाचा प्रयोग केला होतास तसा विषाचा प्रयोग तुला करता येईल. तुझ्यामुळे कोणत्या क्षणी माझ्यावर कशाप्रकारचे संकट येईल हे सांगता येणार नाही. म्हणून तुझा शिरच्छेद झालातरच मला सुखाने झोपता येईल." राजाने मनात होते ते ओकून टाकले.

"मी जिवंत राहणे आपल्या जिवाला धोक्याचं आहे असं आपल्याला वाटत असेल तर मी आनंदाने आपल्या प्राणाची आहुती द्यायला तयार आहे. पण मी मेल्यावरदेखील आपल्याला माझ्या मंत्राचा उपयोग होईल असे काही तरी करण्याची इच्छा माझ्या मनात आहे. माझ्या घरी जुन्या ताडपत्रांचे एक गाठोडे आहे. त्यात एक मंत्र लिहून ठेवलेला आहे. माझा शिरच्छेद केल्यावर आपण त्या मंत्राचा प्रयोग करून काही प्रश्न विचारलात तर माझे कापलेले डोके त्या प्रश्नाचे बरोबर उत्तर देईल." सुमंत म्हणाला. राजाला मंत्र शिकून घेण्याचा लोभ झाला. सुमंतच्या असामान्य शक्तीवर राजाचा विश्वास बसलेलाच होता. म्हणून राजा म्हणाला– "तरमग तो ग्रंथ आणून दे."

आपण आपल्या शिपायांबरोबर मला आपल्या घरी पाठवावे, मी तो ताडपत्रांचा ग्रंथ हुडकून आणून देतो." सुमंत म्हणाला. राजाने ते मान्य केले. सुमंतने राजाच्या शिपायांबरोबर आपल्या घरी जाऊन ताडपत्रांचा ग्रंथ काढला व प्रत्येक ताड-पत्राला विष लावून ठेवले. त्याने हे सर्व केले त्यावेळी शिपाई बाहेर उभे होते. तो ग्रंथ घेऊन सुमंत राजाकडे परत आला आणि म्हणाला–"महाराज! हा ग्रंथ हुडकून काढायला थोडा उशीर झाला त्याबद्दल क्षमा करावी. हाच तो ग्रंथ. आपण स्वच्छ हात धुवून यावे. आपण एकेक ताडपत्र उचलून वाचीत जावे. तिसाव्या पानावर तो मंत्र आहे."



राजा लगेच हात धुवून आला. परत आल्यावर प्रत्येक पान वाचीत उलटू लागला. दहावे पान उलटू लागला तेव्हांच त्याला आतून नाडचा ओढल्यासारखे वाटू लागले. विसाव्या पानावर बोट पडतांच राजा एकदम घेरी आल्यासारखा बेशुद्ध होऊन पडला आणि तत्काळ मरण पावला.

सुमंत राजाच्या खोलीतून बाहेर आला आणि शिपायांना म्हणाला—"महाराजांना झोप लागली आहे. मी उद्यां महाराजांच्या दर्शनास येईन." असे सांगून तो निघून गेला. उजाडण्यापूर्वी तो कामाल्या राज्याच्या हद्दीबाहेर पोचला होता.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला—"राजा! कामपाल राजाच्या मृत्यूला जबाबदार कोण? राजाच्या मनांत संशय उत्पन्न करणारा मंत्री की सुमंत? या प्रश्नाचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमार्क म्हणाला—"त्याच्या स्वत:च्या जिवाला धोका आहे हे कळेपर्यंत सुमंतची स्वामिभक्ति अढळ होती. म्हणून तो दोषी किंवा अपराधी ठरत नाही. मंत्र्याचा मुद्धा त्यात काही दोष नव्हता असेच म्हणावे लागेल. कारण त्याने राजाच्या हिताची गोष्ट म्हणून राजाला सावध रहायला सांगितले होते त्याचा तो सल्ला गैरवाजवी म्हणता येणार नाही. परंतु मंत्र्याने सावध केले असून ही राजाने स्वत:चे मरण, केवळ मंत्र शिकून घेण्याच्या मोहाला बळी पडून स्वत:वर ओढून घेतले. मंत्र्याचा सल्ला मान्य करून त्याने लगेच सुमंतचे डोके उडविले असते तर त्याला असे मरण आले नसते."

अशाप्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य होऊन झाडाला लोंबकळू लागला. (कल्पित)



ठरविले. थोडया वेळाने त्या झोपडीत एक म्हातारा व एक म्हातारी आले.

"मी फार दुरून दमून भागून आलो आहे, जेवायला वाढता का?" सुमंगने विचारले.

"बरं वाढते हो!" म्हातारी सैपाकघरात जाताना म्हणाली.

"सैपाक करणारी मुलगी कोण? तुमची मुलगी की नात?" त्याने म्हाताऱ्याला विचारले.

म्हाताऱ्याचा चेहरा एकदम पांढरा फट्ट झाला. म्हणाला—"आम्ही या घरात फक्त दोघेच आहों, बाळ!"

"तुम्ही कोणत्या तरी भीतीने खोटे बोलतां आहां. मी त्या मुलीला पाहिले आहे. तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने विचारले होते मी. कोणी भिकारी नका समजू मला. खरे काय ते सांगा." सुमंग म्हणाला.

"तू जी मुलगी म्हणतोस तिला आम्ही कधी पाहिले नाही." म्हातारा म्हणाला.

"तर मग तुम्ही दोघे बाहेर गेला होतां तेव्हां सैंपाक कोणी केला? सैपाक करणारी ती कोण?" सुमंगने विचारले.

"ते आम्हांला सुद्धा आजपर्यंत कळले नाही. रोज झोपून उठण्यापूर्वी किंवा





लग्नाला योग्य मुली होत्या. पण सुमंगला एकदेखील पसंत पडली नाही.

आठदहा दिवस प्रवास करीत गेल्यावर एकदां दुपारी तो भिल्लांच्या एका वस्तीत येऊन पोचला. त्या वस्तीत दहाबाराच झोंपड्या होत्या. वस्तीतले लोक बाहेर कामाला गेले होते. सुमंगने खिडकीतून एका झोपडीत डोकावून पाहिले, एक तरुण मुलगी एकटी बसून सैपाक करीत होती. या पृथ्वीच्या पाठीवर इतक्या सुंदर मुली-सुद्धा असू शकतात, हे त्याला स्वप्नातदेखील कधी वाटले नव्हते. कारागिराने तासून सुलाखून जणुकाही नुकतीच घडवलेली एक सुंदर मूर्ती होती ती झोपडीतल्या झोपडीत तिला फिरतांना पाहून सिरपूरच्या राजा-कडल्या नर्तकी त्याला आठवल्या. लग्न करायचे ते हिच्याशीच, त्याने मनात ठरविले.

सुमंगच्या मनातले हे विचार जणुकाही त्या मुलीला ऐकू आल्यासारखी ती मुलगी त्याच्याकडे मान वर करून पाहू लागली आणि दचकल्यासारखी ओरडून दुसऱ्या क्षणाला अदृश्य झाली.

सुमंग चकितच झाला. झोपडीच्या दाराजवळ जाऊन दार आत लोटले आणि विचारले—"कोण आहे आत?" दार उघडल्याबरोबर कूंकूं करीत एक काळी कोंबडी आली आणि बाहेर पळून गेली. सुमंगला वाटले की त्याला तो सर्व भ्रम झाला असावा. परंतु त्याच्या डोळ्यासमोर त्या मुलीचा चेहरा जणुकाही नाचत होता. त्याने सारी झोपडी हुडकून काढली. ती त्याला ज्या खोलीत दिसली होती त्या खोलीत नुकताच केलेला ताजा सैपाक मात्र त्याला दिसला. त्या मुलीने तो सैपाक केला नसेल तर कोणी केला असेल?

त्या गोष्टीची पुरी माहिती मिळेपर्यंत त्याच झोपडीत बसून राहण्याचे त्याने ठरविले. थोड्या वेळाने त्या झोपडीत एक म्हातारा व एक म्हातारी आले.

"मी फार दुरून दमून भागून आलो आहे, जेवायला वाढता का?" सुमंगने विचारले.

"बरं वाढते हो!" म्हातारी सैपाकघरात जातांना म्हणाली.

"सैपाक करणारी मुलगी कोण? तुमची मुलगी की नात?" त्याने म्हाताऱ्याला विचारले.

म्हाताऱ्याचा चेहरा एकदम पांढरा फट्ट झाला. म्हणाला—"आम्ही या घरात फक्त दोघेच आहों, बाळ!"

"तुम्ही कोणत्या तरी भीतीने खोटे बोलतां आहां. मी त्या मुलीला पाहिले आहे. तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने विचारले होते मी. कोणी भिकारी नका समजू मला. खरे काय ते सांगा." सुमंग म्हणाला.

"तू जी मुलगी म्हणतोस तिला आम्ही कधी पाहिले नाही." म्हातारा म्हणाला.

"तर मग तुम्ही दोघे बाहेर गेला होतां तेव्हां सैपाक कोणी केला? सैपाक करणारी ती कोण?" सुमंगने विचारले.

"ते आम्हांला सुद्धा आजपर्यंत कळले नाही. रोज झोपून उठण्यापूर्वी किंवा












शेतातून घरी येण्यापूर्वी सैपाक झालेला असतो." म्हातारा म्हणाला.

"असे होऊ लागून किती दिवस झाले?" सुमंगने चकित होऊन विचारले.

"आठदहा दिवसांपूर्वी कोठून तरी एक काळी कोंबडी आली. आम्ही वस्तीतल्या सर्वांना विचारले, कोणाची ती कोंबडी म्हणून. प्रत्येक जण, आमची नाही बुवा, म्हणाला. ती कोंबडी अंडी घालीत नाही. आम्हांला वाटू लागले की कोण्या वनदेवीने आमच्या मदतीसाठी तिला पाठविले असावे. त्या दिवसापासून रोज आमचा सैपाक तयार असतो." म्हातारा म्हणाला.

सुमंग म्हातारा व म्हातारी दोघांबरोबर जेवून त्यादिवशी रात्री झोपडीतच झोपतो असे सांगून झोपला.

झोपायला जाण्यापूर्वी म्हातारीने काळ्या कोंबडीला चारा घालायचा तो घालून खुराड्याच्या टोपलीखाली तिला ठेवून दिले.

त्या दिवशी रात्री सुमंगला झोपच आली नाही. मध्य रात्र उलटल्यावर काहीतरी आवाज झाला. त्याने मान वर करून पाहिले. काळी कोंबडी टोपलीबाहेर आली, आणि सैपाक घराकडे निघाली. सुमंगने मांजराच्या पावलांनी सैपाक घराच्या दाराआड उभा राहून आत पाहिले.

कोंबडीने एकदा आपले अंग फडफडवून झाडले आणि आपले शरीर कोट काढल्यासारखे काढून खाली जमिनीवर टाकले आणि त्याने पाहिलेली ती मुलगी बाहेर आली. ती काही आवाज केल्याशिवाय सैपाकाला लागली. सुमंग बराच वेळ तिच्याकडे टक लावून पहात उभा राहिला. नंतर काम करायचे हे मनाशी जणुंकाही ठरवून पुन्हा अंथरुणावर जाऊन झोपला. उजाडल्यावर म्हाताऱ्याचा निरोप घेते वेळी म्हाताऱ्याच्या हातावर एक सोन्याची मोहोर ठेवीत म्हणाला—"आपली ती काळी कोंबडी मला देता का?"



म्हातारा चकित होऊन म्हणाला—"कोंबडीची किंमत इतकी? ती अंडी देखील घालीत् नाही? आम्हांला मूलबाळ काही नाही, आम्हांला ती आपल्या मुलीसारखी वाटू लागली आहे."

"ती कोंबडी पाहल्यापासून ती विकत घ्यायचे मी ठरविले. पाहिजे तर मी आणखी एक मोहर द्यायला तयार आहे. परंतु ही कोंबडी माझ्या हाती विकलीच पाहिजे." सुमंग म्हणाला.

त्या गरीब नवराबायकोचे दारिद्र्य दूर व्हायला दोन मोहरा पुष्कळ होत्या. म्हणून दोघांनी आनंदाने ती कोंबडी सुमंगला दोन मोहरा घेऊन दिली. तो ती कोंबडी खाकेत उचलून घेऊन निघाला.

घरी पोंचतांच आईने सुमंगला विचारले—"अरे! सुनबाई कोठे आहे? मी तुला एकटा परत येऊ नकोस म्हणून सांगितले होते."

"मी एकटा कोठे आलो आहे आई! ही पहा, माझी बायको." असे म्हणत सुमंगने खाकेत धरलेली कोंबडी दाखविली.

ते उत्तर ऐकून सुमंगच्या आईला वाटले की मुलगा थट्टा करीत असावा. परंतु सुमंगने जेव्हां तिला, त्या कोंबडीशीच मी लग्न करणार आहे असे निक्षून सांगितले



तेव्हां मात्र तिला वाटले की वस्तीतले लोक तिला व तिच्या मुलाला वेड्यात काढून वस्तीच्या बाहेर कदाचित काढतील.

त्या दिवशी काळी कोंबडी मध्यरात्र उलटून गेल्यावर आपल्या संवयीप्रमाणे सैपाकघरात जाऊन जेव्हां तरुण मुलगी झाली तेव्हां सुमंगने पाठीमागून जाऊन तिला दोन्ही हातानी धरून विचारले—"कोण तू? तुझे नाव काय? तू कोंबडी व तरुण स्त्री अशी आलटून पालटून कां होतेस?" ती मुलगी स्वतःला सुमंगच्या भुज पाशातून सोडवून घेण्यासाठी ओढाताण करू लागली.



"मी तुला सोडणार नाही. तुझ्याशी लग्न करण्यासाठी मी तुला घेऊन आलो आहे." सुमंगने सांगून टाकले.

"मी एका भिल्ल नायकाची मुलगी आहे. माझे नाव जंत्री. आमच्या वस्तीतल्या एका जादुगाराचा माझ्याशी लग्न करण्याचा विचार होता. मी नकार दिला. तेव्हां त्याने मला कोंबडी करून टाकले. फक्त दुपारी व मध्यरात्रीच मला मनुष्य रूप मिळते. ठरल्या वेळेबाहेर जर मी कोंबडीच्या शरिरात प्रवेश केला नाही तर मला मरण येईल. मी कोंबडीच्या रूपात असतांना कोणी माझ्याशी लग्नाला तयार झाला तर मला शाप मुक्ती मिळेल." जंत्रीने तिला मिळालेल्या शापाचे व त्यातून मुक्तीचे गुपित सुमंगला सांगितले.

"ठीक, मी तुला त्या शापातून मुक्ती करण्याचा उपाय करतो." सुमंगने तिला धीर दिला. त्या दोघांचे बोलणे चालू असता सुमंगची आई जागी झाली. तिने सैपाक घरात डोकावून पाहिले. तिला तिचा मुलगा अप्सरेसारख्या सुंदर मुलीला मिठी मारून उभा असलेला दिसला. थोड्या अंतरावर निश्चेष्ट पडलेली कोंबडी पाहून तिला सर्व उलगडा झाला. ती पाऊल वाजवल्या शिवाय आत गेली आणि निश्चेष्ट पडलेल्या कोंबडीला दोघांची नजर चुकवून बाहेर उचलून घेऊन गेली. वस्तीच्या बाहेर एका जागी एक शेकोटी जळत होती, त्या आगीत तिने ती कोंबडी टाकली. दुसऱ्या क्षणाला जंत्री मोठ्याने ओरडून तडफडू लागली.

"झाले काय जंत्री?" सुमंगने घाबरून तिला विचारले.

"माझे सर्वांग जळत आहे, माझे कोंबडीचे शरीर कोणीतरी आगीत टाकले आहे." जंत्री पोळल्यासारखी ओरडू लागली.

तिने सोडलेले कोंबडीचे शरीर त्या जागी नव्हते. सुमंगने बाहेर जाऊन पाहिले, दूर विस्तवांत कोंबडीचे ते शरीर दिसले. तो धावत गेला व आगीतले ते शरीर काढून जळलेला भाग हाताने चोळून विझवू लागला. सुदैवाने आग पेटलेली नव्हती व शरीर थोडेच एक दोन जागी भाजले होते.

आई ओरडत राहली. पण सुमंग तिकडे दुर्लक्ष करून ते शरीर झोपडीत घेऊन आला. आता जंत्रीला आराम पडला होता. तिने कोंबडीच्या शरिरात पुन्हा प्रवेश केला.

उजाडल्यावर सुमंग त्या कोंबडीला घेऊन भिल्लांच्या सभेत गेला आणि भिल्ल नायकासमोर गुडघे टेकून नमस्कार करून म्हणाला—"भिल्लेश्वरा! या कोंबडीशी मी लग्न करणार आहे. आमचे लग्न लावून देण्याची कृपा करावी."

काही भिल्ल सुमंग जे बोलला ते ऐकून हसू लागले. काहींनी त्याच्या वेडेपणाबद्दल त्याची खूप थट्टा केली. एकाने असे म्हणायला देखील मागेपुढे पाहिले नाही की भिल्ल जातीचा अपमान करण्यासाठीच याने हा हट्ट धरला आहे. एक जण म्हणाला—"मूर्खा! एकाहून एक सुंदर सुंदर मुली मिळतील तुला कोणत्या गोष्टीची उणीव आहे? तुझ्याजवळ पैसे नाहीत की काय नाही? सर्व काही आहे. वाटले तर दहा दहा जणींशी तू लग्न केलेस तरी हरकत
















नाही. पण हे काय, म्हणे, कोंबडीशी लग्न करणार. वेडबीड तर नाही लागलं तुला?

"मी याच कोंबडीशी लग्न करणार. खरी गोष्ट लग्न होताच तुम्हांला सर्वांना कळेल." सुमंग म्हणाला.

"तू असे कांहीं काम केलेस तर तुला व तुझ्या आईला वाळीत टाकू, लक्षात असू दे." भिल्लेश्वर म्हणाला.

"तुम्ही कोंबडीशी माझे लग्न झाले तर ना जातीबाहेर करणार? प्रथम माझे लग्न तर होऊ दे. लग्न करून दिल्यावर तुम्ही मला जातीबाहेर करणार नाही, उलट सर्व मेजवान्या उडवाल, हे मला माहीत आहे. माझ्या बोलण्यावर विश्वास करून माझी एवढी विनंती मान्य करा." सुमंग म्हणाला.

तरी कित्येकांनी लग्न होणे इष्ट नाही असे आपले मत दिले. परंतु भिल्लेश्वराची सुमंगवर फार मर्जी होती. म्हणून त्याने असा निवाडा दिला की सुमंगचे कोंबडीशी प्रथम लग्न करून देऊ, नंतर त्याला जी शिक्षा द्यायची असेल ती सुद्धां देऊ.

त्याप्रमाणे भिल्लांच्या पुरोहिताने त्यांच्या पद्धतीने लग्नाची सर्व तयारी केली आणि मंत्र म्हटला. तो मंत्र पुरा होण्यापूर्वीच जंत्रीने आपला कोंबडीचा देह सोडून मनुष्य देह धारण केला. ती नवऱ्यामुलीसारखी नटून लग्नाला तयार होऊन आल्याचे सर्वांना दिसले. तिचे ते रूप पाहून सर्वांचे डोळे दिपून दिले.

सुमंगने सांगितल्याप्रमाणे भिल्लांच्या सर्व वस्तीला एका महोत्सवाचे रूप मिळाले जंत्रीची शापमुक्ती झाल्याचे कळल्याबरोबर तिचा बाप धावत भिल्लेश्वराच्या वस्तीत आला. त्याने सुमंगच्या वस्तीतल्या भिल्लांना भाले, धनुष्य बाण, मोरपंख, कपडे, हत्तीचे दांत इत्यादी वस्तू व निरनिराळी शस्त्रे वांटून मुलीला व आपल्या जांवयाला आशीर्वाद दिला.





# लंबाडी

पूर्वीच्या काळात राजा असो की चक्रवर्ती सर्वांना युद्ध म्हटले की अंगावर काटा उभा राही. तरी आपल्याहून लहान राजांना जिंकून आपले राज्य वाढविण्याच्या मोहाला प्रत्येक जण बळी पडे. परंतु दुसऱ्याचे राज्य सैनिक शक्तीने जिंकण्या-ऐवजी इतर पद्धतीने जिंकण्याकडेच जास्त कल असे. कधी कधी समस्या टाकून उत्तर न देणाऱ्या राजाने समस्या देणाऱ्याच्या स्वाधीन व्हायचे असे देखील कधीकधी घडे.

अशाच तऱ्हेने आपल्या शेजारचे राज्य जिंकण्याचा विचार शमंत देशाचा राजा कमलनाभ याच्या डोक्यात आला. त्याच्या राज्याच्या सीमेपलीकडे प्रसेन नावाच्या एका राजाचे राज्य होते. ते बळकावण्याचा कमलनाभने विचार केला. त्याने प्रसेनकडे एका प्रतिस्पर्धेत भाग घेण्यासाठी निरोप पाठविला. दोन्ही राज्यांनीं दोन रथ तयार करून त्यांची शर्यत करावी असे त्याने एक दूत पाठवून प्रसेनला कळविले. ज्याचा रथ मागें राहील तो देश हारला असे ठरले.

प्रसेनला शर्यतीत भाग घेणे पसंत नव्हते. तरी मनाच्या इच्छेविरुद्ध ती अट कबूल करून त्याला भाग घ्यावा लागला. कारण प्रतापी कमलनाभ त्याच्या राज्यावर चालून आला तर सर्व नाशच होणार. त्यापेक्षा शर्यतीत हारून आपण हारल्याचे कबूल करणे त्याला जास्त हिताचे वाटले.

प्रसेनने आपल्या राज्यातल्या सर्व सुता-रांना व लोहारांना बोलावून एक उत्तम रथ तयार करायला सांगितला. ज्याचा रथ सर्वात बळकट व वेगाने चालणारा निघेल त्याला बक्षिस दिले जाईल असे देखील राजाने जाहीर केले.

श्री. का. ना. सोनार



राज्यातले सुतार लोहार चढाओढीत उतरले. त्यात एक जण लोहाराच्या धंद्यात फार हुशार असल्याची प्रसिद्धी होती. खरोखरी तो इतरांसारखाच सामान्य लोहार होता. परंतु त्याच्या हाताखाली काम करणारा एक तरुण मुलगा फार हुशार होता. त्याच्या हातच्या कसबावर त्याच्या मालकाला प्रसिद्धी मिळाली होती. तो तरुण चतुर व बुद्धीने चलाख होता. त्याचे जातगोत कोणाला माहीत नव्हते. एक अनाथ मुलगा म्हणून त्या गावी आला होता. त्याचे नावगाव पण कोणाला माहीत नव्हते. लोक त्याला फक्त 'लंबाडी' या नावाने हाक मारीत. लंबाडी पगारबिगार घेतल्या शिवाय दोन वेळच्या जेवणावर सर्व काम करी.

राजाच्या इच्छेप्रमाणे लंबाडीने एक रथ तयार केला. तो किल्लघासमोर नेऊन उभा करण्यात आला. तो रथ पाहण्यासाठी लोकांची गर्दी जमली. त्या रथाला एखाद्या लहान मुलाने जरी धक्का दिला तरी रथ दहावीस पावले जाई. याची बरोबरी करू शकणारा रथ जगात कोठे असणेच शक्य नाही." असे एक दरबारी म्हणाला.

"आपल्या राजाचे पांढरे घोडे या रथाला जोडले तर आपला जय निश्चित!" दुसरा म्हणाला.

"त्या घोड्यांच्या पायांना मी नाल बसवितो. मग पाहून घ्या घोडे कसे धावतात ते." लंबाडी मध्येच बोलला.

"कोण रे तू? आणि या रथ बनविणाऱ्या लोहाराचा कोण तू?" दरबारी अधिकाऱ्यांनी विचारले.

"मीच हा रथ तयार केला." लंबाडी म्हणाला.

"होय का? अरे हा रथ बनविणाऱ्या लोहाराला राजाने मोठे बक्षिस दिले आहे. म्हणजे तू मोठा श्रीमंत आहेस म्हणायचा?" अधिकाऱ्यांनी विचारले.

"ते इनाम माझ्या मालकाला मिळाले. त्यातली एक पैदेखील मला मिळाली नाही." लंबाडी म्हणाला.

ते उत्तर ऐकून अधिकारी चकित झाले आणि लंबाडीला राजाकडे घेऊन गेले. राजा सर्व ऐकून लंबाडीला म्हणाला–"तू म्हणतोस हे सर्व खरे असेल, तू रथ तयार केलास पण तुझ्या मालकाने तुला काही बक्षिस किंवा इनाम दिले नसेल तर मी त्याची चवकशी करून तुझ्या मालकाला कडक शिक्षा करीन."

लंबाडी म्हणाला–"मला आताच बक्षिस नको आहे. मी नाल बसवल्यावर घोड्यांनी ही शर्यत जिंकली तर आपण द्याल ते बक्षिस मी आनंदाने घेईन."

ठरल्याप्रमाणे दोन्ही राज्यांच्या सीमेवर रथांची शर्यत झाली आणि प्रसेनचाच रथ पुढे गेला. त्याने ती शर्यत जिंकली. आपला रथ मागे राहला हे पाहून रागाने कमलनाभच्या सारथ्याने आपला रथ प्रसेनच्या रथावर आदळेल अशा तऱ्हेने आणला. पण त्याच्याच रथाचे एक चाक मोडले व रथ निरुपयोगी झाला. प्रसेनचा रथ जागच्या जागी उभा





होता. कमलनाभची मान त्या शर्यतीत खाली झाली.

त्यानंतर प्रसेनने लंबाडीला बोलावून त्याचा दरबारात जाहीर सत्कार केला व त्याला आपला एक सल्लागार म्हणून नेमले.

कमलनाभला सल्ला देणारी मायाविनी नावाची एक बाई होती. तिला त्याने पुढे काय करावे, असा सल्ला विचारला.

मायाविनीने राजाला एक नवीन युक्ती सांगितली.

काही दिवसांनी कमलनाभ राजाचे दूत प्रेसनकडे एकाच लांबी रुंदीच्या तीन काठ्या घेऊन गेले व म्हणाले–"आमच्या महाराजांनी या तीन काठ्या आपणांकडे पाठविल्या आहेत. या झाडाच्या काठ्या एकाच वेळी कापलेल्या नाहीत. सर्वात प्रथम कोणती कापली व उरलेल्या दोन्ही कोणत्या क्रमाने कापल्या हे कळवायला सांगितले आहे."

"मी विचार करून दोन दिवसांनी उत्तर देतो." असे सांगून प्रसेनने कमल-नाभच्या दूताला पाठवून दिले. नंतर त्याने लंबाडीला बोलावून त्या प्रश्नाचे उत्तर सांगायला सांगितले. तेव्हां तो म्हणाला–"या तिन्ही काठ्या पाण्यात टाका. जी काठी सर्वात खाली जाईल ती सर्वात शेवटी कापलेली. जी पाण्यावर तरंगेल ती सर्वात प्रथम कापलेली आणि मधे राहील ती मधे केव्हां तरी कापलेली समजावी."

प्रसेनने त्याप्रमाणे काठ्या पाण्यात टाकून परिणाम प्रत्यक्ष पाहून कमलनाभ कडे त्याच्याच दूतांकरवी उत्तर पाठविले.

कमलनाभने मायाविनीला विचारले–"हे कसे झाले? प्रसेन माझ्याहून जास्त हुशार दिसतो. मला सुद्धा ज्या प्रश्नाचे उत्तर माहीत नाही त्याचे त्याला माहीत आहे.

"तो राजा इतका मोठा बुद्धिमान असेल असे वाटले का महाराज? त्याला कोणी चांगला सल्लागार मिळालेला आहे." मायाविनी म्हणाली.

"मग त्याला आपण कसे काय जिंकायचे? तो सल्लागार असेपर्यंत शक्यच नाही!" कमलनाभ म्हणाला.

"मी त्याला प्रसेनच्या मर्जीतून उतरवून त्याचा काटा दूर करविते. आपण निश्चित असावे!" मायाविनी म्हणाली.

एकदा मायाविनी एका योगिनीचा वेष करून प्रसेनकडे गेली व म्हणाली–"मला हस्तसामुद्रिकाची माहिती आहे." नंतर प्रसेनचा हात पाहून म्हणाली–"महाराज! आपले सिंहासन डोलण्याच्या बेतात आहे व त्याची आपल्याला कल्पनादेखील नाही? आपण एका सल्लागाराला नेमले आहे. त्याची नजर आपल्या सिंहासनावर आहे. सावध रहावे. त्याचा काटा कायमचा दूर करावा." असे सांगून मायाविनी निघून गेली.

प्रसेनला लंबाडीची भीती वाटू लागली. कारण तो एकटाच त्यांचा सल्लागार होता. त्याचे कुलगोत कोणाला माहीत नव्हते. होता तो बुद्धीचा तल्लख. त्याच्या मनातला हेतू कोणाला कळणार? तो नक्कीच विश्वास-





घात करील. तेव्हां वेळ न घालवता त्याला जिवंत समाधी देऊन टाकली पाहिजे. राजाने तो विचार मनात येताच आपल्या स्थापत्य खात्याच्या अधिकाऱ्याला बोलावून लंबाडीला मध्ये उभा करून त्याच्या चारी बाजूला दरवाज्या खिडकी शिवायच्या भिंती बांधून वर गच्चीचे पक्के धावे टाकायला सांगितले.

प्रसेनची मुलगी शुभांगी हिला ती राजाज्ञा कळली. तिने सर्वात प्रथम लंबाडीला पाहिले तेव्हां पासून तिचे मन त्याने हिरावून घेतले होते. ती त्याच दिवशी अंत:पुराच्या खिडकीतून बाहेर पहात असता तिला लंबाडीला मध्ये बसवून त्याच्या चारी बाजूला भिंत बांधण्याचे काम चालू असलेले दिसले. तिने आपल्या दासीला पाठवून एका गवंड्याला बोलावून ते सर्व काम कशासाठी चालू आहे याची चवकशी केली तेव्हां तिला ती विचित्र राजाज्ञा कळली.

गवंडी म्हणाला—"लंबाडीला चिणून टाकायला आज्ञा केली आहे महाराजांनी!"

शुभांगीने विचारले—"पण असे का? त्याने असा कोणता अपराध केला आहे?"

"ते नाही माहीत आम्हांला, राजकुमारी!" गवंडी म्हणाला.

राजकन्येने त्या गवंड्याला हातातली अंगठी बक्षिस म्हणून काढून दिली व म्हणाली—"हे पहा, मी सांगते ते कर. कोणाला कळणार नाही अशा तऱ्हेने भिंतीत एक दगड बसव. त्याच्यातून आत बाहेर येता जाता आले पाहिजे. परंतु ही गोष्ट कोणाला, स्वत: महाराजांना सुद्धा कळता कामा नये. कळली तर तुझा शिरच्छेद होईल, लक्षात ठेव."

गवंडी होकार देऊन तेथून निघून गेला.

त्या दिवशी रात्री शुभांगीने त्या दगडाजवळ जाऊन दगड बाजूला सारून लंबाडीला हाक मारली—"लंबाडी!"



लंबाडी एकाएकी महाराजांचा असा कोप कां झाला, या विचारात गर्क होता. त्याच वेळी कोणी गोड बारीक आवाजात त्याला हाक मारली, ती ऐकून चकित होऊन त्याने विचारले—"कोण आहे?"

"मी, राजकुमारी, तुझ्यासाठी जेवण वाढून आणले आहे." शुभांगी म्हणाली.

लंबाडीला आश्चर्याचा धक्काच बसला, स्वत: राजकुमारी जेवण घेऊन कां बरे आली आहे? तिची आपल्यावर अशी एकाएकी कृपा कशी काय झाली? तो तिला म्हणाला—"राजकन्या! आपल्या या उपकाराबद्दल मी जन्मभर आपला ऋणी राहीन. परंतु हे नाही मला कळले की महाराजांचा माझ्यावर असा अकस्मात कोप कां झाला असावा? माझ्या हातून काही अपराध झाल्याचे पण मला आठवत नाही?"

"कोणी तरी माझ्या बाबांचे कान तुझ्या विरुद्ध भरले असावेत. कळेल कोण दुष्ट आहे तो. त्यांचा लोकांच्या बोलण्यावर चटकन विश्वास बसतो. खरी गोष्ट पुढे मागे प्रगट होईलच. काही दिवस तुला हे कष्ट सहन करावे लागणार. मी तुझ्या जेवणाखाणाची जबाबदारी स्वत:वर घेतली आहे." अशा तऱ्हेने लंबाडीला धीर देऊन राजकन्या निघून गेली.





कमलनाभला त्याच्या हेरांकरवीं लंबाडीला प्रसेनने चिणून टाकल्याचे वृत्त कळले. त्याने मायाविनीला शाबासकी दिली आणि पुन्हां प्रसेनला कोणत्या तरी प्रश्नाच्या जाळ्यात पकडण्याचा सल्ला विचारला. मायाविनीने एक उपाय राजाला सुचविला.

असाच काही काळ लोटला. एके दिवशी अचानक प्रसेनकडे बारा तरुण युवक एकाच वयाचे, रूपवान व एकाच तऱ्हेचा पोशाख करून आले. त्यांच्या पैकी एक जण प्रसेनला म्हणाला–"महाराज! आम्हांला कमलनाभ महाराजांनी पाठविले आहे. आमच्या पैकी एक जण युवराज आहेत. त्यांना आपण ओळखू शकला नाही तर आपल्याला हार स्वीकारावी लागेल."

प्रसेन तो प्रश्न ऐकून वावरून गेला. आजपर्यंत ज्या लंबाडीच्या मदतीने त्याने उत्तर देऊन कमलनाभचे तोंड बंद केले होते त्याला त्याने स्वतःच चिणवून ठार केले होते. या खेपेस कमलनाभचे दास्य स्वीकारण्या व्यतिरिक्त दुसरा मार्ग नव्हते. प्रसेन काळजीत पडला. राजकन्येला महाराज काळजीत पडल्याचे समजले. म्हणाली–"महाराज! मी पुष्कळ दिवस झाले, विचारावे, विचारावे म्हणत होते. आपण लंबाडीला कोणत्या अपराधा करता शिक्षा फर्माविलीत?"

"मुली! एका योगिनीने माझा हात पाहून सांगितले कीं मी एका सल्लागाराला नेमून विनाकारण स्वतःचा जीव धोक्यात टाकला आहे. त्याचा काटा दूर करून टाकण्यासाठी मी हे सर्व केले." राजा म्हणाला.

"मला वाटते, ती समाधी तोडून पहावी, कदाचित तो अजून जिवंत असेल." शुभांगीने वडिलांना सुचविले.

"मुली, तो केव्हांच मेला असेल. त्याला खायला प्यायला काही नाही आणि तो जिवंत कसा काय राहिल?" असे राजाने विचारले आणि तरी सुद्धा त्याने ती समाधी तोडायला नोकरांना सांगितले. आत लंबाडी नुसता जिवंतच नव्हता तर चांगला जाडजूड पण झाला होता.

राजाने त्याची क्षमा मागून त्या संकटातून काही मार्ग काढायला विनंती केली.

लंबाडी थोडा वेळ विचार करून म्हणाला–"महाराज! आज रात्री त्या बारा जणांना थोडे उशिरां पंचपक्वान्नांचे जेवण वाढावे. त्यांना ज्या ताटांत जेवण वाढण्यात येईल ती ताटे वेताची स्वच्छ असावीत." त्या बारा तरुणांना मध्यरात्रीच्या सुमारास ताटे वाढून जेवायला बोलावण्यात आले. "छी: छी:! ही काय जेवायची ताटे? इतकी घाणेरडी. आम्ही नाही जेवणार." तरुण मंडळी म्हणाली.

"क्षमा करा, मी ठरलो गरीब. तुमच्या राजासारखा श्रीमंत नाही. जे शक्य झाले ते प्रेमाने वाढून आणले आहे, गोड करून घ्यावे. सैपाक उत्तम पंच पक्वान्नांचा आहे." प्रसेन नम्रपणे म्हणाला.

भुकेली तरुण मंडळी एकेक करून जेवू लागली. त्यांच्या पैकी फक्त एकाने ताटाला हातदेखील लावला नाही. तो गंभीरपणे नुसता बसून होता.



“महाराज! हेच युवराज आहेत. यांना अटक करावी.” लंबाडी म्हणाला.

राजा कमलनाभकडे अकराच तरुण मंडळी परत आली आणि त्यांनी प्रसेनचा निरोप सांगितला तो असा–“आपल्याला सल्ला देणाऱ्या त्या म्हातारीचे मुंडके मला पहायला मिळेल त्याच दिवशी मी आपल्या चिरंजीवांना सुखरूप परत पाठवीन. त्याच बरोबर तुम्ही मला यापुढे असे प्रश्न वगैरे पाठवून त्रास देणार नाही, असे वचन पण दिले पाहिजे.” हा निरोप प्रसेनने लंबाडीच्या सल्लयाने पाठविला होता हे निराळे सांगण्याची गरज नाही.

आता कमलनाभचा पारा पूर्णपणे उतरला. तो म्हाताऱ्या मायाविनीला बरोबर घेऊन आला आणि तिला प्रसेनच्या पायांसमोर आडवी टाकून म्हणाला–“हिला जो दंड द्यावयाचा असेल तो द्यावा. परंतु माझ्या एकुलत्या एका कुलदीपकाच्या जिवावर कोणत्याहि प्रकारे आच येऊ देऊ नका. मी तुमच्या वाटेला न जाण्याची शपथ घेतो.”

प्रसेनवरची संकटे कायमची टळली. कमलनाभच्या मुलाला लंबाडीकडून सर्व वृत्त कळले. त्याच्या वडिलांनी प्रसेनला किती तऱ्हेनी त्रास दिला होता ते ऐकून त्याला वाईट वाटले.

प्रसेनला, समाधीत लंबाडी कसा जिवंत राहला हे कळले तेव्हां शुभांगीने लंबाडीला मनाने वरले असल्याचे पण कळले. त्याने दोघांचे लग्न आनंदाने करून दिले. त्या विवाहोत्सवाला कमलनाभ व त्याचा मुलगा दोघे हजर होते. लग्न समारंभ आटोपल्यावर प्रसेनचा व लंबाडीचा प्रेमाने निरोप घेऊन दोघे बापलेक स्वदेशी परतले.

कमलनाभच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा गादीवर बसला व प्रसेन वारल्यावर लंबाडी त्याच्या गादीवर बसला. त्यांचे परस्परांशी सख्य नित्य वाढतच गेले.





# वेडेपणाला औषध

अरबस्तानात एक जमीनदार रहात असे. त्याला पशुपक्ष्यांची भाषा येत असे. त्याच्याजवळ एक घोडा व एक बैल होता.

एकदा बैल घोड्याला म्हणाला–“दादा! तुझे बरं आहे बुवा, काम बेताचे आणि जेवणखाण मात्र छान स्वादिष्ट! माझं नशीबच फुटकं बघ. दिवसभर ढोपरभर चिखलात नांगर ओढावा तेव्हां कोठे वाळलेली वैरण समोर येऊन पडते.”

त्यावर घोडा म्हणाला–“मित्रा! मी सल्ला देतो, त्याप्रमाणे वागलास तर तुला सुद्धा आराम मिळेल. तुला कोणी शेतात नांगराला जोडायला नेऊ लागला की बसून रहा. मारहाण केली तरी उठू नकोस. खायला कोंडा व पेंड घातली तरी उठायचे नाव काढू नकोस. म्हणजे पहा, खायला हिरवे गवत दोन्ही वेळ खायला मिळेल.

जनावरांची भाषा कळणाऱ्या मालकाने ते संभाषण ऐकले होते.

त्या दिवशी रात्री वैरणीला बैलाने तोंड देखील लावले नाही. दुसऱ्या दिवशी त्याला शेतात नेले तेव्हां तो खाली बसला. मालक आपल्या नोकरांना म्हणाला–“तुम्ही बैलाला गोठ्यात नेऊन बांधून ठेवा आणि घोड्याला घेऊन या.”

त्या दिवशी घोड्यालाच नांगराला जोडले. दिवसभर काम केल्यावर बिचारा संध्याकाळी आपल्या तबेल्यात आला. तेव्हां बैल त्याला म्हणाला–“दादा! तू म्हणालास तसा मी वागलो, म्हणून मला खूप आराम मिळाला, बघ!”

दुसऱ्या दिवशी सुद्धा मालकाने घोड्याकडून बैलाचे काम करून घेतले. जोखडाच्या वजनाने त्याच्या मानेला एक मोठा गोळा झाला. त्याचे सर्व अंग पिळवटून

श्री. वा. स. बोराळे



आल्यासारखे झाले. शेतातून परत आल्यावर घोडा बैलाला म्हणाला–"मित्रा! तू जरा सावध रहा बरं का. मालक नोकरांना सांगत होता, मी ऐकलं, उद्यादेखील बैल उठला नाही तर खाटकाच्या हाती विकून टाका त्याला. त्याचं कातडं काढवून त्याची मोट करून घेऊ.

ते ऐकून बैलाची पाचावर धारण बसली. म्हणाला–"नको रे बाबा! उद्यापासून मी कामावर जातो कसा!" त्याचे ते संभाषण मालकाने ऐकले.

दुसऱ्या दिवशी मालकाला पाहताच बैल उभा राहून जणूंकाही मालकाने जवळ यावे अशी खूण करण्यासाठीच डोके हलवून हलवून बोलावू लागला.

ते पाहून मालक खदखदां हसला. त्यावेळी त्याची बायको जवळच उभी होती. तिने विचारले, "हंसायला काय झाले?"

"ते एक गुपित आहे, मी आतां नाही सांगणार." नवरा म्हणाला.

"माझ्यात काही वैगुण्य दिसलं वाटतं?" बायकोने थोडेसे फणकाऱ्यानेच विचारले.

"मी तुला पाहून हसत नाही, माझे आई! दुसरेच कारण आहे." नवरा म्हणाला.

"काय वाटेल ते असू द्या. मला सांगता की नाही?" बायकोने जास्तच रागावून विचारले.

"मी सांगितले तर तत्क्षण माझा जीव जाईल. मग...?" नवऱ्याने विचारले.

"काय वाटेल ते झाले तरी चालेल, सांगितलेच पाहिजे." बायकोने हट्टच धरला.

बायकोचा तो हट्ट पाहून नवऱ्याने त्रासून जाऊन मरण्याचा विचार केला. त्याने मरणसमयी भेटण्याची इच्छा दर्शवून सर्व नातेवाईक व मित्र मंडळींना पत्रे लिहिली.

दुसऱ्या दिवशी सर्व नातेवाईक मंडळी बाहेर ओसरीवर जमा झाली. त्या आधी मालक मागे परसात गेला होता.



कोंबडा ऐटीत हिंडत किडे व दाणे जे समोर दिसे ते खात होता. कुत्रा जवळ जाऊन त्याला म्हणाला–"काय रे, आपला धनी मरण्याच्या तयारीत तिकडे आहे आणि तू ऐटीत बेफिकीर पणे किडे खात हिंडतो आहेस? तुला काहीच वाटत नाही का?"

कोंबड्याने विचारले–"पण मरण्याचे कारण काय? कारण असेल की नाही काही?" कुत्र्याने सर्व सविस्तर सांगितले.

"अरे आपल्या धन्यासारखा मूर्ख मनुष्य कोणी नसेल. हे पहा, मला पन्नासवर बायका आहेत. त्या सर्वांवर माझे सारखे प्रेम आहे. परंतु त्या उगाच हट्टाला पेटल्या तर मी त्यांना चोचीने टोचून त्यांची खोड मोडतो. आपल्या धन्याला एकच बायको संभाळता येईल तर ना? तिच्या हातचे बाहुलं झाले आहेत ते."

जमिनदाराने ते संभाषण पण ऐकले. तो घरी आला तेव्हां येताना चिंचेच्या दोन लांब सटक काठ्या तोडून घेऊन आला. बायकोला घरात गेल्याबरोबर म्हणाला–"तू जे गुपित विचारले होतेस ना ते आज मी सांगतो." असे सांगून जमीनदाराने काठीने बायकोला छान झोडपून काढले.

"नको हो! मी मेल्ये! सोडा मला! पायां पडते तुमच्या!" असे म्हणत बायको पायां पडली. काठ्या फेकून देऊन बायकोला बरोबर घेऊन जमीनदार नातेदार जमले होते तेथे आला.

"मी बायकोची हौस पुरी केली. पाहिजे तर विचारून पहा तिला." जमीनदार म्हणाला.

सर्व नाते वाईक चकित झाले. त्यांना पंच पक्वान्नांची मेजवानी देऊन जमीनदाराने निरोप दिला. त्यानंतर त्याच्या बायकोने कधी हट्ट केला नाही.





# सहजीवन

एका जंगलात एक म्हातारा एक लहानसे झोपडे बांधून त्यात रहात असे. त्याला आयुष्यात कसला त्रास नव्हता सुखाने सर्व ठीक चालले होते. फक्त त्याच्या कोंबड्यांना खायला एक बोका येऊन त्रास देई. त्या बोक्याला धरण्यासाठी म्हाताऱ्याने कित्येकदां प्रयत्न केला पण तो फसला. पुढे काही दिवसांनी त्या म्हाताऱ्यालाच मरण आले. जेव्हां बोका कोंबड्यांच्या शोधार्थ आला तेव्हां त्याला म्हाताऱ्याचे प्रेत दिसले. त्याला फार आनंद झाला. त्याने विचार केला, काय पण आजमेजवानी आहे! कित्येक दिवस पुरेल आपल्याला. असा विचार करून तो म्हाताऱ्याचे प्रेत आपल्या जागी ओढून घेऊन जाण्याचा प्रयत्न करू लागला. पण त्याला ते जमेना ?

कोणाची मदत मिळते का हे तो पाहू लागला. तेव्हां त्याला समोर एक खार दिसली. तो तिला बोलावून म्हणाला– "अग ए खारी! पहा आपल्या दोघांना कित्येक दिवस पुरेल एवढे देवाने जेवण वाढून ठेवले आहे. ह्या म्हाताऱ्याचा हा आडदांड देह आपल्या घरी घेऊन जायला जरा हातभार लावतेस का?"

खार बोका म्हणाला त्याला कबूल झाली. दोघांनी खूप-उड्या मारून ते प्रेत ओढण्याचा यत्न केला. पण ते जागचे हालेच ना.

इतक्यात त्यांना एक ससा दिसला. बोक्याने त्याला पण मदतीला बोलाविले. तिघांनी ते प्रेत वाटून घ्यायचे ठरले. तिघांनी मिळून ओढण्याचा यत्न केला तरी ते प्रेत जागचे हालले नाही. नंतर क्रमाने एक कोल्हा, एक लांडगा व एक अस्वल आले. सर्वांनी मिळून त्या म्हाताऱ्याचा देह सारखा सारखा वाटून घ्यायचे मान्य केले. सर्वांनी सहजीवन पाळायचे असे ठरवून शपथ घेतली आणि असे पण ठरले की सर्वांनी मिळून पुढे शिकार करायची व प्रत्येकाच्या पोटाला लागेल तेवढे वाटून घ्यायचे.

आता म्हाताऱ्याचा तो देह कोठे ओढून न्यायची त्यांना गरजच उरली नाही. सहा जणांची पोटे भरल्यावर म्हाताऱ्याच्या हाडांचा फक्त सांगडाच काय तो उरला.

काही वेळाने सर्वांच्या पोटात कावळे 'काव काव' करू लागले. तेव्हां अस्वलाने सुचविले–"मित्र हो! मला भूक लागली आहे. आपल्या समाजाने लवकर काही तरी खाण्याची व्यवस्था केली नाही तर माझा जीव जाणार!"

"म्हणजे हा तर फार मोठाच प्रश्न उभा राहलां आहे. काय करायचे?" बाकी जनावरे म्हणाली.

"त्यात काय? आपण आपल्या पैकी सर्वात लहान प्राण्याला खाऊन टाकू या. त्या शिवाय आपला जीव वांचवायला दुसरा उपाय मला तरी सुचत नाही." अस्वल म्हणाले.

ते वाक्य संपण्याच्या आधीच खार चटकन उडी मारून एका झाडावरून दुसऱ्या झाडावर जात दृष्टीआड झाली.



श्री. के. ना. पवार

"पाहिलेत या खारीला. हिच्यात थोडी देखील प्रेम व सहानुभूतीची भावना नाही. आपल्या सह् कान्यांसाठी ती एवढादेखील त्याग करू शकली नाही?" असे म्हणत अस्वल सशाला पकडणार तेवढ्यात तो त्याच्या पंज्यातून निसटून एका झुडपात शिरला व दिसेनासा झाला. प्रसंग ओळखून बोक्याने पण तेथून चटदिशी पाय काढला आणि झाडावर जाऊन बसला.

"सहा जणांपैकी तिघे तर पळालेच. त्यांचा काय विश्वास आणि प्रेम तरी काय कामाचे? आपण तिघे उरलो आहो. तिघात तूच लहान आहेस कोल्ह्या! म्हणून आम्ही दोघं तुला वाटून खातो." अस्वल कोल्ह्याला म्हणाले.

"मला हरकत नाही. पण या काळो-खात आणि या झोपडीत, मला तरी ते नाही कबूल. चला आपण डोंगरावर जाऊ. तेथे मी तुमचा दोघांचा आहार व्हायला तयार आहे." कोल्हा म्हणाला.

अस्वलाने त्याला होकार दिला आणि तिघे डोंगराकडे निघाले. कोल्ह्याने त्याच्या पाठीमागून येत असलेल्या लांडग्याला हळूच, अस्वलाला ऐकू जाणार नाही अशा बेताने विचारले–"काय हो लांडगे दादा! मला खाल्ल्यावर पुन्हां तुम्हांला भूक लागेल तेव्हां तुम्ही काय हो करणार?"

लांडग्याच्या डोक्यात तेव्हां प्रकाश पडला की त्यानंतर त्याचीच पाळी आहे.

"होय की रे! माझ्यामते हे सहजीवन फुकट आहे. सहजीवनाच्या थोर नावा-खाली आपण मोकळेपणे उघड्या जंगलात शिकार करण्याऐवजी आपल्या लहान मित्रांनाच खाऊन टाकण्याच्या विचारात आहो." लांडगा म्हणाला.

त्यानंतर लांडगा मागे वळून अस्वलाला म्हणाला–"आमचे दोघांचे मत या सह-जीवनाविरुद्ध आहे. आम्ही दोघे आपापल्या वाटेने जातो, तू आपल्या वाटेने जा!"






शुक्राचार्यांनी ययातीला वार्धक्याचा शाप दिल्यावर ययाती शुक्राचार्यांचे पाय धरून विनवण्या करीत म्हणाला–"आपण मला असा शाप देणे बरोबर नाही. शर्मिष्ठेने माझ्याजवळ पुत्रभिक्षा मागितली. मी ती मान्य केली नसती तर मला घोर पाप लागले असते. देवयानीची प्रतारणा करण्याचा विचार माझ्या मनात कधीच आला नाही. म्हणून मला क्षमा करा!"

"मी दिलेला शाप कधी व्यर्थ होत नाही. तुला आणखी काही काळ यौवन सुख उपभोगावयाचे असेल तर मी तुला एक उपाय सांगतो. तू आपले वार्धक्य कोणातरी तरुण मुलाला देऊन त्याचे तारुण्य मागून घे. ते शक्य होईल." शुक्राचार्यांनी ययातीला त्या संकटातून बाहेर येण्याचा मार्ग सांगितला. ययातीने विचार केला की कोणा तिन्हाईत तरुणाजवळ त्याचे तारुण्य मागण्या ऐवजी आपल्याच एखाद्या मुलाजवळ विचारून कां पाहू नये? जो कबूल होईल त्याचे तारुण्य आपण मागून घ्यावे व त्याबद्दल त्याला आपल्या मागून आपल्या गादीला वारस म्हणून नेमावे. शुक्राचार्यांना त्याने आपला तो विचार सांगितला आणि त्यांनी पण त्याला होणार दिला.

लगेच ययातीला वार्धक्य आले. त्याचे सर्व केस पांढरे झाले व त्याचे डोके 'ना' 'ना' करू लागले. त्याच्या तोंडावर सुर-कुत्या दिसू लागल्या आणि संधीवाताने



त्याचे सांधे दुखू लागले. त्या परिस्थितीत ययातीने देवयानीचा मोठा मुलगा यदू याला बोलावून मिळालेल्या शापाची गोष्ट सांगितली आणि विचारले–"बाळ! तू माझे वार्धक्य घेऊन आपले तारुण्य मला देतोस का? मी पुन्हां तुझे तारुण्य परत देऊन आपले वार्धक्य परत घेईन."

यदू त्या गोष्टीस कबूल झाला नाही. त्याबद्दल ययातीला राग आला व तो म्हणाला–"तुला, किंवा तुझ्या वंशांतील कोणाला माझे राज्य मिळणार नाही." एकट्या यदूनेच नकार दिला असे नसून देवयानीच्या इतर मुलांनी पण साफ नकार दिला. परंतु शर्मिष्ठेच्या मुलांपैकी धाकटा पुरु आपल्या वडिलांच्या इच्छेप्रमाणे त्यांना आपले तारुण्य देण्यास कबूल झाला. शुक्राचार्यांच्या कृपेने ययातीने आपले वार्धक्य पुरुला दिले व त्याचे तारुण्य मागून घेतले. त्यानंतर तो विश्वाचि नांवाच्या अप्सरेबरोबर भोगविलास करीत विश्वभर फिरला. काही काळ लोटल्यावर त्याने आपला पितृभक्त मुलगा पुरु याला त्याचे तारुण्य परत दिले व आपले वार्धक्य परत घेऊन पुरुला आपला वारस म्हणून गादीवर बसवून त्याचा राज्याभिषेक केला.

पुरुला पौष्ठी आणि कौसल्या नावाच्या दोन बायका होत्या. दोघींना मुले झाली. कौसल्येला जी मुले झाली त्यांच्या पैकी एका मुलाच्या वंशात सोळाव्या पिढीत दुष्यंत नावाचा राजपुत्र जन्मला. दुष्यंताचे विश्वामित्रांची मुलगी शकुंतला हिच्याशी लग्न झाले. त्यांचा मुलगा तो भरत. त्याचा वंश तो भरत वंश म्हणून प्रसिद्ध झाला. त्याच वंशात जनमेजय जन्मला.

विश्वामित्राची मुलगी शकुंतला हिच्या जन्माचा वृत्तांत असा :–

एकदा विश्वामित्र मुनींनी घोर तपश्चर्या केली. त्यांची ती तपश्चर्या पाहून इंद्र घाबरून गेला. त्याने मेनका नावाच्या अप्सरेला बोलावून आज्ञा केली की विश्वामित्र ऋषी तपश्चर्या करीत आहेत. तेव्हां तू जाऊन त्यांची तपश्चर्या काय वाटेल ते करून भंग होईल असे कर.

विश्वामित्र ऋषी सामान्य ऋषी नव्हते. त्यांचा जन्म क्षत्रिय कुळात झाला होता. परंतु आपल्या तपोबलाने ते ब्राह्मण झाले होते. स्वभावाने ते फार क्रोधी पण होते. वशिष्ठमुनीसारख्यांना विश्वामित्रमुनीं मुळेच त्रास सहन करावा लागला होता. सप्तर्षींच्या शापामुळे स्वर्गलोकांतून खाली येऊ लागलेल्या त्रिशंकूकडून विश्वामित्रांनी यज्ञ करविला. त्यामुळे घाबरून जाऊन इंद्राने स्वत: हविर्भाग घेतला होता. अशा त्रिशंकूला आपल्या तपोबलाने विश्वामित्र ऋषींनी पुन्हां स्वर्गारोहणास पाठविले. देवांनी त्याला खाली ढकलले तेव्हां विश्वामित्र ऋषींनी खाली पडत असलेल्या त्रिशंकूला अंतरिक्षात नवीन स्वर्गलोक निर्माण करून तेथे ठेवले. हे सर्व माहीत असून मेनका विश्वामित्र ऋषींचा तपोभंग करण्यासाठी त्यांच्या आश्रमात आली.

मेनका विश्वामित्र ऋषींना प्रणाम करून त्यांच्या आश्रमात विहार करू लागली.



तिचे सौंदर्य पाहून विश्वामित्रांच्या मनात चलबिचल होऊ लागली. चतुर मेनकेने त्यांच्यावर आपल्या सौंदर्याची मोहनी टाकून त्यांना वशीभूत करून घेतले. त्यानंतर विश्वामित्रांच्या कृपाकटाक्षाने मेनकेच्या पोटी एक सुंदर कन्यारत्न जन्मले. त्या कन्येला विश्वामित्र मुनींनी स्वीकारण्यास नकार दिला तेव्हां मेनका आपल्या मुलीला मालिनी नदीच्या काठी निर्जन जंगलात सोडून स्वर्गलोकी निघून गेली.

त्या जंगलात हिंस्र पशू रहात. शकुंत नामक पक्ष्यांनी आपल्या पंखा खाली तिला झाकून ठेवून तिचे रक्षण केले. दुपारी

कण्वमुनी स्नानासाठी नदीवर आले तेव्हां त्यांची नजर त्या तान्ह्या मुलीवर पडली. जवळपास कोणी मनुष्य दिसला नाही. तेव्हां कण्वमुनी त्या मुलीला आपल्या आश्रमात घेऊन गेले आणि त्यांनी शकुंतला म्हणून तिचे नामकरण केले. कण्वमुनींनी शकुंतलेला स्वत:च्या मुलीसारखे आपल्या आश्रमात वाढवले. शकुंतला त्यांनाच पिता मानी. ती लहानाची मोठी झाली व आश्रमातली सर्व कामे करू लागली.

एकदा राजा दुष्यंत आपल्या अनुयायांसह शिकारीला मालिनी नदीच्या काठच्या जंगलात आला. त्याला कण्वमुनींचा तो आश्रम दिसला. तेथील शांत वातावरण पाहून राजाच्या मनाचे समाधान झाले. आपल्या सैनिकांना व इतर लोकांना आश्रमाबाहेर रहायला सांगून दुष्यंताने आश्रमात प्रवेश केला. तेव्हां आश्रमात कण्वमुनी नव्हते. दुष्यंताला आश्रमात आलेला पाहून शकुंतला व इतर आश्रमवासी तिच्या सखींनी व ब्रह्मचाऱ्यांनी त्यांचा सर्व प्रकारे सत्कार केला. दुष्यंताच्या पोशाखावरूनच तो राजा असावा हे शकुंतलेने ओळखले व त्यांना बसायला आसन वगैरे देऊन येण्याचे कारण विचारले.



शकुंतलेचे सौंदर्य पाहून दुष्यंत चकित झाला. म्हणाला–"भद्रे मी या जंगलात शिकारीला आलो होतो. कण्वमुनींचा आश्रम पाहून त्यांचे दर्शन होईल या हेतूने आश्रमात आलो. मुनिवर्य कोठे आहेत?"

"ते कंदमुळे व आणि समिधा आणण्यासाठी वनात गेले आहेत. थोड्या वेळाने परत येतील." शकुंतला म्हणाली.

शकुंतलेचे सौंदर्य व तिची मनोहर वागणूक पाहून आणि मंजुळ आवाज ऐकून दुष्यंत जणुकाही देहभानच विसरला. तरी स्वत:ला आवरून त्याने विचारले–"कण्वमुनी ब्रह्मचारी आहेत असे ऐकतो. मग तू त्यांची कन्या कशी? तू कोणाची मुलगी? या आश्रमात कशी काय आलीस? तुला पाहिल्यापासून माझे मन स्वत:च्या स्वाधीन नाही. खरेखरे काय ते सांग."

शकुंतलेने आपला जन्मवृतांत, कण्वमुनी दुसऱ्या एका मुनींना सांगत असतां ऐकला होता. तिने तो दुष्यंताला सांगितला.

"म्हणजे तू क्षत्रियकुळात जन्मली आहेस तर! असे हे कूळ आणि असे हे सौंदर्य वल्कल वस्त्रात सुद्धा कसे खुलून दिसते आहे. असे हे सौंदर्य जंगलात कंदमुळे व फळे यावर राहलेले शोभत नाही. माझ्याशी लग्न करून माझ्या राजवाड्यात





आलीस तर मी तुला आपली पट्टराणी करून घेईन. तुला सर्व राजसुख उपभोगायला मिळेल." दुष्यंताने शकुंतलेला आपला मानस कळविला.

"माझे बाबा परत आल्याबरोबर त्यांच्या संमतीने आपला विवाह होऊ शकेल." शकुंतला म्हणाली.

अशातऱ्हेने शकुंतलेने चातुर्याने आपली संमती दिलेली ऐकून दुष्यंत तिला म्हणाला— "माझे मन तू वशीभूत करून घेतले आहेस. क्षत्रियांत गांधर्वविवाह मान्य आहे. गांधर्वविवाहाला मंत्रतंत्रादींची आवश्यकताच नसते. वधुवरांनी परस्पर संमतीने हा विवाह करावयाचा असतो. थोरा मोठ्यांच्या संमतीची जरूर नसते."

शकुंतला एका अटीवर त्या गांधर्वविवाहास तयार झाली. तिला मुलगा झाला तर तोच दुष्यंताच्या गादीला वारस होईल हे दुष्यंताने कबूल केल्यावर दोघांचा विवाह झाला.

दुष्यंताने तो दिवस शकुंतलेच्या सहवासातच आश्रमात घालविला आणि तिचा निरोप घेतांना म्हणाला—"मी राजधानीत परत गेल्यावर तुला आदरपूर्वक घेऊन येण्यासाठी आपल्या मंत्र्याला आणि अनुचरांना पाठवीन." त्यानंतर अनेक प्रकारे शकुंतलेची समजूत घालून दुष्यंत तिला प्रेमाच्या खुणे करितां म्हणून आपली अंगठी देऊन निघून गेला. कण्वमुनी आल्यावर त्यांच्या पाठी मागे त्यांच्या मुलीशी दुष्यंत राजाने विवाह केल्याचे वर्तमान कळल्यास मुनींना राग येईल या भीतीने दुष्यंत घाईघाईने निघून गेला. शकुंतला पण बाबा काय म्हणतील या विचाराने घाबरून गेली होती.

काही वेळाने कण्वमुनी परत आले. हात पाय धुवून आपल्या आसनावर येऊन बसले. शकुंतला अपराध्यासारखी संकोच





करीत समोर येऊन उभी राहली. कण्वमुनींना दिव्य दृष्टीने सर्व काही कळले. ते म्हणाले—"मुली, तुझा विवाह एका योग्य वराशीच झाला आहे. या गांधर्वविवाहाने तुला होणारा मुलगा एक चक्रवर्ती राजा होईल. तुला आणखी काही विचारावयाचे किंवा मागायचे असेल तर बोल!"

"माझ्या पोटी जन्मलेला मुलगा दीर्घायु, ऐश्वर्यशाली व एक शक्तिशाली वंशकर्ता व्हावा अशी माझी इच्छा आहे." शकुंतलेने आपल्या मनातली इच्छा मनमोकळेपणे सांगितली. कण्वमुनींनी तिला तसा आशीर्वाद दिल्यावर तिच्या मनाचे समाधान झाले.

यथासमयी शकुंतलेच्या पोटी एक पुत्ररत्न जन्मले. कण्वऋषींनी त्या मुलाचे जातकर्म इत्यादी संस्कार शास्त्रोक्त विधीप्रमाणे एका क्षत्रियकुळात जन्मलेल्या मुलासारखे केले. तो मुलगा लहानाचा मोठा होऊ लागला तसतसा आश्रमात खेळू बागडू लागला. आश्रमात येणाऱ्या हरणांबरोबर व आश्रमाबाहेरच्या हिंस्र पशूंबरोबर तो खेळू लागला तेव्हां आश्रमवासी त्याचा तो निर्भयपणा पाहून त्याला सर्वदमन या नावाने हाक मारू लागले.

असाच काही काळ लोटल्यावर एकदां कण्वमुनी शकुंतलेला बोलावून म्हणाले— "मुली! तुझा मुलगा युवराज होण्यास योग्य झाला आहे. म्हणून त्याने या वेळी आपल्या वडिलांजवळ राहणे उचित होईल. तूदेखील पतिगृही राहणेच उचित होईल. पितृगृही तू किती दिवस राहणार? मी तुला तुझ्या पतिगृही पाठवावे, असा विचार करतो आहे."

कण्वमुनींच्या दोघांतिघा शिष्यांबरोबर शकुंतला आपल्या मुलाला बरोबर घेऊन दुष्यंत राजाच्या राजधानीत गेली. तिचा निरोप घेऊन कण्वमुनींचे शिष्य आश्रमात परत आले.

द्वारपाल शकुंतलेला व तिच्या मुलाला घेऊन राजवाड्यात दुष्यंत राजाकडे घेऊन गेले. परंतु शकुंतलेची ओळखच नाही अशा तऱ्हेने राजाने तिच्याकडे पाहिले. तेव्हां शकुंतलेच्या छातीत धस्स झाले. ती राजाला म्हणाली–"राजन! आपण मागे एकदां शिकारीला आला असतां कण्वमुनींच्या आश्रमात आला होतां. आपणांला ती गोष्ट आठवत नाही का? हा आपलाच मुलगा आहे! याला युवराज करून घेण्याबद्दल आपण वचन दिले होते. त्याचे पालन करावे."

दुष्यंत हे सर्व माहीत असून माहीत नसल्यासारखा नटला व म्हणाला–"दुराचारिणी! कोण तू? मी तुला मुळीच ओळखले नाही! निरर्थक बटबट बंद कर आणि आपली वाट धर."

ते ऐकून क्रोधाने शकुंतलेचे सर्व अंग थरथर कापू लागले. ती दुष्यंताला म्हणाली–"महाराज! आपण आपले वचन मोडीत आहां. कोणी दुसरा साक्षी नाही म्हणून खोटे बोलता? आपल्या विवाहाला साक्षी आपणच दोघे होतो. आपला अंतरात्मा आपल्याला खरे ते सांगेल. खरे लपविणे हे महापाप आहे. आपण ज्या सद्भावनेने मला आपली करून घेतलीत त्याच सहृदयतेने आज पण माझा स्वीकार करावा. आपल्या मुलावर पशुपक्ष्यांचे पण अपार प्रेम आहे. हा आपला मुलगा, आपला युवराज आहे. आपल्या मुलाला असा दूर लोटू नका!"

इतके बोलल्यावर देखील दुष्यंताच्या वागणुकीत काही फरक न झालेला पाहून शकुंतला घाबरून गेली.

त्याच वेळी एक आकाशवाणी ऐकू आली. त्या आकाशवाणीने जगजाहीर केले, शकुंतला दुष्यंताची पत्नी आहे व भरत त्याचाच मुलगा आहे. म्हणून त्याने दोघांना पत्नी व पुत्र म्हणून स्वीकारले.





# गांधीचे चरित्र

[ ३ ]

मोहनदासांचे शाकाहारी व्रत त्यांच्या फायद्याचेच ठरले. 'व्हेजिटेरियन' नावाच्या नियतकालिकात त्यांचे त्या विषयावर नऊ लेख प्रसिद्ध झाले. त्यांत आहारासंबंधी हिंदूंचे आचार विचार, त्यांचे सणवार इत्यादींचे सविस्तर वर्णन होते. लंडनच्या शाकाहारी समितीचे गांधी एक सभासद झाले आणि ते रहात होते त्या शहराच्या पेठेत त्यांनी एका शाकाहारी क्लबाची स्थापना पण केली.

गांधी तीन वर्षे इंग्लंडमध्ये राहले. त्या अवधीत बाहेरच्या जगाशी त्यांचा विशेष संबंध नव्हता. शाकाहारी क्लबा व्यतिरिक्त 'अंजुमन इस्लामिया' या संस्थेकडे पण ते आकृष्ट झाले. त्या संस्थेत भारतीय मुसलमानांचाच जास्त भरणा होता. त्यांच्याकडे चहापार्टी होई त्या वेळी राजकीय व सामाजिक प्रश्नांवर चर्चा होई. या चर्चेत गांधीजींच्या बरोबर अब्दुल रहीम, मजहरुल हक, महम्मद शफी, सच्चिदानंद सिनहा, हरकिशनलाल वगैरे पण भाग घेऊ लागले. त्याना जोर जोराने व्याख्यान देता येत नव्हते.

गांधीची इंग्लंडमध्ये होते त्या काळी मार्क्स व डार्विन यांच्या विचारांनी राजकीय, वैज्ञानिक व साहित्य क्षेत्रात खळबळ उडून गेली होती. परंतु त्यांचा परिणाम गांधीजींच्या मनावर यत्किंचित ही पडला नव्हता. ते नेहमी भगवद्गीता व बायबल वाचीत असत. त्यांनी २० जून १८९१ च्या 'व्हेजिटेरियन' या नियतकालिकात असे लिहिले होते की, 'इंग्लंड मध्ये असतांना मांस व मदिरा सेवन माझ्या हातून घडले नाही, याबद्दल माझ्या मनाला



# भित्रा

छत्रपूरच्या राजाला सुधीर नावाचा एक मुलगा होता. नावाच्या अगदी उलट वाघाची डरकाळी ऐकून किंवा हत्तीचे ओरडणे ऐकून तो मोठमोठ्याने रडू लागे. वाघाला पाहल्यावरच त्याला कापरे भरे. त्याचा तो भितरेपणा पाहून लोक म्हणत–"हा मोठा झाल्यावर राज्य काय करणार आणि शत्रूशी युद्ध तरी काय करणार ?"

राजाची खुशमस्करी करणारे लोक म्हणत–"अहो, अजून पोरवय आहे. मोठा झाल्यावर साहसाची कामे करील."

सुधीर लहानाचा मोठा झाला. उंच बांधा व दिसायला राजबिंडा. त्याला पाहूनच लोक भीत. परंतु तो स्वतः भितरा होता. पण लोकांना वाटे की युवराजांना समोर उभे पाहूनच शत्रूची गाळण उडून जाईल.

एकदां काही लुटेरे लूट करीत राज्यात घुसले. नेमके त्या वेळी युवराज कोठे दिसेनात. महाराजांनी स्वतः बरोबर शिपायांना घेऊन लुटेऱ्यांना पिटाळून लावले. त्यानंतर काही वेळाने युवराज राजधानीत परत आले आणि फुशारक्या मारून सांगू लागले की शिकारीला जंगलात गेलो होतो. वाघाची शिकार करून परत येत आहे. परंतु त्या गप्पांवर कोणाचा विश्वास बसला नाही. सर्व त्याला 'भितरी भागूबाई' म्हणू लागले. राजवाड्यात त्याला मान ताठ करून चालणे अशक्य झाले.

पण तो अपमान सहन करणे सुधीरला कठीण वाटू लागले. एके दिवशी तबेल्यातून एक उत्तम घोडा घेऊन व सर्वांची नजर चुकवून तो राजधानी बाहेर निघाला. जंगलातून जात असता वाटेत त्याला जंगली जनावरांपासून आपला बचाव करीत जाण्यास जो त्रास झाला त्याचे वर्णन करणे कठीण होते.

फिरत फिरत तो अस्तगिरी नामक गावी येऊन पोचला. तो घोड्यावर बसून मुख्य रस्त्याने जात असता अस्तगिरीची राजकन्या चारुमती हिने त्याला अंत:पुराच्या खिडकीतून पाहिले आणि आपल्या सखींना म्हणाली–"हा तरुण देवलोकातून उतरून आलेला कोणी देवपुत्र दिसतो आहे. तो कोण आहे याची चवकशी करून मला सांगा." चारुमती स्वतः एक सुंदर तरुण स्त्री होती. तिने सुधीर इतक्या तरुण व सुंदर राजपुरुषाला पूर्वी कधी पाहिले नव्हते.

सखींनी चवकशी केली व परत येऊन राजकन्येला म्हणाल्या–"राजकुमारी! तो तरुण दुसरा तिसरा कोणी नसून छत्रपूरच्या महाराजांचा एकुलता एक मुलगा आहे." चारुमतीने लगेच जाऊन आपल्या वडिलांना सांगितले की त्यांनी स्वतः जाऊन आदरपूर्वक छत्रपूरच्या युवराजांना बोलावून घेऊन यावे आणि त्यांच्या आतिथ्य-सत्काराची व्यवस्था करावी.

राजकन्येला छत्रपूरचा युवराज पसंत असल्याचे पण अस्तगिरीच्या महाराजांना राजकन्येच्या सखींकडून कळले. म्हणून



महाराजांनी स्वतः छत्रपूरच्या युवराजाला भेटून राजवाड्यात आणले व राजकन्येची ओळख करून दिली. सुधीर राजकन्येशी विवाहास तयार असल्याचे कळल्यावर राजाने दोघांचा विवाह करून दिला.

अस्तगिरीच्या राज्यात देखील चोर व लुटेरे लूट मार करीत. सुधीर व चारुमती दोघांच्या विवाहानंतर काही दिवसांनी राज्याच्या सरहद्दीवरच्या गांवात लुटेरे शिरले आणि जाळपोळ करून त्यांनी गांवकऱ्यांची गुरे पळवून नेली.

चारुमतीला पतीच्या शौर्यावर फार विश्वास होता. म्हणून ती म्हणाली–



"आपण जाऊन लुटेऱ्यांची खोड मोडावी व त्यांना कैद करून आणावे. आपल्या बरोबर जायला सैनिक तयार आहेत. आपणांसाठी कवच, ढाल तलवार व घोडा पण तयार आहे."

ते ऐकून सुधीरचा चेहरा पांढरा फट्ट झाला. म्हणाला–"हे सर्व करायला मी तयार नाही. मी डाकूंशी युद्ध करू म्हणतेस? मला लागले किंवा जिवाचे बरेवाईट काही झाले तर? मला मारा मारी व युद्धाची भीती वाटते."

पतीच्या तोंडचे ते शब्द ऐकून चारु-मतीला आश्चर्याचा धक्का बसला. पुरुषा-सारखा पुरुष आणि असा कापुरुषासारखा कां बोलतो? परंतु भयामुळे त्याची बोबडी वळलेली पाहून तिला पती भितरी भागुबाई असल्याची खात्री झाली.

ती एक शब्ददेखील बोलली नाही. तिने स्वत: ते कवच धारण केले आणि तलवार व ढाल घेऊन बाहेर घोडा उभा होता त्यावर बसून निघून गेली. बाहेर सैनिक उभे होते ते तिच्या पाठीमागून निघाले. तिने लुटेऱ्यांशी युद्ध केले. कित्येक लुटेरे हताहत झाले, गुरांना सोडवून आणून ती राज-धानीत परतली.

नागरिकांना वाटले की राजाच्या जावयाने आपल्या पराक्रमाने लुटेऱ्यांची खोड मोडली. म्हणून त्याचे अभिनंदन करण्यासाठी ते राजवाड्यासमोर जमले. चारुमती घोड्यावरून उतरून अंत:पुरात निघून गेली.

सुधीर आपल्या खोलीत एका कोपऱ्यात बसून होता. चारुमतीने आपल्या अंगावरचे कवच व शिरस्त्राण काढले व पतीला म्हणाली–"कृपाकरून आपण हे धारण करावे. आपले अभिनंदन करण्यासाठी नागरिक बाहेर जमले आहेत." असे सांगून तिने सुधीरच्या इच्छे विरुद्ध त्याच्या अंगात ते कवच व डोक्यावर शिरस्त्राण घातले.

सुधीरला पाहून नागरिकांनी त्याचा जयजयकार केला. राजवाड्यात देखील कोणाला सुधीर ऐवजी राजकन्येने युद्ध केले असल्याचे माहीत नव्हते. परंतु चारुमतीच्या भावांपैकी धाकट्याला ते कळले असावे. तो आपल्या मोठ्या भावाला म्हणाला–"सुधीरने लुटेऱ्यांशी युद्ध केले नाही, ताईने केले. पुन्हा युद्ध होईल तेव्हां मी म्हटले ते खरे होते की नाही हे सिद्ध करून दाखवीन." धाकटा म्हणाला.

ही गोष्ट घडली त्यानंतर थोड्याच दिवसांनी पुन्हां चोरांनी लूटमार करायला सुरवात केली. चारुमतीने पतीला चोरांचे पारिपत्य करण्यासाठी पाठविण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु तिला यश आले नाही. या खेपेसदेखील तिलाच कवच-धारण करून चोरांचे पारिपत्य करावे लागले. ती चोरांना पळवून लावून परत आली.

राजवाड्यात प्रवेश करते वेळी चारु-मतीच्या पायाला धाकट्या भावाने खुणेसाठी एक जखम केली. ते तिला कळले देखील नाही. ती राजवाड्यात निघून












गेली. आपले कवच काढून पतीच्या हातात देऊ लागली तेव्हां पायाला लहानशी जखम झालेली दिसली. तेव्हां ती आपल्या पतीला म्हणाली–"आता तुम्हीं अशीच एक जखम पायला करून घ्यावी. नाही तर लोकांना खरी गोष्ट कळेल व आपल्या बरोबर माझी मानपण खाली होईल."

"बाप रे! रक्त नाही का येणार:" पती म्हणाला.

सुधीर नको नको म्हणत असता चारुमतीने तलवारीने पतीच्या पायाला जखम केली. तो कळवळून ओरडला. "ही लहानशी जखम झाली त्याबद्दल घाबरण्याचे कारण नाही. ही जखम पाहून लोकांना वाटेल की आपणच चोरांना पळविले व युद्ध करीत असता ही जखम झाली असावी. पण हे खोटे बाहेर आले तर आपला जो अपमान होईल त्याचा विचार करावा." चारुमती म्हणाली.

सुधीर मनातल्या मनांत चारुमतीला शिव्या देत कवच धारण करून नागरिकांना दर्शन देण्यासाठी बाहेर आला. लोकांनी त्याचा जयजयकार केला. त्यानंतर तो परत आपल्या खोलीत आला.

चारुमतीच्या हाती मार खाऊन गेलेले डाकू एका आठवड्यातच पुन्हा चांगली तयारी करून आले.

"या खेपेस फार मोठे युद्ध होणार. आपले सैन्य घेऊन जाऊन आपण स्वत: युद्धाला गेले पाहिजे" असे चारुमती पतीला म्हणाली.

"युद्धाची गोष्ट माझ्याजवळ बोलू नकोस. त्या शिवाय काय वाटेल ते करायला मी तयार आहे. सैन्याचे नेतृत्व मीच केले पाहिजे असे कोणी सांगितले? आपल्या भावांपैकी कोणाला सेनापती करून कां पाठवूं नये? युद्धांत मला मरण यावे असे तुला वाटते आहे का?" पतीने तिला विचारले.

चारुमती थोडा वेळ विचार करून म्हणाली–"तर मग एक काम करावे. आपण कवच धारण करून बाहेर पुढे जावे व तलावाच्या काठी बागेत माझी वाट पहावी. मी दुसऱ्या वाटेने येऊन आपणाला भेटेने. मी आपले कवच धारण करून सैन्याला आदेश देईन की सैन्याने माझ्या मागून यावे."

सुधीरला तीं सूचना पसंत पडली. राजकन्या आली नाही तर बागेतच लपून बसता येईल आणि युद्धाच्या भानगडीत पडण्याची गरज राहणार नाही. राजवाड्यात राहल्याने लपून बसणेदेखील अशक्य होईल. कोणी तरी तेथे येऊन ओढून नेईल.

ठरल्या प्रमाणे सुधीर कवच धारण करून बाहेर आला. त्याच्या पाठी मागून येऊन चारुमतीने त्याला घोड्यावर बसविले आणि घोड्याच्या मागच्या पायावर जोराने चाबूक मारला. चाबूक लागताच घोडा भरधाव पळू लागला. सैन्य सुधीरच्या मागून निघाले. सुधीरला तलाव जवळ थांबण्याला किंवा बागेत लपून बसायला घोडा थांबलाच नाही. तो सरळ शत्रूसमोर येऊन थडकला.

दोघांचे भयंकर युद्ध झाले. भितरा म्हणून ओळखला जाणारा सुधीर नांवा रूपाला साजेल असाच लढला. त्याने यमराजासारखा शत्रूचा संहार केला. त्याच्या शौर्याची सैन्याने वाखाणणी केली. सुधीर विजयी होऊन परतला.

पतीचा पराक्रम पाहून व ऐकून चारुमतीचा आनंद गगनात मावेना. तिचा पती शूर आहे, फक्त त्याला शौर्य दाखविण्याचा प्रसंग आला नाही अशी तिच्या मनाची खात्री होती. त्यानंतर सुधीर अनेक युद्धात पराक्रम गाजवून वडील व सासरा दोघांच्या आदराचा पात्र झाला.



# खऱ्यासारखे खोटे

एका राजाने दवंडी पिटविली की जो कोणी अगदी खऱ्यासारखे खोटे बोलेल त्याला एक सोन्याचा आंबा बक्षिस दिला जाईल.

सोन्याच्या आंब्याच्या मोहाने अनेक लोक राजवाड्यात आले. प्रत्येकाने आपापल्या रीतीने खोटे सांगितले. पण त्यापैकी राजाला एकाचे खोटे देखील पसंत पडले नाही. काही खोट्या गोष्टी खऱ्यासारख्या भासत, पण बऱ्याच गोष्टी स्पष्टपणे खोट्याच दिसत. म्हणून राजाने कोणालाच सोन्याचा आंबा दिला नाही.

एकदा एक भिकारी एक मोठे मडके राजाकडे घेऊन आला.

"तुला काय पाहिजे रे?" राजाने त्याला विचारले.

"आपल्याकडून मला हे मडके भरून सोने मिळावयाचे आहे. तेवढे देववावे." भिकारी म्हणाला.

"हे खोटे! वारे वा! माझ्याकडून तुला काही येणे नाही. खोटे, धुद्ध खोटे." राजा म्हणाला.

"खोटे? तर मग तो सोन्याचा आंबा मला देऊन टाका." भिकारी म्हणाला.

राजाने खूष होऊन त्याला सोन्याचा आंबा देऊन टाकला.






# पडकें देऊळ

[ १८ ]

[नागमल्लीला सोडवण्यासाठी ताडपत्रांचे पुडके आणून दे ही अट पडक्या देवळाच्या पुजाऱ्याने सांगितल्यावर जिवाजीने ती मान्य केली. चोरांची राहण्याची जागा कोठे आहे हे पाहून शिखीमुख परत येत असतां त्याच्या पावलांचा आवाज नागगिधाडाला ऐकू आला व तो भाला घेऊन त्याला मारण्यासाठी तयार झाला. पुढे—]

शिखीमुखला पुढे काय करावयाचे हे ठरवायला वेळ लागला नाही. नागगिधाडाच्या पाठीमागून जाऊन त्याचा कपाळमोक्ष करणे कठीण नव्हते. परंतु त्यामुळे पुजाऱ्याच्या अनुयायांना त्याचे निवासस्थान शत्रूला कळल्याचा संशय येण्याची शक्यता होती आणि तसे झाले तर पुजारी नागमल्लीला आणखी कोठे तरी घेऊन जाईल किंवा तिला ठार करून मोकळा होईल याची देखील शक्यता होती. तो धोका टाळून नागमल्लीला वाचविणे हे जास्त महत्वाचे काम होते.

असा विचार करून नागगिधाडाच्या डोळ्यात धूळ फेकून पळ काढण्यासाठी शिखीमुखने एक युक्ती केली. तो त्या झाडीतून उडया मारीत पळून जाणाऱ्या वाघासारखा डरकाळ्या फोडीत चार रांगत निघून गेला. वाघाच्या डरकाळ्या



पायांवर ऐकून नागगिधाड जागच्या जागी थांबला. वाघाच्या भीतीने मागे सरकत त्याने तेथून पळ काढला. मनात म्हणत होता–"बरं झालं, घाई करुन पुढे गेलो नाही, नाहीतर आज वाघाच्या तोंडी मोक्ष मिळाला असता.

शिखीमुखने त्या मूर्ख नागगिधाडाला अगदी सहज फसवून स्वत:चा बचाव करुन घेतला. तो तसाच उड्या मारीत व डरकाळ्या फोडीत दूर निघून गेला. बाहेर वाघाचा आवाज ऐकून पुजाऱ्याने नागगिधाडाच्या मदतीला दोघां चोरांना पाठविले. ते दोघे आपापल्या तलवारी उपसून धावत नागगिधाड होता तेथे आले आणि विचारु लागले–"कोठे आहे रे वाघ? बोल लवकर, त्याला ठार करु या चल!"

नागगिधाड स्वत:ला सावरुन स्वत:च्या बहाद्दुरीच्या फुशारक्या मारीत हसत म्हणाला–"अरे! तुम्हांला काय वाटले मी वाघाला असा जिवंत सोडीन? तो माझ्यावर उडी मारणार एवढ्यात मी त्याच्या छातीत भाला भोसकला. तो दूर जाऊन पडला आणि उठून पळून गेला."

"शाबास! म्हणजे तू सुद्धा काही कमी बहाद्दर नाहीस? तर मग चल, पुजारी धनी तुझी वाट पहात आहेत. तुला एक महत्वाचे काम सांगणार आहेत." एक चोर म्हणाला.

"काय वाटेल ते काम सांगितले तरी करायला हा गडी तयार आहे. पुजारी धन्याची आज्ञा होण्याची खोटी, मी आकाशात उडायला देखील तयार आहे. मी मनुष्यांच्या जातीतले गिधाड आहे. तुला काय वाटले?" नागगिधाड फुशारक्या मारीत म्हणाला.

"अरे, आम्ही नाही का ओळखत तुला? इतर लोक तुला नुसता बडबड्या मानतात. पुजारी धन्याच्या मंत्रशक्तीची ओळख आम्हांला पटली आहे. तू त्यांचा पट्टशिष्य!" दुसरा चोर म्हणाला.

"अरे! ही काय बटबट चालविली आहे तुम्ही? त्या नागगिधाडाची मुंडी वाघाने धरली नाही, नशीब बलत्तर आहे त्याचे. खूप ताडी पिऊन आला आहे तो. त्याला त्याची बटबट बंद करायला सांगा." पुजाऱ्याने करड्या आवाजात सर्वांना गप्प केले.

नागगिधाडाच्या हातावर तुरी देऊन शिखीमुख जंगलात शिरला. मशालींचा उजेड त्याला दूरुन दिसला. त्या उजेडात खोऱ्याच्या बाजूला कुंपणाच्या आत पूर्वी पाहिलेली झोपडी त्याने ओळखली आणि तेथे आपलेच लोक आहेत हे पण ओळखले. तेथे पोचल्यावर जिवाजी, लट्टूसिंह व त्यांच्याबरोबरचे शबर व नाग भेटले. जिवाजीने पुजारी कोणत्या परिस्थितीत भेटला व कोणती अट घालून निघून गेला हे सांगितल्यावर शिखीमुखीने त्यांना नागमल्लीला ज्या जागी पुजाऱ्याने कैद करुन ठेवले होते तेथे पुजारी पण असल्याचे सांगून ओरडा आरडा केल्याशिवाय गुपचुप जाऊन नागमल्लीला सोडवून पुजाऱ्याला पकडता येईल हे पण सांगितले.



परस्परांशी सल्ला करुन ते निघाले. पिंपळाच्या झाडाला ताडपत्रांचे पुडके टांगून ठेवायला पुजाऱ्याने सांगून ठेवल्याचे जिवाजीने सांगितल्यावर शिखीमुखने त्या झाडाच्या जवळपास दोघां तिघां शबरांना पाहण्यासाठी नेमले. नंतर दहा शबरांना आणि विक्रमकेसरीला बरोबर घेऊन तो पुजाऱ्याच्या झोपडीकडे सर्वांपुढे निघून गेला. अर्ध्या तासात तो त्या जागी पोचला. झोपडीच्या समोरच्या झाडीत एक चोर पाहरा देत बसला होता. झोपडीच्या खिडकीतून मशालीचा उजेड बाहेर पडला होता.



पुजाऱ्याने प्रसंग ओळखूनच सावधगिरी-साठी या माणसाला पाहऱ्यासाठी येथे नेमले असावे हे शिखीमुखच्या लक्षात आले. तो दुष्ट धोका पाहून नागमल्लीच्या जिवाचे बरे वाईट करायला मागे पुढे पाहणार नाही. कदाचित तो तिला उचलून घेऊन जाऊन आणखी कोठे तरी ठेवील. ते काही असो, पण झोपडीत शिरले हे पाहिजेच. काय करायचे हे ठरवून त्याने विक्रमकेसरीला सांगितले. पाहरेदार मेला तर पाहिजे पण त्याचा आवाज कोणाला ऐकू येता कामा नये.

त्याने सर्वांना मागे थांबायला सांगितले व एकटा हळूहळू मांजराच्या पावलांनी पाहरेदाराच्या मागे गेला आणि भाल्याच्या मुठीने पाहरेकऱ्याच्या डोक्यात जोराने एकच वार केला. तो खाली पडताना ओरडला व त्याचे तोंड धरून ठेवणे शिखीमुखला जमले नाही.

त्या पाहरेदाराचा आवाज पुजाऱ्याला ऐकू आला. त्याने नागगिधाडाला सावध केले व म्हणाला–"अरे गिधाडा! आपण लगेच येथून पाय काढला पाहिजे. माझ्या पाठी मागून ये." असे सांगून झोपडीचे मागचे दार उघडून तो नागगिधाडाबरोबर जंगलांत निघून गेला.

शिखीमुखला वाटले आपला बेत फसला. तरी त्याने झोपडीला घेरून उभे रहायला आपल्या अनुयायांना सांगितले. विक्रम-केसरी सर्वांना बरोबर घेऊन झोपडीला घेरून उभा राहिला. पुढच्या दाराने शिखी-मुख व मागच्या दाराने विक्रमकेसरी एकदम झोपडीत पाय टाकीत ओरडून म्हणाले–"सर्व जण हत्यारे खाली ठेवा. नाहीतर मरायला तयार व्हा."

चौकीवर नागमल्ली बसलेली होती. चकित होऊन ती दोघांकडे पाहून म्हणाली–"तुमचा बेत फसला. तो पुजारी निसटून गेला. तो नागगिधाड पण त्याच्या बरोबर पळाला. हे तिघे चोर झिंगून पडले आहेत. भूकंप झाला तरी हे उठणार नाहीत."

शिखीमुख काही बोलल्याशिवाय नाग-मल्लीचे बांधून ठेवलेले हात सोडवू लागला आणि शिखीमुखकडे वळून म्हणाला– "ह्या दोरीने त्या दुष्टाला एक न एक दिवस बांधण्याची संधी खास मिळेल. या काळोखात त्याला पकडण्याच्या प्रयत्नात वेळ घालविण्यापेक्षा प्रथम लट्ठूसिंहाच्या या पोरीला सुरक्षित त्याच्या हाती पोचती करू या. नंतर सावकाश तुझ्या आजोबांनी दिलेल्या ताडपत्रांच्या पुडक्याविषयी व या पुजाऱ्याला कसे पकडावयाचे या विषयी विचार करता येईल."

बराच वेळ एकाच जागी बसून राहिल्याने नागमल्लीला अंगातले सर्व रक्त गोठून गेल्यासारखे झाले होते. पुन्हा चौकीवर बसून ती म्हणाली–"या शबर तरुणाला तो पुजारी किती वस्ताद आहे हे कळलेले दिसत नाही. तो तुमच्या सर्वांच्या डोळ्यात धूळ फेकून ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात निघून जाईल."

"तिकडे कसे जायचे, वाटा आणि मुख्य मुख्य जागा यांचा नकाशा आमच्या-जवळ आहे. तू पहात रहा, आम्ही तिकडे देखील त्याचा पिच्छा पुरवू. म्हणून तर त्याला जे ताडपत्रांचे पुडके हवे होते, ह्या जन्मात ते त्याच्या हाती पडणार नाही." शिखीमुख म्हणाला.



त्याच वेळी झिंगून पडलेल्या चोरांपैकी एक जांभई देत उठू लागला. शिखीमुखला पाहून तो दुसऱ्या दोघांना जागे करण्याच्या विचारात होता. पण शिखीमुखने त्या सर्वांच्या डोक्यात भाल्याच्या मुठीने एकेक टोला देत त्यांना जागे केले व म्हणाला– "उठा! तुमचा मालक पळून गेला आहे. तुम्हांला तिघांना त्या पिंपळाला टांगून ठेवणार आहे."



दोघां चोरांनी शिखीमुखला ओळखले होते. डोकी उडवीन अशी धमकी त्याने त्यांना दिली होती. तिथे शिखीमुखचे पाय धरून त्याच्या जवळ प्राणाची भिक्षा मागू लागले. म्हणाले–“प्रभो! त्या दुष्ट पुजाऱ्याने दिलेले सर्व पैसे आम्ही तुम्हांला देतो. जीवदान मागतो तुमच्या पायां-जवळ!”

“पाहू तर द्या, त्याने किती पैसे तुम्हांला दिले आहेत ते!” शिखीमुखने विचारले.

चोर परस्परांकडे पाहू लागले. शिखी-मुखने ते पाहून दटावून विचारले–“तुमचा तो चवथा साथी कोठे आहे, माहिती नाही का तुम्हांला? तो तुमच्या आधी तुम्ही पाठी मागून येत आहां ही बातमी द्यायला यमराजाकडे गेला आहे. बरं, त्याचा वांटापण तुम्हीच घ्या वाटून आणि जमीन विकत घेऊन आजपासून पुढे शेती करण्याचे ठरवा. पुन्हा कोठे चोरी करतांना दिसलात तर पहा, आता मिळालेले जीवदान तेव्हां मिळणार नाही.”

असे सांगून त्या चोरांचा नाद सोडून सर्व बाहेर आले. तेव्हां विक्रमकेसरी शिखीमुखला म्हणाला–“शिखी! पुजारी व चोर या सर्वांना ही झोपडीच लपायला होती. ही अशीच सोडून जाणे मला नाही पटत. पुन्हां ते या झोपडीच्या आश्रयाला राहून आपला धंदा सुरू करतील. म्हणून आपण ही झोपडी जाळून टाकू या.”

शिखीमुख होकारार्थी मान हलवून म्हणाला–“पहा, तुला तसे वाटत असेल तर!” विक्रमकेसरी पुन्हा झोपडीत जाऊन मशाल घेऊन आला आणि ती झोपडी त्या मशालीने जाळून टाकली. पाहता पाहता सर्व झोपडी पेटली. शिखीमुख व त्याचे सर्व साथी हसत टाळ्यावाजवीत तेथून निघून गेले. तिथे चोर झोपडीतले आणतां आले





ते त्यांचे सामान व भांडीकुंडी बाहेर घेऊन आले.

त्या खोऱ्याजवळच्या एका झोपडीनजीक शिखीमुख आपल्या अनुयायांसह जिवाजी, लट्ठूसिंह वगैरेंना येऊन भेटला. लट्ठू-सिंहने त्याची मुलगी जिवंत परत आल्याचे पाहून शिखीमुखची पाठ थोपटली. त्याला जो आनंद झाला तो शब्दाने वर्णन करता येणे शक्य नाही. त्याने आपल्या मुलीला जवळ ओढून प्रेमाने विचारपूस केली. म्हणाला–“मला वाटले होते तो कुत्रा तुला ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात धरून घेऊन गेला असावा. माझे नशीब बलवत्तर म्हणून तू सुरक्षित आपल्या माणसात परत आलीस. त्या कुत्र्याला धरून त्याच्या अंगाच्या ठिकऱ्या कोल्ह्या कुत्र्यांना खायला घालीपर्यंत माझ्या मनाचे समाधान होणार नाही.”

जिवाजी स्मित करून म्हणाला–“लट्ठू-सिंह! आपण असल्या आणाशपथा व प्रतिज्ञा करून त्या पुऱ्या करून दाखविण्याच्या वयात नाही आहो, हे विसरू नकोस. आपले उतारवय झाले आहे. शिखीमुख व विक्रमकेसरी शूरसेन देशात जाऊन विक्रमच्या वडिलांना भेटून त्यांचा मानस काय हे विचारून घेतील. नंतर ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात जातील. त्यांना वाटेत तो दुष्ट कोठे भेटला तर त्याला धरून आणून तुझ्या पायासमोर फेकतील. मग तू काय करायचे ते कर.”

जिवाजी जे म्हणाला ते ऐकून सर्व हंसत आनंदाने नागवस्तीकडे निघाले. उजाड-ण्याच्या सुमारास ते वस्तीत येऊन पोचले. दोन दिवस गावांत उत्सव आणि मेजवान्या चालू होत्या. तिसऱ्या दिवशी उजाडल्यावर जिवाजी लट्ठूसिंह व त्याच्या गावकऱ्यांचा निरोप घेऊन शबरवस्तीकडे निघाला. तेव्हां नागमल्लीने शिखीमुखला एका बाजूला



झाडाआड खुणावून बोलाविले आणि म्हणाली–"ज्या दुष्ट पुजाऱ्याने माझे हात पाय बांधले होते त्याची शेंडी मला हवी आहे."

"तो अजून याच खोऱ्यात कोठे असेल तर त्याचे डोके कापून आणून तुझ्या पायांसमोर हजर करीन. परंतु आम्हांला परत यायला किती दिवस लागतील सांगणे कठीण आहे. या अवधीत तू एकाद्या नाग तरुणाची बायको झालीस तर तो माझ्यावर भाला उगारायला मागे पुढे पाहणार नाही." शिखीमुख खोचक शब्दात म्हणाला.

ते ऐकून नागमल्ली थोडी लाजली. त्याचबरोबर तिला, तिच्यावर शिखीमुखने जणुंकाही आरोप केल्यासारखा मनस्वी रागपण आला. तरी स्त्रीसुलभ रागाने मान खाली करून कांपऱ्या आवाजात ती म्हणाली–"माझ्याकडे नागतरुणच काय दुसरा शबर युवक सुद्धा वांकड्या नजरने पाहण्याची हिंमत करील तर त्याचे डोळे निघतील."

"मला, तू काय म्हणालीस, कळले नाही." असे म्हणत त्याने नागमल्लीकडे अगदी भोळया नजरेने पाहिले.

नागमल्ली त्याचे काही उत्तर देणार इतक्यात जिवाजीचा आवाज ऐकू आला–"चला, सर्व तयार झालात का? निघू या. शिखी कोठे आहे?"

नागमल्ली आपल्या घरात लगेच पळून गेली. लाल कुत्रे भुंकत आपल्या मालका जवळ येऊन उडया मारू लागले. शिखीने आपल्या इमानदार कुत्र्याच्या अंगा खांद्यावर प्रेमाने हात फिरवला आणि नागमल्ली जे म्हणाली त्याचा अर्थ काय असावा या गोष्टीचा विचार करीत आपल्या बापा-जवळ येऊन उभा राहला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# दैवी शक्ती

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, 'काही लोक पुष्कळ कष्ट सहन करून मोठी दैवी शक्ती किंवा दिव्य मंत्र मिळवतात आणि स्वतःच्या स्वार्थासाठी त्याचा उपयोग करून घेण्याच्या प्रयत्नात अयशस्वी होऊन कधी कधी त्यांना अपमानदेखील सहन करावा लागतो. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला प्रचंड नावाच्या माणसाची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी अवंती नगरीत प्रचंड नावाचा एक अनाथ मुलगा रहात असे. तो भीक मागे व आपले पोट भरी. अशातऱ्हेने तो पंधरा वर्षे त्या हीन स्थितीत कसे तरी













दिवस कंठीत होता. एके दिवशी अवंती नगरीत एक सिद्ध योगी आला. प्रचंडने त्याला पाहिले व त्याच्या पाठीमागून जात जात रात्री एका जंगलात गेला.

तो सिद्ध भूतपिशाच व त्यांच्या सारख्याच क्षुद्र देवादिकांची पूजा करी. प्रचंड त्या सिद्धाचा शिष्य होऊन त्याची सेवा करू लागला. त्या सिद्ध पुरुषाने प्रचंडला एक मंत्र शिकविला. त्यानंतर तो आपल्या गुरूचा निरोप घेऊन रानावनातच क्षुद्र देवादिकांची आराधना करू लागला.

क्षुद्र देवांच्या कृपेने प्रचंडाला अत्यद्भुत दैवी शक्ती प्राप्त झाली. तो कोणाचे तोंड पाही व तो मनुष्य एका महिन्याच्या आंत मरण पावणार आहे की नाही, हे बरोबर सांगे. या अद्भुत शक्तीचा चमत्कार दाखवून प्रचंड गावोगावच्या श्रीमंतांकडून जे पैसे मिळत त्यावरच आपला उदरनिर्वाह चालवू लागला. परंतु लोकांच्या मनात त्याच्याविषयी आदरभाव मुळीच नव्हता.

ही गोष्ट प्रचंड ओळखीत होता. म्हणून त्याने कोणत्या तरी राजाला आपल्या मंत्रविद्येचा चमत्कार दाखवून मोठे बक्षिस मिळविण्याचे ठरविले. नंतर लग्न करून सुखाने संसार थाटावा असा विचार करून प्रचंड अवंतीच्या राजाच्या दरबारी गेला व आपल्या मंत्रविद्येचा चमत्कार दाखविण्याची इच्छा प्रकट केली. परंतु अवंतीच्या राजाचा असल्या मंत्रविद्येवर विश्वास नव्हता. उलट अशा लोकांच्या विषयी त्याच्या मनात तिटकारा होता. प्रचंडचा दरबारात अपमान झाला. म्हणून त्याच्या मनात सुडाची भावना उद्भवली. त्याने राजाचे तोंड पाहून राजा पंचवीस दिवसात मरणार आहे हे ओळखले होते. राजाने त्याचा उचित सत्कार केला असता तर कदाचित प्रचंडने ती गोष्ट राजाला एकांतात सांगितली असती. म्हणजे मरण येण्यापूर्वी राज्यकारभाराची आवश्यक व्यवस्था राजाला करता आली असती.

अवंती नगराच्या दरबारी अपमान झाल्यामुळे प्रचंड शेजारच्या राज्यात जाऊन राहला. त्या देशाच्या राजाचे नाव सुनंद होते. प्रचंड त्याला जाऊन भेटला. सुनंद वयाने तरुण, पराक्रमी व शाहणा होता. त्याचे अवंतीच्या राजाशी हाडवैर होते. प्रचंडने त्याला आपल्या अद्भुत मंत्रशक्तीची माहिती सांगितली. सुनंदने त्याच्या बोलण्यावर विश्वास बसल्याचे किंवा न बसल्याचे काहीच कळू दिले नाही. त्याने एकच गोष्ट प्रचंडला विचारली–







"आमच्या दरबारातल्या कोणत्या दरबाऱ्याचे आयुष्य सर्वात प्रथम संपुष्टात येणार आहे?" ते ऐकून प्रचंडने दरबारात हजर असलेल्या सर्व दरबाऱ्यांकडे व इतर शिपायांकडे एकदां पाहिले व राजाच्या कानात एक विशिष्ट शिपाई दोन दिवसात मरणार असल्याचे खुणेने सांगितले. त्या शिपायाच्या तोंडावर मृत्युकळा दिसत होती व प्रचंडने सांगितल्याप्रमाणे तो खरोखरच दुसऱ्या दिवशी हृदयविकाराने मरण पावला. तेव्हां सुनंद प्रचंडला बोलावून म्हणाला—"प्रचंड, तुझ्या शक्तिसामर्थ्यावर माझा विश्वास बसला आहे. परंतु तुझ्या त्या शक्तीचा मला किंवा माझ्या राज्याला काय उपयोग होणार?"

प्रचंड म्हणाला—"महाराज! माझ्या मंत्रशक्तीचा उपयोग आपल्याला शत्रुनाश आणि राज्यविस्तार करण्याच्या कामी होऊ शकेल. आपला शत्रू अवंतीचा राजा आजपासून चोवीस दिवसात मरणार आहे. आपण बरोबर त्याच दिवशी त्याच्या राज्यावर स्वारी केलीत तर राजाच्या मृत्यूमुळे शोकसागरात बुडलेली प्रजा आपल्यासमोर युद्धाला उभी राहणार नाही आणि आपल्याला सहज ते राज्य जिंकता येईल."

प्रचंडच्या सल्ल्याप्रमाणे सुनंदने सेना सज्ज करून ठेवली आणि अवंतीचा राजा ज्या दिवशी मरणार होता त्या दिवशी स्वारी केली. युद्ध सुरू झाल्यावर थोड्या वेळाने राजा मरण पावल्याची गोष्ट प्रजेला कळली. ती बातमी कळल्यावर अवंतीच्या सैन्याने हाय खाऊन सुनंदचे वर्चस्व कबूल केले.

सुनंदने अवंतीचे राज्य आपल्या राज्याला जोडले. त्यानंतर दोन महिन्यांनी त्याने प्रचंडला बोलाविले व त्याला जितके धन हवे असेल तेवढे खजिन्यातून घेऊन राज्याबाहेर निघून जाण्यास सांगितले.



वेताळने येथवर गोष्ट सांगून विक्रमादित्याला विचारले—"राजा! सुनंदने प्रचंडला आपले राज्य सोडून जाण्यास कां सांगितले? त्याने तर सुनंदचे हितच केले नव्हते का? कदाचित आपला मरणकाळ येऊन ठेपल्यावर प्रचंड ती गोष्ट आपल्या शत्रूला जाऊन सांगेल ही भीती त्याला वाटली असावी. किंवा अशा क्षुद्रशक्तीचा उपयोग करणारा मनुष्य आपल्याला व प्रजेला केव्हा दगा देईल याची राजाला शंका वाटली असावी? या सर्व प्रश्नांची उत्तरे माहिती असून तू दिली नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला—"प्रचंडला राज्य सोडून जायला सांगण्याचे कारण यांपैकी एकही नव्हते. अवंती राज्य जिंकण्यासाठी जेवढ्या मदतीची सुनंदला जरूर किंवा गरज होती, तेवढी पुरी झाली होती. त्याहून जास्त मदत करण्याची शक्ती त्याच्या अंगात नव्हतीच. तो दरबारात राहला असता तर उगाच दर एक दोन दिवसांनी कोण दरबारी केव्हां मरणार हे सांगून सर्वांना घाबरवून सोडले असते. म्हणून त्याने प्रचंडला निरोप देण्याचे ठरविले. त्याने जी मदत केली होती तिच्याबद्दल त्याने आवश्यक तेवढी रक्कम बक्षिस म्हणून देण्याची व्यवस्था केली. स्वतःच्या खुशीने तो हवे तेवढे धन घेऊन गेला म्हणजे त्याचे समाधान झाले की नाही हे पाहण्याची गरज उरणार नाही हा पण हेतू होता."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतावरोबर नाहीसा झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# समस्यापूर्ती

फार पूर्वी विदर्भच्या गादीवर रघुरामराज नावाचा राजा राज्य करीत असे. नेहमी त्याच्या डोक्यात निरनिराळी कोडी किंवा समस्या घोळत. दरबारात बसल्या बसल्या त्याला एक न एक कोडे किंवा समस्या अचानक सुचे. तो ती समस्या सोडविण्यास आपल्या दरबाऱ्यांना सांगे. कोणी कोडे सोडविले नाही अगर कोड्याचे उत्तर असूच शकणार नाही असे सांगितले की राजा त्या दरबाऱ्याला शिक्षा करी.

एकदा राजाने एक विचित्र समस्या प्रस्तुत केली. म्हणाला–"नुकसान न होऊ देणारी चोरी आणि दुःखी होऊ न देणारी लबाडी कोणती?" चोरी झाली तरी नुकसान होणार नाही अशी चोरी अशक्यच. कोणी फसविले तर फसणारा दुःखी होतोच. म्हणून सर्व दरबारी विचार करू लागले की महाराजांनी ही दोन्ही कोडी निरर्थकच दिली आहेत. पण तोंड उघडून सांगण्याची हिंमत कोणीच केली नाही.

कोणी उत्तर दिले नाही हे पाहून राजाने मंत्र्याला आज्ञा केली–"मी म्हटल्या प्रमाणे चोरी आणि लबाडी कोठे तरी होतच असणार. कोठे होत आहे या गोष्टीची चवकशी करून मला एका आठवड्याच्या आत कळवावे."

सर्वांना वाटले की मंत्र्याचे मरण आता चुकत नाही. मंत्री दुसऱ्या दिवसापासून दरबारात आलाच नाही आणि नोकरां-करवी दररोज दरबारात काय काय होते, या गोष्टीची इत्थंभूत बातमी ठेवीत होता.

मंत्री दरबारातून निघाला त्याच्या ठीक तिसऱ्या दिवशी राजाची फार आवडती अशी काळी गाय आजारी पडली. पुष्कळ औषधपाणी केले तरी ती बरी झाली नाही. सर्वांना गाय मरणार असे वाटले. परंतु ती मेली नाही. व हळू हळू छान बरी झाली आणि तीन चार दिवसांनी नेहमी-सारखे दूध पण देऊ लागली.

मंत्र्याने आठव्या दिवशी दरबारात येण्यापूर्वी काय ते उत्तर योजून ठेवले होते. ठरल्या वेळी तो दरबारात आला. मंत्र्याला पाहून राजाने विचारले–"काय मग उत्तर घेऊन आलात का? नुकसान न होणारी चोरी कोणती आणि दुःख न होऊ देणारी लबाडी कोणती?"



"महाराज! ती उत्तरे द्यायला तर आलो आहे. कोणाचे नुकसान होणार नाही अशी चोरी मीच केली. आपण जीवदान देण्याचे वचन द्याल तर मी ते उत्तर सांगतो." मंत्री म्हणाला.

"बरं तर सांगा!" राजा म्हणाला.

मंत्री म्हणाला–"महाराज! मी वेष पालटून आपल्या कोड्याची उत्तरे शोधीत आठवडाभर सर्व राज्य हिंडून फिरून आलो. हिंडत असता मी महोबा नावाच्या गावी पोचलो. तेथल्या शेतकऱ्याच्या घरा-समोरच्या अंगणात एक काळी गाय दिसली. ती आजारी व रोगिष्ट होती. अगदी मरायला टेकलेली. तो शेतकरी आपल्या नोकरांना सांगत होता–"अरे ही गाय आता लवकरच मरणार. मरेपर्यंत हिला फुकटाचे खायला घालावे लागणार. मेली तर केवढा खर्च करावा लागणार. गोमाता आहे ना? अन्त्येष्टीचा खर्च किती होईल कोण जाणे?" हे सर्व ऐकून मी त्या गावात ती रात्र काढायचे ठरविले. रात्री मी ती गाय चोरून एका गाडीत घातली आणि निघून आलो. पशुवैद्य म्हणाला, मी घेऊन आलो ती गाय दम्याच्या आजाराने आजारी आहे. तिचे औषधपाणी नीट झाले तर ती बरी होईल. त्याच वेळी आपली गाय मरायला टेकली असल्याचे मी ऐकले. लगेच मी चोरून

श्री. आ. का. साबळे

आणलेली गाय आपल्या गाईच्या जागी ठेवून दिली आणि आपल्या गाईला नदी काठी टाकून आलो. ती थोड्याच वेळाने मेली. मी ठेवून गेलो होतो ती गाय आता बरी झाली आहे व दूध पण देऊ लागली आहे म्हणे. आपण वैद्यांना त्यांनी दिलेल्या औषधाबद्दल बक्षिस पण दिलेत. महोबा गावचे शेतकरी गाय चोरी गेल्याबद्दल खूष दिसले, कारण त्यांना एक पैचादेखील खर्च झाला नाही, पाहिलेत मी चोरी करून कोणाचे नुकसान केले नाही. केला तो दोघांचा फायदाच केला. आपल्याला चांगली दूध देणारी गाय मिळाली व गावकऱ्यांना गाईच्या अन्त्येष्टीसाठी एक पैचादेखील खर्च करावा लागला नाही."

दरबारी म्हणाले–"मंत्री खरोखरच हुशार आहेत. राजाने टाकलेली समस्या कशी छान सोडविली?" राजाला पण कोणत्याही प्रकारची शंका राहली नाही. त्याने खूष होऊन विचारले–"दुःखी न करणारी लबाडी तू केलीस का?"

"हो तशी लबाडी पण मी केली आहे." मंत्री म्हणाला.

"तू लबाडी केलीस? कोणाला फसविलेस? आणि त्याला दुःख वाटले नाही?" राजाने मंत्र्याला एका दमात विचारले.

मंत्री हात जोडून म्हणाला–"महाराज! मी आपणांलाच फसविले आणि आपल्याला थोडे देखील दुःख झाले नाही. मी महोब्याला गेलोच नाही. गाय आजारी पडली नाही. मी चोरी केली नाही, सर्व खोटे. परंतु हे सर्व आपणांला खरे वाटावे अशातऱ्हेने सांगून मी आपणांला फसविले. आपल्याला त्याचे दुःख तर झालेच नाही, नुकसान पण आपले काही झाले नाही.

मंत्र्याचे चातुर्य पाहून राजा व दरबारी थक्क होऊन त्याच्या तोंडाकडे पाहू लागले.





# विश्वासघात

प्राचीन काळी मगध देशाच्या गादीवर राजसिंह नावाचा एक राजा राज्य करीत असे. त्याच्या कारकीर्दीत मगध राज्याच्या शेजारी कल्याणपूर नावाचे एक छोटेखानी संस्थान होते. विक्रमसिंह नावाचा राजा त्या संस्थानाचा राजा होता. ते संस्थान एक स्वतंत्र राज्य होते. मनात आले असते तर कल्याणपूरचे संस्थान जिंकून ते आपल्या राज्यात मिळवून घेणे राजसिंहाला सहजी शक्य होते. परंतु त्याच्या मनात तो विचार कधीच आला नाही. उलट त्याने विक्रमसिंहाशी मैत्री वाढविण्याचाच प्रयत्न केला. त्याचे आणखी एक कारण होते. विक्रमसिंह लहान संस्थानिक असला तरी हुशार व विश्वासपात्र होता. तो एक प्रजावत्सल राजा पण होता.

कल्याणपूरच्या हद्दीला लागून कांचनपूर नावाचे आणखी एक लहानसे संस्थान होते. पण ते मगध साम्राज्यातच होते. कांचनपूरचा राजा चंडवर्मा राजसिंहाचा एक मांडलिक राजा होता. राजसिंहाने त्याचा पराभव करून त्याला आपला एक मांडलिक करून घेतले होते. चंडवर्मा स्वभावाने दुष्ट होता. विक्रमसिंहाशी त्याची पूर्वी मैत्री होती. परंतु स्वतः मांडलिक झाल्यापासून त्याला विक्रमसिंहाच्या स्वातंत्र्याचा हेवा वाटू लागला. त्यात विक्रमसिंहाची राजसिंहाशी दिवसेदिवस वाढत चाललेली मैत्री पाहून त्याच्या चित्ताचा जळफळाट होऊ लागला.

चंडवर्माच्या मनात विचार आला की राजसिंहाने मनात आणले तर त्याला विक्रमसिंहाचे राज्य एका दिवसात जिंकता येईल आणि त्या राज्यातला राज्यकारभार राजसिंहाच्या कृपेने आपल्यालाच मिळू शकेल. हे विचार त्याच्या मनात घोळत



होते. विक्रमसिंहाचे वैभव त्याच्या डोळ्यात सलत होते. म्हणून तो एकदा राजसिंहाला एकांतात भेटून म्हणाला–"महाराज! आपण सूज्ञ आहांत, मी सांगण्याची गरज नाही. विक्रम दिसायला सज्जन आहे, परंतु त्याच्या मनातला हेतू दुसऱ्याला कळणे शक्य नाही. मी लहानपणापासून त्याला चांगला ओळखतो. माझ्या राज्याला लागूनच त्याचे राज्य आहे. संधी मिळायची खोटी, तो आपल्या राज्यावर स्वारी केल्याशिवाय राहणार नाही." ते सर्व शांतपणे ऐकून घेऊन राजसिंहाने फक्त थोडे स्मित केले. पण काही बोलला मात्र नाही.

असाच आणखी काही काळ लोटला. विक्रमसिंहाचा नाश कसा होईल हा एकच एक विचार चंडवर्माच्या मनात घर करून बसला होता. तो संधीची वाट पाहू लागला.

दरवर्षी विजयादशमीला राजसिंह थाटामाटाने दसऱ्याचा सण साजरा करीत असे. त्यावेळी सर्व सामंत राजांना बोलावणी जात. या वर्षी उत्सवाचे खास निमंत्रण शक्तिसिंह नांवाच्या एका योद्ध्याच्या हाती कल्याणपूरला पाठविण्यात आले. शक्तिसिंह एक स्वामिभक्त शूर व विश्वासपात्र योद्धा होता व तो महाराजांचा एक अंगरक्षक पण होता.

शक्तिसिंह कल्याणपूरच्या वाटेवर विश्रांती साठी कांचनपूरला राहिला. चंडवर्माने त्याचे सर्व प्रकारे आदरातिथ्य करून त्याला खूष ठेवले. त्याच बरोबर एक दुष्ट विचार त्याच्या मनात आला. विक्रमसिंहाच्या हाती शक्तिसिंहाचा वध झाला तर राजसिंहाचा विक्रमसिंहावर कोप होईल. नंतर राजसिंह विक्रमसिंहाचा वध करून त्याचे राज्य स्वाधीन करून घेईल. आपण युक्तीने त्या राज्याची व्यवस्था पाहण्याचे काम महाराजांकडून मागून घेऊ.



त्या दिवशी रात्री शक्तिसिंह झोपला असता त्याच्या खिशातून विक्रमसिंहाच्या नावे लिहिलेले निमंत्रण पत्र चंडवर्माने काढून घेतले व त्या जागी दुसरे पत्र ठेवून दिले. शक्तिसिंहाला ते काही कळले नाही व तो दुसऱ्या दिवशी उजाडताच कल्याणपूरला निघून गेला.

विजयादशमीचा उत्सव संपला. विक्रमसिंह त्या उत्सवाला हजर नव्हता. त्याच्याकडे निमंत्रण घेऊन गेलेला शक्तिसिंहदेखील परत आला नव्हता. तो कां परतला नाही व नेहमीप्रमाणे विक्रमसिंह उत्सवाला कां हजर झाला नाही हे कोणाला कळले नाही.

चंडवर्मा राजसिंहाला म्हणाला–"महाराज, शक्तिसिंहाला आपण विक्रमसिंहाकडे पाठविला होता. तो तेथे गेला होता की नाही आणि त्याने पत्र पोचते केले की नाही हे विक्रमसिंहालाच विचारून पहावे. यामागे काही तरी भयंकर गुपित असावे."

"म्हणजे तुझ्या मते शक्तिसिंहाचा जीव धोक्यात आहे का?" राजसिंहाने विचारले.

"महाराज, मी आजपर्यंत कधी बोललो नाही, परंतु आपण विचारलेत म्हणून बोलत आहे. विक्रमसिंह आपल्याला वाटतो तसा सरळ नाही. तो आतल्या गाठीचा आहे." चंडवर्मा म्हणाला.





राजसिंहाच्या मनात विक्रमसिंहाविषयी संशयाचे बीज पेरले गेले. त्याने आपला एक दूत विक्रमसिंहाकडे पाठविला. तो दूत परत येऊन म्हणाला—"महाराज! आपण सांगितल्याप्रमाणे मी सर्व गोष्टींची चवकशी करण्याचा प्रयत्न केला. परंतु मला एकाही गोष्टीचे सरळ उत्तर मिळाले नाही."

राजसिंहाने आणखी एका हुशार माणसाला माहिती काढून आणायला पाठविले. परंतु या खेपेसहि विशेष फायदा झाला नाही. त्यामुळे महाराजांच्या मनातला संशय कमी होण्याऐवजी दुणावला. परंतु एक गोष्ट मात्र महाराजांना कळली की त्यांचा विश्वासपात्र अंगरक्षक शक्तसिंह आता या जगात नाही.

"विक्रमसिंहाने विश्वासघात करून स्वतःच माझ्या मैत्रीचा अपमान केला आहे. त्याच्या राज्यावर स्वारी करून त्याची घमेंड उतरविली पाहिजे." राजसिंहाने जणुकाही प्रतिज्ञाच केली. चंडवर्माला, त्याचा दुष्ट हेतू साध्य झाल्याबद्दल परमानंद झाला.

मगधच्या सैन्याने कल्याणपुरला वेढा दिला. महाराजांच्या शिबिरात चंडवर्मा बसून महाराजांना सल्ला देऊ लागला. दोघे परस्परांशी सल्ला करीत असता अचानक तेथे एक सामान्य शिपाई विक्रमसिंहाचा दूत म्हणून आला.

"तुझ्या राजाने माझ्याकडे कोणता निरोप पाठविला आहे?" महाराज राजसिंहाने दूताला विचारले.

"आपण एकाएकी ही स्वारी केली याबद्दल विक्रमसिंहाला आश्चर्य वाटत आहे. आमचे महाराज आज या युद्धाला मुळीच तयार नाहीत. आपण थोडी सवड दिल्यास ते तयारी करू शकतील." तो दूत म्हणाला.

"आम्ही आपल्या शक्तीची परीक्षा देण्यासाठी तुमच्याकडे आलो नाही. तुझ्या



राजाने माझ्याशी जो द्रोह केला आहे, त्याचा जाब विचारण्यासाठी व उचित दंड देण्यासाठी आलों आहो. तुम्ही युद्धाला तयार नसाल तर त्याचे फळ भोगायला तयार रहा." राजसिंह कठोर शब्दात म्हणाला.

चंडवर्मा मध्येच म्हणाला—"महाराज! या लोकांनी आपल्या दूताचा वध केला आहे. आपण त्याचा सूड घ्यायला नको का?"

दूत ते सर्व ऐकून काहीच बोलला नाही. पुढे काय होते हे पहात स्वस्थ बसून राहिला.

राजसिंहाचे सर्वांग क्रोधाने थरथर कापत होते. तो मोठ्याने ओरडून म्हणाला—"तू बोलत का नाहीस? तुझ्या राजाने माझ्याशी द्वेषभावाने विश्वासघात करून एका निरपराध व्यक्तीचा वध केला. मैत्रीचे ढोंग करून गळ्यावर सुरी फिरवायला त्याला लाज नाही वाटली?"

त्यावर राजदूत म्हणाला—"महाराज! आमच्या महाराजांनी विनाकारण आपल्या दूताचा वध केला नाही!"

मध्येच चंडवर्मा म्हणाला—"विना कारण वध केला नाही? तरमग राजसिंह महाराजांनी त्याचा वध करण्यास पत्र लिहून त्याच्या हाती पाठविले होते? निमंत्रण



पत्रात तेच लिहिले होते का? बोल ना!" चंडवर्मा मोठ्याने व्यंग्य हास्य करीत म्हणाला.

"होय! आपण म्हणालात तेच खरे आहे. हे घ्या ते निमंत्रण-पत्र महाराज!" असे सांगून राजदूताने राजसिंहाच्या हातात निमंत्रण पत्र दिले. ते पत्र वाचून राजसिंह चकित झाला. पत्रात हा मजकूर होता—

"हे पत्र घेऊन येणारा दूत राजद्रोही आहे. गुप्तपणे याचा वध करावा.

—राजसिंह."

"काय लिहिले आहे?" असे विचारीत चंडवर्माने राजसिंहाच्या हातातून ते पत्र










घेऊन वाचले. ते पत्र त्याने स्वतः लिहून शक्तिसिंहाच्या खिशात ठेवले होते. चंडवर्माला ते पत्र राजसिंहाच्या हातात पडेल असे स्वप्नातदेखील वाटले नसेल.

राजसिंहाचे सर्व लक्ष त्यावेळी चंडवर्माच्या चेहऱ्यावरच होते. त्याने दरडावून त्याला विचारले–"बोल, हे पत्र कोणी लिहिले. तुला या पत्राविषयी आधीच कसे काय कळले?

"महाराज! मलादेखील तेच विचारायाचे होते!" असे म्हणत राजदूताने आपल्या डोक्याची पगडी खाली काढून ठेवली.

त्याला ओळखून राजसिंह चकित होऊन म्हणाला–"विक्रमसिंह! आपण स्वतः?"

चंडवर्माचे कपट सर्वांना कळले. राजाच्या आज्ञेने सैनिकांनी त्याला कैद केले.

"विक्रमसिंह! या दुष्टाचा दुष्टपणा मला लगेच कां कळविला नाही? आजपर्यंत गप्प कां होता?" राजसिंहाने विचारले.

याचा दुष्टपणा सर्वांना नीट कळावा व पुराव्यानिशी याला पकडता यावे म्हणून मी बोललो नव्हतो. नाही तर त्याने पुढे आणखी कोणकोणते कट केले असते सांगणे कठीण आहे. याने माझे राज्य नष्ट करण्यासाठी आणि आपले सख्य मोडावे यासाठी हा सर्व प्रयत्न केला होता. परंतु आपला थोरपणा मी ओळखत होतो. म्हणून मी शक्तिसिंहाचा वध न करता त्याला आपल्याकडे आजपर्यंत सुखरूप ठेवले आहे. चंडवर्माने माझ्यासाठी जे जाळे टाकले होते त्यात तो स्वतःच सापडला.

राजसिंहाने चंडवर्माला फाशीची शिक्षा दिली. शक्तिसिंहाला कांचनपूरचे राज्य देण्यात आले. त्यानंतर राजसिंह काही दिवस विक्रमसिंहाचे अतिथ्य स्वीकारून आपला राजधानीला परतला.





# विचित्र मृत्युपत्र

एका गावी धर्मानंद नावाचा एक जमीनदार रहात असे. त्याचा वाडा फार मोठा होता. त्याच्याकडे शेकडो गाईगुरे, रत्नमाणिक्ये व शेकडो एकर जमीन होती. नोकरचाकर पण पुष्कळ होते.

धर्मानंदला तीन मुलगे होते. त्याचा मोठा मुलगा श्रीधर दिसायला फार सुंदर होता. परंतु तो भोगविलासात गुरफटलेला होता. दुसरा मुलगा विजय स्वभावाने मितव्ययी होता. शेतीची कामे व इतर कामे करण्याची त्याला आवड व चांगली माहिती पण होती. तिसरा मुलगा महेश आळशी व स्वभावाने खर्चिक होता.

मरण समयी धर्मानंदने आपले मृत्यु पत्र लिहून ठेवले. मृत्युपत्राची माहिती व त्या प्रमाणे त्या मृत्युपत्राची अंमल बजावणीचे काम दिवाणाला सोपविले होते. दिवाणाला सर्व सांगून धर्मानंदाने डोळे मिटले. त्यानंतर दिवाणाने धर्मानंदाच्या तिघां मुलांना बोलावून त्यांच्या बापाने लिहून ठेवलेले मृत्युपत्र वाचून दाखविले. मृत्युपत्रात खालील खुलासा व अटी होत्या.

सर्व इस्टेट तिघां मुलांना सारखी सारखी वांटून देण्यात यावी.

जो वांटा प्रत्येकाला मिळेल तो कोणाच्या स्वाधीन होणार नाही आणि अधिकार असल्याचा अनुभवपण त्यांना होणार नाही.

प्रत्येकाला आपल्या वांट्यावर पूर्ण अधिकार नाही. प्रत्येकाने आपल्या वांट्यातले दोन दोन हजार आपल्या आईला दिले पाहिजेत.

त्या अटी दिवाणाने वाचून दाखविल्यावर तिघे चकित झाले. कारण त्यांचा अर्थ कोणालाच कळला नाही. तिसरा मुलगा महेश दिवाणाला म्हणाला–"हे मृत्युपत्र निरर्थक आहे. मला वाटते की हे मृत्युपत्र

सौ. जानकीबाई ठकार

लिहीत असतां बाबांचे डोळे ठिकाणावर नव्हते. म्हणून आपण बाबांची इस्टेट आपल्या इच्छेप्रमाणे आम्हांला वांटून द्यावी."

"तुमच्या वडिलांनी हे मृत्युपत्र स्वतःच्या हाताने लिहिले आहे. त्याची अंमल बजावणी करण्याचे काम त्यांनी माझ्यावर टाकले आहे व त्याप्रमाणे अंमल बजावणी झाली पाहिजे. अर्थ नाही कसा? या अटींप्रमाणे वांटे करून देण्याचे कर्त्तव्य माझे आहे. मी पंचांना बोलावून त्यांच्या समक्ष मृत्युपत्राच्या अटींप्रमाणे वांटे करून देतो. मी अटींप्रमाणे वांटे करून दिल्याची साक्ष पंचांनी दिल्यावरच मी आपले कर्त्तव्य पालन केल्याचे समाधान माझ्या मनाला वाटेल." दिवाण मुलांना म्हणाला.

नंतर दिवाणाने पंचांना बोलावून त्यांच्या समोर मृत्युपत्र वाचून दाखविले आणि म्हणाला—"मृत्युपत्राच्या अटींप्रमाणे मी माझ्या धन्याची इस्टेट त्याच्या मुलांना वांटून देतो :—

मी शेत, गुरे नोकर व इतर शेतीचे सामान मोठा मुलगा श्रीधर याला देतो. राजवाडा व बाग मधला मुलगा विजय याला देतो. कपडे, दागदागिने व इतर मूल्यवान वस्तू सर्वांत धाकटा महेश याला देतो." दिवाण म्हणाला.

असे वांटे केल्यामुळे धर्मानंदच्या तिघां मुलांना त्यांच्या त्यांच्या उपयोगाच्या व आवडीच्या नसलेल्या वस्तू मिळाल्या म्हणून त्यांना आपापला वांटा बदलावासा वाटला. महेशचा वांटा श्रीधरला, श्रीधरचा वांटा विजयला व विजयचा वांटा महेशला बदलून द्यावा लागला. अशा-तऱ्हेने प्रत्येकाला सारखा सारखा वांटा मिळाला असूनही तो वापरता आला नाही. ते पाहून तिघांना दिवाणांच्या हुशारीची व चातुर्याची कल्पना झाली. तिघांनी आपापल्या वांट्यातले दोन दोन हजार रुपये आपल्या आईला दिले.





# योग्यतेची परीक्षा

एका गावी गोपू नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्या एकुलत्या एका मुलीचे नाव कमला होते. ती वयात आल्यावर तिच्यासाठी चांगली चांगली स्थळे सांगून येऊ लागली. चांगले स्थळ निवडून मुलीला त्या घरी देण्यासाठी गोपूला विचार करून एक उपाय करावा लागला.

गोपूच्या घरी शेतकऱ्यांची स्थळेच सांगून येत. मुलगी सुंदर होती व गोपूची शेतीभाती मोठी होती. म्हणून आपल्या तरुण मुलांना घेऊन शेजार पाजारच्या गांवची शेतकरी मंडळी येऊ लागली. गोपूने सर्वांचे यथायोग्य आदरातिथ्य केले व त्यांना म्हणाला—"मला हीच एकुलती एक मुलगी. हिला योग्य वर मिळावा हा माझा प्रयत्न आहे. मुलाची निवड मी एक दोन गोष्टींची परीक्षा करून करणार आहे. तेव्हां तुम्ही आपल्या मुलांना तसे सांगून पाठवावे. जो मुलगा मी ठेवलेल्या परीक्षेत उत्तम ठरेल त्याला मी आपली मुलगी आनंदाने देईन."

अर्थातच ही अट शेतकरी मंडळींना पसंत पडली नाही. तरी दोघां तिघां मंडळींना अशी परीक्षा घेण्यात काही गैर दिसले नाही. म्हणून तिघांचे तिघे मुलगे ती परीक्षा देण्यास झाले. त्यांचे वय जवळ जवळ एकच होते तिघे दिसायला तरतरीत व सुशील होते.

गोपू त्या तिघा मुलांना म्हणाला—"तुम्ही बरोबर एक पै किंवा पैसा काही घेतल्याशिवाय निरनिराळ्या दिशेने जा व एका महिन्याने शंभर रुपये मिळवून घेऊन या. त्यानंतर कोणाला आपली मुलगी द्यायची हे मी ठरवीन."

तिघे त्याप्रमाणे तीन निरनिराळ्या दिशांनी निघाले. त्यांच्यापैकी लखू हा



पूर्वेकडे निघाला. तो एका जंगलातून जात असता त्याला एका जागी एक लाकडी बाहुली सापडली. ती पाहून त्याच्या मनात एक विचार आला. त्याने एकाद्या साधू-सारखा वेष केला आणि एका गांवी जाऊन त्याने त्या बाहुलीला हळदकुंकं लावून तिला एक वस्त्र नेसवले आणि तलावाच्या काठी एका झाडाखाली ती बाहुली ठेवून भक्तासारखा तिची पुजा करीत बसला.

गावच्या बायका पाणी भरायला तलावावर येत आणि त्याला विचारीत की ही देवी कोण कोठची? तेव्हां तो त्यांना सांगे–"ही देवी काशीजवळ गंगापात्रात माझ्या गुरुवर्यांना सांपडली. स्वत: गंगाच अवतरली आहे. आपल्या गुरुवर्यांच्या आज्ञे-प्रमाणे मी या देवीची स्थापना करण्या-साठी या तलावाच्या काठी आलो आहे. या देवीची श्रद्धा भक्तिपूर्वक पूजा केल्यास कधी दुष्काळ पडणार नाही व तलावात बारा महिने बत्तीस काळ पाणी राहील."

भाबड्या बायकांचा त्यावर विश्वास बसला. त्या नारळ पान सुपारी केळी व इतर फळफळावळ आणून देवीला वाहून नमस्कार करू लागल्या. काही लोक देवी पुढे पैसे पण ठेवू लागले. हळू हळू देवीचे महात्म्य वाढत गेले. धर्माची पेटी ठेवण्यात आली. पेटीत पडलेले पैसे लखू एका जागी पुरून ठेवू लागला. काही दिवसांनी शंभर रुपये जमा झाले. एक महिना पुरा होणार हे लक्षात येताच लखूने दोघां भक्तांना देवीच्या सेवेला नेमले व मी लवकर परत येऊन देवीचे देऊळ बांधीन असे सांगून निघून गेला.

दुसरा तरुण शेतकरी नंदू गोपूने सांगितल्याप्रमाणे पश्चिमेकडे निघाला. एका महिन्यात शंभर रुपये मिळवून आणण्याची गोष्ट तर सोडाच, त्याला सकाळी संध्याकाळच्या जेवणाची व संध्याकाळी सकाळच्या जेवणाची भ्रांत त्रास देई. उपाशी मरावे लागले तरी चालेल पण परक्यासमोर हात कसा पसरायचा? किती झाला तरी तो एक स्वाभिमानी शेतकऱ्याचा मुलगा होता. चोरी करायला मन कचरू लागले. म्हणून गावातून फिरते वेळी लहान मुलांच्या हातात काही खाण्यासारखे दिसले की ते हिसकावून घेऊन तो खाई. असे चार आठ दिवस गेले.

परंतु नंदूला ते जिणे आवडेनासे झाले व त्याने निराश होऊन परत फिरण्याचे ठरविले. त्या दिवशी रात्री तो त्याच मनस्थितीत कालव्याच्या काठाने चालत असता कोणी तरी पाठीमागून आला व एक गाठोडे त्याच्या खांद्यावर ठेवून पळून जाऊ लागला. त्याचवेळी त्याला पाठीमागून लोक "चोर चोर, पकडा त्याला!" असा आवाज ऐकू आला. प्रसंग लक्षात यायला नंदूला जास्त वेळ लागला नाही. त्याने ते गाठोडे जमिनीवर टाकले व त्या चोराला त्याचा पाठलाग करून पकडले.

इतक्यात चोरांचा पाठलाग करीत धावत येणारे लोक पण आले. नंदूने ज्याला धरले होते तो एक अट्टल चोर होता. तो





चोर एका जमिनदाराच्या घरात शिरून घरातले दागदागिने घेऊन पळून जात होता. कुत्रा भुंकू लागला तेव्हा जमिनदाराचे नोकर जागे झाले व चोराला धरायला धावले. त्याच चोराला नंदूने धरले होते. चोराला मुद्देमालासकट पकडून दिल्याबद्दल जमिनदार खूष झाला व त्याने नंदूला शाबासकी देऊन त्याला बक्षिस म्हणून शंभर रुपये दिले. ते रुपये घेऊन नंदू आनंदाने परतला.

तिसरा तरुण विठू गोपूच्या घरून उत्तरेकडे निघाला. दुपारच्या सुमारास तो एका गांवच्या शेतकऱ्याच्या घरी पोचला. त्याने शेतकऱ्याला विचारले—"काही काम देता का? काम करून पोटभर जेवायला वाढले की पुरे. मला शेत नांगरता येते व शेतीच्या व बागायतीच्या कामाची मला चांगली माहिती आहे."

त्या शेतकऱ्याला तो तरुण शेतकरी हुशार व होतकरू वाटला. त्याने प्रथम त्याला खायला वाढले आणि मग शेतावर घेऊन गेला. विठूने मन लावून काम केले. त्या दिवशी रात्री शेतकऱ्याने त्याला जेवायला वाढून एक रुपया मजुरी म्हणून दिले. विठू दुसऱ्या दिवशी पुढे निघाला.

असाच प्रत्येक दिवशी एकेका गावाला मुक्काम करीत मेहनत करून पोटापाण्याची व्यवस्था करीत तो पुढे निघाला. अशा-तऱ्हेने एक आठवडा लोटला. खाण्या-पिण्याची त्याला फिकीर नव्हती. परंतु एका महिन्यात शंभर रुपये जमवायचे कसे हाच मोठा प्रश्न त्याच्यासमोर उभा होता. असे किती दिवस चालणार? काही तरी दुसरा विचार केला पाहिजे.

असाच विचार करीत तो आणखी एका गावी आला. गावातल्या पिंपळाच्या पारा-वर बसून चार पांच जण मोठमोठ्याने ओरडून काही तरी प्रश्नावर भांडत होते. त्याने जवळ जाऊन भांडणाचे कारण विचारले. भांडण करणारांपैकी एक जण सैंपाक्यांमधला एक प्रमुख होता. तो जेवणावळीच्या वेळी सैंपाकी ठरवून देई व सैंपाक्यांकडून व यजमानांकडून पैसे घेई. एका सैंपाक्याने चौघां सैंपाक्यांना घेऊन येतो असे वचन दिले होते, पण तो फक्त तिघांना बोलावून घेऊन आला होता. म्हणून तो प्रमुख सैंपाकी त्याला रागावत होता.

विठू त्याला जवळ जाऊन म्हणाला—"मी सैंपाक्याचे काम द्या म्हणून नाही सांगणार, आणि ते काम मला करता पण येणार नाही. पाणी भरण्याचे, भांडी घासून द्यायचे व अशीच इतर वरची कामे मी करीन."

प्रमुख सैंपाक्याने विचार केला की तरुण मुलगा हुशार दिसतो आहे. त्याला मदतीला ठेवला तर तिघे सैंपाकी वेळ मारून नेतील. त्या दिवशी रात्री एका जमिनदाराच्या घरी जेवणावळ होती आणि वचन दिल्याप्रमाणे सैंपाकाची सर्व जबाब-दारी त्याच्यावर येऊन पडली होती. म्हणून त्याने विठूला मदतीसाठी कामावर ठेवून घेतले.

त्या दिवशी विठूने खूप मेहनत करून मुख्य सैंपाक्याला खूष केले. पुढे त्या



सैपाक्याने निरनिराळ्या गावी सैपाकाच्या वेळी मदतीसाठी त्यालाच नेले. दहा पंधरा दिवसातच विठूला पुष्कळ मजुरी मिळाली आणि त्याला हवे होते तेवढे शंभर रुपये त्याच्याकडे जमा झाले. तेव्हां तो गोपूच्या गावी निघाला.

एक महिना पुरा झाला त्या दिवशी तिघे तरुण गोपूच्या घरी आले. तिघे शंभरशंभर रुपये घेऊन आले होते. गोपूला आनंद झाला. प्रथम त्याने लखूला विचारले–"काय रे बुवा, तू कसे काय मिळवलेस हे शंभर रुपये?"

तो म्हणाला–"मी चातुर्य दाखवून शंभर रुपये मिळविले." नंतर त्याने लोकांच्या अंधविश्वासाचा दुरुपयोग करून गंगेची मूर्त म्हणून एक बाहुली ठेवून कसे पैसे मिळविले हे फुशारक्या मारीत सांगितले.

"आणि तू रे कसे मिळविलेस हे शंभर रुपये?" गोपूने नंदूला विचारले.

"माझे नशीबच बलवत्तर!" असे सांगून त्याने चोराला पकडवून देऊन जमिनादाराकडून शंभर रुपये कसे बक्षिस मिळविले हे ऐटीत वर्णन करून सांगितले.

"आणि तू रे?" गोपूने विठूला विचारले.

तो म्हणाला–"मी लोकांच्या अंधविश्वासाचा गैर फायदा घेतला नाही की नशिबावर अवलंबून राहलो नाही. स्वतःच्या मेहनतीने हे पैसे मिळविले आहेत." त्याने सैपाक्याच्या हाताखाली पडेल ते काम करून पैसे कसे मिळविले हे सांगितले.

गोपूने विचार केला, लखू हुशार आहे पण त्याने लबाडी करून पैसे मिळविले आहेत. नंदूला केवळ नशिबाच्या भरंवशावर पैसे मिळाले. परंतु विठूने स्वतः अंगमेहनत करून पैसे मिळविले आहेत. तेव्हां तोच मुलीला योग्य वर आहे, असा विचार करून गोपूने विठूशीच आपल्या मुलीचे लग्न करून दिले.



# मातीचा प्रश्न

एका गावी गावच्या पाटलाने गांवकऱ्यांच्या इच्छेप्रमाणे विहीर खणण्याचे ठरविले. त्याने एका माणसाला मजुरांना कामाला लावून विहीर खणून घेण्याचे काम दिले. त्यासाठी किती मजुरी द्यायची हे पण ठरले.

त्याने सर्व व्यवस्था करून पाटलाला विचारले–"धनी! मजूर कामावर आले आहेत. विहीर खणतांना माती निघेल ती कोठे टाकायची?"

पाटील थोडा वेळ विचार करून म्हणाला–"ती माती टाकायला एक खड्डा खणून घे, त्यात विचारायचे काय?"

"पण मग त्या खड्ड्यातली माती कोठे टाकायची? तो प्रश्न उभा राहील ना?" तो मनुष्य म्हणाला.

"तुला एवढेदेखील कळू नये? अरे ती माती आणि ही माती दोन्ही मावेल इतका मोठा खड्डा खणवून घे! असा सांगकाम्यासारखा विचारीत बसून वेळ कां घालवतो आहेस?" पाटील म्हणाला.





# अक्कलशून्य

गावातल्या टोकाच्या गल्लीतल्या कवलारू घरात राहणाऱ्या मुलाला मुले खुळा व मूर्ख म्हणून त्याची टर उडवीत होती. तितक्यात आजोबा आले व रागावून म्हणाले–"अरे काय दंगा चालवला आहे? अक्कलशून्य खुळ्याचे लग्नदेखील एखाद्या राजकुमाराशी होते, ठाऊक आहे का?"

आजोबांच्या तोंडचे ते वाक्य पुरे व्हायची खोटी, मुले ओरडू लागली– "तीच गोष्ट सांगा, आजोबा!" आजोबा नाकात तपकीर कोंबून गोष्ट सांगू लागले.

फार पूर्वी एक म्हातारी होती. तिला एकच एक मुलगा होता. त्याच्या डोक्यात बटाटे भरलेले होते आणि त्याच्या डोक्याला एक केस नव्हता, बिनबुडाची गोल लोटीच जणुकाही. त्याची आई त्याला म्हणे–"तुझे कसे रे व्हायचे? तुला मुलगी कोण देणार पोट तरी कसे भरणार?"

तो होताच मुळी अक्कलशून्य म्हणून लग्न आणि पोट भरणे दोन्ही गोष्टींची त्याला काळजी अशी वाटलीच नाही.

एकदा त्या गावची राजकुमारी पालखीत बसून कोठेतरी चालली होती. त्या अक्कल-शून्य टकल्याने तिला पाहिले. त्याने विचार केला आई म्हणते तसे लग्न करायचे तर या राजकुमारीशीच करायचे आणि घरी गेल्यावर आईला म्हणाला–"आई! तू राजाकडे जाऊन सांग की त्या राजकुमारीशी मी लग्न करणार आहे."

ती म्हातारी चकित होऊन म्हणाली– "अक्कलशून्य मूर्ख! डोकं बिकं फिरलं आहे वाटतं तुझं? माझ्याजवळ बोललास तर बोललास, आणखी कोणाजवळ बोलू नकोस. राजाच्या कानावर ही गोष्ट गेली तर तुझ्या बरोबर माझे डोक देखील जाईल. पुन्हा तोंडावाटे असे काही वेडे वाकडे बोलू नकोस." म्हातारीने बजावले.

परंतु त्याने म्हातारीचे एक ऐकलं नाही व हट्ट धरून बसला की राजाला जाऊन सांगितलेच पाहिजे. म्हणून म्हातारी राजाच्या दरबारात गेली आणि हात जोडून म्हणाली–"महाराज! माझ्या मुलाला लागलं आहे वेड. तो राजकुमारीशी लग्न करणार म्हणतो."

राजा सुद्धा विक्षिप्तच होता. ते ऐकून तो विचार करू लागला, पाहू तर या गंमत काय होते ती आणि म्हातारीला म्हणाला–"म्हातारे ही गोष्ट तुझ्या मुलाने स्वत: येऊन सांगायला काही हरकत आहे का? तू कशाला आली आहेस?"

म्हणून म्हातारीने दुसऱ्या दिवशी मुला-लाच राजाकडे पाठविले. तो अक्कलशून्य मूर्ख दरबारात जाऊन राजासमोर हात जोडून उभा राहिला.

राजा त्याला पाहून म्हणाला–"काय म्हणे, तुला राजकुमारीशी लग्न करायचे आहे? तर मग मी सांगतो ते कर. आमच्या बागेत गाणारे पक्षी नाहीत. तू जाऊन तसे पक्षी बागेत आणून पोचते कर. जो कोणी



असे पक्षी पोचते करील त्याच्याशी राजकन्येचे लग्न करून द्यायचे मी ठरविले आहे."

तो अक्कलशून्य मूर्ख म्हणाला–"कबूल महाराज! मी प्रयत्न करून पाहतो." असे सांगून तो निघाला. परंतु असे पक्षी असतात कोठे हे त्या मूर्खाला माहीत नव्हते. समजा, तसे पक्षी मिळालेच तर त्यांना आणून राजाच्या बागेत कसे सोडायचे हे देखील त्याला माहीत नव्हते. म्हणून तो त्याच विचारात भ्रमिष्टासारखा एका गावाहून दुसऱ्या गावी फिरत राहिला.

एक दिवशी त्याला एक बैरागी भेटला. बैराग्याने त्यालाजवळ बोलावून विचारले–

श्री. शा. मो. गांवकर



“कायरे मुला! असा उदास कां?” त्या अक्कलशून्याने त्या बैराग्याला आपली रडकथा सांगितली.

“तू खुळा आहेस. मनात आलेली गोष्ट मिळावी म्हणून तेच खूळ तुझ्या डोक्यात घोळत आहे. दुसरा कोणी असता तर तो विचार केव्हांच मनातून काढून मोकळा झाला असता. बरं तर मी सांगतो तसे कर. तू सरळ पूर्वेकडे जा. तुला एका कोसावर एक वडाचे झाड दिसेल. त्या झाडावर ते पक्षी राहतात. तू झाडाखाली गेल्याबरोबर “ओम् फट्!” असे म्हण. म्हणजे ते पक्षी जागच्या जागी बसून राहतील. त्यांना उडता येणार नाही. तू त्यांना घेऊन जाऊन राजाच्या बागेत सोडून पुन्हा–“ओम् फट्” म्हण, म्हणजे ते गाऊ लागतील. त्यानंतर तू राजकन्येशी लग्न करून घे.” असे अक्कलशून्य मूर्खाला सांगून तो बैरागी निघून गेला.

बैराग्याने सांगितल्याप्रमाणे तो अक्कलशून्य त्या वडाच्या झाडाजवळ गेला. त्या झाडावर चित्रविचित्र रंगाचे लहान मोठे पुष्कळ पक्षी बसून निरनिराळे आवाज काढून गात होते.

अक्कलशून्याने ‘ओम् फट्!’ म्हणताच सर्व पक्षी गप्प जागच्या जागी हलल्या. डुलल्या शिवाय बसून राहले. त्याने त्या सर्व पक्षांना धरले आणि नेऊन राजाच्या बागेत सोडून पुन्हा ‘ओम् फट्’ म्हटले, त्याबरोबर पक्षांचा गोड किलबिलाट सुरू झाला.

त्यानंतर तो अक्कलशून्य राजाच्या दरबारात जाऊन म्हणाला–“महाराज! आपल्या आज्ञेप्रमाणे मी गाणारे पक्षी घेऊन आलो आहे आणि ते बागेत बोलत आहेत. आता माझे लग्न राजकुमारीशी करून द्यावे.”

“अरे! त्यात काय मोठेसे? मी लग्न करून द्यायला तयार आहे. तुला मंत्र तंत्र येतात असं दिसतं. तुझ्या टक्कल पडलेल्या या डोक्यावर केस उगवून दाखविलेस तर राजकन्येशी मी तुझे लग्न करून देईन.” राजा म्हणाला.

“बरे महाराज!” असे म्हणत अक्कलशून्याने लवून राजाला मुजरा केला आणि डोक्याला केस कसे येणार याचा विचार करीत तो घरी आला.

अक्कलशून्य निघून गेल्याबरोबर मंत्र्याला बोलावून राजा त्याला म्हणाला–“महामंत्री! मी तुमच्या मुलाबरोबर राजकन्येचा विवाह करून द्यावा, म्हणतो. लग्नाची तयारी लवकर करावी.”

राजधानीभर मंत्र्याच्या मुलाशी राजकन्येच्या विवाहाची वार्ता पसरली. हे लग्न दुसऱ्याच दिवशी होणार आहे हे ऐकून प्रजेला आश्चर्यच वाटले.

तो अक्कलशून्य राजाकडे त्या विषयाची चवकशी करायला गेला. “असा अन्याय कां?” त्याने राजाला जाऊन विचारले. तोंपर्यंत लग्नाची सर्व तयारी झाली होती. वरवधूंस बोहोल्यावर समोरासमोर उभे करण्यात आले. भटजी व इतर वडीलधारी मंडळी पाहुण्यांना अक्षता देत होते. भटजींनी मंगलाष्टके म्हणायला सुरवात केली. सर्व कार्यक्रम उरकून वधूच्या गळयात मंगळसूत्र



बांधण्यासाठी भटजींनी नवरदेवांना सांगून ठेवले.

त्यावेळी अक्कलशून्य तेथे आलेला कोणाच्या दृष्टीस पडला नाही. ऐन वेळी "ओम् फट्" असे अक्कलशून्य ओरडला. सर्व जागच्याजागी पुतळ्यासारखे उभे राहूले आणि चकित होऊन अक्कलशून्याकडे पाहू लागले.

तेवढ्यात राज्याचे काही प्रमुख अधिकारी मांडवात आले. त्यांनी ही सर्व काय भानगड आहे असे विचारले तेव्हां अक्कलशून्य म्हणाला—"राजाने मला वचन देऊन माझ्या ऐवजी मंत्र्याच्या मुलाचा विवाह आरंभिला. म्हणून मी मंत्र टाकला आहे."

"तरमग हे लग्न होणे शक्य नाही. अक्कलशून्या तू मंत्र काढून घे. आम्ही मुले लग्न राजकुमारीशी करून देतो." ते म्हणाले.

अक्कलशून्याने "ओम् फट्" म्हणताच पुन्हा सर्वांची हालचाल सुरू झाली. सर्वांनी समजावून सांगितल्यावर राजाने आपल्या मुलीचे लग्न अक्कलशून्याशी करून दिले.

"आजोबा! पण त्या अक्कलशून्याला टक्कल होते ना? मग राजाने त्याच्याशी लग्न कसे करून दिले?" मुलांनी विचारले.

"अरे त्याच्या डोक्याला केस होते. नाही तर राजकुमारी त्याच्याशी लग्नाला कशी तयार झाली असती?" असे सांगून आजोबा आंघोळीला उठले.

"पण आजोबा त्याच्या डोक्याला केस कोठून आले हे सांगितल्याशिवाय तुम्ही निघालात." मुले ओरडली.

"अरे त्यात काय मोठे से? नाटकात काम करणाऱ्यांकडून एक टोप मागून घेतला आणि डोक्यावर ठेवून 'ओम् फट्' म्हटले. झाले, तो टोप कायमचाच डोक्याला चिकटून बसला. एवढे तुम्हांला कळू नये. तुम्ही तरी अक्कलशून्यच!" असे म्हणत मोठ्याने हसून आजोबा निघून गेले.



# भोळी सासू

एक मुलगी नुकतीच सासरी आली. तिला काजू फार आवडत. सासूची नजर चुकवून ती काजूच्या बरणीतला काजूचा एखाद तुकडा तोंडात टाकी आणि चांगली संधी मिळाली की मूठमूठभर काजू गट्ट करी. काही दिवसांनी अर्धे अधिक काजू नाहीसे झाले. सासूला सुनेवर संशय होता. कारण तिच्याशिवाय दुसरे घरात कोणी नव्हते.

सुनेला कळले की सासुबाईंना आपली चोरी कळली आहे. एकदा ती केर काढीत होती. जमिनीवर काजूचा तुकडा पडला होता. तो सासुबाईला दाखवून तिने विचारले— "सासुबाई! काय हो हे?"

"अग हा काजू!" सासु म्हणाली व सुनेवर आपण विनाकारण संशय केल्याबद्दल तिला वाईट वाटले.












# महामूर्ख

एका गावी गणपतराव व सरस्वतीबाई नावाचे जोडपे रहात असे. त्यांना फार दिवसांनी एक मुलगा झाला. म्हणून त्यांनी त्याचे नाव धोंडू ठेवले. मुलगा झाल्यावर थोडयाच दिवसांनी त्याची आई वारली. तेव्हां मुलाची सर्व जबाबदारी बापावर येऊन पडली. बापाने आपल्या एकुलत्या एका मुलाचे सर्व लाड पुरविले.

गणपतरावाला गावकरी गणोबा म्हणत. गणोबाचा एक लहान मळा होता. ते स्वतः मळयात भाजीपाला लावून तो बाजारात विकीत. त्यावरच बापलेक दोघांचा उदर-निर्वाह चाले. गणोबांनी मुलाला कधी कोणते काम करायला सांगितले नाही. दोन वेळ जेवण आणि दिवसभर उनाडक्या, असा त्याचा कार्यक्रम असे.

धोंडू लहानाचा मोठा झाला. त्याच्या वयाला आता पंधरावे वर्ष लागले. तरी तो बापाच्या कामाला हात भार लावीत नसे. ते पाहून गावकरी गणोबांना म्हणत— "गणोबा! आहो, मुलाला तुम्ही असा मोकळा सोडून त्याच्या जीविताचे मातेरे करणार आहां."

पण गणोबा आपल्या मित्रमंडळींच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करी आणि म्हणे— "अहो मुलगा अजून लहान आहे. खेळण्याचं वय हेच तर आहे. पुढे काम सुटतं आहे का? शिकेल स्वतःच हळूहळू."

एकदां गणोबांना पहाटे उठून भाजी घेऊन बाजारात जायचे होते. जातांना त्यांनी मुलाला सांगून ठेवले—"धोंडू! मी जातो आहे बाजारात. मला यायला उशीर होईल कदाचित. तू झाडांना पाणी घाल बरं का? नवी दोरी विहिरीवरच आहे."

संध्याकाळ व्हायच्या आधी बाबा न आलेले पाहून धोंडूने दोरीचे एक टोक विहिरीत सोडले व दुसरे वर एका झाडाच्या बुंधात बागेत सोडून दिले.

गणोबांनी भाजीपाला लवकरच विकला आणि तीन चार वाजण्याच्या सुमारास घरी परत आले. त्यांनी मळयात जाऊन पाहिले तर दोरखंड विहिरीत लोंबत असलेले व एक टोक बागेत सोडलेले दिसले. आपल्या चिरंजिवांच्या कर्तृत्वशक्तीची साक्ष त्यांना पटली. त्यांना भयंकर राग आला. त्यांनी मुलाला बोलाविले आणि म्हणाले—"कायरे, तू मूर्ख आहेस हे मला माहीत होते, पण तू इतका मूर्ख निघशील हे माहीत नव्हते. आजपर्यंत तुझ्यासारखे मूर्ख या जगात आहेत, याची कल्पनादेखील नव्हती. मी तुझे सर्व लाड पुरविले आणि शेवटी मीच मूर्खात काढला गेलो. आतां तुझ्याहून जास्त कोणी मूर्ख कोणी आहे का हे मी पाहणार आहे. आज मी त्याच कामावर घराबाहेर पडत आहे." असे सांगून गणोबा घराबाहेर पडले.

गणोबा एका गल्लीतून जात असतां त्यांना एका गोठयातून एका मुलाचा मोठ-मोठयाने ओरडण्याचा आवाज ऐकू आला. गणोबा धावत त्या गोठयात शिरले. तेथे त्यांना गाईच्या मागच्या पायांजवळ एक



मुलगा तडफडत पडलेला दिसला. त्याला उभा करून गणोबांनी त्याला रडण्याचे कारण विचारले.

मुलगा रडत रडत म्हणाला—"आईला ताप आला आहे. बाबा घरी नाहीत. आईने सांगितले की वासरू गाईचे दूध जास्त पिऊन टाकील. म्हणून एक थेंब सुद्धा दूध जमिनीवर पडू न देतां सर्व धार काढ वासरू पितांना एक थेंब सुद्धा खाली पडला नाही हें मी पाहिले. तेव्हां मी पण तसेच दूध पिऊं लागलो. तेव्हां गाईने लाथ मारली."

ही स्वारी माझ्या मुलाहून जास्त मूर्ख आहे, हे ओळखून गणोबांनी दूध कसं

काढावयाचे हे शिकवले आणि पुढे निघाले. गणोबा आणखी एका गावी गेले. गावात पाऊल टाकतांच त्यांना एका बाईचा मोठमोठ्याने रडण्याचा आवाज ऐकू आला. ती बाई ओरडत होती–"अरे मुला! मला थंडी वाजते आहे रे लवकर पेटव विस्तव!"

त्याचे उत्तर म्हणून मुलगा म्हणाला–"आई ओरडू नकोस मी पेटवतोच आहे."

त्याच वेळी गणोबांना एक विचित्र गोष्ट बघायला मिळाली. तो मुलगा एक पेटलेले लाकूड झोपडीवर ठेवायला निघाला होता. गणोबांना हे कळेना, थंडी जावी म्हणून झोपडीला आग लावण्याची पाळी यायचे कारण काय? तेवढ्यात त्याला त्या बाईचा आवाज ऐकू आला–"लवकर पेटव रे! झोपडे पेटले म्हणून काय झाले? दुसरे बांधता येईल! पण जीव गेला तर परत येईल का?"

गणोबांनी मुलाच्या हातातले लाकूड ओढून काढून घेतले. आपल्या मुलांहून हे मायलेक जास्त मूर्ख दिसतात! त्याने म्हातारीला व मुलाला बोलावून थंडीपासून स्वत:चा बचाव करण्यासाठी शेगडी पेटवून घ्यायला सांगितले. त्यांनी मुलाला शेगडी कशी पेटवायची हे समजावून दिले आणि आपल्या घरी गेला.

गणोबांना तेव्हां कळले की जगात मूर्ख लोकांची कमतरता नाही. नंतर मुलाचे लाड जास्त केल्यामुळेच तो मूर्ख निघाला आहे हेदेखील त्यांना कळले. दुसऱ्या-दिवसापासूनच त्यांनी आपल्या मुलाला बागेचे काम शिकवायला सुरवात केली. काही दिवसांनी धोंडू बागेचे काम बापाच्या बरोबरीने करू लागला. नंतर तो भाज्या घेऊन बाजारात जाऊन विकून घरी पैसे आणून देऊ लागला. अशातऱ्हेने तो गणोबांना मदत करू लागला.





# महाभारत

दुष्यंतानंतर भरत गादीवर बसला आणि कण्व ऋषींना त्याने राजपुरोहित म्हणून नेमले. त्याच्या कारकीर्दीत प्रजा सुखी होती. भरताच्या नातवाच्या एका मुलाचे नाव हस्ति असे होते. त्याच्याच नावाने हस्तिनापुराची राजधानी म्हणून स्थापना झाली. हस्तीनंतर पांचव्या पिढीत कुरु राजा झाला व त्याच्यानंतरच्या सातव्या पिढीत प्रतीप झाला. त्याची बायको सुनंदा ही शिबी राजाची मुलगी. त्यांना देवापी, शंतनु आणि बाल्हिक असे तीन मुलगे झाले. मोठा मुलगा देवापी हा राज्यत्याग करून तपश्चर्या करण्यासाठी निघून गेला. म्हणून शंतनु गादीला वारस झाला आणि गादीवर बसला.

एकदा राजा शंतनु जंगलात शिकार करून दमून भागून गंगेच्या काठी आराम करीत असता त्याला तेथे एक सुंदर स्त्री दिसली. तिचे रूपलावण्य पाहून ती देवकन्या असेल असे वाटले. शंतनूने जवळ जाऊन तिला विचारले–"हे सुंदरी! तू कोण व अशी गंगेच्या काठी एकटी कशी?"

दुसरे तिसरे काही उत्तर न देता तिने सरळ विचारले–"तुम्ही माझ्याशी लग्न करण्यास तयार असाल तर मी लग्नाला तयार आहे. परंतु माझी एक अट आहे. मी काय वाटेल ते केले तरी तुम्ही विघ्न आणता कामा नये व माझी निंदा करता कामा नये. तसे केलेत तर मी लगेच निघून जाईन." शंतनूने तिची ती अट कबूल



करून तिच्याशी लग्न केले. ती तरुण स्त्री स्वत: गंगानदी होती.

गंगेला शंतनूपासून एका मागून एक मुलगेच होत गेले. मुलगा जन्मला मुलाला गंगेत फेंकून देई. ते पाहून राजाला फार वाईट वाटे. परंतु तोंड उघडायची सोय नव्हती. त्याने स्वत:च वचन दिले होते. आशातऱ्हेने एका मागून एक सात मुलगे गंगेने टाकले. पण राजा कांहींच बोलला नाही.

परंतु आठवा मुलगा झाला तेव्हां मात्र राजाने, त्या मुलाला गंगेत टाकू नकोस असे सांगून तिचे मन वळविण्याचा प्रयत्न करून पाहिला. म्हणाला–"तू एका मागून एक पोटच्या सात मुलांना स्वत:च्या हाताने गंगेत सोडलेस. डोळ्यातून एक टीपूस देखील गाळले नाहीस. जगात इतकी निष्ठूर माता आजपर्यंत कोणी जन्मली नाही. निदान पुढली मुलं तरी जगू देत. तू आहेस तरी कोण? असा मुलांचा वध तू कां करतोस?"

"तुला मुलगाच हवा आहे ना? तर याला ठेवून घे. तू कबूल केलेली अट मोडलीस. म्हणून मी तुला सोडून जात आहे. तू माझी ओळख विचारलीस, तर ऐक,–" एकदां अष्ट वसूंना वशिष्ठ मुनींनी मानवजन्म मिळेल असा शाप दिला. त्यांनी मला व तुला माता व पिता म्हणून मागून घेतले. मी त्यांच्या उद्धारार्थ मानवरूप धारण केले व तुझ्याशी लग्न करून आपल्या पोटी जन्म घेण्यास त्यांना सोय करून दिली. त्यांना मर्त्यलोकातल्या हालअपेष्टा सहन कराव्या लागू नयेत यासाठी मी जन्मताच त्यांना नदीत फेकीत होते. आता मी याला ठार केले तर तू पुत्रहीन होशील म्हणून मी याला सोडीत आहे." गंगा म्हणाली.

परंतु गंगेने त्या मुलाला शंतनूच्या हातात दिला नाहीं. त्या मुलाला घेऊन ती अंतर्धान पावली. पत्नी व पुत्र दोघे अदृश्य झाल्याने दु:खी होऊन शंतनु हस्तिनापुरी परत आला.

असाच बराच काळ लोटला. राजा शंतनु शिकारीसाठी एकदां गंगेच्या काठी पुन्हां आला. गंगेची धारा एका जागी बारीक झालेली पाहून राजा चकित झाला. त्याला एक तरुण मुलगा बाण सोडून गंगेची धारा थोपवून ठेवीत असलेला दिसला.

तेव्हां गंगानदी आपल्या मानवरूपात प्रकट होऊन, त्या तरुण मुलाची ओळख करून देत, राजाला म्हणाली–"महाराज! हाच आपला आठवा मुलगा. आजपर्यंत मी याला वाढवून लहानाचा मोठा केला. याने वशिष्ठ मुनींजवळ सर्व विद्याभ्यास केला आहे. परशुरामाजवळ हा धनुर्विद्या शिकला आहे. याचे नाव देवव्रत आहे. याला आपण आपल्या बरोबर घेऊन जावे."

शंतनु आपला मुलगा देवव्रत याला आपल्याबरोबर घेऊन गेला आणि त्याला युवराज पद देऊन आनंदाने राहू लागला.

अशीच चार वर्षे लोटली. एकदां शंतनु यमुनेच्या काठी विहार करीत असता त्याला कोठून तरी गोड वास येत असल्याचा भास झाला. राजा वास येत होता त्या दिशेने चालू लागला. काही अंतर चालून गेल्यावर एक सुंदर स्त्री नावेत बसलेली दिसली. तिच्या अंगचा तो मोहक वास होता. राजाने



जवळ जाऊन तिला विचारले–"हे सुंदरी! तू कोण व कोणाची मुलगी?"

"मी दाशराजाची मुलगी आहे. माझे नाव मत्स्यगंधा असे आहे. मला योजन गंधा म्हणून देखील म्हणतात. मी आपल्या वडिलांच्या आज्ञेने ही तर चालवते. मी लोकांना नदीपार घेऊन जाते व नदी-पारच्या लोकांना या तीरावर आणते."

शंतनु लगेच दाशराजाकडे गेला व त्याला म्हणाला–"मी तुझ्या मुलीला मागणी घालण्यासाठी आलो आहे."

दाशराज म्हणाला–"महाराज! आपल्या सारख्या एका क्षत्रिय राजाने माझ्या



मुलीला मागणी घालावी याहून मोठे भाग्य माझे काय असणार? पण या लग्नाला मान्यता देण्यापूर्वी आपण एक अट मान्य केली पाहिजे. माझ्या मुलीच्या पोटी जन्मलेल्या मुलालाच आपल्या मागून गादी मिळाली पाहिजे." दाशराज म्हणाला.

राजा ती अट कशी पुरी करणार? कारण त्याने आपल्या लाडक्या देवव्रताला युवराजपद दिले होते. म्हणून राजा काही उत्तर दिल्याशिवाय राजधानीत परत आला. मत्स्यगंधेशी आपला विवाह होणार नाही हे समजून राजा उदास झाला. त्याचे चित्त राज्यकारभारात लागेना.

देवव्रतने आपल्या वडिलांचा उदास चेहरा पाहून त्याच्या दुःखाचे कारण विचारले. शंतनूने दाशराजाच्या मुलीशी लग्न करण्यास उत्पन्न झालेल्या विघ्नाची गोष्ट सांगितली. देवव्रत ते ऐकून दाशराजाकडे गेला आणि त्याच्या मुलीचे लग्न आपल्या वडिलांशी करून देण्यास विनंती केली व म्हणाला—"मला त्यात आनंदच होईल."

ते ऐकून दाशराज म्हणाला—"युवराज! ही उपरिचर वसूची मुलगी आहे. या मुलीला माझ्या हाती सोपवितांना त्याने मी योग्य वर पाहून हिचे लग्न करून द्यावे असे सांगितले होते. हिचे नाव सत्यवती असे आहे. असित असित देवलयाने हिच्याशी लग्न करण्याची इच्छा प्रकट केली होती. पण मी नकार दिला. तुझे वडील लग्नाला तयार असतील तर मी लग्न करून द्यायला तयार आहे. परंतु मला एका गोष्टीचे भय वाटते. तू एक शूर योद्धा आहेस. सत्यवतीच्या पोटी जन्मलेल्या मुलाच्या जिवाचे बरे वाईट होण्याची शक्यता आहे. म्हणून होकार देतांना मन कचरते."

ते ऐकून देवव्रत दाशराजाला म्हणाला—"तर मग माझी प्रतिज्ञा ऐक. मला राज्य नको. सत्यवतीचा मुलगाच राजा होईल. मी शपथ घेऊन ही प्रतिज्ञा करतो."

दाशराज ती प्रतिज्ञा ऐकून स्मित करून म्हणाला—"तुमची प्रतिज्ञा तुम्हांला खरोखर भूषणावह आहे. पण आपली मुले गप्प कां बसतील?" ते ऐकून देवव्रताने आणखी एक भीषण प्रतिज्ञा केली. म्हणाला—"दाशराज! मी राज्यत्यागाची प्रतिज्ञा केलीच आहे. माझ्या मुलांची तुला भीती वाटू नये म्हणून अशी प्रतिज्ञा करतो की मी लग्नच करणार नाही. आतां तुला भिण्याचे मुळीच कारण उरले नाही. तू आपल्या मुलीचे लग्न माझ्या वडिलांशी करून दे."

दाशराजाने ती प्रतिज्ञा ऐकल्यावर प्रसन्न होऊन एका सुमुहूर्तावर सत्यवतीचे लग्न शंतनूशी करून दिले.

देवव्रताने जी भीषण म्हणजे 'भीष्म' प्रतिज्ञा केली त्यावरून त्याला लोक त्या नंतर भीष्म या नावानेच ओळखू लागले.

राजा शंतनूला सत्यवती पासून चित्रांगद आणि विचित्रवीर्य नावाचे दोन मुलगे झाले. दोघे लहान असतांनाच शंतनूला मरण आले. भीष्माने वडिलांची अन्त्येष्टी वगैरे झाल्यावर सत्यवतीचा मोठा मुलगा रुक्मांगद याला गादीवर बसविले.



चित्रांगद एक पराक्रमी तरुण होता. तो नेहमी देव, दानव, व गंधर्व यांच्याशी युद्धांत गुंतलेला असे. एकदां चित्रांगद नांवाच्या गंधर्वाने त्याला युद्धासाठी आव्हान केले. सरस्वती नदीकाठी दोघांचे युद्ध झाले. शेवटी चित्रांगद गंधर्वाने माया युद्ध करून सत्यवतीचा मुलगा चित्रांगद याचा वध केला.

चित्रांगद मरण पावल्याने भीष्माला फार दुःख झाले. त्याने त्याचा धाकटा भाऊ विचित्रवीर्य याला गादीवर बसविले. विचित्रवीर्य वयाने फार लहान होता. म्हणून त्याच्या वतीने सर्व राज्यकारभार पाहण्याचे काम सत्यवतीच्या आज्ञेने भीष्मच



करीत असे. विचित्रवीर्य भीष्माच्या सल्ल्या-प्रमाणेच राज्यकारभार पहात असे.

विचित्रवीर्य लग्नाला योग्य झाला त्याच सुमारास काशीच्या राजाने अंबा, अंबिका व अंबालिका नांवाच्या आपल्या तिघां मुलींच्या स्वयंवराची गोष्ट जाहीर केली. ती बातमी कळल्यावर भीष्म सत्यवतीच्या आज्ञेने रथात बसून काशीला आला. भीष्म इतर राजां-बरोबर जाऊन बसला. राजकन्यांना सर्व राजांचा परिचय करून देण्यात आला. तेव्हां भीष्म पुढे होऊन म्हणाला–"मी या कन्यांचा विवाह आपल्या भावाशी करून देण्याच्या हेतूने आलो आहे. मी यांचे अपहरण करून नेणार आहे. साहस असेल याने त्यांना सोडवून न्यावे." असे सांगून भीष्माने अंबा, अंबिका व अंबालिका तिघींना रथात बसविले.

सर्व राजांनी मिळून भीष्माला अड-विण्याचा प्रयत्न केला. भयंकर युद्ध झाले. भीष्माने अनेक राजांना ठार केले, काहींना जखमी केले आणि शेवटी काशी राजाच्या तिघां मुलींना पुन्हां रथांत बसवून हस्तिना-पुराकडे निघाला. साल्व नांवाच्या राजाने भीष्माला अडविण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करून पाहिला. पण भीष्मासमोर तो टिकाव धरू शकला नाहीं. म्हणून त्याला देखील पळ काढावा लागला.

हस्तिनापूरला पोचल्यावर भीष्माने सत्यवतीचा सल्ला घेऊन तिघींचा विवाह विचित्रवीर्याशी करण्याचे ठरविले. परंतु अंबा त्या लग्नास तयार झाली नाही. ती म्हणाली–"मी साल्व राजाला मनाने वरले आहे. त्याचे देखील माझ्यावर प्रेम आहे. स्वयंवर सुरळित झाले असते तर मी त्यालाच स्वयंवराची माळा घातली असती. मला माझ्या इच्छेविरुद्ध तुम्ही इकडे उचलून आणले आहे. अजून तरी मला माझ्या इच्छेप्रमाणे लग्न करण्यास परवानगी देणे तुमचे कर्तव्य आहे."




भीष्माने मंत्री, पुरोहित व इतर थोर मंडळींचा सल्ला घेऊन अंबेला साल्व राजाकडे पाठविले आणि अंबिका व अंबालिका यांचा विवाह विचित्रवीर्याशी करून दिला.

विवाह झाल्यानंतर विचित्रवीर्य भोग-विलासात गुरफटून गेला आणि राज्य कारभारात त्याचे मुळीच लक्ष लागेना. पुढे तो क्षयरोगाने आजारी पडला व त्यातच त्याला मरण आले. भीष्माने आपल्या धाकट्या भावाची अन्त्येष्टी क्रिया वगैरे केली व पुत्रशोकाने विलाप करणाऱ्या सत्यवतीच्या मनाला सांत्वना देण्याचा यत्न केला.

पुढे काही काळ लोटल्यावर सत्यवती भीष्माला बोलावून म्हणाली–" भीष्मा! तुझ्या वडिलांचा वंशवृक्ष चालू ठेवायला हवा. तर्पण, पिंडदान वगैरे नियमित झाले पाहिजे, नाहीतर पितरांना मुक्ति मिळणार नाही. त्यांच्या वंशात तूच एक उरला आहेस. तू अंबिका व अंबालिका यांच्याशी विवाह करून घे. हें पसंत नसेल तर योग्य कन्या पाहून तिच्याशी लग्न कर आणि वंशाचे रक्षण कर."

पण भीष्माने सत्यवतीच्या विनंतीला होकार दिला नाही. म्हणाला–" मी आपली प्रतिज्ञा भंग होऊ देणार नाही. मला इंद्र पदाचा लोभ जरी कोणी दाखविला तरी मी आपल्या निश्चयापासून ढळणार नाही. तू धर्म म्हणून जे सुचविलेस ते खरोखरी धर्मविरुद्ध कार्य आहे. संकट समयी आपद् धर्म म्हणून निराळ्या नियमांचा आश्रय घ्यावा लागतो. परंतु ते करतांना देखील वडील मंडली, मंत्री व विद्वान लोक यांचा सल्ला घ्यावा लागतो. वंश रक्षणासाठी तुझ्या सुनांनी ब्राह्मणांच्या कृपेने संतती होऊ शकेल. पूर्वी परशुरामाने पृथ्वी नि:क्षत्रिय केली होती तेव्हां मृत क्षत्रियांच्या पत्नींना ब्राह्मणांच्या कृपेने संतती प्राप्त झाली होती व वंश चालू ठेवता आला होता. तेच आपण या आपत्काळी करावे."





# तोतया युवराज

एकदा एक राजा एका गावाहून दुसऱ्या गावी जात असता एका गरीब म्हातारीच्या झोपडीत उतरला. म्हातारीला एक सुंदर मुलगी होती. तिने राजाचे सर्व प्रकारे आतिथ्य केले. राजाने तिच्याशी लग्न केले आणि तिला एक मुलगा झाला.

एकदां राजा आपल्या बायकोला म्हणाला "राज्य सोडून मला बरंच दिवस झाले आहेत. आपला हा मुलगाच गादीला वारस होईल. तू ह्याचे नीट पालनपोषण करून तो मोठा झाल्यावर त्याला पाठवून दे. त्याची ओळख पटावी म्हणून मी तुला एक पदक देऊन ठेवतो. ते पाहिल्याबरोबर मी त्याला ओळखून त्याला युवराज करीन." असे सांगून राजा आपल्या बायकोचा निरोप घेऊन राजधानीला परतला.

मुलगा मोठा झाल्यावर आईला विचारू लागला—"आई! माझे बाबा कोठे आहेत?"

त्या गरीब बाईने विचार केला की मुलाला त्याच्या वडिलांकडे पाठविण्याची हीच वेळ आहे. म्हणून तिने मुलाच्या हातात ते पदक दिले आणि म्हणाली—"तुझे बाबा मद्रदेशाचे महाराज आहेत. तू त्यांना हे पदक दाखविलेस म्हणजे ते तुला ओळखतील. पण एक गोष्ट लक्षात ठेव, वाटेत तुला कोणी दाढी मिशा नसलेला बुळा भेटला तर तू परत ये."

मुलगा आईचा निरोप घेऊन आपल्या वडिलांच्या राज्यात पोचला. त्याच वेळी एक बुळा त्याला समोरून येत असलेला दिसला. म्हणून राजाचा मुलगा परत आपल्या आईकडे गेला. मुलगा सांगितल्या प्रमाणे बुळा भेटताच परत आला या बद्दल त्याच्या आईला फार आनंद झाला.

एका महिन्यानंतर तो पुन्हा निघाला. या खेपेस तो त्याच्या वडिलांच्या राज्याच्या सरहद्दीपर्यंतच पोंचला असेल त्याला तो बुळा समोरून येत असलेला दिसला. म्हणून तो पुन्हां परतला.

महिनाभर आईकडे राहून तो पुन्हां आपल्या वडिलांकडे निघाला. या खेपेस तो राज्यात प्रवेश करून बरेच अंतर आत चालून गेला. विश्रांतीसाठी तो एका जागी बसला असतां त्याला तो बुळा दिसला.

"हा बुळा जणुकाही माझ्या पाठीसच लागला आहे. या खेपेस आपण नाही परतायचे!" स्वतःशीच तो पुटपुटला.

त्याचा आवाज ऐकून बुळा त्याच्याजवळ गेला व विचारू लागला—"काय रे झाले? स्वतःशीच काय बोलतो आहेस?"

राजकुमाराने तो कोण, कशा करिता आला होता वगैरे सर्व सांगून टाकले. पण त्याने पदकाची गोष्ट त्याला सांगितली नाही व ते त्याला दाखविले पण नाही.

"मी राजवाड्याकडेच निघालो होतो. दोघे बरोबर जाऊ. राजाने तुला कधी पाहिले आहे का?" बुळ्याने त्याला विचारले.

"पाहिलं कां नाही? मी लहान होतो तेव्हां पाहिलं होतं." तो तरुण मुलगा म्हणाला.



दोघे बरोबर निघाले. दोघांना तहान लागली होती. वाटेत एक बावडी लागली. बावडीत पाण्यापर्यंत जायला पायऱ्या होत्या. बुळ्याने आत वाकून पाहिले व म्हणाला—"अरे! आत खोल पाणी आहे. पण आत जाऊन आणायचं कसं?"

"मी आणून देतो," असे सांगून तो तरुण मुलगा तांब्या घेऊन विहिरीत पायऱ्या उतरून गेला. बुळ्याने, विहिरीत उतरायला जी वाट होती त्या दारावर एक मोठी शिळा आणून ठेवली आणि म्हणाला—"मूर्ख मुला! आता तू माझ्या तावडीत सापडला आहेस. तुला आता सुटका नाही."



तो तरुण मुलगा घाबरून म्हणाला–"अरे, मला बाहेर येऊ दे!"

"मी एका अटीवर तुला सोडीन. आपण राजाकडे गेल्यावर मी सांगेन की मीच राजकुमार आहे व तू माझा नोकर आहेस. तू खरी गोष्ट चुकून सुद्धा तोंडाने वदता कामा नये." तो बुळा म्हणाला.

"या जन्मात मी खरी गोष्ट सांगणार नाही." तरुण मुलाने कबूल केले.

त्यानंतर दोघे राजवाड्यात पोचले. बुळ्याने तोच राजकुमार असल्याचे सांगून त्याची आई अमुक अमुक गावी आहे असे सांगितले, राजाने त्यालाच आपला मुलगा मानून प्रमाने त्याला आलिंगन दिले. पदकाची गोष्ट विचारायला राजा कदाचित विसरला ही असावा. राजाने त्याला सर्व राजवाडा दाखविला आणि त्याला झोपण्यासाठी चंदनाचा पलंग दिला.

रात्रभर बुळाला झोप आली नाही. त्याला वाटले की राजाच्या मुलाने खरी गोष्ट सांगून टाकली तर आपल्याला अनायास लाभलेले सर्व वैभव हातचे जाईल. म्हणून राजकुमाराचा शेवट कसा करून टाकावा हा विचार त्याच्या मनात घोळू लागला.

दुसऱ्या दिवशी राजाने बुळ्याला बोलवून विचारले–"राजवाड्यात तुझी राहण्याची व्यवस्था तुझ्या मनासारखी झाली ना?" त्यावर बुळा म्हणाला–"सर्व ठीक आहे. एकाच गोष्टीची उणीव भासते."

"ती कसली?" राजाने विचारले.

"विश्वसुंदरी नाही! ती आली की आपला राजवाडा इंद्रभवनासारखा सुंदर होईल." बुळा म्हणाला.

"अरे पण ती विश्वसुंदरी मिळणार कोठे?" राजाने विचारले.

"मी आपल्या नोकराला पाठवितो, तिला हुडकून आणायला." बुळा म्हणाला.

त्यानंतर त्याने खऱ्या राजकुमाराला बोलाविले व म्हणाला–"राजाची आज्ञा आहे की तू जाऊन विश्वसुंदरीला शोधून आण. मी एक उत्तम घोडा द्यायला सांगतो, तू लगेच नीघ."

तो तरुण मुलगा थोडा घाबरला. म्हणाला–"ती विश्वसुंदरी कोठे आहे हे मला नाही माहीत."

"असं होय? तर मग मी राजाला सांगतो, म्हणजे राजा तुझे डोके उडवील." बुळा म्हणाला.

अगदी नाइलाजाने राजकुमार घोडा घेऊन नगराबाहेर निघाला. पण राजधानीच्या बाहेर गेल्यावर निराश होऊन एका झाडाखाली बसून, आपण आईने बजावल्या प्रमाणे न वागल्याबद्दल व त्या बुळ्याशी बोलल्याबद्दल पश्चात्ताप करू लागला.

एक म्हातारी त्याच्याजवळ आली व म्हणाली–"काय रे बाळ! असा रडतोस का?" राजकुमाराने आपली रडकथा सांगितली.

"हत् तिच्या! एवढ्याच साठी का रडतो आहेस? अशी हिंमत हारून बसलास तर कसे चालेल? विश्वसुंदरीच्या महालापर्यंत पोचणे तसे कठीण नाही. वाटेत





पुष्कळ धोक्याचे प्रसंग येतील. तू अमावास्येच्या रात्रीपर्यंत विश्वसुंदरीच्या महालात पोचशील. वाटेत एका जागी तुला सिंह आडवे येतील. तू त्यांना अमावास्येला विश्वसुंदरीच्या महालात यायला सांग. त्या दिवशी त्यांना पोटभर खायला मिळेल. थोडा पुढे गेलास की मुंग्यांची रांग आडवी येईल. मुंग्या तुला चावून नकोसे करायला येतील. तू त्यांना प्रतिपदेला विश्वसुंदरीच्या महालात यायला सांग. त्यानंतर मधमाशा तुला चावायला येतील. तू त्यांना द्वितीयेला विश्वसुंदरीच्या वाड्यात यायला सांग. या संकटांतून पार पडल्यावर पुढे काय करावयाचे हे तूच ठरव." असे सांगून ती म्हातारी निघून गेली.

म्हातारीने सांगितले होते अगदी तसेच सर्व घडले. राजकुमाराला वाटेत सिंह, मुंग्या व मधमाशा भेटल्या व त्याने त्यांना म्हातारीने सांगितल्याप्रमाणे सांगावयाचे ते सांगितले. तो आमावास्येला विश्वसुंदरीच्या किल्ल्यांत पोचला.

किल्ल्याच्या फाटकाजवळ शंभर पाहरेकरी पाहारा देत होते. त्यांनी राजकुमाराला पाहून विचारले—"काय पाहिजे रे तुला?"

"मला विश्वसुंदरी पाहिजे!" राजकुमार म्हणाला.

पाहरेकरी मोठ्याने हसून म्हणाले—"वा रे वा! काय पाहिजे तर म्हणे, विश्वसुंदरी, जरा आत जाऊन तर पहा, म्हणजे कळेल. खोड मोडेल तुझी."

"मी विश्वसुंदरीला घेऊनच परत येईन." राजकुमार म्हणाला.

"ठीक, तर चल." असे सांगून ते राजकुमाराला एका खोलीत घेऊन गेले आणि चाळीस भांड्यात भरून ठेवलेले मांस दाखवून म्हणाले—"उजाडण्यापूर्वी तू ते सारे मांस खाल्ले नाहीस तर तुझे डोके उडवू." असे सांगून राजकुमाराला एका खोलीत बंद करून पाहरेकरी निघून गेले.

राजकुमार प्रथम घाबरला. पण तितक्यात त्याला सिंहांची आठवण झाली. त्यांना त्याच रात्री बोलवायचे ठरले होते. त्याला शंका वाटली की सिंह येतील की नाही. परंतु सिंह आले आणि सर्व मांस खाऊन गेले. त्याला हे कळेना की त्या पाहरेकऱ्यांची नजर चुकवून ते आत आले कसे? दुसऱ्या दिवशी पाहरेकऱ्यांनी खोलीतली मांसाची सर्व भांडी रिकामी झालेली पाहून त्यांना आश्चर्य वाटले. हा दिसायला तर एवढासा दिसतो आहे, पण त्याने सर्व भांडी साफ करून टाकली.

दुसऱ्या दिवशी पाहरेकरी राजकुमाराला दुसऱ्या एका खोलीत घेऊन गेले. त्या खोलीत धान्याचे ढीग होते. राजकुमाराला त्यांनी बजावून सांगितले की उद्या सकाळपर्यंत हे सर्व धान्य संपले नाही तर डोके उडवून दिले जाईल. राजकुमाराने स्मरण केल्याबरोबर असंख्य मुंग्यांनी येऊन सर्व धान्याचा धुव्वा उडविला.

तिसऱ्या दिवशी पाहरेकरी राजकुमाराला आणखी एका खोलीत घेऊन गेले. त्यात चाळीस भांडी मधाने भरलेली होती.



उजाडण्यापूर्वी ती रिकामी करायला पाहरेकऱ्यांनी राजकुमाराला सांगितले. रात्री मधमाशांनी येऊन सर्व मडकी रिकामी केली.

तिन्ही परीक्षा देऊन त्यात यशस्वी झाल्यावर राजकुमार विश्वसुंदरीला जिंकून राजवाड्याकडे निघाला,

बुळा त्यावेळी किल्ल्याच्या एका बुरुजावर बसलेला होता. राजकुमार विश्वसुंदरीला घेऊन येत असलेला त्याला दिसला. राजकुमार जवळ आल्याबरोबर बुळा त्याला म्हणाला—"त्या विश्वसुंदरीला माझ्याकडे घेऊन ये."

दोघे पायऱ्या चढून बुरुजावर पोचले. बुळयाने लगेच विश्वसुंदरीचा हात धरला व तिला ओढून नेत म्हणाला–"चल आपण लग्न करू या."

विश्वसुंदरीने बुळयाचा हात झटकून आपला हात सोडवून घेतला आणि म्हणाला–"कोण रे तू? दुष्टा! दूर हो! मला जिंकून घेऊन येणाराशीच मी लग्न करणार."

ते ऐकून बुळा इतका रागावला की त्याने राजकुमाराला किल्ल्यावरून खाली खंदकात ढकलले आणि विश्वसुंदरीला म्हणाला–"तू बोल, आता तरी तू माझ्याशी लग्न करणार की नाही?"

विश्वसुंदरीने काहीच उत्तर दिले नाही. झपाझप पायऱ्या उतरून राजकुमार पडला होता त्याच्याजवळ गेली आणि आपल्या वेणीत खोवून ठेवलेली संजीवनी बूटी काढून राजकुमाराच्या अंगाला ती लावली. त्याबरोबर राजकुमार जिवंत झाला. त्याने डोळे उघडून तिच्याकडे पाहून विचारले–"इतक्या उंचावरून खाली पडलो तरी वांचलो कसा?"

"मी तुला जिवंत केले." विश्वसुंदरी म्हणाली.

"खरोखरच का, मेलो होतो आणि आता जिवत झालो? तर मी त्या दुष्ट बुळयाला दिलेल्या वचनाने आता बांधलेला नाही. मी राजाला जाऊन खरी गोष्ट सांगून टाकतो." असे सांगून राजकुमार विश्वसुंदरीला बरोबर घेऊन राजाकडे गेला आणि त्याला ते पदक दाखविले.

ते पाहून व सर्व प्रसंग ओळखून राजा म्हणाला–"त्या दुष्टाला मी आतांच्या आतां फांशी देतो."

परंतु तो बुळा त्याच्या आधीच कोठे तरी पळून गेला होता.

राजाने राजकुमाराचा राज्याभिषेक करून त्याचे विश्वसुंदरीशी लग्न करून दिले.





# पडकें देऊळ

[ १९ ]

[ शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांनी पडक्या देवळाच्या पुजाऱ्याच्या झोपडीला अचानक वेढा घालून नागमल्लीला बंधनमुक्त केले. पुजारी नागशिपाडाबरोबर जंगलात पळून गेला. नागमल्लीने शिखीमुखला वचन दिले की तो ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यातून परत येईपर्यंत ती लग्न करणार नाही. पुढे–]

जिवाजी आपल्या अनुयायांसह दुपारच्या सुमारास शबरांच्या वस्तीत येऊन पोचला. वाटेत त्याला सतत एका गोष्टीची काळजी वाटत होती, त्याच्या गैरहजेरीत त्या दुष्ट पुजाऱ्याने शबरांच्या वस्तीवर हल्ला करून नासधूस तर केली नसेल. परंतु वस्तीत पोचल्यावर तसे एकही संकट न आलेले कळले तेव्हां त्याच्या मनाचे समाधान झाले. त्याचे गांव सुरक्षित होते.

जिवाजीला विक्रमकेसरीचे वडील जयपाल यांनी पाठविलेल्या ताडपत्रातला मजकूर निश्चित होऊन वाचायला पुष्कळ दिवसांनंतर सवड मिळाली. त्या ताडपत्रात उल्लेखिलेल्या काही प्रदेशांची नावे वाचून झाल्यावर त्याला जयपालचे वडील विक्रमकेसरी यांना पुन्हा ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात कां जावे लागले त्याचा उलगडा होण्यास थोडी मदत मिळाली. त्याने दुसऱ्या खेपेस



ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यातील अनेक बेटा-तल्या वृश्चिक नावाच्या बेटात पोचण्या-साठीच प्रवास केला होता. त्याच बेटात ते प्रसिद्ध देऊळ आहे अशी जनश्रुती होती. त्या पडक्या देवळात अलोट धन व सोने तर होतेच, त्याशिवाय शिल्पकलेचे अत्युत्तम नमुने पण पुष्कळ आहेत असे लोक सांगत. विक्रमकेसरी ते शिल्पकलेचे नमुने आणून आपल्या राजवाड्याची शोभा वाढविणार होता.

विक्रमकेसरीने त्या ताडपत्रावर त्या पडक्या देवळापर्यंत जाण्याची वाट कोठून व कशी जाते, हे कळावे म्हणून मुख्य मुख्य खुणांचे वर्णन करून लिहून ठेवले होते. म्हणे, ते देऊळ कित्येक शतकांपूर्वी दम्यु नामक एका रानटी जातीच्या लोकांनी बांधलेले होते. निसर्गाच्या कोपामुळे व ब्रह्मपुत्र नदीला दरवर्षी येणाऱ्या पुरामुळे त्या बेटाच्या चारी बाजूचा प्रदेश पाण्याखाली बुडून जात असे. म्हणून कित्येक वर्षे त्या बेटात असे एखादे देऊळ असेल याची कल्पनाच कोणाला नव्हती. तरी दम्यु जातीतल्या काही वृद्ध मंडळींना त्या बेटा-संबंधी त्यांच्या वाडवडिलांनी सांगितलेल्या गोष्टी माहीत होत्या.

जिवाजीने त्या शेकडो ताडपत्रांतून पडक्या देवळाचे व त्या देवळापर्यंत जाणाऱ्या वाटेचे वर्णन ज्या ताडपत्रांवर होते ती ताड-पत्रे निवडून काढून विक्रमकेसरीला त्यावरचा मजकूर वाचून दाखविला आणि म्हणाला—"विक्रम! तुझे आजोबा प्रभू विक्रमकेसरी अजून जिवंत असतील असे मला वाटत नाही. ते वयाने माझ्याहून फार मोठे होते. या शिवाय ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यातल्या विषारी हवेत फार दिवस ते जगू शकले असतील असे मला वाटत नाही. तरी तू जाऊन आपल्या वडिलांना मी सांगितले ते सर्व वृत्त सांग. ते सर्व ऐकल्या-



नंतर त्यांना त्या प्रदेशात जावयाचे असेल तर आम्ही नकार देणारा नाही. तुला तिकडे पाठविण्याचे त्यांनी ठरविले तर तुझ्या मदतीला शूरसेन देशापर्यंतच नव्हे, तर ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात सुद्धा मी आपल्या मुलाला पाठविण्यास तयार आहे."

त्यानंतर विक्रमकेसरीने जिवाजीचे आभार मानले आणि सर्वांचा निरोप घेतला. दुसऱ्या दिवशी तो शिखीमुखला बरोबर घेऊन स्वदेशी निघाला. वाटेत चोर व लुटेरे किंवा पडक्या देवळाचा पुजारी यांपैकी कोणी विघ्न आणल्यास मदतीसाठी म्हणून जिवाजीने दोघां शूर शबर तरुणांना बरोबर पाठवून दिले.

वाटेत कोणतेही विघ्न आले नाही. लागोपाठ पंधरा दिवस प्रवास केल्यानंतर विक्रमकेसरी व शिखीमुख शूरसेन जय-पालच्या राजधानीत पोचले. शूरसेन जयपाल याने विक्रमकेसरीच्या तोंडून सर्व वृत्त ऐकून घेतले व म्हणाला—"कोणतेही संकट आले तरी त्याची फिकीर न करता ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात गेलेच पाहिजे व वृद्ध वडिलांना भेटून सर्व माहिती विचारून घेतली पाहिजे."



जयपालने आपला निश्चय कळविल्यावर त्याचे मंत्री व प्रमुख दरबाऱ्यांनी नम्र शब्दात स्वत: जयपालने त्या धोक्यात पाऊल न टाकता तरुण मंडळींवर ती जबाबदारी टाकावी असे सुचविले. उतार-वयात परदेश गमन धोक्याचे आहे असा त्यांनी सल्ला दिला. त्यांच्या शब्दाला मान देऊन जयपालने त्या कामाची जबाबदारी विक्रमसिंह आणि शिखीमुख दोघांवर टाकली.

विक्रमसिंहाच्या प्रवासासाठी आवश्यक सर्व तयारी झाली. विक्रमकेसरी व शिखीमुख यांच्या बरोबर दोघां शस्त्रास्त्र विद्येत कुशल अशा दोन तरुणांना पाठ-





विण्याचे ठरले. एके दिवशी उजाडताच सर्व जण ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात जाण्यासाठी तयार झाले. निघण्यापूर्वी जयपालने मोठ्या प्रेमाने शिखीमुखला आपल्या मुलाप्रमाणे मानून त्याला प्रेमाने आलिंगन दिले व त्याच्या गळ्यात एक गंडा बांधला. त्या गंड्याला एक पदक होते. ते जयपालच्या वडिलांनी ठेवलेल्या ताड-पत्रांच्या पेटीत होते. त्यावर काली मातेची मूर्त कोरलेली होती.

शिखीमुख व विक्रमकेसरी आपल्या दोघां साथीदारांबरोबर चार पांच महिने जंगलात व डोंगरात फिरत अनेक नद्या पार करीत कामाख्यापूर या गावी येऊन पोचले. तेथे काही दिवस विश्राम करून बरोबर वाट दाखवायला दोघां तिघांना घेऊन जावे म्हणजे दस्यु जातीच्या लोकांच्या वस्तीत सहजी पोचता येईल असे त्यांनी ठरविले. शूरसेन देशाच्या एका पंडिताने जयपालला त्याचे वडील त्या प्रदेशात काही दिवस रहात होते असे सांगितले.

विक्रमकेसरी व त्याचे साथी कामाख्यापुर येथे पोचल्यावर एका धर्मशाळेत उतरले. त्यावेळी त्या गावी देवीचा उत्सव चालू होता. त्या उत्सवात भाग घेण्यासाठी दहा बारा कोसावरच्या टापूतले लोक आले होते. त्यात निरनिराळ्या जातीतले लोक होते. ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यातली वाट दाखविण्यास त्यांच्या पैकी कोणी एखादा मनुष्य मिळाला तर बरे असे शिखीमुखला वाटले. त्या हेतूने तो विक्रमकेसरी व दोघां साथीदारांना बरोबर घेऊन देवीची जत्रा भरली होती तिकडे गेला.

गल्लीच्या दोन्ही बाजूला असंख्य दुकाने सजलेली होती. त्या दुकानातून हस्तीदंती वस्तू, संगमरमरी दगडूच्या उत्तमोत्तम मूर्ती, जनावरांच्या कातड्याच्या वस्तू आणि अशाच अनेक प्रकारच्या वस्तू दुकानात विकायला ठेवलेल्या होत्या. विक्रमकेसरी व त्याचे तिघे तरुण साथी मित्र त्या वस्तू पाहण्यात गर्क झाले. ते गल्लीच्या टोकाला आले. तेथे एक ज्योतिषी हत्तीचे कातडे अंथरून त्यावर मनुष्याची हाडे ठेवून बसलेला दिसला. येणाऱ्या जाणाऱ्यांचे त्याच्याकडे सहजी लक्ष जात होते. त्याची दाढी लांब होती व साधूसारख्या लांब केसांच्या जटा पण होत्या. त्याच्या कपा-ळाला लाल कुंकुवाचा टिळा होता.

शिखीमुखने व त्याच्या तिघा मित्रांनी त्याला एकदाच पाहिले व पुढे जाऊ लागले. इतक्यात त्या ज्योतिष्याने विक्रमकेसरीला बोटाने खुणाबून हाक मारली—"शूरसेन देशाचा केसरी नव्हेस का तू? थांब, सांगतो ते ऐक!"

आपले नाव घेऊन हाक मारणाऱ्या ज्योतिष्याकडे पहात विक्रम थबकला. त्याला हात दाखवणारे लोक विक्रमकेसरी व त्याच्या मित्रांकडे निरखून पाहू लागले.

शिखीमुख ज्योतिषी बसला होता त्या बाजूला दोन पावले टाकून म्हणाला—"ज्योतिषी बुवा! हात पाहून लोकांचे नांव सांगणारे ज्योतिषी मी पाहिले आहेत. परंतु तुम्ही चेहरा पाहूनच नाव व गाव ओळ-














खलेत. तुम्ही कधी आमच्या देशात राहला होता, वाटते?"

ज्योतिषी मोठ्याने व्यंग्य हास्य करून म्हणाला–"मी अघोरी आहे व ज्योतिष-शास्त्रात प्रवीण आहे. भूत, भविष्य व वर्तमान काळ मला तळ हातातल्या आवळ्यासारखा आहे. तुम्ही आल्या वाटेने परत जा. म्हातारा विक्रमकेसरी आतां या जगात नाही. उलट तुम्ही एक हजार वर्षे आयुष्य असलेल्या शक्तिशाली महा-पुरुषाचे वैर स्वीकारून स्वतःचा जीव कां धोक्यात घालून घेता? जिवंत परत जाता येणार नाही तुम्हांला लक्षांत ठेवा."

ते ऐकून विक्रमकेसरी तलवार उपसून त्याला गार करण्याच्या विचारात होता. पण शिखीमुखने त्याला मध्येच अडविले व हळूच म्हणाला–"विक्रम! घाई करू नकोस. आपण परमुलखात आहो. हा कपटी ज्योतिषी पुजाऱ्याचा साथी किंवा नोकर असावा. त्या दुष्टाकडूनच याला आपली ओळख मिळाली असावी. याचा अर्थ असा की तो दुष्ट याच गावी कोठे तरी असला पाहिजे. त्याची नजर सुरवातीपासूनच आमच्यावर होती, म्हणायची."

"मला सुद्धां तेच वाटत आहे. त्या दुष्टाची पीडा टळली असं मला वाटत होतं. आतां आपण या गर्दीत फिरणे धोक्याचे आहे. त्याचे नोकर दबा धरून आपल्याला असावध पाहून हल्ला करतील. चला, आपण धर्मशाळेत परत जाऊं या." विक्रम म्हणाला.

चौघे अर्ध्या तासाने धर्मशाळेत परत आले तेव्हां धर्मशाळेचा मालक त्यांना म्हणाला–"तुमचे गुरू तुमच्या खोलीतच उतरले आहेत व एक तास झाला, तुमची वाट पहात आहेत?"

ते ऐकून सर्वांना आश्चर्याचा धक्काच बसला. शिखीमुखाने सशंकित नजरेने



धर्मशाळेच्या मालकाकडे पाहून त्याला विचारले–"आमचे कोणी गुरू नाहीत. तो कोणी तरी लुच्चा लबाड असावा. तू त्याला आमची खोली दाखविलीस का?"

धर्मशाळेचा मालक घाबरून गेला व म्हणाला–"मी त्याला तुमची खोली दाख-विली खरी. तो काली मातेचा भक्त दिसतो आहे. तो म्हणाला की तो कोणत्यातरी देवळातला पुजारी आहे आणि तुमचा गुरू आहे."

"ठीक! त्याच्या समाचाराला आम्ही जातो तू आमच्या खोलीतून कोणाचे ओरडणे ऐकू आले तर अर्धा तासभर तरी कोणाला तिकडे येऊ देऊ नकोस." असे सांगून शिखीमुख घाई घाईने जिना चढून वरच्या मजल्यातल्या त्यांच्या खोलीकडे गेला. बाकी तिघे त्याच्या मागून झपाझप पावले टाकीत गेले.

विक्रमकेसरीने जी खोली भाड्याने घेतली होती तिचे दार सताड उघडे होते. शिखीमुखने दारात पाऊल टाकताच सर्वांत प्रथम पुजाऱ्याला पाहिले. पुजारी एक लहानशी लाकडी पेटी एक सुरी घेऊन फोडण्याचा प्रयत्न करीत होता. शिखी-मुखला दारात उभा पाहून व्यंग्य हास्य



करीत तो म्हणाला–"शिखी, तू कसा अगदी वेळेवर आला आहेस बघ! बरं झाले. तू आणि तुझे साथी दरवाज्यातच थोडा वेळ थांबा. ही लहानशी पेटी उघ-डायला मी आपल्या मंत्रशक्तीचा प्रयोग करण्यापेक्षां या सुरीने ती फोडावी म्हणतो."

शिखीमुख दरवाज्यातच थबकला.

त्याच्या पाठीमागे उभे असलेल्या दोघां क्षत्रिय तरुणांना खुणेने दारावर चांगले लक्ष ठेवायला सांगून दोन पावले खोलीत टाकून पुजाऱ्याला म्हणाला–"पुजाऱ्या! तुला वाटत असेल की या पेटीत तुला पाहिजे असलेला नकाशा असेल. पण ते

ताडपत्र त्यात नाहीत. हे पहा, विक्रमकेसरी नेहमी ते बरोबर घेऊन हिंडतो आहे. पुढे येऊन मागून कां घेत नाहीस? तो देईल."

विक्रमकेसरीने आपल्या कोटाच्या आत ठेवलेले एक मोठे ताडपत्र दाखविले. पुजाऱ्याने ते पाहिले व रागाने दांत ओठ चावून म्हणाला–"अस्सं! म्हणजे मी त्या ताडपत्राची त्याच्याजवळ भीक मागू म्हण-तोस? बरं तर मागतो, पण तोंडाने नाही, या खंजिराने." असे म्हणत त्याने तो खंजीर विक्रमकेसरीच्या अंगावर फेकला.

विक्रमकेसरी प्रथमपासूनच सावध होता. म्हणून शिखीमुखला त्याने खांदा धरून खाली बसविले व स्वतः पण बसला. म्हणून पुजाऱ्याचा वार चुकला आणि सुरा दरवाज्यात खुपसला गेला. शिखीमुखने पुजाऱ्याला पकडण्यासाठी उडी मारली. परंतु खोलीचा मागचा दरवाजा उघडून पुजाऱ्याने माडीवरून खाली उडी मारली. शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांना त्याच्या जवळ जायला थोडा उशीर झाला. त्यांना वाटले की वरून खाली उडी मारल्यावर तो हात पाय मोडून घेईल. परंतु खाली उभा असलेला नागगिधाड जणुकाही त्याला वरच्यावर अलगद झेलण्यासाठी उभाच होता. त्याप्रमाणे त्याने त्याला अलगद धरले पण. त्याने खाली तयार ठेवलेल्या एका घोड्यावर पुजाऱ्याला बसविले व तो स्वतः दुसऱ्या घोड्यावर बसला.

शिखीमुख लगेच मागे वळला आणि ओरडून दोघा क्षत्रिय तरुणांना म्हणाला–"अजित व वीरभद्र! तुम्ही दोघे त्या पळणाऱ्या दुष्टांमागे पळा व शक्य तर त्यांना पकडा.

ते दोघे धावत धावत खाली गेले.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# गुपित

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"तू हे इतके कष्ट सहन करीत आहेस, याचे काही तरी गुप्त कारण असावे असे दिसते. परंतु काही गुप्त गोष्टीत धोका असतो. उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी अवंती येथे चंद्रसेन नावाचा राजा होता. त्याच्या राणीचे नाव प्रभा-वती असे होते. दोघे स्वभावाने उदार व दानी होते. त्यांना सर्व ऐश्वर्य व सुख प्राप्त होते. परंतु त्यांना मूल बाळ नव्हते. त्यांना भेटण्यासाठी साधू व बैरागी येत. चंद्रसेन राजा आपल्या दुःखाचे कारण

वेताळाच्या गोष्टी












त्यांना सांगे. परंतु एकाच्या ही कृपेने त्याला पुत्रप्राप्ती झाली नाही.

एकदा एक साधू राजाच्या दर्शनार्थ आला. राजा व राणी त्याला सामोरे गेले. त्यांच्याकडे पाहून तो साधू स्वतःच म्हणाला–"तुम्ही दोघं अपत्य नसल्यानें दुःखी दिसता आहां. गादीला वारस नसल्याचे दुःख राजाला आहे तर कोड-कौतुक करायला मुलगी नाही म्हणून राणी दुःखी आहे. मी तुम्हांला एक फळ देतो. राणीने स्नान करून काली मातेच्या देवळात जावे व मध्यरात्रीच्या वेळी हे फळ खाण्यापूर्वी तिने तिला पुत्र हवा की कन्या हे मनातल्या मनात मागून घ्यावे. ती इच्छील तसे अपत्य होईल." असे सांगून त्या साधूने राणीला एक फळ दिले.

अंतःपुरातच काली मातेचे एक देऊळ होते. त्या दिवशी रात्री राणी स्नान करून काली मातेच्यासमोर बसून मुलगा मागावा की मुलगी या विचारात मग्न झाली. परंतु ती एक निश्चय करू शकली नाही. इतक्यात रात्रीचे बारा वाजल्याची घंटा झाली. राणीने फळ खाऊन टाकले.

नऊ महिन्यानंतर राणीला एक मुलगा झाला. तिला परमानंद झाला. गादीला वारस जन्मला.

परंतु त्या दिवशी रात्री त्या आनंदावर दुःखाची छाया एकाएकी पडली. कारण मुलगा मध्यरात्रीच्या सुमारास मुलगी झाला. सकाळी उजाडल्यावर पाहतात तर मुलगी मुलगा झाली होती. रोज असेच होऊ लागले. रात्री जी मुलगी असे ती दिवसा मुलगा होई व रात्री पुन्हा मुलगी होई. तेव्हां राणीच्या लक्षात तिची चूक आली. तिने फळ खाण्यापूर्वी मुलगी व्हावी की मुलगा हे नक्की ठरवून मागून घेतले नव्हते. राणीने ते गुपित स्वतःजवळ राखून ठेवले.



राजाला वाटे की त्याला मुलगा झाला आहे. कारण राजा त्याला दिवसाच पहात असे. म्हणून राजाने त्याचे नाव विजय असे ठेवले आणि त्याला तो क्षत्रियोचित शिक्षण देऊ लागला. अशातऱ्हेने राजकुमार दिवसा विजय व रात्री विजया होऊन लहानाचा मोठा होऊ लागला. परंतु कोणाला त्याच्या जन्माचे गुपित कळले नाही.

एके दिवशी डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या लोकांनी येऊन राजाजवळ निवेदन केले की एक वाघ त्यांच्या वस्तीत शिरून त्यांना त्रास देतो आहे व महाराजांनी येऊन त्याची शिकार करावी. तेव्हां महाराज म्हणाले–"मी युवराजांना शिकार करण्यास पाठवून देतो. ते आता धनुर्विद्येत व खड्ग-विद्येत निष्णात झाले आहेत. परंतु आज-पर्यंत त्यांना शिकार खेळण्याची संधी कधी मिळाली नाही."

राजाच्या म्हणण्याप्रमाणे विजय आपली सर्व शस्त्रास्त्रे घेऊन रथात बसला व त्या प्रदेशात शिकारीला गेला. दिवसभर शिकार करण्यात गेला. सायंकाळ होण्या-पूर्वी विजयने वाघाची शिकार केली. नंतर आपल्या बरोबर नेलेल्या शिपायांबरोबर राजधानीकडे निघाला. सूर्यास्ताची वेळ होती. एक मदोन्मत्त हत्ती अचानक राज-



कुमाराच्या रथासमोर येऊन उभा राहला. त्याला पाहून बरोबरचे शिपाई घाबरून पळून गेले. हत्तीने विजयला आपल्या सोंडेने अलगद उचलून घेतले व जंगलात पळू लागला. विजय मोठमोठ्याने ओरडू लागला. त्याचे ते ओरडणे माणिकपूरचा राजकुमार वसंत याने दुरून ऐकले. तो त्या जंगलात शिकार करीत हिंडत होता. एका उंचवट्यावर एक राहुटी बांधून तो रहात होता विजयचे ओरडणे ऐकू आले तेव्हां त्याला तो आवाज एका बाईचा वाटला. कोणीतरी चोर किंवा लबाड कोणातरी गरीब असहाय स्त्रीला उचलून नेत असावा असा विचार करून वसंत उठला व हातात एक कट्यार घेऊन निघाला. त्याला दुरून एक हत्ती सोंडेत एका मनुष्याला उचलून पळत असलेला दिसला.

वसंत पळत टेकडीच्या पायथ्याशी गेला आणि त्याने आपल्या कट्यारीने हत्तीची सोंड कापून टाकली. सोंड कापली गेल्याने विजया झालेला विजय जमिनीवर पडला आणि हत्ती जंगलात पळून गेला. बेशुद्धावस्थेत असलेल्या विजयाला वसंत आपल्या डेऱ्यात उचलून घेऊन गेला.

विजया शुद्धीवर आल्यावर वसंतने विजया झालेल्या विजयला विचारले—"कोण तू? या जंगलात कशी काय आलीस व हत्तीने तुला कसे काय सोंडेने उचलून घेतले. तू कोणी राजकुमारी असावीस असे मला वाटते." वसंतने एका श्वासात सर्व प्रश्न विचारले.

विजया म्हणाली—"मी अवंतीपूरच्या राजाची राजकन्या आहे. वनविहारासाठी आल्ये होते. संध्याकाळी राजधानीकडे परत निघाल्ये. वाटेत हत्तीने मला उचलून घेतले. मला तुम्ही सोडविलेत, मी या ऋणातून कधी मुक्त होईन हे त्या परमेश्वरालाच माहीत."



"माझे नाव वसंत. माणिकपूरचा युवराज आहे मी. आपण दोघं लग्न करून, म्हणजे तू या ऋणातून अनायास मुक्त होशील." वसंत म्हणाला.

"मी लग्नाला तयार आहे. आपण आपल्या वडिलांची संमतीपण या विवाहास घ्यावी. चांगला मुहूर्त पाहून आपण अवंतीपुरला यावे. जवळपास कोठे तलाव किंवा नदी असेल तर सांगावे. मी आंघोळ करून घ्यावी म्हणते." विजया म्हणाली.

"जरा खाली वळणावर एक तळे आहे, तू आंघोळ करून ये. मी येथेच तुझी वाट पाहातो." वसंत विजयाला म्हणाला.

विजया निघून गेली. वसंत विचार करीत तिच्याशी आपले लग्न झाले तर आपले आयुष्य किती सुखाने जाईल असा मनातल्या मनात विचार करीत अंथरुणावर पडून होता. उजाडले तरी विजया परत आली नाही. वसंत घाबरला व तलावात आंघोळ करताना विजयला त्याने पाहिले.

"कोण रे तू? येथे आंघोळीला एक राजकन्या आली होती तिला पाहिलेस का तू?" वसंतने विचारले.

"कदाचित तू माझी बहीण विजया हिच्याविषयी विचारीत असशील. ती



थोडयाच वेळापूर्वी आपल्या लव्या जम्यासमवेत राजधानीला परत गेली. मी तिचा भाऊ आहे. आम्ही दोघं जुळी भावंडे आहो." विजय म्हणाला.

त्यानंतर वसंतशी थोडा वेळ गप्पागोष्टी करून व त्याचा निरोप घेऊन विजय ती टेकडी उतरून खाली आला. त्याच वेळी त्याला शोधत त्याचे शिपाई रात्रभर हिंडत होते ते भेटले. राजकुमार सुखरूप आहेत हे पाहून त्यांना आनंद झाला.

ते सर्व राजधानीकडे परत येत असता त्यांना दुरून एका असहाय स्त्रीचा आवाज ऐकू आला. विजयने आपला रथ त्या















बाजूला वळवला. कोणीतरी पुरुष एका स्त्रीला ओढून नेत असलेला दिसला. विजयने रथातून उडी मारून त्या पुरुषाचे डोके उडवले. ती स्त्री बेशुद्धावस्थेत असता विजय तिला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करीत होता. इतक्यात काही शिपाई धावत आले व विचारू लागले—"आमच्या राजकुमारीला काय झाले? आमच्या सेनापतीला कोणी ठार केले?"

शिपायांनी, ती माणिकपूरची राजकन्या असल्याचे सांगितले व असेही सांगितले की आपल्या वडील बंधूंच्या बरोबर ती शिकारीला आली होती. सेनापती बरोबर होते व ती दोघे शिकारीसाठी हिंडत हिंडत त्या बाजूला आली. रात्री राजकन्या ठिकाणावर पोचू शकली नव्हती.

"तुमचा हा सेनापती दुष्ट होता. राजकन्येवर बलात्कार करण्याचा प्रयत्न त्याने केला. तेव्हां राजकन्या ओरडली. मी येऊन राजकन्येचे रक्षण केले आणि या दुष्टाला यमलोकी पाठविले." विजय म्हणाला.

शिपायांनी बरोबर आणलेले पाणी राजकन्येच्या तोंडावर शिंपडले तेव्हां ती शुद्धीवर आली. तिने डोळे उघडून पाहिले व विजयला विचारले—"आपण कोण? आणि तो दुष्ट कोठे गेला?"

"तो दुष्ट आता या जगात नाही." विजय म्हणाला.

राजकन्या लवंगी म्हणाली—"तुम्ही वेळेवर येऊन माझे रक्षण केले नसते तर मी या दुष्टाच्या हातून आपला बचाव करू शकले नसते. या ऋणातून कशी उतराई होईल?"

"मी अवंतीपूरचा राजकुमार माझे नाव विजय. तू माझ्याशी लग्न करायला तयार झालीस की झाले." विजय म्हणाला.

लवंगीने मान खाली करून व स्मित करून आपला होकार दिला व म्हणाली—"माझे एवढे भाग्य कोठून असणार?"



"तर मग तू आपल्या घरी जाऊन आपल्या वडिलांना तसे सांग. त्यांनी मुहूर्त ठरवला की माझ्या बाबांना कळवा म्हणावे." असे सांगून विजय लवंगीला निरोप देऊन अवंतीपूरला परत आला.

घरी आल्यावर विजयने घडलेल्या गोष्टींपैकी एक गोष्ट देखील घरात सांगितली नाही. एका महिन्यानंतर माणिकपूरच्या राजाने अवंतीच्या राजाकडे लग्नपत्रिका पाठविली. पत्रिकेत माणिकपूरच्या राजकुमाराशी अवंतीपूरच्या राजकन्येचा व माणिकपूरच्या राजकन्येशी अवंतीपूरच्या राजकुमाराचा विवाह अवंतीपूर येथे होणार असल्याचा उल्लेख होता.

ती पत्रिका पाहून राजा घाबरून गेला व राणीला म्हणाला—"ही आनंदाची गोष्ट आहे की युवराजाचा विवाह माणिकपूरच्या राजकन्येशी होणार आहे. परंतु माणिकपूरच्या राजकुमाराशी लग्न करणारी राजकन्या आपल्याकडे कोठे आहे? ही चूक कशी काय झाली?"

चूक होण्याची शक्यता आहे हे राणीला वाटत होते, पण वस्तुस्थितीची पूर्ण माहिती विजयकडूनच कळणे शक्य होते. म्हणून राणीने जे गुपित राजापासून आजपर्यंत





लपवून ठेवले होते ते आज उघड करून सांगितले.

"म्हणजे आपण चांगलेच तोंडघशी पडणार! आतां या संकटातून सुटका कशी काय होणार? दिवसा पुरुष व रात्री बाई होणारा आपला मुलगा कोणाशी लग्न कसा करणार?" राजा काळजीत पडला.

आपल्या मूर्खपणाने हे सर्व घडले ही गोष्ट विजयच्या लक्षात आली. आता आपल्या आईवडिलांचा मान राखावयाचा असेलतर आत्मबलिदान हा एकच उपाय आहे. असा विचार करून विजय कालीमातेच्या देवळात गेला व देवी समोर डोके टेकून म्हणाला–"अंबे! तू मला जन्म देऊन माझ्या आई वडिलांना सुख देण्याऐवजी दु:खच दिलेस. माझा जन्म अशा तऱ्हेने व्यर्थ झाला आहे. म्हणून मी तुझ्या चरणां-वर आत्माहुती देत आहे." असे सांगून त्याने तलवारीने स्वत:चे डोके कापून देवीला अर्पण केले.

ठीक त्याच वेळी माणिकपुराचा राज-कुमार व राजकन्या अवंतीपुरला येऊन पोचले. त्यांना विजयची जन्मकथा कळली. दिवसा पुरुष होणाऱ्या स्त्रीवर प्रेम करून तिच्याशी लग्नं करण्याचे ठरवल्याबद्दल वसंतला स्वत:चा राग आला. परंतु लवंगीला तसा स्वत:चा राग आला नाही. उलट दिवसा काही वेळ का होईना त्याची पत्नी म्हणून राहून आपला जन्म सार्थक करता आला असता असे लवंगीला वाटले. तो कालीमातेच्या देवळात गेला असल्याचे तिला जेव्हां कळले तेव्हां ती तिकडे गेली. तेथे तिला विजयचे प्रेत दिसले.

"कालीमाते! मी ज्या पुरुषाला वरले तू त्याला आपल्या मांडीवर घेतलेस तर आता मला पण घे." असे म्हणत ती विजयच्या मृत देहाच्या हातातली कट्यार घेऊन स्वत:चा बळी देणार एवढ्यात कोणी-तरी तिचा हात वरच्यावर धरल्यासारखे तिला वाटले. त्याच वेळी तिला ऐकू आले– "मूर्ख मुली! अशी घाई करू नकोस! बोल, या मृत देहाला पुरुष करू की स्त्री करून जिवंत करू?"

वेताळने येथवर गोष्ट सांगून विचारले– "राजा! लवंगीने काय मागणे मागावे? विजय म्हणून की विजया म्हणून त्याला जिवंत करायला सांगावे? तिचे विजयवर प्रेम बसले होते त्यापूर्वी तिच्या भावाने विजयाशी विवाह करण्याचे नव्हते का ठरविले? भावासाठी तिने त्याग नको का करायला? स्वत:च्या स्वार्थासाठी तिने त्याला पुरुष रूप देण्यास देवीजवळ मागणे बरोबर होईल का? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

त्यावर राजा म्हणाला–"ही शंकाच मुळी मुळात चुकीची आहे. विजयाची गरज खरोखरी कोणाला उरली नव्हती. राणी समोरच ती लहानाची मोठी झाली होती. कन्येपासून मिळणारे सुख राणीला मिळाले होते. तिचे लग्न करून देऊन तिला सासरी कसे, पाठवायचे ही एकच एक काळजी तिला वाटू लागली होती. वसंतला फक्त रात्री स्त्री होणाऱ्या पुरुषाविषयी घृणा वाटू लागली होती. अवंतीच्या महाराजांना गादीला वारस म्हणून पुत्रप्राप्तीची इच्छा होती आणि लवंगी तर पतीकरितां आत्माहुती द्यायलाच तयार झाली होती. कालीमाता लवंगीला वर देणार होती, वसंतला नव्हे. म्हणून विजय म्हणूनच त्याला देवीने जिवंत करणे बरोबर झाले असते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# बैरागी

एक बैरागी होता. तो नेहमी तीर्थयात्रा करीत हिंडे. तो कोणाकडून पैसा घेत नसे. कोणी काही खायला दिले की तो तेवढ्यावर समाधान करून घेई. नाही तर उपवास करून दिवस काढी.

एके दिवशी मुसळधार पाऊस पडत होता. त्याचे सर्व अंग पाण्याने ओले चिंब झाले होते. तो एका गावी एका श्रीमंताच्या घराच्या ओसरीत जाऊन बसला.

घर मालकाने खिडकीतून बाहेर बैराग्याला ओसरीत बसताना पाहिले व ओरडला–"ऊठ तेथून, घाणेरडा! घाण वास येतो आहे तुझ्या अंगाला व कपड्यांना. सारी ओसरी घाण केलीस! ऊठ, चालता होतोस की नाही येथून?"

"शंकर, शंकर!" म्हणत बैरागी तेथून उठला आणि पावसात भिजत पुढे निघाला. जवळच्याच झोपडीच्या भिंतीला टेकून उभा राहिला व म्हणाला–"शंकर, शंकर!"

त्याचा आवाज ऐकून त्या झोपडीतला गरीब मनुष्य दिवा घेऊन बाहेर आला व म्हणाला–"पाऊस पडतो आहे, बाहेर! आत या तुम्ही!"

बैरागी झोपडीत गेला. त्या गरीब माणसाच्या बायकोने तिच्याकडे एक दोन फाटकी चिरगुटे होती ती आणून दिली व म्हणाली–"तुम्ही अंग पुसून घ्या व हे कोरडे धोतर नेसून उपरणे अंगावर घ्या." बैराग्याने त्याप्रमाणे केले आणि स्वस्थ बसून राहिला.

थोड्या वेळाने त्या गरीब माणसाची बायको त्याला खायला एक भाकरी व चटनी आणि थोडी पेज देत म्हणाली–"एवढ्या वर मिटेल तेवढी भूक मिटवून घ्या!"

"शंकर, शंकर!" म्हणून तो बैरागी खाऊन घेऊन फाटक्या चटईवर आडवा झाला.

दुसऱ्या दिवशी तो झोपून उठला. त्याने आपले कपडे पुन्हा घातले व त्या गरिबाने दिलेले कपडे काढून ठेवले आणि पुढे जायला निघाला. तेव्हां त्या गरीब माणसाने एक डबा आणून त्यात होते नव्हते ते सर्व पैसे काढून त्या बैराग्याला दिले व म्हणाला–"बैरागी बुवा! हे पैसे ठेवून घ्या! प्रवासात यांचा उपयोग होईल!"

त्यावर तो बैरागी "शंकर, शंकर!" म्हणाला आणि गरिबाने दिलेले पैसे पुन्हा त्याच डब्यात ठेवीत म्हणाला–"बेटा! मी पैसे घेत नाही!" आणि निघून गेला.



त्या गरिबाने तो डबा घरात उचलला. पण डबा पहिल्या पेक्षा जास्त जड वाटला. त्याने चकित होऊन डब्यातले पैसे हातात ओतले तेव्हां ते सर्व पैसे सोन्याचे झालेले त्याला दिसले.

"कोणी सिद्ध पुरुष दिसतो आहे हा!" तो गरीब आपल्या बायकोला म्हणाला.

"आणि हे कपडे पाहिले का? पहा नवे कोरे आहेत." बायको कपडे बाहेर आणून दाखवीत म्हणाली. तिने जी फाटकी चिरगुटे दिली होती, ती चांगली जरी काठी धोतरें व उपरणी झाली होती. तो ज्या फाटक्या चटईवर झोपला होता तिच्या जागी एक सुंदर गालिचा झालेला दिसला. त्या दिवसापासून त्या गरीब माणसाचे भाग्यच जणुकाही पालटले. त्याचे पडके झोपडे एक नवीन घर झाले.

शेजारच्या झोपडीत राहणाऱ्या गरिबाच्या घरात बदल झालेला त्या श्रीमंत माणसाच्या नजरेस आल्यासिवाय राहिला नाही. विचारपूस केल्यावर, ज्या बैराग्याला त्याने हाकलून घराबाहेर काढले होते त्याच्या कृपेनेच सर्व बदल झाल्याचे त्याला कळले.

तो एवढा मोठा सिद्ध आहे, हे मला नव्हते माहीत. मी चालून आलेली संधी










गमावून बसलो आहे, असा विचार करीत तो श्रीमंत मनुष्य तो बैरागी पुन्हा यावा असे देवाजवळ मागणे मागू लागला व त्याची वाट पाहू लागला.

एक वर्ष लोटले. पुन्हा पावसाळा सुरू झाला. पाण्यात भिजत तोच बैरागी श्रीमंताच्या घराकडे पहात व गेल्या वर्षी त्याला आलेला अनुभव आठवीत त्या गरीबाच्या घराकडे जाऊ लागला.

श्रीमंत गृहस्थाने बैराग्याला पाहिले व धावत जवळ जाऊन म्हणाला–"बैरागी बुवा! यावे! या पावसात तुम्ही जाणार तरी कोठे? आमच्या घरी येऊन ते पवित्र करावे."

त्याने त्या बैराग्याला घरात बोलावून नेले व त्याला अंग पुसायला व अंगात घालायला फाटके कपडे दिले. शिळी भाकरी, चटणी व पेज खायला देऊन म्हणाला–"खावे, बैरागी बुवा!"

बैराग्याचे खाणेपिणे झाल्यावर त्या श्रीमंताने बैराग्याला एक फाटकी चटई झोपायला दिली. उजाडताच बैरागी उठला. श्रीमंताने दिलेले कपडे सोडून ठेवले आणि स्वत:चे कपडे अंगात घालून निघाला. तेव्हां तो श्रीमंत मनुष्य हातात तांब्याचे पैसे घेऊन आला व बैराग्याला देत म्हणाला–"हे पैसे वाटेतल्या खर्चासाठी ठेवून घ्यावे."

"मी पैसे घेत नाही, बेटा!" असे सांगून बैरागी निघून गेला.

त्या श्रीमंताने आपल्या हातातल्या तांब्याच्या नाण्यांकडे निरखून पाहिले· तांब्याची नाणी जशीच्या तशीच होती. त्याने सोडून ठेवलेले फाटके कपडे व फाटकी चटई पण तशीच होती.

फरक पडला तो हाच की त्या श्रीमंताच्या भाग्याने त्याच्याकडे पाठ फिरविली. त्याला नुकसानच नुकसान सोसावे लागले आणि शेवटी त्याच्या हातात करवंटी आली.





# न्याय निवाडा

काश्मीरच्या गादीवर कित्येक वर्षे दुष्ट राज्यकर्त्यांच राज्य करीत होते. एकदा तेव्हां ब्राह्मणांनी एका गरीब ब्राह्मणाला गादीवर बसवून त्यालाच आपला राजा म्हणून मान्य केले. इ. स. २३७ मध्ये यशस्कर नावाचा एक व्यक्ती राजा झाला. त्याच्या कारकीर्दीत प्रजा सुखी होती.

यशस्करच्या कारकीर्दीत कोणी उपाशी राहाला तर राजाला त्याची बातमी कळविण्यासाठी अधिकारी नेमलेले होते. एकदा एका व्यक्तीने उपास केल्याची बातमी राजाला एका अधिकाऱ्याकडून कळली. यशस्करने त्याला आपल्याकडे बोलावून त्याचे कारण विचारले तेव्हां तो म्हणाला–"महाराज! एका काळी मीच या गावात श्रीमंत होतो. परंतु माझ्या भाग्याने पाठ फिरविली आणि माझ्यावर झालेले कर्ज फेडता फेडताच जवळ होते नव्हते ते सर्व मी घालवून बसलो. मला कर्ज देणाऱ्यांनी इतका त्रास दिला की मी आपले घरदार सर्व विकून टाकले. एका श्रीमंत व्यापाऱ्याने माझे घर विकत घेतले होते. मी, बायकोला स्वत:चे पोट भरायला काही असावे म्हणून विहीर तेवढी विकली नाही. गावातला एक माळी आपल्या पानाच्या मळ्यासाठी व दुसरा एक माळी आपल्या फुलबागेसाठी दोघे पाणी घेऊन जात व पाणी वापरल्याबद्दल थोडी रक्कम देत, त्यावर बायकोच्या पोटा पाण्याची तरतुद झाली होती. वीस वर्षांनंतर परदेशात चार पैसे जमा करून नुकताच परतलो तेव्हां बायको दुसऱ्याच्या घरी काम करून करून थकून गेलेली मला दिसली. मी बायकोला विचारले तेव्हां ती म्हणाली–"ज्या श्रीमंत व्यापाऱ्याने घर विकत घेतले होते तो तिला विहिरीवर पाऊल ठेवून देत











नाही. ती एकदां विचारायला गेली तेव्हां त्याने नोकरांकरवी मारहाण करून तिला हाकलून लावले. म्हणून तिला मजुरी करावी लागली. मला फार वाईट वाटले. मी अधिकाऱ्यांकडे गाऱ्हाणे नेले, पण सर्वांनी माझ्या विरुद्ध न्याय दिला. म्हणून मी आमरण उपवास करण्याचे ठरविले आहे. मला न्याय शास्त्राची माहिती नाही. पण मी इतके मात्र खरे सांगतो की मी घर विकले तेव्हां विहीर विकली नव्हती."

राजाने न्यायाधिशांना बोलावून चवकशी केली. सर्व म्हणाले–"या माणसाने आम्हांला बेजार करून सोडले आहे. याला न्याय निवाड्याची फिकीर नाहीं."

राजाने खरेदीखत मागवून खरेदीच्या अटी वाचून पाहाल्या. त्यात विहिरीसहित घर विकल्याचे स्पष्ट लिहिले होते. तरी राजाला वाटले की घर विकणाऱ्याच्या विरुद्ध काही तरी अन्याय झालेला आहे.

राजा आपल्या एका खास नोकराला बोलावून म्हणाला–"तू त्या व्यापाऱ्याच्या दुकानात जाऊन त्याच्या मुनिमाकडून वीस वर्षापूर्वीची खतावणी घेऊन ये. ती बही परत आणून देई पर्यंत ही राजमुद्रा ठेवून घ्यायला त्याला सांग."

नोकराने खतावणी आणून दिली. त्यात खरेदीखत लिहिणाऱ्याच्या नावे एक हजार दीनार खर्च लिहिलेले होते. राजाने ती गोष्ट न्यायाधिशांना दाखविली आणि खरेदी खत लिहिणाराला बोलावून विचारले तेव्हां तो म्हणाला–"खरेदीखत लिहितांना एक अक्षर बदलून मी लिहिले. 'विहिरी रहित'च्या ऐवजी 'विहिरी सहित' असे मी लिहून दिले.

राजा व इतर न्यायाधिकाऱ्यांनी त्या गृहस्थाला त्याचे घर व विहीर परत देवविली व व्यापाऱ्याला हद्दपारीची शिक्षा केली. (उरलेली गोष्ट पुढील अंकी)





# राजाचे वैराग्य

एका राजाच्या दरबारी एक पौराणिक रोज पुराण प्रवचन करीत असत. पुराण प्रवचन काही दिवस ऐकत राहल्यावर राजाला संसाराचा वीट आला न सर्वसंग परित्याग करून हरिभजनात पुढचे आयुष्य घालविण्याचे राजाने ठरविले. पौराणिक बुवाच आपल्याला मुक्तीचा मार्ग दाखवू शकतील असे राजाला वाटले, म्हणून त्याने पौराणिक बुवांना विचारले–"पौराणिक बुवा! मुक्तीचा मार्ग मला दाखवाल का?"

ते ऐकून पुराणिक बुवा नम्रपणे म्हणाले–"महाप्रभो! मी उदरपोषणार्थ पुराण प्रवचन करतो. संसाराच्या पाशातून मी स्वतः मुक्त नाही, मग मी आपणांला मुक्तीचा मार्ग कसा दाखवू शकेन."

ते ऐकून राजाला राग आला. म्हणाला–"याचा अर्थ असा की भवसागर मी पार केलेला तुम्हांला आवडत नाही, असेच ना? म्हणून तुम्ही खोटी बतावणी करीत आहां. तुम्हांला मुक्तीचा मार्ग चांगला माहीत आहे, पण तुम्ही तो मला दाखवायला तयार नाही. तर मग नीट ऐकून घ्या, मी बजावून सांगतो आहे, उद्यां तुम्ही मला मुक्तिमार्ग दाखविला नाही तर मी तुम्हांला नोकरी वरून काढून टाकीनच, तुमचा शिरच्छेद करण्याची आज्ञा पण देईन."

पुराणिक बुवा घाबरून गेले. ते उदास मनाने विचार करीत घरी गेले.

पुराणिक बुवांची मुलगी हुशार होती. तिने आपल्या वडिलांचा उतरलेला चेहरा पाहून कारण विचारले. पुराणिक बुवांनी दरबारात घडलेली गोष्ट तिला सांगितली. सर्व नीट ऐकून घेऊन मुलगी म्हणाली–"बाबा! एवढ्याशा गोष्टीसाठी इतकी काळजी करीत बसला आहां? उद्यां दरबारात पुराण वाचायला तुम्ही जाल











तेव्हां बरोबर मला घेऊन जा. मी राजाला बरोबर उत्तर देईन."

दुसऱ्या दिवशी दरबारात पुराणिकबुवां-बरोबर त्यांची मुलगी पण गेली. जातांना ती एक मोठे दोरखंड बरोबर घेऊन गेली. दरबार भरला होता. पुराणिकबुवांनी पुराणवाचन सुरू केले. त्यांची मुलगी एका खांबाजवळ जाऊन उभी राहली. आपल्या पायांनी खांबाला विळखा घालून स्वतःला त्या दोरीने बांधून घेतले आणि मोठमोठ्याने ओरडून रडू लागली.

ती मुलगी रडू लागल्यामुळे पुराणवाचनाच्या कार्यक्रमात विघ्न आले, सर्व जवळ येऊन विचारू लागले, एकाएकी असे काय झाले.

ती मोठमोठ्याने ओरडून सांगू लागली— "अहो मला सोडवा हो, मला सोडवा हो!"

लोकांनी दोरी सोडून तिला मोकळे केले. तरी तिने हाता पायांनी खांबाला घट्ट विळखा घालून धरले व ओरडत राहली— "मला सोडवा हो! मला सोडवा हो!"

राजाला राग आला. तो गादीवरून खाली उतरून आला व म्हणाला—"मूर्ख मुली! तूच घट्ट धरून बसली आहेस आणि तुला दुसरा कोण सोडवणार ग?" ते ऐकून पुराणिक बुवांची मुलगी मोठ मोठ्याने हसून म्हणाली—"महाराज! आपण दोघे ही मूर्ख आहोत. आपण आपले राज्य, अधिकार धन व वैभव या सर्वांना उराशी आवळून धरून बसला आहां आणि माझ्या बाबांना विचारता आहां की संसार पाशातून मुक्तीचा मार्ग कोणता? आपणाला खरोखरच या संसारातून मुक्त व्हायचं असेल तर आपल्याला 'नको' कोण म्हणणार?"

राजाला आपली चूक कळली व त्याने पुराणिक व त्यांची मुलगी यांची क्षमा मागितली.





# लांडगीण

एका गावी एक गरीब बाई रहात असे. तिला विठू व गणू नावाचे दोन मुलगे होते. तिला जोपर्यंत मोलमजुरी करणे शक्य होते तोपर्यंत तिने केली आणि अगदीच शक्य झाले नाही तेव्हां तिने भीक मागायला सुरवात केली. एकदा एका एकी ती मरण पावली. तिच्या पोरक्यामुलांना कोणी आधार नव्हता. त्या गावच्या एका श्रीमंत शेतकऱ्याने त्या दोघां मुलांना आपल्या घरी नोकरीला ठेवून घेतले. मोठा विठू गाई चरायला नेई व धाकटा गणू मेंढरे चरायला घेऊन जाई.

दोघां भावांच्या वयात तसा फारसा फरक नव्हता. पण स्वभावात फार फरक होता. मोठा धीट होता. धाकटा गणू थोडा भितरा होता. विठू जवळ एक चाबूक होता. त्या चाबकाचा आवाज फार मोठा होई. आवाज ऐकूनच जनावरे भीत. गणूने एका बांबूचा पावा करून घेतला होता. तो त्याच्यावर गोड गाणी वाजवी.

त्या शेतकऱ्याला दोन मुली होत्या. त्यांना आई नव्हती. म्हणून घर कामाची सर्व जबाबदारी मोठीवरच होती. ती स्वभावाने थोडी कडक होती. त्या दोघां मुलांना ती पोटभर खायला वाढीत नसे. पण तिला विठूच्या चाबकाची भीती वाटे. म्हणून ती गणूवर आपला सगळा राग काढी.

धाकटी मुलगी स्वभावाने बरी होती. ती मोठ्या बहिणीच्या नकळत दोघां भावांना काही तरी खायला देई. गणू पावा वाजवू लागला की ती ऐकत बसे.

मोठ्या बहिणीचे नाव होते दुर्गी व धाकटीचे होते सरला.

एकदा दोघे भाऊ सूर्यास्ताच्या सुमारास घरी निघाले तेव्हां धाकट्या भावाला एक मेंढरू कमी असल्याचे आढळून आले. त्यान



लहान तोंड करून मोठ्या भावाला भीत भीत ते सांगितले आणि म्हणाला–"आतां घरी गेल्यावर मालक आपली चामडी लोळवील.

मोठा म्हणाला–"घरी जायला थोडा उशीर झाला तरी चालेल. कोणी तरी लांडगा मेंढरू उचलून घेऊन गेला असावा. पावलांच्या खुणांच्या अनुरोधाने आपण लांडग्याचे घर हुडकून काढू या." त्या प्रमाणे ते निघाले.

"आपण लांडग्याला त्याच्या गुहेतून ठार करून आणू या, म्हणजे मालक रागावणार नाही. मेंढराच्या कातड्या पेक्षा लांडग्याच्या चामड्याची किंमत जास्तच असते." मोठ्या भावाने धाकट्या भावाला धीर दिला.

परंतु गणूला धीर होईना. तो म्हणाला–"नको बुवा! काळोख पडू लागला आहे, घरी जाऊ या."

विठूने चाबकाचा आवाज 'फाट' दिशी करून म्हटले–"लांडग्याला हुडकून काढल्या-शिवाय मी घरी येणार नाही."

एका एकी ते एका घरासमोर आले. त्या घरात लांडग्याच्या पावलांच्या खुणा नाहीशा झाल्या होत्या." येथे जंगलात कोणी तरी साधू रहात असावा. आपण त्याच्याकडे रात्रभर झोपू या." विठू म्हणाला आणि त्याने दाराची कडी वाज-विली. दार उघडले पण आत कोणी नव्हते आणि चूल जळत होती. मेंढराचे कातडे एका बाजूला पडलेले होते आणि चुलीवर मांस शिजत होते.

"हे आपल्या मेंढराचे मांस आहे, गणू! तो लांडगा दिसू तर दे, त्याचा चांगला समाचार घेतो." विठू म्हणाला.

"या घरात तो लांडगा कशाला असेल?" गणूने शंका केली.

"अरे आपण या घरात लांडग्याच्या पावलाच्या खुणा संपत असलेल्या नव्हत्या का पाहल्या?" विठू गणूला आठवण करून देत म्हणाला.

"मला भीती वाटते बुवा! आपण परत जाऊ या." गणू म्हणाला.

"माझ्या हातात चाबूक असेपर्यंत मला कोणाची भीती नाही. कमीत कमी मेंढराची किंमत वसूल करूनच येथून हलावयाचे." विठू गणूला म्हणाला.

"या घरात कोण राहतो आहे, कोणास ठाऊक? कोणी आपल्याला पाहीपर्यंत आपण कोठे तरी लपले पाहिजे." गणूने सुचविले.

विठूला पण तो सल्ला पसंत पडला. ते दोघे शिडी लावून माळ्यावर-चढून बसले.

थोड्या वेळाने एक लांडगीण दार उघडून आत आली. एक मोठी जांभई घेऊन तिने एकदां जोराने आपले अंग झाडले. त्याबरोबर ती एक सुंदर स्त्री झाली.

माळ्यावर चढून बसलेले दोघे भाऊ फटीतून ते दृश्य पाहून घाबरून थर थर कापू लागले. त्यांनी विचार केला की ही बाई लांडगीण होऊ शकते तर ही कोणीतरी मांत्रिक बाई असली पाहिजे.

त्या बाईने चुलीत लाकडे घातली आणि दिवा लावला. नंतर मातीच्या मडक्यातले शिजलेले मांस काढून खाऊ लागली. हे



पाहून दोघांच्या तोंडाला पाणी सुटले. त्यांना भूक पण लागली होती.

अचानक त्या बाईने माळ्याकडे पाहिले आणि म्हणाली–"आता या तुम्ही खाली."

आपण वर माळ्यावर बसलो आहो हे तिला कसे कळले, याचा विचार मनात येताच ते दोघे घाबरून थरथर कापू लागले. "घाबरू नका, माझे जेवण झाले आहे. आतां उरले आहे ते खाऊन घ्या तुम्ही!" ती बाई म्हणाली.

ती जे म्हणाली नाइलाजाने त्यांना त्या-प्रमाणे करावे लागले. म्हणून पहिल्याने विठू व त्याच्या पाठीमागून गणू खाली उतरले.



"तू आपल्या हातातला चाबूक पलीकडे कोपऱ्यात ठेवून दे." ती बाई म्हणाली. विठूने उलट तो घट्ट हातात धरला. परंतु तिने जोराने नुसता हात हालवल्याबरोबर विठूच्या हातातला चाबूक जाऊन कोपऱ्यात पडला. ती तरुण स्त्री स्मित करून म्हणाली–"मी म्हणते तसे वागलात तर तुमचे हितच होईल. बरं तर, आतां खाऊन घ्या."

"हे तर आमचेच मेंढरू आहे." विठू आपल्या धीरपणाची चुणुक दाखविण्यासाठीच जणुकाही म्हणाला.

"तू म्हणालास ते बरोबर आहे. मेंढरू चोरून आणणारी लांडगीण मीच आहे. परंतु तुम्ही दोघे माझा शोध काढीत येथवर आलात हे मात्र मला आवडले नाही. माझे गुपित तुम्हांला कळले आहे. पण आणखी कोणाला हे कळता कामा नये. तुम्ही सांगितलेत तर तुम्हांला मी जागचे हालू देणार नाही." ती बाई म्हणाली.

दोघे गप्प बसले.

"तुम्ही दोघे हुशार दिसतां. तुम्ही माझे गुपित कोणाला सांगितले नाही तर तुम्हांला मी मोठे बक्षिस देईन. हे सांगा की तुम्हांला सर्वात जास्त आवडणारी वस्तू कोणती?" त्या स्त्रीने विचारले.

"माझा चाबूक माझ्या फार आवडीचा आहे.." विठू म्हणाला.

"तर मग मी तुझ्या चाबकात मंत्रशक्ती घालून देते. कोणी तुझ्या इच्छेविरुद्ध काही करू लागला तर तू त्याला चाबूक दाखवून 'थांब!' असे म्हणालास की तो दगडाच्या मूर्तीसारखा जागच्या जागी उभा राहील. तू हालू लागायला सांगेपर्यंत त्याला हालता देखील येणार नाही. बरं तर या धाकट्याच्या आवडीची वस्तू कोणती आहे?" त्या बाईने विचारले.

"माझ्या आवडीचा हा पावा आहे." गणू म्हणाला.



"तर मग आज पासून तू पावा वाजवल्यावर, कोणी का असेना, त्याला तू म्हटल्याप्रमाणे वागावे लागेल. पण एक गोष्ट दोघे लक्षात ठेवा. या मंत्रशक्तीचा तुम्ही दुरुपयोग करता कामा नये. चांगल्या लोकांना कष्ट होणार नाही अशा तऱ्हेने या मंत्रशक्तीचा वापर केला पाहिजे. नाहीतर चाबकातली किंवा पाव्यातली मंत्रशक्ती नाहीशी होईल. आणखी एक गोष्ट लक्षात ठेवा. आज रात्रभर तुम्ही येथेच रहा आणि सकाळी उजाडण्यापूर्वी येथून निघून जा. या घरात सूर्यकिरणे येऊ लागल्याबरोबर मी लांडगीण होऊन जाईन. मी लांडगीण झाल्यावर तुम्ही माझ्या समोर आलात तर मी तुम्हांला फाडून खाईन. मी दिवसा लांडगीण होऊन तशीच वागते." ती बाई म्हणाली.

ते दोघे रात्री त्याच घरात झोपले व उजाडण्यापूर्वी तेथून निघून गेले.

रात्रभर ते घरी आले नव्हते म्हणून मालक त्यांना रागावत होता ते पाहून त्याच्या मोठ्या बहिणीला फार आनंद झाला. तो त्यांना म्हणत होता–"कोठे होता रे तुम्ही दोघे रात्र भर! बोला, चामडी लोळवतो एकेकाची." मालकाने मारहाण



सुरू केली असती तर ते पाहण्यात तिला गंमतच वाटली असती. पण धाकटी सरला घाबरून गेली आणि आपल्या खोलीत जाऊन तिने आतून दार बंद करून घेतले.

विठूने मालकाला काठी घेऊन येत असलेला पाहिले. त्याने आपला चाबूक जोराने झाडला आणि म्हणाला–"थांब!" ते ऐकताच त्याचा मालक दगडाच्या मूर्तीसारखा जागच्या जागी थांबला. त्याने मारायला उचललेला हात वरचा वरच राहून गेला. त्याचे पाय जमिनीला जणू काही चिकटून गेले होते.



"अरे, हे काय झालं मला?" मालक ओरडला. त्याचे तोंड बंद झाले नव्हते. त्याचे हात पाय हालत नव्हते, पण तोंडमात्र बंद झाले नव्हते.

"पहिल्याने हे वचन द्या की आम्हांला तुम्ही मारहाण करणार नाही, म्हणजे मी तुम्हांला हिंडू फिरू देईन." विठू म्हणाला.

"हा कसला मंत्र आहे रे? मी नाही देत वचन. मी तुझी चामडी लोळवतो पहा! तुझा गळा दाबून ठार करीन तुला." मालक म्हणाला.

"तरमग तू आहेस तसाच मी मंत्र काढून घेईपर्यंत उभा रहा." विठू म्हणाला आणि गणूचा हात धरून तेथून निघाला.

मालक घाबरला आणि म्हणाला–"अरे थांबरे बाबा! विठू मी शपथ घेऊन सांगतो, तुझ्या अंगाला मी हात लावणार नाही."

"आम्हांला विना कारण मारायला धावलास तर तुझी अशीच खोड मोडीन, लक्षात ठेव." विठू म्हणाला. नंतर तो म्हणाला–"ठीक तर हाल चाल कर!" त्या बरोबर तो हालचाल करू लागला आणि उडी मारून विठूच्या हातातला चाबूक काढायला पुढे धावला. ते पाहून गणू पावा वाजवू लागला. पाव्यावरचे गाणे ऐकून मालकाला दोघां भावांची सहानुभूति व प्रेम वाटू लागले. त्याच्या डोळ्यातून पाण्याच्या धारा वाहू लागल्या.

हे सर्व पहात दुर्गी जवळच उभी होती. म्हणाली–"बाबा! झालं काय तुम्हांला?"

"त्या बिचाऱ्यांना कोणी मारू नका! या रे मुलांनो, येऊन काय हवं ते मागून खा." मालक म्हणाला.

दोघे घरात गेले. त्यादिवशी मोठ्या मुलीने मुकाट्याने त्यांना पोटभर जेवायला वाढले. आजपर्यंत त्यांना कधी पोटभर खायला मिळाले नव्हते. दोघांचे जेवण-खाण झाल्यावर ते दोघे तेथून निघून गेले. त्यानंतर मालकाचा दुष्ट स्वभाव पुन्हा पहिल्यासारखा दुष्ट झाला.

"आज मला काय झालं आहे, हे माझे मलाच समजत नाही, मुली." मालक आपल्या मोठ्या मुलीला म्हणाला.

"मला वाटते की त्या विठूचा चाबूक व गणूच्या पावा मंत्रवलेले असावेत. त्या दोन्ही वस्तू दोघांच्या हातातून काढून घेऊन नाहीशा केल्या नाहीत तर ते नाचवतील तसे नाचावे लागेल. आपले घरदार आणि जमीन जुमला देखील ते आपल्या हातातून काढून घेतील." मोठी मुलगी म्हणाली.

नंतर मोठ्या मुलीने आपल्या बापाला सांगितले की ती विठूला फसवून त्याचा चाबूक काढून घेईल आणि धाकटी कडून गणूचा पावा काढून घेववील.

मोठ्या बहिणीने धाकट्या बहिणीला बोलावून जेव्हां ते सर्व सांगितले तेव्हां तिला फार आश्चर्य वाटले. पण बहिणीच्या म्हणण्याविरुद्ध काही करण्याची तिची छाती होईना. म्हणून तिने होकारार्थी नुसती मान हलविली.

दुसऱ्या दिवशी दुर्गी एक टोपलीभर खाण्याचे पदार्थ घेऊन दोघे भाऊ गुरे व मेंढरे चरायला घेऊन जात त्या खोऱ्यात














गेली आणि विठू बसला होता तेथे जवळ जाऊन व प्रेमाचा मोठा आव आणून त्याला म्हणाली—“विठू, आपल्या गावात थोडे का लोक आहेत, पण तुझ्यासारखा सुंदर व शूर एक देखील नाही, बघ! म्हणून तू मला जितका आवडतोस तितका दुसरा कोणी आवडत नाही.” असे म्हणत ती बरोबर आणलेले खाण्याचे पदार्थ एकेक करून विठूला खायला देऊ लागली.

दुर्गीचा कावेबाजपणा विठूच्या लक्षात आला नाही. तिने जे जे खायला दिले ते त्याने सर्व खाऊन टाकले.

“मी म्हणते ते ऐकून घेशील का? तू बाबांशी विनाकारण भांडायचे सोडून दे. मी तुझ्याशी लग्न करीन.” दुर्गी म्हणाली आणि विठूच्या ज्या हातात चाबूक होता तो हात आपल्या हातात घेतला. विठूने त्या हातातला चाबूक दुसऱ्या हातात घेतला.

“तुला मी मूर्ख आहे असे वाटले होय?” विठूने दुर्गीला विचारले.

“छे रे! असं काय बोलतोस विठू? तो चाबूक पहावा म्हणत होते मी! तुझ्या सारखाच एकदा सटकवून काय गंमत होते, मी पाहणार होते.” दुर्गा म्हणाली आणि प्रेमाचा आव आणून त्याच्या अंगाला बिलगून बसली व त्याच्या हातातला चाबूक आपल्या हातात काढून घेतला. जग जिंकल्यासारखे तिला वाटले व आनंदाने चाबूक एकदा वाजवून पाहिला. पण चाबकाचा आवाज झालाच नाही.

विठूने दुर्गीच्या हातातला चाबूक हिसकावून घेतला आणि रागाने म्हणाला—“आता तू येथून चालती हो. आज तू इतकी पक्वान्नं करून कशाला आणली होतीस हे मला कळले. या पुढे इकडे कधी आलीस तर पहा. एक चकार



शब्द मी तुझ्याशी बोलणार नाही. चालती हो!”

दुर्गी जसे खाण्याचे पदार्थ एक टोपले घेऊन आली होती तसेच एक टोपले भरून खाद्य पदार्थ तयार करवून सरला पण गणूकडे आली होती. तशी ती पूर्वी कित्येकदा त्याच्या कडे आली होती. पण त्या दिवशी ती गणूच्या अगदी जवळ चिकटून बसली आणि त्याला विचारले—“गणू! तुझ्यावर माझे आहे तसे माझ्यावर तुझे प्रेम आहे का?”

“तुला माहीतच आहे, दादावर माझे जेवढे प्रेम आहे तेवढेच किंवा त्याच्या पाठोपाठ तुझ्यावर आहे.” गणू म्हणाला.

“हा पावा मी मागितला तर तू तो मला देशील का?” सरलाने विचारले.

“तुला पाहिजे तर घे!” असे म्हणत त्याने पावा सरलाच्या हातात दिला.

परंतु पावा हातात घेऊन ती रडू लागली. गणूने तिला त्याचे कारण विचारले. पण तिच्या तोंडातून शब्दच उमटेना. शेवटी ती तो पावा गणूला परत देत म्हणाली—“गणू! मला याची गरज नाही. फक्त तुझ्या प्रेमाची परीक्षा घेण्यासाठीच मी तो मागून पाहिला. दुसरं काही कारण नाही.



याच्यात मंत्रशक्ती आहे, हे मला कळले आहे. तुलाच याचा जास्त उपयोग आहे.”

“हा पावा मंत्रवलेला आहे, हे तुला कसे कळले? गणूने तिला विचारले.

“माझे बाबा व ताई दोघांनी सांगितले.” सरला म्हणाली.

“तुला कळले तसाच हा पावा मंत्रवलेला आहे.” असे सांगून गणूने पाव्याच्या मंत्र-शक्तीचा प्रभाव कसा पडतो हे समजावून सांगितले.

गणूकडून सर्व ऐकून घेतल्यावर सरला म्हणाली—“मग मेंढरे चरायला घेऊन जाण्याची तुला गरजच नाही. या पाव्याच्या

चांदोबा



मंत्रबळाने तुला माझ्या बाबांकडून जे पाहिजे ते करवून किंवा वदवून घेता येईल. तू त्यांना तुझ्याशी माझे लग्न करून द्यायला कां सांगत नाहीस?"

"तुला हरकत नसेल तर मी कां नाही विचारणार?" असे सांगून गणू सरला बरोबर घरी निघाला.

ते दोघे घरी पोचण्यापूर्वीच दुर्गीने बापाला जाऊन घडलेले सर्व वृत्त सांगून टाकले होते. म्हणाली—"पाहायचं आहे आतां की सरला काय करते ती!"

इतक्यात समोरून गणू व सरला हातात हात घालून येत असलेले दिसले.

गणू मालकाला म्हणाला—"या पुढे मी तुमची मेंढरे चरायला नाही घेऊन जाणार! सरलाशी माझे लग्न करून द्या. आम्ही दोघांनी लग्न करायचे ठरविले आहे."

मालकाला राग आला. संतापाने त्याचे सर्वांग थरथर कापत होते. त्याच वेळी गणूने पावा वाजवायला सुरवात केली. मालकाचा सर्व राग कापरासारखा पार विरघळून गेला. स्वत: मुलीचा हात गणूच्या हातात देत म्हटले—"मी तुमचे लग्न करून देतो. दोघं सुखाने संसार करा, माझी पण तीच इच्छा होती."

"हे काय करता आहां बाबा?" दुर्गी मोठ्याने ओरडून म्हणाली. त्याच वेळी विठू तेथे आला व म्हणाला—"मी तुमच्या गाई आजपासून नाही नेणार चरायला. मी आणि माझा धाकटा भाऊ दोघे कोठे तरी जाऊन राहू." विठू आपल्या मालकाला म्हणाला.

"अरे पण तू जाणार कोठे? तुझ्या भावाचे लग्न मी सरलाशी करून देणार आहे." मालक म्हणाला.

"बरं तर मी एकटा निघून जाईन." मालक म्हणाला.

त्याच वेळी दुर्गी मोठ्याने पिसाळल्यासारखी ओरडली—"तुम्ही दोघे चालते व्हा. सरला! तू सुद्धा एका मूर्खाशी लग्न करणार असशील तर तू सुद्धा जा.

"होय, मी जाणारच आहे. मी यांच्याशीच लग्न करणार आहे. तुला काय त्याचे?" सरला म्हणाली.

"मी लांडगीण झाले तरी माझ्याशी लग्न करणार नाही. दुर्गी रागाच्या भरात मोठ्याने ओरडून म्हणाली.

दुर्गी ते म्हणाली त्याच वेळी बाहेर लांडग्याचे ओरडणे ऐकू आले. दुसऱ्या क्षणाला एक लांडगीण तेथे आत आली.

"मी देखील लांडगीण आहे, विठू तयार असेल तर मी त्याच्याशी लग्न करायला तयार आहे." लांडगीण माणसांच्या भाषेत म्हणाली. विठूने त्या लांडगिणीला ओळखले.

"मी तयार आहे!" विठू म्हणाला.

"तर मग मला पोटाशी धरून माझ्याशी बोल." लांडगीण म्हणाली आणि आपले पुढले पाय विठूच्या खांद्यावर टाकले.

विठूने धाडस करून तिला पोटाशी घट्ट आवळून धरले आणि आश्चर्य असे की ती लांडगीण एक सुंदर स्त्री झाली. ती म्हणाली—"विठू! तू मला शापमुक्त केले आहेस. एका मंत्र्याने मला मंत्र टाकून शाप दिला होता म्हणून मी लांडगीण झाले. मी रात्री लांडगीण व दिवसा मनुष्य होत होते. पूर्वी मी देखील या दुर्गीसारखीच कठोर स्वभावाची होते. हा शाप आणखी कोणावर उलटेपर्यंत मला मुक्ती नाही." असे म्हणत तिने एकदां दुर्गीकडे पाहिले व म्हणाली—"आज पासून लांडगीण होऊन जगणे तुझ्या नशिबी आहे. तुझा स्वभाव बदलत नाही तोंपर्यंत तुला शापमुक्ती नाही."

सर्वांसमक्ष दुर्गी एक लांडगीण झाली आणि पाहतां पाहतां रानात पळून गेली•



# रीत रिवाज

एकदा अर्काटचा नबाब ईस्ट इंडिया कंपनीच्या गव्हर्नर साहेबांना भेटण्यासाठी मद्रासला आला. दोघांचे परस्परांशी बोलणे चालू होते. त्यावेळी गव्हर्नर साहेबांची नजर नबाबाच्या बोटातल्या अंगठीवर होती. ती गोष्ट नबाबाच्या लक्षात आली. आपली अंगठी काढून गव्हर्नर साहेबांच्या हातात देत नबाब म्हणाला–"आपल्या बोटात घालून पाहता का जरा ?" गव्हर्नर साहेबांनी ती अंगठी घेऊन आपल्या बोटात घातली.

दोघांचे बोलणे संपल्यावर नबाब निरोप घेते वेळी म्हणाला–"तेवढी अंगठी परत देण्याची तसदी घेणार का ?"

"अंगठी एकदा बोटात आली की ती परत करण्याची रीत गोऱ्या लोकांमध्ये नाही ! पाहिजे तर अंगठीची किंमत मागून घ्या, मी द्यायला तयार आहे." गव्हर्नर स्मित करून म्हणाला.

नबाब काही बोलल्याशिवाय निघून गेला. पुढे एक दोन महिन्यांनी नबाबाने एक मोठी मेजवानी गव्हर्नर साहेबांना दिली. बोलावणे दोघां पति पत्नीस होते. गव्हर्नर साहेबांच्या पत्नीस नबाबाची बेगम जनानखान्यात बोलावून घेऊन गेली. मेजवानी संपल्यावर गव्हर्नर साहेब म्हणाले–"बरे तर येतो. आमच्या मंडळींना निघायला सांगा."

"आमच्या मुसलमान समाजात जनान्यात ज्या बाईला एकदा प्रवेश मिळतो तिला बाहेर पाठविण्याचा रिवाज नाही. त्या बद्दल दुसरी काही भेट देऊ." नबाब म्हणाला.

चतुर गव्हर्नर साहेबांनी बोटातली अंगठी काढून दिली आणि गव्हर्नर साहेबांच्या पत्नी स्मित करीत बाहेर आल्या.





# खोटी साक्ष

एका गावी एक श्रीमंत व्यापारी रहात असे. तो हिऱ्या माणकांचा व्यापार करी. त्याने जे धन वैभव संपादन केले होते त्यात इमानाचा पैसा फार कमी होता. भोळ्या भाबड्या लोकांना फसवून मिळवलेला पैसाच जास्त होता.

व्यापारी ज्या घरी रहात असे ते घर त्याचे वाडवडिलार्जित होते. त्याच्या घराला लागून एका शेतकऱ्याची जमीन होती. ती विकत घेण्यासाठी त्या व्यापाऱ्याने पुष्कळ प्रयत्न केला. ती जमीनदेखील त्या शेतकऱ्याला वाडवडिलार्जितच मिळाली होती. त्या श्रीमंत व्यापाऱ्याने मोठी रक्कम देऊन जमीन विकत घेतली असती तर तो विकायला तयार होता. कारण कमी किमतीत दुसरीकडे जमीन विकत घेऊन राहण्याचा त्याने विचार केला. पण तो श्रीमंत व्यापारी मोठी रक्कम द्यायला तयार नव्हता. म्हणून शेतकरी रागाऊन म्हणाला–"मला जमीन नाही विकायची, तुम्ही आलेत तसे चालू लागा."

व्यापाऱ्याला त्या गोष्टीचा राग आला. तो शेतकऱ्याला निरनिराळ्या प्रकारे त्रास देऊ लागला व शिवीगाळपण करू लागला. तेवढ्यावर त्याच्या मनाचे समाधान झाले नाही, त्या शेतकऱ्याला जास्त जास्त त्रास देऊ लागला.

एक दिवशी व्यापाऱ्याने कमलाकांत नांवाच्या आपल्या एका मित्राला बोलविले व म्हणाला–"माझा शेजारी शेतकरी मला फार त्रास देतो आहे. त्याला चांगली अद्दल घडावी असे काही तरी करावं, म्हणतो आहे मी. तो माझा शेजारी आहे. म्हणून त्याने माझ्या घरातले एक माणिक्य चोरून नेले असल्याचा त्याच्यावर आरोप लावून त्याच्यावर फिर्याद करावी म्हणतो.

श्री. का. शा. सोमण

तू साक्ष द्यावीस अशी माझी इच्छा आहे. साक्षीदाराशिवाय न्यायाधीश मी लावलेला आरोप कबूल करणार नाही. तुला ही खोटी साक्ष दिल्याबद्दल मी मोठें इनाम द्यायला पण तयार आहे."

आपल्याला फुकटात काही पैसे मिळत आहेत, मग कां सोडा, असा विचार करून कमलकांत खोटी साक्ष देण्यास कबूल झाला.

दुसऱ्या दिवशी व्यापाऱ्याने फिर्याद दरबारात नोंदविली. त्यात कमलकांत साक्ष म्हणून असल्याचा उल्लेख होता.

राजाने कमलकांतला बोलावून विचारले– "कायरे बुवा, या व्यापाऱ्याच्या घरचे माणिक्य शेतकऱ्याने चोरले ते खरे आहे का?"

कमलकांत म्हणाले–"होय महाराज! माझ्या डोळ्यादेखत त्याने ते माणिक्य चोरले."

"माणिक्य कसे काय होते?" राजाने विचारले.

कमलकांत तो प्रश्न ऐकून घाबरला. क्षणभर विचार करून बगलेत धरून ठेवली काठी काढून दाखवीत म्हणाला–"महाराज! बरोबर या छडी सारखे होते."

राजा मोठ्याने हसला आणि व्यापाऱ्याला म्हणाला–"काय हो, तुमच्याकडे इतकी मोठी माणिक्ये विकायला ठेवली आहेत वाटते?"

व्यापारी घाबरून जाऊन थर थर कापू लागला.

कमलकांत पुढे म्हणाला–"महाराज! एकदां माझ्या बाबांची छडी हरवली होती. तेव्हां बाबा म्हणाले होते अरे ती छडी म्हणजे एक माणिक्य होते, माणिक्य!"

व्यापाऱ्याची लुच्चेगिरी बाहेर आली. एका भोळसट माणसाकडून खोटी साक्ष देवविल्याबद्दल राजाने रागावून व्यापाऱ्याला कडक शिक्षा केली.





# वराची निवड

फार पूर्वी एका गावी एक विद्वान पंडित रहात असे. त्याने निरनिराळ्या देशांच्या विद्वान पंडितांना शास्त्रार्थ करून जिंकले होते. त्या विद्वान पंडिताला एक मुलगा होता. त्याचे नांव रामशास्त्री होते. तो पहिल्या नंबरचा मूर्ख होता. तो एक महामूर्ख असल्याचे सर्वांस माहीत होते. म्हणून त्याला कोणी मुलगी द्यायला तयार होईना.

आता या मुलाचे लग्न कसे व्हायचे, ही काळजी त्याच्या बापाला वाटू लागली. दूरच्या गावी एका पंडिताला एक मुलगी होती. तिच्याशी आपल्या मुलाचे लग्न झाल्यास बरे, असा विचार करून तो आपल्या काही मित्रांजवळ बोलला. त्याच्या मित्र मंडळींनी मुलीच्या वडिलांना भेटून पंडिताच्या मुलाचे स्थळ सुचविले.

मुलीच्या वडिलांना एक चांगले स्थळ चालून आल्यासारखे वाटले. त्यांनी मुलीला पहायला मुलाला घेऊन यावे असा निरोप मुलाच्या बापाकडे पाठविला. रामशास्त्री मुलीला पहायला निघाला. मुलीच्या भावंडांनी रामशास्त्र्याचे सर्व प्रकारे आदरातिथ्य केले. त्यांच्या घरी जे उत्तमोत्तम ग्रंथ होते ते आणून रामशास्त्र्याला दाखविले.

रामशास्त्र्याने एक पुस्तक उचलून विचारले–"हे कसले पुस्तक आहे?" त्यांनी जे उत्तर दिले ते ऐकून त्याला वाटले की कोणतातरी मोठा ग्रंथ असावा. असेच एका मागून एक ग्रंथ उचलीत त्याने शेवटी एक पुस्तक उचलून विचारले–"हे कसले पुस्तक आहे?"

"हे पुस्तक अलिखित आहे." मुलीचे भाऊ म्हणाले.

"अलिखित" शब्दाचा अर्थच रामशास्त्र्याला माहीत नव्हता. म्हणून त्याने विचारले–"कोणी लिहिला हा ग्रंथ?"

सौ. शारदाबाई गोडसे

तेव्हां मुलीच्या भावंडांना तो मुलगा महामूर्ख असल्याची साक्ष पटली. त्यांनी रामशास्त्र्याला परत पाठवून दिले.

* * *

एका राजाला एक मुलगी होती. ती लग्नाला योग्य झाली तेव्हां राजाने तिचा विवाह करून देण्याचे ठरविले.

"मी विचारीन त्याचे बरोबर उत्तर देणाऱ्याशी मी लग्न करीन" असे जाहीर करण्यास तिने राजाला सांगितले.

कित्येक राजकुमार तिच्याशी विवाह करण्याच्या हेतूने आले. त्यांना तिने प्रश्न केला :–

"मी एक सोपासा हिशोब विचारते. प्रश्न विचारल्या नंतर मी 'एक', दोन 'तीन' असे अंक मोजीन. तेवढ्या अवधीत जो कोणी बरोबर उत्तर देईल त्याच्याशी मी विवाह करीन. आता हिशोब ऐका. असे सांगून राजकुमारीने हिशोब विचारला– एका तलावात एका ऋषींनी एक कमळ लावले. दुसऱ्या दिवशी त्याची दोन कमळे झाली. अशा तऱ्हेने रोज पहिल्या दिवसाच्या कमळांच्या दुप्पट कमळे होऊ लागली. तिसाव्या दिवशी तलाव फुलांनी भरून गेला. तर अर्धा तलाव भरेपर्यंत किती दिवस झाले असतील?"

तो प्रश्न विचारून राजकन्येने 'एक' म्हटले.

एक जण म्हणाला–"पंधरा दिवसात!"

इतर लोक घाई घाईने हिशोब करून पाहू लागले की तीस दिवसात किती कमळे झाली असतील. व त्यांची अर्धी किती होतील?"

राजकुमारी म्हणाली–"दोन!"

"एकोणतीस दिवसात!" एक राजकुमार म्हणाला.

राजकुमारीने त्याला स्वयंवराची वर माळा घातली.






सत्यवतीने, ती नाव चालवीत असता पराशर मुनींच्या प्रेमाग्रहामुळे व तिला कशी पुत्रप्राप्ती झाली हे सांगून कृष्ण-द्वैपायन व्यास तेच तिचे व पराशरमुनींचे पुत्र असल्याचे मोठ्या कष्टाने व लज्जा-वनत होऊन सांगितले व म्हणाली–"माझ्या त्या मुलाने घोर तपश्चर्या करून वेदव्यास ही पदवी मिळविली. त्याच्या कृपेने भरत-वंशाचे रक्षण होऊ शकेल."

भीष्म त्या गोष्टीस कबूल झाला. सत्यवतीने स्मरण करताच कृष्णद्वैपायन व्यास मुनी प्रकट झाले आणि विचारू लागले–"माते! आज तू माझे कां बरे स्मरण केलेस? मी काय सेवा करू तुझी? तुझी आज्ञा शिरोधार्य आहे." सत्यवतीने स्मरण करण्याचे कारण सांगितले व व्यासांनी होकार पण दिला.

त्यानंतर सत्यवतीने अंबिकेला खूप समजावून सांगितले की तू उत्तमोत्तम वस्त्रालंकार करून तयार रहा. तुझे मोठे दीर तुझ्याकडे येतील त्यांच्या सेवेला तयार अस. त्यांच्या कृपेने तुला जे अपत्य होईल ते वंशवृक्ष वाढवील. अंबिका भीष्म येईल अशा अपेक्षेने वाट पहात होती. परंतु रात्री व्यास मुनी आले. त्यांची लांब दाढी, काळा रंग व लाल बुंद डोळे पाहून ती घाबरून गेली आणि तिने डोळे घट्ट बंद करून घेतले. म्हणून तिला जो मुलगा झाला तो आंधळा निघाला. तोच राजा धृतराष्ट्र म्हणून प्रसिद्ध झाला.



त्या आंधळ्या मुलाला पाहून सत्यवतीला फार वाईट वाटले. तिने पुन्हां व्यास मुनींचे स्मरण केले. या खेपेस ती अंबालिकेला म्हणाली–"एक मुनी तुझ्याकडे येतील. त्यांच्या कृपेने तुला पुत्रप्राप्ती होईल व वंशवृद्धी होईल.

रात्री व्यास मुनी आले तेव्हां अंबालिकेने डोळे बंद केले नाहीत. पण त्यांचे तेजस्वी रूप पाहून ती इतकी भ्याली की भीतीने ती नखशिखांत पांढरी फट्ट झाली. म्हणून तिला जो मुलगा झाला तो निस्तेज व फिक्कट रंगाचा झाला. म्हणून त्याचे पांडु हे नाव पडले.

सत्यवतीच्या मनाचे समाधान झाले नाही. तिने पुन्हां व्यास मुनीचे स्मरण करून या खेपेस अंबिकेला बजावून सांगितले की असला भितरेपणा करून कसे चालेल? अंबिकेने होकार दिला. परंतु व्यास मुनींच्यासमोर येण्याची छातीच तिला झाली नाही. तिने स्वतः न जातां आपल्या खेलीत आपल्या दासीला पाठविले. त्या दासीला जो मुलगा झाला तोच विदुर.

धृतराष्ट्र, पांडु व विदुर तिघे लहानाचे मोठे होऊ लागले. भीष्माने राज्यकारभार संभाळला आणि त्याच्या कारकीर्दीत प्रजा सुखी झाली. त्याने तिघांना क्षत्रियोचित वेदवेदांग व शस्त्रास्त्रविद्या शिकविण्याची व्यवस्था करून दिली. तिघांत धृतराष्ट्र शरीराने बलवान होता. पांडु धनुर्विद्येत निष्णात होता तर विदुर नीतिशास्त्रात प्रवीण होता.

राजकुमार मोठे झाल्यावर एकाचा राज्याभिषेक करावयाचा होता. विदुर दासीपुत्र होता. धृतराष्ट्र जन्मांध होता. म्हणून त्या दोघांचा राज्याभिषेक करणे शक्यच नाही असे समजून भीष्माने पांडूचा राज्याभिषेक केला.



हे राजपुत्र विवाह योग्य झाल्यावर त्यांच्यासाठी योग्य राज्यकन्या शोधून आणण्याचे भीष्माने ठरविले. गांधार देशाचा राजा सुबल याला गांधारी नावाची एक मुलगी होती. तिला शंभर पुत्र होतील असा वर शंकराकडून मिळाला असल्याचे भीष्माचार्यांना कळले. म्हणून त्यांनी सुबलकडे काही ब्राह्मणांना पाठवून धृतराष्ट्राचा विवाह तिच्याशी करून द्यावा अशी विनंती केली. धृतराष्ट्र जन्मांध आहे ही गोष्ट सुबलला माहीत होती. परंतु मुलगी मोठ्या घराण्यात पडणार आहे याचा विचार करून त्याने धृतराष्ट्र गांधारी विवाहास संमती दिली. आपला पति आंधळा असल्याची गोष्ट गांधारीला कळली तेव्हां तिने स्वतःच डोळ्यांना पट्टी बांधून घेऊन अंधत्व स्वीकारले. स्वेच्छेने गांधारीचा भाऊ शकुनी याने तिला हस्तिनापूरला नेऊन तिचा विवाह धृतराष्ट्राशी करून दिला. त्यानंतर काही दिवस भीष्माचार्यांचे आतिथ्य स्वीकारून शकुनी स्वदेशी निघून गेला.

आता पांडूच्या विवाहाचा प्रश्न होता. भीष्माचार्यांना कळले की कुंती नामक एक योग्य यादव कन्या आहे. यादव वंशाचा



प्रमुख शूर हा वसुदेवाचा पिता. त्याला पृथा नावाची एक मुलगी होती. शूरचा आते भाऊ कुंतिभोज याला मूलबाळ नव्हते. म्हणून त्याने पृथालाच दत्तक घेऊन आपल्या घरी वाढविले. कुंतिभोज राजाकडे जी पाहुणे मंडळी येत त्यांच्या आदर सत्काराची सर्व जबाबदारी पृथेवर होती. एकदां दुर्वास ऋषी कुंतिभोज राजाकडे अतिथी म्हणून येऊन काही दिवस राहले. पृथेने सर्वप्रकारे त्यांची बडदास्त राखली. म्हणून दुर्वास ऋषींनी खूष होऊन एक मंत्र शिकविला व म्हणाले–"मुली! तू हा मंत्र म्हणून ज्या देवाचे स्मरण करशील



तो प्रकट होईल व तुला त्याच्या पासून पुत्रप्राप्ती होईल."

पृथेने मंत्रबळ खरे आहे की खोटे हे पाहण्यासाठी मंत्र म्हणून सूर्याचे स्मरण केले. लगेच सूर्य प्रकट झाला. पण पृथेने पुत्रप्राप्तीची इच्छा व्यक्त केली नाही. तरी सूर्यापासून तिला एक पुत्र झाला. जन्मताच त्याला कवच व कुंडले होती. कुंती घाबरली. तिने त्या मुलाला एका पेटीत ठेवून ती पेटी नदीत सोडली. ती पेटी एका सूताच्या हाती लागली. त्याने ती पेटी उघडून पाहिली तर त्यात एक सुंदर मुलगा होता. त्याने त्या मुलाला आपली बायको राधा हिच्या हातात देऊन तिचे पालन पोषण करण्यास सांगितले. हाच मुलगा पुढे कर्ण म्हणून प्रसिद्ध झाला.

परंतु कर्णाच्या जन्माची गोष्ट कोणालाच माहीत नव्हती. कुंतिभोज राजाने त्या-नंतरच कुंतीच्या स्वयंवराची तयारी सुरू केली. त्या स्वयंवराला पांडु पण इतर राजकुमारांबरोबर हजर होता. कुरुवंशी पांडु दिसायला सुंदर व देखणा होता. म्हणून कुंतीने त्यालाच स्वयंवराची माळा घातली. कुंतिभोज राजाने दोघांचा विवाह थाटामाटाने करून दिला आणि अहेर म्हणून अनेक मूल्यवान वस्तू व गाई, घोडे आणि हत्ती देऊन वधुवरांस हस्तिनापुरी पोचते केले.

कुंती व पांडु यांचा विवाह झाल्याने कुरुवंशाच्या राजधानीत सर्वत्र आनंदी आनंद पसरला. भीष्माचार्यांनी पांडूच्या आणखी एका विवाहाची व्यवस्था करून ठेवली होती. मद्रदेशाचा राजा शल्य याने भीष्माचार्यांच्या इच्छेला मान देऊन माद्री नावाच्या आपल्या बहिणीचा विवाह पांडूशी करून देण्याचे कबूल केले. त्यांच्या देशाच्या पद्धतीप्रमाणे त्याने कन्याशुल्क मागितले. भीष्माचार्यांनी ते कबूल केले. भीष्मा-



चार्यांनी मद्र राजाला सोने, हिरे व रत्न माणिक्ये, निरनिराळ्या प्रकारची वाहने आणि इतर मूल्यवान वस्तू उपहार देऊन खूप केले. त्यानंतर हस्तिनापुर येथे शल्याने येऊन आपली बहीण माद्री हिचा विवाह पांडूशी करून दिला. पांडू आपल्या दोघां पत्नींसह सुखाने संसार करू लागला.

काही दिवस सुखाने संसार केल्यावर पांडूच्या मनात दिग्विजय करण्याची इच्छा उद्भवली. त्याने चतुरंग सैन्य उभे करून दिग्विजयाला सुरवात केली. निघते वेळी त्याने भीष्माचार्य वगैरे वडील कुरुवंशी-यांना व ब्राह्मणाना नमस्कार केला व त्यांचा आशीर्वाद घेऊन निघाला. त्याने एका मागून एक अनेक देश जिंकले. त्याने मगध राज्यावर स्वारी करून तो देश जिंकला. मगधचा राजा युद्ध करीत असतां मरण पावला. काशी, पुंड्र इत्यादि देश जिंकीत तो हस्तिनापुरला परत आला. भीष्माचार्यांनी आपल्या शूर पुतण्याचे प्रेमाने स्वागत केले. दिग्विजय करीत असता पांडूने अनेक देशातून जे धन व वैभव संपादिले होते ते त्याने आपली आजी सत्यवती, काका भीष्म आणि भाऊ धृतराष्ट्र व विदुर यांना वांटून दिले. सर्वांस आनंद झाला. जो धनलाभ झाला त्याच्या आधारे धृतराष्ट्राने अनेक अश्वमेध यज्ञ केले.

त्यानंतर राजा पांडु आपल्या दोघां राण्यांना बरोबर घेऊन विहार करण्यास हिमालय पर्वतावर गेला. पांडू हिमालयातच अनेक दिवस राहिला. त्याला आवश्यक असलेल्या सर्व वस्तू धृतराष्ट्र पाठवीत असे.

तिकडे हस्तिनापुर येथे भीष्माचार्यांनी विदुराचा विवाह देवक नामक राजाच्या मुलीशी करून दिला.

एकदा व्यासमुनी धृतराष्ट्राच्या घरी आले. त्यावेळी त्यांना फार भूक लागली होती. गांधारीने सर्व प्रकारे त्यांचा आतिथ्य सत्कार करून त्यांना खूष केले. व्यासमुनींनी प्रसन्न होऊन वर मागण्यास गांधारीस सांगितले. गांधारीने पतीसारखे गुणी शंभर पुत्र होवोत असा वर मागितला. त्या प्रमाणे व्यासमुनींनी तिला तो वर दिला.

काही काळ लोटल्यावर गांधारी गरोदर झाली. ती दोन वर्षे गरोदर होती. त्याच वेळी कुंतीला युधिष्ठिर नांवाचा मुलगा झाला असल्याचे तिला कळले. व्यासमुनींनी वर दिला असूनही कुंतीच्या आधी तिला मुलगा झाला नाही असा विचार करून ती फार दुःखी झाली. तिने आपल्या पतीचा सल्ला घेतल्या शिवाय आपले पोट बडवून घेतले. गर्भस्राव होऊन पिंडाचे अनेक तुकडे झाले. ते फेकून देण्याचा विचार तिच्या मनात आला. त्याच वेळी व्यासमुनी धृतराष्ट्राला भेटायला आले होते. त्यांना ती गोष्ट कळली तेव्हां त्यांनी गांधारीला रागावून विचारले—"तू हे काय केलेस व आतां पुढे काय करण्याच्या बेतात आहेस?"

गांधारी रडत म्हणाली—"आपण मला शंभर पुत्र होतील असा वर दिला होता. मी दोन वर्षे गरोदर होते, पण मूल झाले नाही. तिकडे पांडूची बायको कुंती हिला



एक सुंदर मुलगा झाल्याचे मला कळले. त्याचे मला इतके दुःख झाले की मी आपल्या गर्भावरच प्रहार केला. आपण दिलेल्या वराचा परिणाम मला माहीत नाही, पण हे पहा माझ्या पोटातल्या गोळ्याचे हे तुकडे झाले आहेत."

"माझा वर कधी व्यर्थ होत नसतो." असे सांगून व्यासमुनींनी त्या गर्भपिंडाचे सर्व मांसखंड थंड पाण्याने धुवून काढले. ते शंभर मांसखंड होते. ते त्यांनी तुपात ठेवविले. ते पाहून गांधारीने व्यासांना विचारले—"हे शंभर मांसखंड म्हणजे शंभर मुले का? मग मला एक मुलगी पण

देण्याचा अनुग्रह करावा. मुलीच्या मुलां-कडून देखील पुण्यलोकाची प्राप्ती होते, असे मी ऐकले आहे."

व्यासमुनींनी गांधारीची ती इच्छा पुरी होण्यासाठी आशीर्वाद दिला. त्या शंभर तुकड्यांचे एकशे एक तुकडे करून त्यांनी ते तुपात निरनिराळ्या भांड्यात ठेवले आणि व्यासमुनी निघून गेले. एका वर्षाने एका भांड्यातून पहिला मुलगा जन्मला. तो जन्मताच अनेक अपशकुन झाले. ते पाहून धृतराष्ट्र राजा घाबरला. त्याने भीष्माचार्य, मंत्री, पुरोहित इत्यादिकांस बोलावून विचारले–"आमच्या कुळात सर्वात प्रथम युधिष्ठिर जन्मला. मग या मुलाचा राज्याभिषेक होण्याचा योग आहे की नाही ?"

सर्व वडीलधारी मंडळी म्हणाली–"महा-राज, या मुलाच्या जन्मापासूनच अपशकुन होऊ लागले आहेत. हा वंशनाश करणार असे आम्हांला वाटते, याचा आपण त्याग करावा. आपणांला शंभर मुले होतील त्यांतला एक कमी झाला म्हणून काय झाले?" विदुराचे पण तेच मत होते. परंतु पुत्रप्रेमवश धृतराष्ट्राने त्यांचा तो सल्ला मानला नाही.

अशाप्रकारे सर्वात प्रथम जन्मला तो दुर्योधन होय. त्यानंतर क्रमाने दु:शासन, दु:सह वगैरे शंभर मुलगे आणि दुश्शला नावाची मुलगी झाली.

गांधारी गरोदर होती तेव्हां आपल्या सेवेला धृतराष्ट्राने एका वैश्य स्त्रीला नेमले होते. दुर्योधन आदिक ज्या वर्षी जन्मले त्याच वर्षी त्या स्त्रीला धृतराष्ट्रापासून युयुत्सु नावाचा मुलगा झाला.

धृतराष्ट्राने आपल्या शंभर मुलांना क्षत्रियोचित शस्त्रास्त्र विद्या शिकवून व त्यांच्या विद्याभ्यासाची व्यवस्था करून देऊन योग्य वेळी योग्य कन्यांशी त्यांचा विवाह करून दिला.





# लोणचें चोर

एका गावी एक शिक्षक रहात असे. तो गावातल्या सर्व मुलांना शिकवी. त्या शिक्षकाला शिकवणीचे जे पैसे मिळत त्यावर त्याचा उदरनिर्वाह चालत नसे. कारण त्याला दहा मुले होती. एवढ्या मोठ्या कुटुंबाचा खर्च शिकवणीवर निघत नसे.

गावात एक कुळकर्णी होते. घरचे चांगले सुखवस्तू होते. मनात आले असते तर त्यांना त्या गरीब शिक्षकाला मदत करणे शक्य होते. पण ते स्वभावाने चिक्कू मारवाडी होते. म्हणून ते कोरडी सहानुभूती दाखवीत. कुळकर्ण्यांची आई ऐंशी वर्षांची म्हातारी होती. चिक्कूपणात ती मुलापेक्षा काकणभर जास्तच होती.

एकदां कुळकर्ण्यांच्या घरी दोन मोठ्या बरण्या भरून लोणचे घालण्यात आले. त्या शिक्षकाच्या घरी लगोणचे घालून ठेवणेच शक्य झाले नाही. त्याच्या घरी बरणी भर लोणचे असते तर तीनचार महिने भाजी चटणी शिवाय त्याचे काम भागले असते. म्हणून त्याने कुळकर्ण्यांच्या घरातले लोणचे चोरून न्यायचे ठरविले.

एक दिवशी संध्याकाळी तो शिक्षक कुळकर्ण्यांच्या घरी गेला. काही वेळ गप्पा गोष्टीत गेल्यावर कुळकर्ण्यांच्या घरातली सर्व मंडळी आपापल्या कामाला निघून गेली. तेव्हां तो शिक्षक एकदम ओरडला– "बरं मी येतो बरं का?" आणि सर्वांच्या नकळत सैपाक घरात शिरून लोणच्याची एक बरणी उचलून घेऊन मागच्या दाराने काळोखात निघून गेला.

दुसऱ्या दिवशी कुळकर्ण्यांच्या घरातल्या मंडळींना लोणचे चोरीला गेल्याची गोष्ट कळली. कोणी चोरले असेल बरे? असा विचार करीत कुळकर्णी बसले असता बायको येऊन म्हणाली–"एवढा विचार कसला करता आहां? अहो तो भिकारी शिक्षकच घेऊन गेला असेल! संध्याकाळी तो काळोख पडेपर्यंत घुटमळत नव्हता का येथे? तो केव्हां कोठून गेला हे कोणी पाहिले नाही. तो गेल्यावर दुसरा कोणी घरी आलापण नाही."

"त्या गरिबावर कशाला खोटा आळ आणतेस?" कुळकर्णी म्हणाले.

"गरिबी कोणते पाप करवीत नाही? तुम्ही जाऊन पाटलांकडे फिर्याद करा आणि पहा घराची झडती घेऊन. बरणी त्याच्या घरात मिळाली नाही तर नाव बदलून देईन." बायको म्हणाली.

कुळकर्ण्यांला ते आवडले नाही. त्याचा शिक्षकावर फार विश्वास होता व गावकऱ्यांना ते चांगले माहीत होते.

"शिक्षकाच्या घराची झडती? काय बोलतेस काय हे? लोक हसतील तुला व मला. ते लोणचे गेले तर जाऊ दे." कुळकर्णी म्हणाले.

"असं काय म्हणतोस सोन्या! आज लोणचे चोरीला गेलं उद्यां एखादा नगच गेला तर? या चोरीचा पत्ता लावलाच पाहिजे. मी एक युक्ती सांगते. आपले



कपाट शिक्षकाच्या घरी नेऊन ठेव. सांग आम्ही तीर्थयात्रेला एक महिना जातो आहो. मी त्या कपाटात बसून राहते. तू संध्याकाळी पुन्हां सांग की आम्ही तीर्थयात्रेचा बेत बदलला आणि कपाट उचलून पुन्हां घरी घेऊन ये. चोरी त्याच्याच घरी झाली की नाही दिवस भरात मला कळेल." कुळकर्ण्यांची आई म्हणाली.

आईची ती युक्ती कुळकर्ण्यांना आवडली नाही. पण नाइलाजाने त्यांनी ती मान्य केली. कुळकर्ण्यांच्या आईने पुष्कळ सोने आणि पैसे सांठवून ठेवले होते. तिचे ऐकलं नाही तर आपल्याला काही मिळणार नाही,

श्री क. य. सावंत



या भीतीने कुळकर्ण्यांना आईचे म्हणणे मानावे लागले.

दुसऱ्या दिवशी सकाळी कुळकर्ण्यांनी शिक्षकाच्या घरी निरोप पाठविला व आल्यावर म्हणाले–"आम्ही आज तीर्थ-यात्रेला निघालो आहो. आमच्या घरी जी चीजवस्त आहे ती तुमच्या घरी ठेवून जावे म्हणतो. तुम्हांला हरकत नाही ना?"

"तुमचेच घर आहे, खुशाल ठेवा." म्हणाला. ठरल्याप्रमाणे कुळकर्ण्यांनी आईला कपाटात बंद करून कपाट शिक्षकाच्या घरी नेऊन ठेवले. म्हातारी बरोबर खायला भाकऱ्या घेऊन गेली होती.

दुपारी शिक्षकाची मुलं, "खायला दे" म्हणाली आईला. कपाटात बसून म्हातारी भाकऱ्या खाऊ लागली. म्हातारीला दात नव्हते. म्हणून तोंडात भाकरीचा तुकडा टाकून तो भिजून मऊ होईपर्यंत तिला चघळत बसावे लागे.

त्याच वेळी मुलं ओरडली–"आई! कुळकर्ण्यांच्या घरातले ते लोणचं वाढ कीग!"

ते ऐकून कपाटातली म्हातारी स्वतःचा राग आवरू शकली नाही. ओरडून म्हणाली–"चोराच्या पोरांनो! पाहते आता!" त्याच वेळी तिच्या घशात भाकरीचा तुकडा अडकला आणि म्हातारी आतल्या आत तडफडून मेली.

संध्याकाळी कुळकर्ण्यांनी आपल्या नोकरांना शिक्षकाच्या घरी पाठविले. नोकर म्हणाले–"गुरुजी! कुळकर्ण्यांना काल तीर्थ-यात्रेला जाणे जमलं नाही. कपाट परत घेऊन यायला आम्हांला पाठविलं आहे." शिक्षकाने कपाट पाठवून दिलं.

कुळकर्ण्यांनी कपाट उघडून पाहिलं तर आत आई मरून पडली होती.

कुळकर्णी घाबरून गेले आणि शिक्षकाला बोलावून त्यांचा सल्ला विचारला. ते नेहमी शिक्षकाचा सल्ला घेऊनच काही काम करीत. ते म्हणाले–"गुरुजी! माझी आई एकाएकी मेली. तशी आजारी पण नव्हती. ही गोष्ट गावकऱ्यांना कळली तर म्हणतील, धनलोभाने मीच गळा दाबून तिचा जीव घेतला. तिचे प्रेत काही तरी करून नाहीसे केले पाहिजे. काही तरी युक्तीकाका व माझी लाज वाचवा."

"तुम्ही पैसे खर्च करायला तयार असाल तर मी सगळं ठीक करून देतो. तुम्हांला भिण्याचं मुळीच कारण नाही." शिक्षक म्हणाला.

कुळकर्ण्यांना धीर आला. त्यांनी शिक्षकाच्या हातात शंभर रुपये भरून एक पिशवी दिली. शिक्षकाने रात्री म्हातारीचे प्रेत खांद्यावर घेतले. तिला फेकून द्यायचे ठरवून शिक्षक निघाला.

शेजारच्या गावचा जमिनदार पुष्कळ रात्र लोटल्यावर घोड्याच्या गाडीत बसून घरी परत जात होता. तो त्याच वाटेने जात होता. शिक्षकाने घाबरल्याचे सोंग केले आणि म्हातारीचे प्रेत घोड्याच्या पायांखाली टाकले.

गाडी थांबली. जमिनदार गाडीतून खाली उतरून आला. "आई गं! आई! अशी कशी ग मला सोडून गेलीस? आता मी कोणाच्या तोंडाकडे पाहू?" असं रडण्याचे सोंग करून शिक्षक मोठमोठ्याने ओरडू लागला.

"काय रे! तू तरी एक गांवढळच दिसतोस की रे. गाडी आलेली कळत नाही का तुला? बाजूला झाला असतास तर? हे पैसे ठेवून घे." असे सांगून जमिनदाराने काही पैसे त्याला दिले आणि निघून गेला.

त्यानंतर शिक्षक कुळकर्ण्यांच्या आईचे प्रेत नदीकाठी घेऊन गेला आणि ते नदीत फेकून दिले.





# कोल्ह्याचा निवाडा

आजोबा आंबे घेऊन आले. आईने कापून वांटले. मुलं भांडू लागली. एक म्हणे मला लहान तुकडा मिळाला. दुसरा कोयी साठी भांडू लागला. तिसरा म्हणाला–"मला सबंध आंबा हवा."

मुलांना भांडतांना ऐकून आजोबा ओरडून म्हणाले–"तुम्ही सगळे अक्कलशून्य आहां! तुमच्याहून पाणमांजरे चांगली."

पाणमांजरांचे नाव ऐकताच मुलं आंब्याकरिता भांडायचं सोडून आजोबांच्या चारी बाजूला घोळका करून जमा झाली व म्हणाली–"सांगा पाणमांजरांनी काय केलं? त्यांची गोष्ट सांगा!"

"तुमच्या पेक्षा, दुसऱ्याला मोठा तुकडा मिळाला म्हणून किंवा जास्त तुकडे मिळाले म्हणून भांडतां आहां, पण पाणमांजरं भांडली आपल्यापेक्षा दुसऱ्याला कमी कां मिळालं यासाठी. आता कळलं तुमच्यात आणि पाणमांजरात एवढं अंतर आहे हे." आजोबा म्हणाले.

"पाणमांजरांनी आंबे वांटून घेतले होते का आजोबा? तुम्ही काय म्हणालांत ते नाही कळलं आम्हांला. ती सगळी गोष्ट सांगा." मुलांनी हट्ट धरला.

"तरमग प्रथम तुम्ही गप्प बसा, कसे!" असे सांगून मुलांनी गोष्ट सांगायला सुरवात केली.

तिबेट नावाचा एक देश आहे. त्या देशात एक मोठी नदी आहे. त्या नदीच्या काठी दोन पाणमांजरे रहात असत त्यांची आपसात चांगली मैत्री होती. ते परस्परांना मदत पण करीत.

नदीतले मासे हाच त्यांचा मुख्य आहार होता. पाणमांजरे मासे कसे पकडतात माहीत आहे का तुम्हांला? एक पाणमांजर पाण्यात उतरते. ते माशांना किनाऱ्याकडे पळविते. जे मासे किनाऱ्यावर येतात त्यांना किनाऱ्यावरचे मांजर एका जागी जमा करते. मासे पकडून घरी घेऊन जाणे तेवढे सोपे नसते. कारण पाण्यातलं पाणमांजर माशांना किनाऱ्यापर्यंत पळवीत आणून पुन्हा दुसऱ्या माशांना किनाऱ्याला आणी पर्यंत पहिले पळून जातात. प्रत्येक माशासाठी किनाऱ्यावर येऊन पुन्हा पाण्यात उतरून दुसऱ्या माशाला पळवून आणणे सोपे नसते.



हा त्रास ओळखून त्यांनी आपसांत ठरवून मासे पकडण्याच्या कामी परस्परांना मदत करण्याचे ठरविले होते. एका मांजराचे काम पाण्यातून मासे हाकलून किनाऱ्यावर आणणे होते व दुसऱ्याचे किनाऱ्यावर आलेले मासे खाणे. अशातऱ्हेने दोन्ही पाण मांजरांनी पुष्कळ मेहनत करून पुष्कळ मासे धरले. आता धरलेले मासे वांटून घ्यायचा त्यांनी विचार केला.

किनाऱ्यावरचे मांजर पाण्यातल्या मांजराला म्हणाले–"आता तू सर्व माशांची सारखी सारखी वांटणी कर."

नदीतल्या मांजराला त्यांची वांटणी करण्यात संकोच वाटला. कारण चुकून दुसऱ्याला कमी मिळाले तर त्याला वाईट वाटेल. म्हणून ते दुसऱ्या मांजराला म्हणाले–"मित्रा! तूच वांटणी कर ना!" त्याच्या मनात पण तीच शंका होती.

दोघें मांजरं आपल्या हातून कदाचित चूक होईल व दुसऱ्याला वाईट वाटेल म्हणून हातावर हात धरून स्वस्थ बसून राहली.

त्याच वेळी वटवट्या नावाचा एक कोल्हा तेथे आला. त्याने माशांची रास मांजरांसमोर पाहिली आणि चकित होऊन त्यांना विचारण्यासाठी तो त्यांच्याजवळ काही तरी करून हे मासे उपटले पाहिजेत आला. त्याला त्या दिवशी दिवसभर काही

श्री म. सि. पुराणिक













खायला मिळाले नव्हते. भुकेने त्याचा जीव कासावीस झाला होता. त्याने मनात विचार केला, किती मासे आहेत? नंतर तो पाण मांजरांना म्हणाला–"कसं काय जांवई बापू! असे दोघे कोणत्या काळजीत पडला आहां?"

"आम्ही हे मासे धरले आहेत. पण त्यांची वांटणी करतांना कोणाला जास्त किंवा कोणाला कमी मिळू नयेत असे आम्हांला वाटत आहे."

"एवढेच ना? मी वांटून देऊ का?" कोल्ह्याने विचारले.

पाणमांजरांनी विचार केला की आपल्या समोरचा प्रश्न सहजी सुटतो आहे म्हणून त्यांनी होकार दिला.

कोल्हा एका मांजराला जरा बाजूला बोलावून घेऊन गेला आणि म्हणाला–"खरं बोलायचं तर तू मासे धरण्यासाठी केलेसच काय? दुसऱ्या मांजराने पाण्यात जाऊन हुशारीने मासे पिटाळून किनाऱ्याला हाकलून आणले. तू काठावर आलेल्या माशांना फक्त धरण्याचे काम केलेस. म्हणून तुला कमी मासे मिळाले पाहिजेत."

नंतर कोल्हा दुसऱ्या मांजराला बाजूला घेऊन जाऊन म्हणाला–"सर्व मेहनत तर तुझ्या मित्राने केली आहे. किनाऱ्यावर दगड धोंडे आणि काय काय आहे. त्या सर्वांना बाजूला सारून किनाऱ्यावर त्या सुरक्षित ठेवण्याचे सर्व काम तर त्यालाच करावे लागले. तू काय, फक्त त्यांना किनाऱ्याकडे पळवून आणलेस!"

ते ऐकून दोघां पाणमांजरांना आपापला कमीपणा कळला. नंतर कोल्ह्याने माशांच्या शेपटया व डोकी कापली व ती सारखी सारखी दोघां मांजरांना वांटून दिली व मधला भाग आपल्या मेहनतीची मजुरी म्हणून घेऊन आपल्या चातुर्याची मतार्थीच वाखाणणी करीत घरी निघून गेला.





# पडकें देऊळ

[२०]

[शिखीमुख व विक्रमकेसरी आपल्या दोघां साथीदारांसह ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्याकडे निघाले. ते कामाख्या नावाच्या गावी एका धर्मशाळेत उतरले. त्यांच्या गैरहजेरीत पडक्या' देवाळाचा पुजारी त्यांच्या खोलीत शिरला. त्याला पकडण्याचा शिखीमुखने प्रयत्न केला, परंतु तो निसटून घोड्यावर बसून पळून गेला. पुढे–]

धर्मशाळेसमोर गोंधळ उडून गेला. आरडा ओरडा आणि पळापळ चालू होती. दोघे घोड्यावर बसून पळत होते तर "थांबा, थांबा" म्हणत दोघे तरुण त्यांचा पाठलाग करीत पळत होते. ते पाहण्यासाठी धर्मशाळेत उतरलेले सर्व लोक धर्मशाळेच्या आवारात जमा झाले. अजित व वीरभद्र दोघे देखील काही अंतर पाठलाग करीत धावले. परंतु पुजारी व नागगिधाड दोघांना ते पकडू शकले नाहीत. म्हणून अर्थातच त्यांना निराशा वाटली.

शिखीमुख व विक्रमकेसरी आपल्या खोलीला कुलुप लावून खाली आले. अजित व वीरभद्र धावत धापा टाकीत येऊन म्हणाले–"धनी! आम्ही आपल्या तर्फे त्यांना पकडण्याची शिकस्त करून पाहिली. परंतु ते पळून गेले." शिखीमुखला फार वाईट वाटले. तो दुष्ट पुजारी हातात



आलेला निसटून पळून गेला. इतक्या उंचावरून उडी मारून तो पळून जाईल याची त्याला कल्पनादेखील नव्हती.

"शिखी, या दुष्टाने आपला पिच्छा पुरविला आहे. आपण त्याच्याशी बोलण्यात उगीच वेळ घालवला. खोलीत पाय टाकतांच त्याला ठार केला पाहिजे होता." विक्रमकेसरी म्हणाला.

"या खेपेस तो नजरेस पडला की आपण तेच करू. त्या दुष्टाशी आपण बोलण्याची गरज तरी काय? तो कितीदां आपल्या हातावर तुरी देऊन जिवानिशी निसटला. तू देखील सावध रहा." शिखीमुख म्हणाला.

धर्मशाळेसमोर जमा झालेले लोक शिखीमुख व विक्रमला निरनिराळे प्रश्न विचारून बेजार लागले. कोणीतरी दोघे चोरी करून पळून गेले असावे असे सर्वांना वाटत होते. धर्मशाळेचा अधिकारी आपली चूक झाल्या बद्दल माफी मागत म्हणाला— "खरी मालीच चूक झाली. तुम्हां दोघांच्या गैरहजेरीत मी त्या परक्या लोकांना तुमच्या खोलीत जाऊ द्यायला नको होते. एखादी मूल्यवान वस्तू उचलून घेऊन पळून गेले का ते?"

"त्याला ज्या वस्तूची गरज आहे ती आमच्याजवळ नाही. तीर्थ दर्शन करीत आलो होतो. आमच्याजवळ मूल्यवान वस्तू असणार तरी कोणती?" शिखीमुख म्हणाला.

"तुमच्या खोलीत चोरी झाली नाही, हे ऐकून आम्हांला बरे वाटले. तो पुजारी इभ्यु जातीचा दिसतो आहे. त्या जातीचे लोक जितके विश्वासपात्र असतात तितकेच गळेकापू पण असतात." धर्मशाळेचा अधिकारी म्हणाला.

त्या दिवशी रात्री शिखीमुख व विक्रम केसरी दोघांनी खूप विचार करून, इभ्यु जातीच्या वस्तीची माहिती असलेल्या



माणसाला वाट दाखवायला बरोबर घेऊन ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात प्रवेश करावा असे मनाशी ठरविले.

धर्मशाळेच्या अधिकाऱ्याजवळ दुसऱ्या दिवशी त्यांनी त्या विषयी चवकशी केली तेव्हां तो चकितच झाला. म्हणाला—"त्या प्रदेशात पाऊल टाकण्याचा अर्थ स्वतः आगीत उडी टाकण्यासारखा आहे. पण त्या बाजूला जाण्याची गरजच काय? तिकडे तीर्थक्षेत्र पण नाही?"

ते ऐकून हसत शिखीमुख म्हणाला— आमचा जीव धोक्यात पडेल हीच भीती वाटते न तुम्हांला? पण आमचा जीव घेऊन कोणाला काय मिळणार आहे? आम्हांला या खोऱ्यातली सर्व क्षेत्रे पाहून यावयाचे आहे. इभ्यु जातीचे लोक राहतात त्या वस्तीत पुष्कळ जुनी देवळे आहेत असे आम्ही ऐकतो."

"पहा बुवा, मी सांगावयाचे ते सांगितले. पुढे तुमचे तुम्ही पाहून घ्या. केव्हां निघणार आहां तुम्ही? त्या प्रदेशाची चांगली माहितो असलेल्या एका तरुण मुलाला मी बरोबर पाठवितो. त्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था तुम्हांला करावी लागेल. परत आल्यावर त्याला चांगले



बक्षिस दिले पाहिजे." धर्मशाळेचा अधिकारी म्हणाला.

शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांनी दोन्ही अटी कबूल केल्या. दुसऱ्या दिवशी उजाडताच धर्मशाळेचा अधिकारी एका पंचवीस तीस वर्षे वयाच्या मनुष्याला घेऊन आला. तो ठेंगणा व हृष्टपुष्ट होता. त्याची ओळख करून देत धर्मशाळेचा अधिकारी म्हणाला—"याचं नाव जांगला आहे. याला इभ्यु जातीच्या सर्व प्रदेशाची चांगली माहिती आहे. हा एक विश्वासपात्र मनुष्य आहे व मी याला बरेच दिवसांपासून चांगला ओळखतो."



शिखीमुखने जांगलाकडे निरखून पाहिले. त्याच्या निर्विकार चेहऱ्यावरून त्याच्या स्वभावाची ओळख पटणे शक्य नव्हते. जांगलाच्या मुखावर स्मित झळकत होते. परंतु त्याच्या चेहऱ्यावर कोणताच भाव झळकत नव्हता. तो अगदी ठोंब्यासारखा उभा होता, ऊन पाऊस खाऊन खडबडीत झालेल्या दगडासारखा.

जांगलाची ओळख करून देऊन धर्मशाळेचा मालक निघून गेला. तेव्हां शिखीमुख त्याला म्हणाला—"तुला सर्व प्रदेशाची माहिती असेलच या गोष्टीचा आम्ही विश्वास कसा काय करावयाचा? तुला इम्यु जातीच्या प्रदेशाची माहिती कितपत आहे? तुला सर्व प्रदेशाची चांगली माहिती नसेल तर आम्हांला तुझी गरजच नाही. म्हणून निघण्यापूर्वीच साफसाफ काय ते बोल." तुला हा सर्व प्रदेश चांगला नक्की माहीत आहे ना?

"माझ्यावर विश्वास ठेवा एवढेच मी सांगू शकेन. माझा जन्म इम्यु जातीच्या मुलखांतच झालेला आहे. ते लोक मला चांगले ओळखतात. मला त्या प्रदेशाच्या कानाकोपऱ्याची माहिती आहे." जांगला म्हणाला.

"ठीक! तुझ्या खाण्यापिण्याची सर्व जबाबदारी आमच्यावर. परत कामाल्या-पूरला आल्यावर आम्ही तुला पांच सुवर्ण-मुद्रा देऊ. धर्मशाळेच्या अधिकाऱ्याने आम्हांला तेच द्यायला सांगितले आहे. आहेस का कबूल? विचार करून तुला जे बोलायचे ते बोल." शिखीमुख म्हणाला.

"मी काय बोलणार आणि काय विचार करणार? तुमची कृपा असली म्हणजे पुरे." जांगला म्हणाला.

"आम्हांला या खोऱ्याच्या गोलभरा नावाच्या इम्यू जातीच्या गावी जायचे आहे. त्या गावाच्या आसपास पुष्कळशी जुनी देवळे आहेत असे आम्ही ऐकतो." शिखीमुख म्हणाला.

गोलभरा गांवाचे नाव ऐकताच जांगला दचकल्यासारखा होऊन म्हणाला—"धनी! मला ते गांव चांगले माहीत आहे. परंतु आपण म्हणता तसे प्रसिद्ध देऊळ मात्र जवळ पास नाही. मी पहिल्यानेच सांगून ठेवतो आहे. कारण नंतर मला नावे ठेवू नका."

"आम्ही तसे ऐकले आहे, हो की नाही रे विक्रम?" असे म्हणत शिखीमुखने विक्रम-कडे एकदां पाहिले.

त्याने होकारार्थी मान हलविल्यावर शिखीमुख जांगलाला म्हणाला—"तू त्या गावांची वाट आम्हांला दाखव. आम्ही स्वतः कादू हुडकून देवळे. आणि हे पहा, आजच संध्याकाळी आम्हांला निघावयाचे आहे, निघायची तयारी कर."

जांगला नमस्कार करून निघून गेला. त्या दिवशी सायंकाळी वाटेत लागणारे खाद्यपदार्थ दोन खेचरांवर लादून शिखी-मुख व विक्रमकेसरी आपल्या दोघां साथी-दारांबरोबर नदीच्या खोऱ्याकडे निघाले. जांगला त्यांना वाटाड्या म्हणून पुढे पुढे चालत होता.




जंगलातल्या एका तलावाजवळ ते सर्व पोचले. तोंपर्यंत चांगला काळोख पडला होता.

ती रात्र तलावाच्या काठीच घाल-वावी व दुसऱ्या दिवशी पहाटे पुढचा प्रवास सुरू करावा असे त्यांनी ठरविले. अजित व वीरभद्र सैपाकाला लागले. जांगला काटक्या गोळा करून आणायला जंगलात निघून गेला.

तो निघून गेल्यावर शिखीमुख आणि विक्रमकेसरी एका झाडाला टेकून पुढल्या कार्यक्रमाविषयी विचार विनिमय करू लागले. विक्रमकेसरीच्या मनात जांगला-



विषयी अद्याप संशय होता. त्याच्यावर त्याचा पुरा विश्वास बसत नव्हता. तो आपल्याला धोक्याच्या रस्त्याने नेऊन कोठे तरी गोत्यात घालणार असे त्याला वाटत होते. तसे तो शिखीमुखला म्हणाला पण. शिखीमुखला सुद्धां तशीच शंका येऊ लागली होती.

"आपण सावधगिरी बाळगू. तुला काय वाटते, जांगला पुजाऱ्याच्या अनुयायांपैकीच एकजण असेल? तो दुष्ट पुजारी स्वतः आतापर्यंत आपले काही करू शकला नाही तर हा काय करणार?" शिखीमुख म्हणाला.

विक्रमकेसरी आणखी पुढे काही म्हणणार इतक्यात लाल कुत्रा भुंकू लागला आणि दाट झाडीत शिरला. शिखीमुख गुपचुप कुत्र्याच्या पाठीमागून निघाला. विक्रम-केसरी तलवार उपसून चारी बाजूला पसरलेल्या दाट काळोखात डोळे फाड फाडून पहात होता.

लाल कुत्रा थोडे अंतर चालून गेल्यावर एका जागी थांबून तोंड वर करून भुंकू लागला. शिखीमुख झाडीत ध्यान देऊन निरखून पाहू लागला. शत्रू झाडावर लपून बसला असावा असा त्याला संशय आला. पण तेथे त्याला कोणी दिसला नाही. त्याच वेळी त्याला कोणीतरी बोलत असल्याचा भास झाला. तो पुढे निघणार इतक्यात त्याचा लाल कुत्रा आडवा येऊन उभा राहला आणि जोरजोराने भुंकू लागला.

या वेळी शिखीमुखला पावलांचा आवाज जवळ येत असलेला स्पष्ट ऐकू आला.

पाहतां पाहतां जांगला खांद्यावर वाळक्या काटक्यांची मोळी घेऊन घाईघाईने त्यांच्या-कडे येऊ लागला. शिखीमुख दोन पावलंच पुढे गेला असेल इतक्यात झाडाच्या फांदी-वरून एका अजगराने जांगलाच्या अंगावर उडी मारली आणि त्याच्या अंगाला

विळखा घालू लागला. लालकुत्रा भुंकत उडी मारून पुढे गेला. जांगला घाबरून जाऊन मोठ्याने ओरडला.

ते दृश्य पाहून शिखीमुखचा चेहरा पांढरा फट्ट पडला. जांगला मोठ्याच संकटात सापडला होता. शिखीमुख तलवार उपसून अजगराचे तोंड कापण्याच्या विचारात होता. परंतु अजगर जांगलाच्या कमरेच्या वरच्या भागालाच विळखा घालून बसला होता. त्या काळोखात अजगराला मारण्याच्या प्रयत्नात जांगलालाच लागण्याची शक्यता होती.

जांगला वेदनेने ओरडत होता. त्याची वाचाच बंद पडू लागली होती. शिखीमुख त्याला म्हणाला–"जांगला घाबरू नकोस. हे बघ मी अजगराचे डोकेच कापून टाकतो. असे सांगून त्याने डाव्या हाताने अजगराची मान धरून बाजूला त्याचे तोंड ओढले आणि तलवारीने वार केला.

डोके कापल्याबरोबर अजगराचा विळखा सैल होऊन अजगर खाली जमिनीवर पडला. जांगला घाबरल्यासारखा बेशुद्ध होऊन दुसऱ्या बाजूस खुंटासारखा खाली जमिनीवर पडला. जांगलाचा आवाज ऐकल्यावर विक्रमकेसरी, अजित व वीरभद्र तिकडे धावले. ते देखील येऊन पोचले.

शिखीमुख जांगलाला उचलण्याचा प्रयत्न करीत म्हणाला–"मी अजगराचे डोके छाटून टाकले आहे. परंतु त्याच्या विळख्यात तुझे हाडबीड तर नाही मोडले?"

जांगला काही उत्तर देणार त्याच वेळी काळोखातून कोणीतरी बोलल्याचा आवाज ऐकू आला–"अघोरी लोक भक्ति भावनेने ज्या अजगराची पूजा करतात त्याचे डोके कोणी कापले? तर मग तुझे डोके आम्ही कापतो. तयार रहा." असे म्हणत चार-पाच भयंकर आकृतीचे लोक भाला उगारून शिखीमुखवर धावले.




# नित्य यौवन

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू कोणती तरी अपूर्व मंत्रशक्ती मिळविण्यासाठी ही एवढी मेहनत करीत आहेस असे मला वाटते. काही लोकांना अशा अपूर्व शक्तीचा लाभ जन्मतःच होतो. रानटी जातीत असे लोक पुष्कळ आढळतात. परंतु अशा शक्ती परिणामी घातकच ठरतात. तुला रात्रीच्या वेळी एकटेपणा किंवा कंटाळा वाटू नये म्हणून मी अपूर्व शक्ती संबंधी एक गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

दंडकारण्यात राहणाऱ्या रानटी भिल्ल जातीच्या काही जणांना अशी शक्ती प्राप्त होती. जन्मल्याबरोबर त्या अपूर्व शक्तीचा



आभास मिळे. अशा मुलांच्या आयांना त्याची माहिती असे, पण त्या ती गोष्ट गुप्त ठेवीत. कारण कोणाला कळले की अमूक मुलाला अपूर्व शक्ती प्राप्त आहे तर काही दुष्ट लोक त्या मुलाचा गळा दाबून टाकायला मागे पुढे पहात नसत.

एका भिल्ल मुलीच्या डोक्याला पाठीमागे जन्मत:च एक टेंगूळ होते. त्या मुलीचे नाव इला असे होते. तिच्या आईने ती गोष्ट कोणाला कळू दिली नाही. इला मोठी झाल्यावर केसात ते टेंगूळ दिसेनासे झाले.

इला ज्या गावी रहात असे त्या गावानजीक एका जमिनदाराचे गाव होते. त्या गावी उपेन्द्र नांवाचा एक तरुण कुंभार रहात असे. तो दिसायला सुंदर व देखणा होता, परंतु गरीब होता. त्याच्याशी लग्न करण्याचा विचार गावातल्या पुष्कळ मुलींच्या मनात येई. पण त्याची जात व गरीबी आड आल्याने ते शक्य नव्हते. इलाने एकदा त्याला पाहिले तेव्हांपासून तिने त्याच्यावर जणुंकाही आपल्याला ओवाळूनच टाकले.

परंतु उपेंद्राच्या मनात कधी तिचा विचार सुद्धा आला नही. खरं पाहिलं तर त्याचे मन गावातल्या एकादेखील मुलीवर कधी गेलं नाही. एखाद्या श्रीमंताच्या मुलीशी आपलं लग्न झालं की पुरे, त्याला ते प्रेम आणि मन चोरून नेणे वगैरे काही पटत नव्हते.

कसला तरी सण होता. त्या दिवशी इला घराबाहेर पडली नाही. ती उपेंद्रचं ध्यान धरून बसली उपेंद्रने स्वत: तिच्या घरी यावे या हेतूनेच ती ध्यान धरून बसली होती. सर्व दिवस असाच गेला व सूर्यास्ताची वेळ झाली तरी उपेंद्र तिच्या घरी आला नाही. तो गावातल्या इतर मुलींबरोबर गप्पा गोष्टीत व खेळण्यात गुंग होऊन गेला होता.

इलाने आपल्या घरासमोर सडा सारवण घालून रांगोळी काढली. कपडे फाडून त्यांना गाठी मारून रांगोळीवर जागोजागी ठेवू लागली. गाठ मारून रांगोळीवर ठेवतांना ती उपेंद्राच्या नावाचा उच्चार करी.

खेळात रमलेला उपेंद्र एका एकी थांबला व त्याचे पाय भिल्ल जातीच्या वस्तीकडे त्याला ओढून नेऊ लागले. थोड्या वेळाने तो इलाच्या घरच्या अंगणात पोचला व अंगणात उभा राहला. उपेंद्रने दाराची कडी वाजवल्याबरोबर इलाने दार उघडले. तिला पाहताच त्याला अपार आनंद झाल्यासारखा वाटला. दुसऱ्याच दिवशी इला व उपेंद्र यांचा विवाह झाला. उपेंद्र इलाला आपल्या घरी घेऊन गेला. त्यांचा संसार सुखाचा झाला. पाच वर्षात इला व उपेंद्र यांना पाच मुले झाली.

इला प्रत्येक मूल झाल्यावर जास्त जास्त सुंदर होत गेल्याचे पाहून उपेंद्रला आश्चर्य वाटे. तिचे सौंदर्य प्रत्येक प्रसुतीच्या वेळी कमी होण्या ऐवजी वाढत गेले. पांच मुलांची आई झाल्यावर देखील इला, लग्नाच्या दिवशी जितकी सुंदर दिसत होती त्याहून जास्त सुंदर दिसू लागली होती.



इलाचे हे वाढते सौंदर्य पाहून उपेंद्राच्या मनात शंका उत्पन्न झाली. त्याने ती गोष्ट आपल्या आईला पण सांगितली.

ती म्हणाली—"मुला! तुझी बायको जादुगारीण तर नसेल अशी शंका मला वाटू लागली आहे. तसे असेल तर ती गोष्ट तुझ्या किंवा तुझ्या मुलांच्या हिताची नाही."

"पण आई, ती जादुगारीणच आहे हे कशावरून?" उपेंद्रने आईला विचारले.

"ती जादुगारीण असेल तर अमावास्येच्या दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास ती तांत्रिक पूजा केल्याशिवाय राहणार नाही. तू लक्ष ठेव." आई म्हणाली.



अमावास्येच्या दिवशी रात्री उपेंद्र झोपेचे सोंग करून झोपला आणि इला काय करते हे पाहू लागला. इला मध्यरात्र उलटल्यावर उठली. तिने चूल पेटवली, पाणी तापविले. बाहेरून कसल्या तरी मुळ्या व पाला घेऊन आली आणि मंत्र म्हणून तो पाला व मुळ्या अधणात टाकल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी उपेंद्रने ते सर्व आपल्या आईला सांगितले.

"होय ना? मग मी सांगितले त्याप्रमाणे ती खात्रीने जादुगारीणच आहे. तिला वेळीच वाटेला लावले नाहीस तर तुझा व तुझ्या मुलांचा जीव धोक्यात पडेल. जादुगारणीला जिवंत जाळण्याशिवाय दुसरा उपाय नाही." आईने सल्ला दिला.

उपेंद्र घाबरूनच गेला. कापऱ्या आवाजात म्हणाला—"आई! पांच मुलांच्या आईचा स्वतःच्या हाताने जीव घेऊ म्हणतेस?"

"अरे वेड्या! तू एकीला वांचवायला निघाला आहेस पण सहा जणांचा जीव धोक्यात पडेल त्याची काय वाट? म्हणून तिला वाटेला लावलंच पाहिजे." आईने जणुंकाही आज्ञाच केली.

आईजवळ बायकोला ठार करण्याविरुद्ध बराच वेळ वादविवाद केल्यानंतर उपेंद्र इलाचा जीव घ्यायला तयार झाला. त्यानंतर त्याने घरासमोर एका झाडाखाली चिता तयार केली व झाडाच्या फांदीला दोरीचा फास करून लोंबत ठेवला.

हे सर्व इला खिडकीतून पहात होती. तिने बाहेर येऊन नवऱ्याला विचारले—"ही सर्व तयारी कशासाठी चालली आहे?"

"तू या चितेवर जाऊन उभी रहा. मी सर्व सांगतो." उपेंद्र म्हणाला.

इला त्याप्रमाणे चितेवर जाऊन उभी राहली. उपेंद्रने तिच्या गळ्यात दोरीचा फास घातला व म्हणाला—"तू जादुगारीण आहेस. म्हणून मी तुला जाळून स्वतःचा व मुलांचा जीव वांचविणार आहे." असे सांगून त्याने लगेच चितेला आग लावली.

चितेच्या ज्वाळा अंगाला लागताच तिने कोणता तरी मंत्र म्हटला आणि एक फूल होऊन ती झाडाच्या फांदीला जाऊन चिकटून बसली.

दुसऱ्या दिवशी जमिनदार आपल्या घोड्यावर बसून त्या बाजूने निघाला. तो मनातल्या मनात म्हणाला—"या झाडाला अशा नऱ्हेने लागलेले फूल एक विचित्र गोष्टची वाटते. असा विचार करून त्याने ते फळ तोडले आणि ते घरी घेऊन जाऊन फुलदाणीत पाणी घालून ठेवले. नंतर फुलदाणी फुलासकट आपल्या खोलीत नेऊन ठेवली.

जमिनदार म्हातारा होता. त्याला बायको किंवा मूलबाळ कोणी नव्हते. एक सैपाकीण होती. ती रोज ताट वाढून जमिनदाराच्या खोलीत आणून ठेवी. जमिनदार थोडे खाऊन झोपत असे. जमिनदार झोपल्याबरोबर ते फूल जमिनीवर पडले व इलाचे रूप घेऊन उरलेले अन्न खाऊ लागले. सर्व अन्न खाऊन झाल्यावर इला पुन्हां फूल होऊन फुलदाणीत जाऊन बसली.



सैपाकिणीने परत येऊन पाहिले तर ताट साफ झालेले. तिला शंका आली की काही तरी अघटित घडले आहे. कारण जमिनदार कधीच सर्व ताट रिकामे करीत नसे. अर्धे अधिक अन्न ताटात तसेच राहून जात असे. ती ताटातलेच अन्न काढून घेऊन खात असे. पण तिला त्या दिवशी उपाशी रहावे लागले.

दुसऱ्या दिवशी तिने आड लपून काय होते ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले. फूल एका तरुण स्त्रीचे रूप घेऊन सर्व अन्न खाऊन पुन्हा फूल होऊन फुलदाणीत जाऊन बसते. तिने ती गोष्ट जमिनदाराला सांगितली.



दुसऱ्या दिवशी जमिनदार जेवणखाण आटोपल्यावर झोपण्याचे सोंग करून जागा राहला व त्याने इलाला पकडले. इलाने निसटून पळून जाण्याचा प्रयत्न केला, पण तिची वेणी जमिनदाराच्या हातात आली.

"माझी वेणी सोडा, माझे केस दुखत आहेत," इला जमिनदाराला म्हणाली.

"मी सोडून देईन, पण एका अटीवर! पुन्हां फूल नाही व्हायचं, माझ्याशीं लग्न करून माझी बायको होऊन राहायचं!" जमिनदार म्हणाला.

प्रथम इला कबूल झाली नाही. जमिनदाराने तिची वेणी दोनतीनदां जोराने ओढली तेव्हां ती कबूल झाली. जमिनदाराची बायको झाल्यावरोबर इलाने सैंपाकिणीला नोकरीवरून काढले. ती सैंपाकीण जादूमंत्रांची माहिती असलेल्या भिल्लांच्या वस्तीत गेली. तिने जमिनदाराच्या नव्या बायकोने नोकरीवरून काढल्याचे सांगून तिच्यावर सूड काढायचा उपाय काय हे विचारले.

भिल्ल म्हणाले–"जमिनदाराची बायको स्वत: जादुगारीण असली पाहिजे. तिच्या डोक्यावर एक टेंगूळ असेल. त्या टेंगळावरचे केस कापून काढून टाकले की तिच्याजवळची मंत्रशक्ती नाहीशी होईल." परंतु सैंपाकिणीला ते काम थोडे कठीण वाटले. तिची वेणी धरून कशी काढायची?

जमिनदाराने आपल्या बायकोला अनमोल वस्त्रालंकार विकत घेऊन दिले. ती जमिनदाराबरोबर गाडीत बसून फिरायला जाऊ लागली. एकदां त्यांची गाडी कुंभाराच्या घराजवळून जात असता तिला मातीत खेळत असलेली तिची पाच मुलं दिसली.

इलाने लगेच गाडी थांबवायला सांगितले आणि खाली उतरून एकेकदा आपल्या मुलांना उचलून त्यांचा मुका घेतला. तिच्या कपड्यांना धूळ लागली. पण तिने त्याची फिकीर केली नाही. त्यांना उचलून घेणारी त्यांचीच आई आहे, हे मुलांना तरी कोठे माहीत होते? परंतु आईचे प्रेम मिळताच मुलं आनंदाने नाचू लागू लागली. उपेंद्र बाहेर आला. त्याने देखील इलाला ओळखले नाही.

"ही तुझीच मुलं ना? धुळीत लोळताहेत. तुला लाज नाही वाटत? पहा, यांची हाडे बाहेर आली आहेत." इला उपेंद्रला म्हणाली.

"मी गरीब आहे. मुलांना पोटभर खायला कोठून घालू?" उपेंद्र म्हणाला.

"उद्यां तू माझ्या घरी ये कामाला. हे पैसे ठेवून घे." असे सांगून इलाने उपेंद्राच्या हातात पैशाची एक पिशवी दिली.

दुसऱ्या दिवशी उपेंद्र कामाला जमिनदाराच्या घरी गेला.

"आंघोळीच्या खोलीची थोडी दुरुस्ती करायची आहे, पहिल्याने ते काम कर." असे सांगून इला उपेंद्रला आंघोळीच्या खोलीत घेऊन गेली आणि म्हणाली–"पहा, तुझे कपडे कसे मळके आहेत. आंघोळ करून मी देते ते कपडे घाल."



उपेंद्रला ते सर्व विचित्र वाटू लागले. आंघोळ करून तो चांगले कपडे घालून बाहेर आला. आतां इला स्वत:ला आवरू शकली नाही. म्हणाली–"तू मला ओळखलं नाहींस? मी इला!"

आतापर्यंत मान उचलून तिला पाहण्याची उपेंद्रला हिंमत झाली नव्हती. "तू येथे कशी आलीस?" उपेंद्रने विचारले.

"तू मला घाबरून मला ठार करण्याचा प्रयत्न केलास. म्हणून मी या जमिनदाराशी लग्न केले. पण त्याच्यावर माझं



प्रेम नाही. तुझ्यावर व आपल्या मुलांवर माझं तसंच प्रेम आहे. तू मला घेऊन जायला तयार आहेस का?" इलाने उपेंद्रला विचारले.

"तू म्हणतेस तेवढे हे काम सोपे नाही. तू दिसली नाहीस की जमिनदार तुझ्या शोधार्थ नोकर पाठवील व तू माझ्या घरात सापडलीस तर तो माझी चामडीच लोळवील. तरी मला विचार करून ठरवू दे. मी उद्यां येऊन तुला पुन्हा भेटेन." उपेंद्र म्हणाला.

"उद्या ये, विसरू नकोस." असे सांगून इलाने सर्व दागिने काढून त्यांचे एक गाठोडे बांधले आणि उपेंद्रला दिले.

उपेंद्र घरी जात असतां वाटेत तिला सैपाकीण भेटली. तिने त्याला विचारले—"कोठून रे येतो आहेस?"

"जमिनदाराने बोलावले होते कामाला, म्हणून गेलो होतो. उरलेले अन्न बांधून दिलं आहे." उपेंद्र म्हणाला.

"हे बघ, मी तुला बजावून ठेवते, जमिनदाराच्या बायकोच्या हातचे काही खाऊ नकोस. ती जादुगारीण आहे. खाल्लेस तर दगड होऊन जाशील." सैपाकीण म्हणाली.

"हे तुला कसे कळले?" उपेंद्रने तिला विचारले.

"मी जमिनदाराच्या घरी काम करीत असे. मी तिला कधी फूल व कधी बाई होतांना कितीदा तरी पाहिलं आहे. मी त्यांच्या घरचं काम सोडलं तेव्हां मला तिचं गुपित कळलं. मला पहिल्याने हे सर्व माहीत असतं तर मी तिचा जादू मंत्र सर्व निरुपयोगी करून टाकला असता." अशा तऱ्हेने ते गुपित सांगून सैपाकीण निघून गेली.

दुसऱ्या दिवशी उपेंद्र जमिनदाराच्या घरी गेला तेव्हां त्याने आपल्या पिशवीत इतर सामानाबरोबर एक कात्री पण ठेवून घेतली.



इला उपेंद्रची वाट पहात होती. तो येताच तिने विचारले—"तू काय ते ठरविलेस का?"

"होय, सांगतो तुझ्या खोलीत चल." असे सांगून तो इलाबरोबर तिच्या खोलीत गेला व तिला एका हाताने घट्ट आवळून धरून त्याने कात्रीने तिची वेणी कातरून टाकली.

केस कापल्याबरोबर इलाची सर्व मंत्रशक्ती नाहीशी झाली. तिचे नित्य यौवन लयास गेले.

आपले सौंदर्य एकाएकी असे लयास गेलेले पाहून ती रडू लागली. म्हणाली—"माझं सर्व यौवन गेले, सौंदर्य गेले! आतां माझ्यावर तुझं प्रेम कसं काय टिकणार?"

"इला, तसं नाही. तू मला याच रूपात जास्त आवडतेस. तुझं ते रूप नकली होतं. आतां चल आपण आपल्या घरी जाऊ." उपेंद्र आनंदाने म्हणाला.

ती दोघं आपल्या घरी जात असतां वाटेत जमिनदार भेटला. त्याने उपेंद्रला विचारले—"काय रे! तुला माझ्या बायकोने दिलेले काम पुरं झालं का?"

"मालक! माफ करा, काही दिवसांपूर्वी माझी बायको नाहीशी झाली होती.



तिचा मी पुष्कळ शोध केला पण सापडली नाही. आज तुमच्या घरी काम करणाऱ्या नोकरांमजुरांबरोबर मी तिला पाहिलं. मी तिला घरी घेऊन जातो आहे." उपेंद्र म्हणाला.

जमिनदाराने घरी येऊन पाहिले, त्याची बायको नव्हती. त्याने पुष्कळ शोध केला, पण सापडली नाही. तेव्हां त्याने आपल्या जुन्या सैपाकिणीला बोलावून तिला काम दिले.

जमिनदाराच्या घरून उचलून आणलेले दागिने विकून इला आणि उपेंद्र यांचा संसार सुखाचा झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले–"राजा! माझ्या मनात एक शंका आहे. इला नित्य यौवन गमावून बसल्यानंतर उपेंद्रने तिला आपल्या घरी आणून तिच्या बरोबर संसार कसा काय केला? तिचा त्याग करणे त्याला शक्य नव्हते का? तिच्या अंगात अपूर्व शक्ती सुद्धा उरली नव्हती. उपेंद्रने इलाला सोडून दिले असते तर ती त्याचे काय वाईट करू शकली असती? असे असून ही त्याने तिचा स्वीकार कां केला? याचे उत्तर माहीत असून ही तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"उपेंद्र, इलाच्या सौंदर्यावर कधीच भाळला नव्हता. लग्नापूर्वी तरी तो स्वत: तिच्याशी लग्नाला तयार कोठे झाला होता? इलाच त्याच्या सौंदर्यावर भाळली होती व तिने मंत्र टाकून त्याला आपल्याकडे आकृष्ट करून घेतले होते. तरी पुढे तिने आपल्या प्रेमानेच उपेंद्राला वश करून घेतले होते. तो सौंदर्यावर भाळला असता तर तिच्या वाढत्या यौवनाची व सौंदर्याची त्याला भीती कां वाटली असती? कारण तिचे सौंदर्य हे तिच्या जादूमुळे आहे हे त्याला कळले होते. त्याने सोडल्यामुळे इलाला जमिनदाराशी लग्न करावे लागले आणि ऐश्वर्य भोगायला असून ही जमिनदारावर तिचे प्रेम नसून आपल्यावरच आहे हे जेव्हां त्याला कळले तेव्हां त्याने तिला पुन्हां पत्नी म्हणून स्वीकारले. तिच्या प्रेमाखातर त्याने तिचा स्वीकार केला, यौवनाखातर नाही. म्हणून तिचे यौवन गेले तरी त्याचे त्याला दु:ख वाटले नाही.

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





# सौंदर्याची चढाओढ

एकदा वैकुंठ लोकी विष्णूच्या जेष्ठा आणि लक्ष्मी नांवाच्या दोघां बायकात त्यांच्या पैकी जास्त सुंदर कोण या गोष्टीवर वाद-विवाद सुरू झाला. दोघी ते विचारायला विष्णूकडेच गेल्या.

चतुर विष्णू म्हणाला–"दोघीत जास्त सुंदर कोण हे ठरवायला एका ब्रह्मदेवाशिवाय दुसरा कोणी मला योग्य दिसत नाही."

त्या दोघी ब्रह्मलोकात गेल्या. सरस्वतीने येण्याचे कारण विचारले तेव्हां दोघी म्हणाल्या–"आमच्या दोघीत जास्त सुंदर कोण आहे हे ब्रह्मदेवाला विचारायला आलो आहे."

सरस्वतीच्या तोंडी जेष्ठा व लक्ष्मी दोघी कशासाठी आल्या आहेत हे कळल्यावर ब्रह्मदेव बाहेर येऊन म्हणाला–"मातांनो! मला तुम्ही दोघी सारख्याच सुंदर दिसता आहां! कोणी मुलगा आपल्या मातेहून सुंदर दुसऱ्या कोणा स्त्रीला मानील का? मग मी, तुम्हां दोघींना माता मानीत असतां दोघीत जास्त सुंदर कोण आहे हे कसे काय सांगू शकेन? मला वाटते, तुम्ही दोघी कैलास लोकी जाहून महादेवाला कां नाही विचारीत?"

ब्रह्मदेवाच्या सल्लयाप्रमाणे जेष्ठा व लक्ष्मी कैलास पर्वतावर जाऊन पार्वती परमेश्वरांना भेटल्या. शंकराला पार्वती-कडून दोघी कोणत्या कामासाठी आल्या आहेत हे कळले. तेव्हां शंकर त्यांना म्हणाला–"आशुतोष म्हणून लोक मला ओळखतात. मी थोडक्यात खूष होऊन भक्तांना ते मागतील ते देतो. विचार केल्या शिवाय दिलेल्या वरदानाचा कटु परिणाम मलाच भोगावा लागतो. शेवटी तुमच्या पतिराजांना येऊनच मला त्या संकटांतून सोडवावे लागते. तेव्हां तुमच्या

श्री. मा. ग. शिरोळे









पतिराजांनाच ज्या प्रश्नाचे उत्तर देणे शक्य झाले नाही त्या प्रश्नाचे उत्तर मी काय देऊं शकणार? होय, तुमच्या पतिराजांचा परम भक्त तो नारद आहे ना, तो असल्या प्रश्नांची उत्तरे अगदी बरोबर सांगतो. त्याला कां नाही विचारीत?"

त्याच वेळी नारद तेथे आला. दोघींनी त्याला तोच प्रश्न केला.

तो म्हणाला- "मातांनो! मी ब्रह्मचारी. सौंदर्य वगैरे आपल्याला ते काही नाही कळत. तुम्हांला तुमच्या प्रश्नाचे उत्तरच पाहिजे असेल तर भूलोकात भद्रय्या शेट म्हणून एक वैश्य राहतो त्याला जाऊन विचारा. तो नक्कीच तुमच्या शंकेचे समाधान करील."

तेव्हां त्या दोघी भूलोकात भद्रैया शेटच्या घरी गेल्या. त्या आल्या बरोबर भद्रैया शेटने त्यांना साष्टांग नमस्कार करून येण्याचे कारण विचारले. म्हणाला— "या गरिबावर कसा काय अनुग्रह केलात?"

"आम्हां दोघीत जास्त सुंदर कोण आहे, लवकर सांग." दोघी म्हणाल्या.

ते ऐकून भद्रैया त्यांना म्हणाला— "तुम्ही दोघी माझ्या घरी चला."

त्या प्रमाणे दोघी भद्रैयाच्या घरी गेल्या. नंतर भद्रैया त्यांना परत जाऊन जेथे त्याने त्यांना नमस्कार केला होता तेथे जाऊन उभ्या व्हा, असे म्हणाला. दोघी त्या प्रमाणे परत जाऊन उभ्या राहल्या.

तेव्हां भद्रैया म्हणाला—"तुम्हां दोघींच्या सौंदर्यात पुष्कळच अंतर आहे. लक्ष्मी येतांना फार सुंदर दिसते तर जेष्ठा जातांना सुंदर दिसते."

भद्रैयाचे उत्तर ऐकून दोघी खूष झाल्या. त्यानंतर लक्ष्मी भद्रैयाच्या घरात येऊन बसली व जेष्ठा परत निघून गेली. म्हणून त्या दिवसापासून वैश्य लोकांची आढ्यता नाहीशी झाली व त्यांच्या घरी श्रीमंती कायमची नांदू लागली.





# वात्सल्य

एका गावी एक शेतकरी रहात असे. त्याच्या मुलाचे नाव दगडू. दगडू फार आळशी होता. तो बापाला त्याच्या कामात कोणतीच मदत करीत नसे. त्याच्या वडिलांना मुलाच्या उडाणटप्पूपणाबद्दल फार काळजी वाटे. त्यांनी त्याच्यात काही सुधार व्हावा म्हणून रागावून, समजून घालून पाहिले. पण काही उपयोग झाला नाही.

मोहन वयात आला. बापाने, मुलावर कुटुंबाचा भार येऊन पडला म्हणजे थोडी अक्कल येईल असा विचार करून त्याचे एक चांगलीशी मुलगी पाहून लग्न करून दिले. लग्न झाल्याबरोबर दगडू आपल्या वडिलांना म्हणाला—"बाबा! घरात माझा जो वांटा आहे तो मला द्या. मी स्वतःच्या पायांवर उभा राहून आपल्या कुटुंबाचे पालन पोषण करीन."

बापाला ते ऐकून आश्चर्य वाटले. म्हणाला—"तुला या घरात राहण्यास त्रास कसला आहे, हे तर कळू दे. तू आपल्या शक्तीप्रमाणे मेहनत करून काही मिळवू लागलास तर मला आनंदच होईल."

"बाबा! माझ्यावर एवढा प्रेमाचा आव आणून दाखविण्याची गरजच काय? तुम्ही मला नेहमी रागावत आलात. माझ्यावर तुमचे प्रेमच नाही. आजपर्यंत माझ्यावर शिव्यांची लाखोली वाहून वर मारहाण केलीत. आज आतां मी निराळा राहून स्वतःचे पोट भरावे म्हणतो आहे तर तुम्ही नाही म्हणतां. अजून मी स्वतंत्रपणे राहणे तुम्हांला आवडत नाही वाटते?"

"मुला! असले विचार मनात आणण्याचे कारण नाही. तू तुला वाटेल तेथे रहा व सुखी रहा." असे सांगून बापाने त्याचा वांटा त्याला देऊन टाकला. दगडू त्याच्या वांटाला जे

आले ते घेऊन शेजारच्या दुसऱ्या गावी जाऊन राहू लागला. तेथे तो दिवसभर मजुरी करून स्वत:चे व कुटुंबाचे पोट भरू लागला.

एक वर्ष लोटले. दगडूला एक मुलगा झाला. दगडूसारखाच खंडू पण उडाणटप्पू व कामचोर निघाला. मुलाच्या उडाणटप्पूपणाबद्दल दगडूला फार राग येई एकदां रागाच्या भरात त्याने आपल्या मुलाला खूप ठोकले. तो घर सोडून पळाला व आपल्या आज्याच्या गावी गेला व आज्याला सर्व सांगितले.

आज्याने नातवाला आपल्या एका मित्राच्या घरी नेऊन ठेवले.

दगडू खंडू घरातून निघून गेल्यापासून काळजीत पडला. त्याने मुलाचा पुष्कळ शोध केला. पण तो कोठे सांपडला नाही. शेवटी तो मुलाचा शोध काढीत आपल्या वडिलांकडे गेला आणि त्यांच्याकडे चवकशी केली. म्हणाला—"चार दिवस झाले, खंडू नाहीसा झाला आहे. काम चोर, पक्का उडाणटप्पू झाला आहे. म्हणून त्याला मी चार दिवसां पूर्वी खूप रागावलो व दोन लगावले पण. म्हणून तो पळून गेला आहे."

"निघून गेला आहे तर जाऊं दे. असल्या आळशी उडाणटप्पू मुलाने घरी राहले काय



आणि नाही राहिले काय सारखेच. त्याच्या हातुन तुझा उद्धार काय होणार? तू त्याची काळजी करूं नकोस." बाप म्हणाला.

दगडू हताश होऊन दु:खी मनाने घरी परतला. नवऱ्याला एकटा घरी परत आलेला पाहून बायकोने रडून सर्व घर डोक्यावर घेतले. म्हणाली—"मुलावर मारहाण केल्याने. काय झाले? तुम्ही कधी त्याला वळण लावलेत की रागावल्याने काम करू लागेल? कोठे उपास काढीत उन्हात वणवण फिरत असेल, देवच जाणे."

खंडूच्या काळजीने दगडू आजारी पडला. त्याच्या बापाला जेव्हां ते कळले तेव्हां तो आपल्या नातवाला बरोबर घेऊन दगडूच्या घरी गेला. दगडूने खंडूला पोटाशी आवळून धरले व लहान मुलासारखा रडू लागला.

तेव्हां दगडूचा बाप त्याला धीर देत म्हणाला—"मुला! आतां तुला कळले असेल, मुलाचे प्रेम हे कसे असते ते! तुझा मुलगा उडाणटप्पू होऊ लागला म्हणून तू त्याला मारलेस. याचा अर्थ त्याच्यावर त्याचे प्रेम कमी होते असा मुळीच नाही. हेच पहा, चार दिवसच तो नजरेआड झाला तर तुझी ही स्थिती झाली. आता तूच विचार कर, तू घर सोडून निराळे घर केलेस त्या वेळी माझ्या मनाची काय स्थिती झाली असेल. परंतु मी आजवर मनाला आवरून होतो. तुझे डोळे कधी तरी उघडतील ही आशा मनात बाळगून मी आजवर मनाला धीर दिला. मी तुला मारले, रागे भरलो ते तुझ्यावर प्रेम नव्हते म्हणून का? मी तुला किती समजावून सांगितले, पण ते ऐकले नाहीस आणि घर सोडून निघून गेलास."

दगडूची अशा तऱ्हेने कानउघाडणी झाल्यावर दगडू आपली बायको व मुलगा दोघांना घेऊन आपल्या वडिलांच्या घरी परत येऊन राहू लागला.



# विश्वास

एका शिष्याचा आपल्या गुरूवर अपार विश्वास होता. त्याने आपल्या गुरूचे नामस्मरण करून पाण्यावर चालून नदी पार केली होती. ही गोष्ट गुरूला कळली. गुरूला वाटले–''माझ्या नावाचाच हा महिमा आहे. मी केवढा थोर पुरुष आहे. मग जगात मला करतां येणार नाही असे काय आहे?

दुसऱ्या दिवशी गुरु "मी" शब्दाचा जप करीत नदीच्या पाण्यात पाय ठेवून चालण्याचा प्रयत्न करू लागला. पण तो तरंगला नाही. पाण्यात पाऊल टाकतांच नदीच्या ओघात पाय घसरून तो वाहून गेला.





# राजकुमार

छत्रपूरचा राजा सुधन्वा याने बालपणीच अनेक देशांचे पर्यटन करून ज्ञान संपादन केले. त्याच्या बरोबर श्रीपुत्र नावाचा एक दुसरा राजपुत्रपण पर्यटन करण्यास गेला होता. दोघांचे जुळ्या भावंडांसारखे परस्परावर प्रेम होते. ते दोघे शूर व साहसी होते. त्यांच्या समोर मोठ मोठ्या शूर वीरांचा पण टिकाव लागत नव्हता. त्यांची कीर्ती जगभर पसरली. वयात आल्यावर दोघांची सुंदर राजकन्यांशी लग्ने झाली. त्यांचा राज्याभिषेक पण यथा वेळी झाला. दोघे राज्य करीत असतां प्रजेचे प्रेमपात्र झाले. श्रीपुत्रचे राज्य छत्रपुर पासून दोन अडीचशे मैल दूर होते.

छत्रपूरच्या राजाला बरेच दिवस मूल बाळ झाले नाही. एकदा तो शिकारीला रानात गेला असता एका किराताने राजाचा हात पाहून भविष्य वर्तविले की, एका माशाच्या कृपेने राजाला पुत्रप्राप्ती होणार आहे. एकच औरस मुलगा असला तरी तो तीन मुले वाढवणार आहेत.

किरात जे म्हणाला त्याचा राजाला उलगडा झाला नाही.

राजा शिकार करून घरी परत येऊन पाहतो तर अंत:पुरात कोळ्यांनी पांच रंग असलेला एक विचित्र मासा आणून दिला होता. सैपाकिणीने तो मासा शिजवून स्वत: थोडासा खाल्ला व बाकी राणीला खायला दिला. राणीने थोडा खाऊन बाकी पानात तसाच टाकून दिला. तो तिच्या एका दासीने खाल्ला. तो मासा खाणाऱ्या तिघी गरोदर झाल्या व तिघींना नऊ महिने व नऊ दिवस उलटल्यावर मुले झाली.

तिघींना एकाच वेळी मुलगे झाले आणि तिघे दिसायला सारखे होते. राजाला



ती गोष्ट कळली तेव्हां तो म्हणाला– "मी स्वत: डोळ्यांनी तिघांना पाहिले नाही तो पर्यंत ती गोष्ट कबूल करणार नाही." राजाच्या आज्ञेने तिघां मुलांना राजाच्यां खास महालात आणण्यात आले. गडबडीत मुलांची अदलाबदल झाली.

"आतां या तिघांपैकी कोण युवराज हे ठरविणे अशक्य आहे. तेव्हां तिघांचे पालन पोषण राजवाड्यातच करायचे. तिघांना तीन निरनिराळ्या रंगांचे व प्रकारांचें कपडे घालायला द्यावे." अशी राजाज्ञा झाली. राजाने त्यांची नांवे अनुक्रमे धीर, वीर व शूर अशी ठेवली.

तिघे मुलगे मोठे झाले तेव्हां राजा त्यांना म्हणाला–"तुमच्या पैकी एक जण माझ्या पाठीमागून गादीवर बसेल. म्हणून तुमच्या शक्तिसामर्थ्याची मला कल्पना यायला हवी. तुम्ही तबेल्यातून स्वत: पाहिजे तो घोडा निवडून घ्या आणि देशपर्यटनास जा. परत येताना मी न पाहिलेली अशी एखादी वस्तू घेऊन या."

सर्व त्याप्रमाणे आपल्या आवडीने चांगला घोडा घेऊन निघाले. कित्येक दिवस प्रवास केल्यावर ते एका विचित्र रानात पोचले. त्या जंगलांतल्या एका जांभळाच्या झाडाला चांदीचा रंग असलेली फळे लागली होती. धीरने चटकन काही फळे तोडून घेतली आणि म्हणाला–"बाबांनी असली फळे कधी पाहिली नसतील. ही नेऊन देतो. मलाच ते युवराज करतील." असे सांगून तो घोड्यावर बसून राजधानीकडे परतला.

वीर विचार करू लागला, आपल्याला कां बरे ते सुचले नाही? पाहू या आणखी एखादी विचित्र वस्तु आपल्याला पुढे मिळेल असा विचार करून तो पुढे निघाला. शूरदेखील त्याच्या बरोबर पुढे गेला.

काही दिवस प्रवास केल्यानंतर ते आणखी एका विचित्र जंगलात पोंचले. तेथे सोन्याच्या रंगाची कवठे त्यांना दिसली. वीर म्हणाला–"बाबांनी असली कवठें कधीच पाहिली नसतील. मी ही नेऊन देतो. मी राजा होणार." असे सांगून तो दोनतीन कवठे काढून घेऊन राजधानीकडे निघाला.

त्यानंतर शूर एकटा पुढे निघाला. तो पुष्कळ दिवस प्रवास केल्यानंतर एका विचित्र जंगलात पोचला. त्याजंगलातली प्रत्येक वस्तु हिऱ्यासारखी चमकत होती. गवतसुद्धा चमकत होते. त्या जंगलाच्या मधोमध एक सोन्याचा राजवाडा होता. त्याच्या भींतीवर नवरत्न जडलेले होते. राजवाड्यासमोर एक म्हातारी बसली होती. तिच्या हातात एक तलवार होती.

शूरने तिला पाहिले. पण तिने त्याला पाहण्यापूर्वीच तो एका झुडपाआड लपला. त्याला वाटले की असा रत्नमहाल बाबांनी पूर्वी कधी पाहलेला नसणार. एक लहानशी डाहाळी आपण तोडून न्यावी असा विचार करून त्याने झाडाला हात लावल्या बरोबर ते झाड कण्हू लागले. एक दुर्वा तरी तोडून न्यावी या हेतूने त्याने हात लावला मात्र, ती दुर्वा खोल बारीक आवाजात म्हणाली– "शूर! मला तोडू नकोस. तू लगेच घरी परत जा. येथे तू जे काही पाहिलेस ते





कोणाला सांगू नकोस. तुझ्या बाबांनी देश भ्रमण करीत असतांना जो पेहराव केला होता आणि जी तलवार धारण केली होती तो पेहराव व तलवार धारण करून आणि ते ज्या घोड्यावर बसून गेले होते त्याच घोड्यावर बसून इकडे ये. तेव्हां तुझे हित होईल."

ती दुर्गा जे म्हणाली त्यावर शूरचा विश्वास बसला. तो त्या भयंकर म्हातारीच्या दृष्टीस पडल्याशिवाय जंगलाबाहेर आला आणि सरळ आपल्या राजधानीकडे निघाला.

तिकडे धीरने घरी जाऊन चांदीची जांभळे राजाला दाखविली व म्हणाला–"पहा, अशी अद्भुत वस्तु जगात दुसरी मिळणे शक्य नाही."

"बाळ, पण तू फार दूर गेला नाहीस. चांदीची जांभळे आपल्या राज्याच्या सरहद्दीवरच्या जंगलात आहेत. मी लहानपणी त्या जांभळाच्या झाडापर्यंत रोज आपल्या मित्रांबरोबर फिरायला जात असे." राजा असे म्हणाल्यावर धीर हताश झाला.

वीर सोन्याचे कवठ घेऊन आलेला पाहून राजाला आश्चर्य वाटले नाही. तो म्हणाला–"बाळ! मी तुम्हांला जगाचा प्रवास करून काही तरी अद्भत वस्तु घेऊन यायला पाठविले होते. पण तू सुद्धा थोड्याच अंतरावर जाऊन परत आलास. पूर्वी मी तेथपर्यंत रोज संध्याकाळी फिरायला जात असे. राजा म्हणाला ते ऐकून वीरदेखील हताश झाला.

दोघे राजकुमार हताश झाले. दोघांना वाटू लागले की शूर काही तरी विचित्र वस्तु आणणार आणि राजा होणार.

परंतु शूर रिकाम्या हातानेच परत आला. तो राजाला म्हणाला–"बाबा! तुम्ही पाहिली किंवा ऐकली नाही अशी एकही वस्तु मला दिसली नाही. परंतु मी पुन्हा जावे म्हणतो. आपण लहानपणी जो पोशाख घालीत होता, जी तलवार धारण करीत होतां व ज्या घोड्यावर बसून जात होता त्यांची गरज आहे मला."

राजा म्हणाला–"माझ्या लहानपणचा पोशाख फाटका आहे. तलवार गंजली आहे आणि घोडा इतका म्हातारा झाला आहे की त्याला चालवत देखील नाही." तरी शूरने हट्ट धरून राजाकडून त्या तिन्ही वस्तू मागून घेतल्या.

शूरने वडिलांचे ते फाटके कपडे घातले. तलवारीचा गंज घुवून काढला आणि तबेल्यात म्हाताऱ्या घोड्याला सोडायला निघाला. तेव्हां घोडा खेंकाळू लागला आणि त्याच्या खेंकाळण्यात माणसांची भाषा स्पष्टपणे ऐकू आली. शूरला घोडा म्हणाला–"मला निखारे खायला घाल!"

ते ऐकून शूर चकितच झाला, पण घाबरला नाही. त्याने दोनचार लाकडे जाळून निखारे तयार केले व ते घोड्याच्या तोंडात टाकले, ते तोंडात पडताच घोडा उठून उभा राहिला. त्याचे सर्वांग मखमली-सारखे मऊ व लखलखीत दिसू लागले. एकदा जांभई घेऊन तो उभा राहिला आणि आपल्या खुरांनी जमीन खरडू लागला.



शूरला आनंद झाला. तो उडी मारून घोड्यावर बसला. घोडा दुसऱ्या क्षणाला वायुवेगाने पळू लागला. अर्ध्या तासात तो घोडा रत्नमहालात येऊन पोचला. तेथे पोचल्यावर घोडा म्हणाला–"शूर, आता तुला फार सावधपणे कामगिरी बजावयाची आहे. या जंगलात राहणारी म्हातारी एक भयंकर मोठी जादुगारीण आहे. तिची दृष्टी तुझ्यावर पडली तर तुझ्या जिवाला धोका आहे, विसरू नकोस. क्षणार्धात तू तिच्या हातातली तलवार हिसकावून घेऊन तिचे डोके उडविले पाहिजे. तिने मंत्र-बळाने येथील राजा, त्याची मुलगी व



राजाच्या कुटुंबातील सर्व लोकांना झाडे झुडपे व गवत करून टाकेलं आहे. ती मेली तर सर्वांना आपले मूळ रूप येईल.

शूर सावधपणे जादुगारणीच्या पाठी-मागे मांजराच्या पावलाने जाऊन उभा राहला आणि झटदिशी तिच्या हातातली तलवार हिसकावून घेऊन आपल्या तल-वारीने तिचे डोके छाटून टाकले.

दुसऱ्या क्षणाला सारे जंगल नाहीसे झाले आणि जिकडे पहावे तिकडे माणसेच माणसे दिसू लागली. त्यांच्यामध्ये राजा व राजकन्या पण होते. राजाने शूरला पाहून विचारले–"कोण रे बुवा तू? तू कपडे घालून आला आहेस ते माझ्या एका बाल-मित्राचे दिसत आहेत. हे तुला कोठे व कसे काय मिळाले?"

शूर हा सुधन्वाचाच मुलगा आहे हे जेव्हां त्या राजाला कळले तेव्हां तो त्याला प्रेमाने भेटला आणि म्हणाला–"माझे नाव श्रीपुत्र. तुझ्या वडिलांनी माझ्याविषयी तुला कधी काही सांगितले नाही का? बालपणी आम्ही 'जीवश्चकंठश्च' मित्र होतो. तू माझा व माझ्या राज्याचा उद्धार केलास. याशिवाय तू माझ्या एका बाल-मित्राचा मुलगादेखील आहेस. तू माझी मुलगी मालती हिच्याशी विवाहास तयार झालास तर मला फार आनंद होईल."

मालतीचे रूप पाहूनच शूरच्या मनात तिच्याशी आपले लग्न होऊ शकेल का, हा विचार आल्याशिवाय राहिला नव्हता. राजाने स्वतःच विचारल्यावर त्याला आनंदच झाला. पण त्याने लगेच होकार दिला नाही. म्हणाला–"मी आपल्या वडिलांची संमती घेऊन परत येईन." ते ऐकून श्रीपुत्रला जास्तच आनंद झाला. आपल्या हातातली अंगठी काढून शूरच्या हातात देत तो म्हणाला–"तू ही अंगठी आपल्या वडिलांना दाखव आणि वडिलांना सांग की ही अंगठी देणाऱ्याने आपल्या मुलीचे लग्न तुझ्याशी करून देण्याचे वचन दिले आहे."

शूर आपल्या घोड्यावर बसून आपल्या वडिलांकडे परत आला आणि श्रीपुत्रने दिलेले अंगठी दाखवून म्हणाला–"ही अंगठी देणाऱ्याने आपल्या मुलीचे लग्न माझ्याशी करून देण्याची इच्छा दर्शविली आहे व त्यासाठी आपली परवानगी मागितली आहे."

ते ऐकून सुधन्वाला फारच आनंद झाला. आपल्या बालमित्राच्या मुलीशी आपल्या मुलाचे लग्न होणार आहे. परंतु आपला खरा मुलगा कोण हे कळल्यावर त्याच्याशी बालमित्राच्या मुलीचे लग्न होऊ शकलं तर जास्त आनंद होईल. म्हणून सुधन्वा शूरला म्हणाला–"लग्नासंबंधी मी लवकरच निर्णय घेऊन कळवीन." असे सांगून त्याने शूरला पाठवून दिले. नंतर राजाने जंगलातल्या भविष्य वर्तवणाऱ्या किराताला बोलावून आणविले.

किरात आल्यावर राजा त्याला म्हणाला–"तू मला जे भविष्य सांगितले होतेस ते खरे निघाले. मी तीन मुलांना वाढवीत आहे, पण फक्त एकच माझा खरा मुलगा आहे. एक सैपाकिणीचा मुलगा आहे आणि एक दासीचा. त्यांचा हात पाहून माझा














खरा मुलगा कोण हे सांगता येईल का तुला? कारण त्यांच्या पैकी एकाला आपला युवराज करून त्याचा राज्याभिषेक करावयाचा आहे.

किराताने तिघांचे हात पाहून राजाला कानात सांगितले, धीर हा आपला खरा मुलगा आहे. शूर हा दासीचा मुलगा आहे व वीर हा सैंपाकिणीचा.

राजा निराश झाला. तिघांपैकी सर्वात आळशी तोच त्याचा मुलगा निघाला. सर्वात हुशार व मेहनती दासीचा मुलगा होता. परंतु आपल्या मुलालाच गादीवर बसवावे लागणार. म्हणून राजाने मध्यरात्रीच्या सुमारास धीरला जागे केले व म्हणाला–"तबेल्यात माझा लहानपणातला घोडा आहे त्याला मालिश व खरारा करून दाणा खायला घाल आणि त्याच्यावर बसून तुला तो जिकडे नेईल तिकडे जा."

"त्या मरतुकड्या घोड्यावर?" धीरने आश्चर्य प्रकट करून विचारले.

"होय बाळ, तोच आपल्या शूरला फार दूर एका जंगलात घेऊन गेला होता." राजाने सर्व नीट समजावून सांगितले.

धीरने घोड्याला उठविण्याचा प्रयत्न केला. पण तो उठेच ना. त्याने मारहाण सुरु केली तेव्हां शूर जागा होऊन तेथे आला आणि त्याला विचारले–"असा घोड्याला मारतोस का?"

बाबांनी मला या घोड्यावर बसून जायला सांगितले आहे. पण तो उठतच नाही." धीर म्हणाला. शूरला हे कळायला वेळ लागला नाही की मालतीशी आपला विवाह राजाला पसंत नाही. तरी त्याने धीरला समजावून सांगितले की घोड्याला निखारे खायला घाल.

धीरने त्या प्रमाणे घोड्याला निखारे खायला घातले. घोडा उठून उभा राहिला. धीर त्याच्यावर बसून अर्ध्या तासात श्रीपुत्रच्या राज्यात येऊन पोचला. श्रीपुत्रने त्याला विचारले–"तू परत आलास का? तुझ्या वडिलांनी लग्नाला परवानगी दिली का? माझी अंगठी परत दे."

"अंगठी कोणती? मला नाही माहीत!" धीर म्हणाला.

"आपल्या वडिलांना दाखविण्यासाठी मी तुला अंगठी दिली नव्हती का?" श्रीपुत्रने विचारले.

"मला! तुम्ही केव्हां अंगठी दिलीत?" धीरने विचारले.

श्रीपुत्रला हे ओळखायला वेळ लागला नाही की तो शूर नाही. म्हणून त्याने त्याला कैद केले. घोडा परत सुधन्वाच्या राजधानीत गेला. धीरचा जीव धोक्यात सांपडला असावा अशी शंका राजाला आली. राजाने बोलावून धीरच खरा युवराज असून त्याचा जीव वांचविणे त्याच्या सेवकाचे कर्तव्य आहे असे शूरला सांगितले.

शूरने राजाच्या पायांवर डोके टेकून नमस्कार केला व म्हणाला–"महाराज! मी दासीपुत्र असून ही आपल्या घरी राजकुमारासारखा वाढलो. या ऋणातून मी या रीतीने उतराई होईन. मला आशीर्वाद द्यावा."

शूर घोड्यावर बसून श्रीपुत्रच्या रत्न महालात गेला आणि म्हणाला–"महाराज! आपण दिलेली ही अंगठी घ्यावी." असे सांगून त्याने अंगठी दिली.

"यापूर्वी एकाला कैद करून ठेवले आहे. कारण त्याला अंगठीची गोष्ट माहीतच नव्हती. तो कोण?" राजाने विचारले.

"तो धीर आहे. आमचे दोघांचे रूप सारखे सारखे आहे." शूर म्हणाला.

श्रीपुत्रने धीरला कैदेतून मुक्त केले. तो घोड्यावर बसून आपल्या वडिलांकडे परत गेला. शूर व मालती दोघांचा विवाह थाटामाटाने पार पडला.





# नवी सून

पूर्वीच्या काळात चीन देशात सासवासुनांची भांडणे फार होत. सुनेवर सासूला राग आला की तिला मारीत असे. अनेक तऱ्हेने ती तिचा छळ करी व कधीकधीतर तिचा जीव घ्यायला सुद्धा मागे पुढे पहात नसे.

एका डोंगरी प्रदेशात एक कुटुंब रहात असे. त्या कुटुंबात दुसऱ्या मुलाचे लग्न करून देण्यासाठी त्या कुटुंबातली वडील मंडळी एका मुलीला घेऊन आली. नवीन होणाऱ्या सुनेला सासू खूप काम सांगे.

त्या घराच्या परसात एक विचित्र झाड होते. त्या झाडाची पाने कधी पिकून गळून पडत नसत. दर रोज सकाळी त्या झाडावरून तांब्याच्या गोलगोल पुतळ्या खाली पडत. त्या पुतळ्यांना भोक पाडून ते पैसे म्हणून वापरण्यात येत. चीन देशात तसलेच पैसे होते.

झाडावरून पडणाऱ्या तांब्याच्या पुतळ्यांना भोक पाडण्याचे काम नव्या सुनेला देण्यात आले. ते काम फार कठीण होते. हतोडे मार मारून बिचाऱ्या मुलीच्या हाताची बोटे सोलून निघाली. रात्रभर ती पैसे तयार करी आणि दिवसभर घरातले काम करी. या सर्व कामात तिला जड काम वाटे ते डोंगर चढून लाकडे तोडून आणण्याचे. डोंगरावर थंडीपण तर्शीच खूप पडे. तिला पांघरायला लोकरीची एखादी शाल पण नव्हती.

ती बिचारी डोंगरावर लाकडे तोडून आणायला जाई तेव्हां थोडा वेळ एकटी बसून आपल्या दैवाला दोष देत रडत बसून राही. एकदां ती अशीच रडत असता एका म्हाताऱ्याने तिला येऊन विचारले—"मुली तू अशी रडतेस का?" तिने त्याला आपली सर्व रडकथा सांगितली.

"तू त्या डोंगराच्या टोकाला एक दगडाची मूर्त आहे ती पाहिलीस का? त्या माणसाचा हात तुझ्या सासूच्या परसातील झाड दाखवितो. तू तो हात तोडून टाकलास तर तांब्याच्या पुतळ्या देणारे ते झाड मरून जाईल. तुझा अर्धा अधिक छळ कमी होईल." म्हाताऱ्याने तिची समजून घातली.

त्या मुलीला फार आनंद झाला. तिने दगडाची ती मूर्त हुडकून काढली आणि त्या दगडाच्या माणसाचा हात तोडून टाकली. घरी येऊन पाहते तर खरोखरच झाड वाळून चालले होते.

सासूला शंका आली हे सर्व काम आपल्या होणाऱ्या नवीन सुनेचे असले पाहिजे. ती तिला रागाच्या भरात मारायला धावली व म्हणाली—"चांडाळणी! पैसे देणाऱ्या झाडाची अशी दशा तूच केलीस! मी तुला पण ठार करते!" ती सुरा घेऊन सुनेला मारायला धावली. सून घाबरून जाऊन जी पळत सुटली ती सरळ डोंगर चढून निघून गेली. सासूने तिला धरण्यासाठी पुष्कळ धावपळ केली. पण तिचे सर्व प्रयत्न फोल ठरले. तिला परत घरी यावे लागले.




काय करावे हे सुनेला कळेना. घरी परतली तर सासू जीव घेणार. म्हणून तिने डोंगरातच राहून पुढले आयुष्य कंठायचे ठरविले. झाडाचा पाला खाऊन ती राहू लागली. तो पाला खाल्ल्याने तिच्या शरिरात पुष्कळ बदल झाला. तिला पांढरे लहान पंख फुटले. तिला थोडे थोडे उडता पण येऊ लागले.

डोंगराच्या पायथ्याशी एक उंच सागवानाचे झाड होते. त्या झाडावर ती राहू लागली. कोवळी पालवी खाऊन त्यावर ती राहू लागली. देवळाच्या आवारात एक मठ होता. त्यात एक भिक्षु रहात असे.

त्याला त्या शाल वृक्षावर एक मनुष्याकृती दिसली. तो मनुष्य कोण असावा हे ओळखण्याची तीव्र इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली. म्हणून त्याने उत्तम जेवण तयार करून झाडाखाली नेऊन ठेवले आणि थोड्या अंतरावर एका जागी लपून बसला.

नव्या सुनेला मनुष्यांचे जेवण दृष्टीस पडतांच ते खाण्याची तीव्र इच्छा झाली. जवळ पास कोणी नाही असे पाहून ती हळूच खाली उतरली आणि घाई घाईने तिला खाता आले तितके खाऊ लागली.

आड लपून बसलेल्या भिक्षूला ते एखादे भूत असावेसे वाटले. तो भुतांचा मंत्र म्हणत जवळ आला आणि विचारू लागला–"हे पिशाचा! तू कोण आहेस?"

नवी सून घाबरून उडण्याचा प्रयत्न करू लागली. पण तिला उडता येईना कारण मनुष्यांचा आहार घेतल्याने ती उडण्याची शक्ती गमावून बसली. म्हणून तिने रडत रडत आपली रडकथा त्या भिक्षूला सांगितली. ती बोलत असतां तिच्या अंगावरचे पंख व पिसें गळून पडू लागली व ती एक सामान्य स्त्री दिसू लागली.

"तुला भिण्याचे मुळीच कारण नाही: तुझी सासू तुझा कसा छळ करते हे मी पाहतो." अशी तिची समजूत घालून भिक्षू तिला तिच्या सासूच्या घरी घेऊन गेला. सासूला एका बाजूला बोलावून नेऊन त्याने तिला समजावून सांगितले की तुझी सून चांगली मुलगी आहे. तिच्याशी चांगली वागत जा. तू तिचा छळ केलास तर ती भूत होऊन जाईल. आकाशात उडतांना मी स्वत: डोळ्यांनी पाहिले आहे.

सासूला भुताचे नाव ऐकतांच कापरे भरले. म्हणून आपल्या नव्या सुनेला घराच्या बाहेर काढण्याची तिला हिंमतच होईना. तिने चांगला मुहूर्त पाहून आपल्या दुसऱ्या मुलाशी तिचे लग्न करून दिले.





# यशस्कर याचा निवाडा

एकदा राजा यशस्कर न्यायालयाचे काम संपवून जेवणासाठी उठणार इतक्यात एका ब्राह्मणाने येऊन राजाच्या दर्शनाची इच्छा असल्याचे सांगितले.

"महाराजांनी आजचे सर्व काम उरकले आहे. उद्यां येऊन आपल्याला जे काही निवेदन करावयाचे असेल ते करावे." असे द्वारपाल म्हणाला.

राजाला ती गोष्ट ऐकू आली. त्याने ब्राह्मणाला आत बोलावून येण्याचे कारण विचारले.

ब्राह्मण दु:खपूर्ण आवाजात म्हणाला–"महाराज! मी अनेक देशांचे भ्रमण करून शंभर सुवर्णमुद्रा संपादन केल्या आणि स्वदेशी आलो. आपल्या कृपेने वाटेत चोरांनी मला कोणत्याही प्रकारे त्रास दिला नाही. काल सायंकाळी मी लवनोत्स नामक गावी एका झाडाखाली झोपलो होतो. सकाळी उठून पाहतो तर माझी सुवर्णमुद्रांची पिशवी नाहीशी झाली होती. थोडा शोध केल्यावर ती पिशवी विहिरीत दिसली. मी आपले सर्वस्व घालवून बसलो होतो आणि मला विहिरीत उतरायला भीती वाटत होती. तेव्हां मी हताश होऊन रडत असतां एका माणसाने मला विचारले–"मी तुमची पिशवी विहिरीतून काढून दिली तर त्याबद्दल तुम्ही मला काय देणार?" मी म्हटले–"तुला हवी असतील तितकी नाणी तू मला दे." त्याने विहिरीतून पिशवी काढली व मला फक्त दोन नाणी दिली. मी त्याबद्दल त्याच्याशी भांडलो. तेव्हां तेथे जमलले लोक मलाच रागावू लागले व म्हणाले–"यशस्कर राजाच्या राज्यात सलोख्याने कामे होतात." आपल्या राज्यात असा अन्याय झाला तर मला आपल्या दारासमोर अन्नत्याग करून जीव द्यावा लागेल."











"तुमची पिशवी काढून देणारा कोण होता?" राजाने विचारले.

"मी त्याचे तोंड पाहून त्याला ओळखू शकेन. त्याचे नाव नाही मला माहीत." तो ब्राह्मण म्हणाला.

"तुमच्या या फिर्यादीचा निकाल उद्यां सांगतो. आज तुम्ही माझ्याबरोबर जेवून घ्या आणि उद्यांपर्यंत आराम करा." राजा म्हणाला.

दुसऱ्या दिवशी राजाच्या आज्ञेने लवनोत्स गावाचे सर्व नागरिक न्यायालयात हजर झाले. ब्राह्मणाने त्यालां फसविणाऱ्या माणसाला ओळखले. ब्राह्मणाने राजाला जे काही सांगितले तेच त्या माणसाने आपल्या जबानीत सांगितले.

तेथे जमलेल्या लोकांना कळेना की वादी आणि प्रतिवादी दोघांचे म्हणणे एकच आहे. मग राजा निकाल काय देणार हे त्यांना कळेना.

परंतु राजाने निकाल सांगितला– "ब्राह्मणाला अठ्ठ्याण्णव नाणी देऊन प्रतिवादीला दोनच नाणी देण्यात यावी."

त्यावर काही लोकांनी अन्याय झाल्याचे सांगून हरकत केली. तेव्हां राजाने त्यांना समजावून सांगितले की केव्हां केव्हां न्याय आणि अन्याय एकाच तऱ्हेचा असतो. आपण विचार करून तथ्य काढावयाचे असते. या ब्राह्मणाने, 'तू जितकी देशील तितकी मी घेईन असे नव्हते सांगितले. याने एवढेच सांगितले होते की 'तुला हवे असतील तेवढीच दे.' पण या लालची माणसाने काय केले? त्याला हवे होते तेवढे ठेवून घेतले आणि जेवढे नको होते तेवढे ब्राह्मणाला दिले. अशा तऱ्हेने जे ठरले होते त्याविरुद्ध त्याने केले."

यशस्कराने अशा तऱ्हेने अनेक कज्जे बरोबर निकाल सांगून मिटविले व पृथ्वीवर पुन्हां सत्ययुग आरंभ केला अशी कीर्ती संपादन केली.





# तक्रार

फार पूर्वी प्रशा नांवाच्या युरोपीय देशात एक राजा राज्य करीत असे. तो हुशार व चतुर होता. त्याच्या दरबारात फारूस आणि कमाल नावाचे दोन सल्लागार होते.

फारूस हा कमाल पेक्षा जास्त हुशार आहे, अशी त्याला प्रसिद्धी मिळाली होती. म्हणून कमाल फारूसचा हेवा करी. फारूसची बादशाह फार स्तुति करी, एवढेच नव्हे तर त्याला बादशाहाकडून पुष्कळ इनामे पण मिळाली होती.

कमालला वाटू लागले की फारूसला बादशाहच्या दरबारातून हाकलून लावता आले तर बरे होईल. त्या शिवाय दरबारात आपली प्रतिष्ठा वाढणे शक्य नाही आणि बादशाह आपला सल्लापण घेणार नाही.

फारूस विषयी फक्त बादशाहाच्या मनातच आदरभाव होता, असे नसून सर्व दरबारीपण त्याला मान देत. कारण तो दयाळू, परोपकारी व सज्जनपण होता. म्हणून त्याच्या विरुद्ध कारस्थान करणे पण तितके सोपे नव्हते. म्हणून चांगलीशी संधी मिळाल्यावर त्याचा पाणउतारा करण्याचा कमाल विचार करीत होता. बादशाहाच्या मनात फारूसच्या विरुद्ध संशय कसा उत्पन्न करावयाचा या विचारात कमाल होता.

अशी एक संधी जणुकाही चालूनच आली.

राजाचे शिपाई एका गुन्हेगाराला दरबारात ओढून घेऊन आले. त्याच्यावर खुनाचा आरोप होता. राजाने सर्व चवकशी करून खुनाचा आरोप खरा असल्याची खात्री झाल्यावर त्या आरोपीला शिरच्छेदाची शिक्षा दिली. शिक्षा ऐकून आरोपी हताश होऊन रागारागाने तोंडाला येईल त्या शिव्या राजाला देऊ लागला. कारण त्याला

श्री. पु. वा. आपटे










जीवनआशा उरली नव्हती. मग राजाचे भय कसले? कैदी काय म्हणाला ते राजाला बरोबर ऐकू आले नाही. "कैदी काय म्हणतो आहे. फारूस?" राजाने विचारले.

फारूस उभा राहून म्हणाला–"बादशाह! कैदी म्हणतो आहे की जो मनुष्य दीन दुःखी लोकांना दया करून क्षमा करतो त्याचे ईश्वर रक्षण करतो. तो निर्दोष आहे व त्याचा शिरच्छेद झाल्याने जे पाप घडेल ते राजाचा सर्वदा पिच्छा पुरवील."

बादशाहाला ते ऐकून कैद्याची कींव आली व त्याने दया करून त्याला मुक्त केले.

आतां कमालाला चांगली संधी मिळाली. फारूसअर उलट आरोप लावण्याच्या हेतूने कमाल उभा राहून म्हणाला–"बादशाह! या सेवकाचा देह आपण दिलेल्या अन्नावर वाढला आहे. मी आपणांसमोर कधी खोटे बोलणार नाही. त्या कैद्याने आपल्याला शिव्या शाप दिले होते आणि ईश्वराचे प्रतिनिधी आपण तर आपला अपमान केला होता. माझी आपणांजवळ अशी विनंती आहे की या अपराधाबद्दल एकच एक शिक्षा आहे. याची जीभ छाटून टाकावी."

कमाल जे म्हणाला ते ऐकून बादशाहाचा चेहरा लाल झाला व रागामुळे त्याचे सर्वांग थरथर कापू लागले. तो कमालला म्हणाला–"तू जे खरे सांगितलेंस त्याहून फारूसने जे खोटे सांगितले ते मला जास्त आवडले. त्याने त्या गरिबाची कींव येऊन खोटे सांगितले. पण तू ईर्ष्या व द्वेषबुद्धीने सत्य सांगितलेस ते मला मुळीच आवडले नाही."

बादशाह म्हणाला ते ऐकून कमालला डोक्यावर वीज पडल्यासारखे झाले. तो मान खाली घालून दरबारातून अपराध्या सारखा निघून गेला आणि दुसऱ्या दिवशी ते राज्य सोडून निघून गेला.






पांडु राजा आपल्या दोघी राण्या, कुंती व माद्री यांच्यासह वनविहाराला जात असे. त्याला शिकारीचा नाद होता. एकदा पांडु राजाने एका हरणाच्या जोडीला ठार केले. खरोखरी ती हरिणांची जोडी नसून किंदम नावाचे एक ऋषी व ऋषी पत्नी हरणाचे रूप घेऊन विहार करीत होते. पांडु राजाला ती गोष्ट माहीत नव्हती. बाण लागल्याने विह्वल होऊन मरण समयी त्या ऋषीने पांडु राजाला शाप दिला की–"तू देखील आपल्या पत्नी बरोबर असाच कामसुख घेत असशील तेव्हां तुला अकाली मरण येईल."

पांडु राजाला, त्याच्या हातून नकळत घडलेल्या चुकीबद्दल फार दुःख वाटले. त्याला तो पर्यंत मूल बाळ काही नव्हते. पुढे देखील ऋषीचा शाप लागल्याने स्त्रीसंग करणे त्याला शक्य नव्हते. पांडु राजाने ती गोष्ट आपल्या दोघी राण्यांना सांगितली व म्हणाला–"आतां माझे जिणे फुकट आहे. मी सर्वसंग परित्याग करून संन्यास घेतो. तुम्ही दोघी हस्तिनापूरला जाऊन भीष्म, धृतराष्ट्र व विदुर यांना ही बातमी पोचती करा.

"आम्ही तुम्हांला सोडून राहणार नाही. आपण सर्वच मिळून तपश्चर्या करू या व इहलोकाचा निरोप मिळे पर्यंत स्वर्ग प्राप्ती-साठी झटू या." कुंती व माद्री दोघी पांडु राजाला म्हणाल्या. पांडुराजाने ही गोष्ट मान्य केली नाही तर तेथे रानातच देहत्याग



करण्याचा पण त्यांनी निश्चय केला. व तसे राजाला सांगितले पण.

पांडुराजा आपल्याबरोबर दोघां राण्यांना राहू देण्यास कबूल झाला. तिघांनी मूल्यवान वस्त्रांचा त्याग करून वल्कल वस्त्रे धारण केली. आपल्या सर्व नोकरांचाकरांना हस्तिनापूरला परत पाठविले. ते तिघे देशाटन करीत नागशत पर्वत, हिमवंत, गंधमादन, इंद्रद्युम्न, हृद, हंस कूट आदि प्रदेशात फिरत, काही काळ प्रत्येक जागी रहात शेवटी शतश्रृंग नांवाच्या पर्वतावर येऊन पोचले. तेथे अनेक मुनि तपश्चर्या करीत होते. पांडु राजाने सपत्नीक तेथे राहून तपश्चर्या सुरू केली.

तपश्चर्या करीत असतां पांडु राजाच्या मनात एक शंका आली, पुत्र प्राप्ती शिवाय मोक्ष प्राप्ती नाही. म्हणून त्याच्या सारखेच शूर, कुलवान व धर्म परायण अशा पुरुषांकडून त्याच्या पत्नींना पुत्र प्राप्ती झाल्यास त्याचा व कुळाचा उद्धार होऊ शकेल असा त्याने विचार केला. आपल्या मनातली गोष्ट तो प्रथम कुंतीजवळ बोलला. कुंतीला प्रथम ती गोष्ट मान्य झाली नाही. परंतु पांडु राजाने अनेक प्रकारे तिची समजूत घालून तिचे मन तयार केले.

कुंती पतीला म्हणाली–"मी तुम्हांला पूर्वी कधी सांगितले नाही, मला लहान पणी दुर्वासा ऋषींनी एक मंत्र शिकविला आहे. मी मंत्रजाप करून ज्या देवाचे स्मरण करीन तो प्रगट होऊन मला पुत्रप्राप्ती करून देईल. तेव्हां मी कोणत्या देवाचे स्मरण करावे हे तुम्हीच सांगावे."

"बरे तर छानच झाले. कौरव वंशाचा जो राजा होईल तो धर्मपरायण असला पाहिजे. म्हणून तू प्रथम यम धर्मदेवाचे स्मरण कर." पांडु राजा कुंतीला म्हणाला.

त्याप्रमाणे कुंतीने यमाचे स्मरण करताच तो प्रकट झाला. त्याच्या कृपेने कुंती गरोदर झाली. गांधारी तिच्या आधी एक वर्षापासून गरोदर होती. परंतु ती प्रसूत होण्यापूर्वीच कुंतीला मुलगा झाला. आश्रमवासी ऋषींनी त्याचे नाव युधिष्ठिर असे ठेवले.

त्यानंतर पांडु राजाने अति बलवान असा पुत्र असावा अशी इच्छा प्रकट केली. तेव्हां कुंतीने पांडुराजाच्या सल्ल्याप्रमाणे वायूचे स्मरण केले व त्याच्या कृपेने तिच्या पोटी भीमाचा जन्म झाला. भीमाचा जन्म झाला तेव्हां एक अघटित घडले. कुंती आपल्या मुलाला मांडीवर घेऊन बसली असता तिकडे एक वाघ आला. वाघाला पाहून कुंती भ्याली व पळून जायला उभी राहली. मांडीवर मुलगा होता ते ती विसरून गेली. म्हणून मुलगा एका दगडावर पडला परंतु आश्चर्य म्हणजे मुलाच्या अंगाला काही दुखापत झाली नाही, उलट तो दगडच फुटून गेला. वज्रदेही मुलाचे ते भयंकर वृत्त पाहून पांडूने त्या मुलाचे भीम हे नाव ठेवण्यात आले.

आपल्याला एक असाधारण असा पुत्र व्हावा अशी इच्छा पांडु राजाच्या मनात होती. ती इच्छा पूर्ण करण्यासाठी कुंतीने इंद्राचे स्मरण केले व त्याच्या कृपेने तिच्या पोटी अर्जुन जन्मला.





हस्तिनापूरला गांधारीच्या पोटी शंभर पुत्र जन्मले तर शतशृंग येथे कुंतीच्या पोटी तीन मुले जन्मली. पांडूची इच्छा होती की कुंतीला आणखी काही मुले व्हावीत. पण कुंती त्या गोष्टीस कबूल झाली नाही.

एके दिवशी माद्री पांडु राजाला येऊन म्हणाली—"कुंतीला मंत्रप्रभावाने पुत्र प्राप्ती झाली आहे. कुंती पेक्षा मी कोणत्या बाबतीत लहान आहे? मी तरी निपुत्रिक कां रहावे? मला कुंतीने तो मंत्र शिकविला तर पुत्र प्राप्ती होणार नाही का? आपण कुंतीला ही गोष्ट सांगून माझी इच्छा पुरी करावी."

पांडुराजाने माद्रीच्या मनातली इच्छा कुंतीजवळ प्रकट केली. कुंतीने तो मंत्र माद्रीला शिकविला. माद्रीने अश्विनी-कुमारांचे स्मरण करून तो मंत्र म्हटला. त्यांच्या कृपेने तिच्या पोटी नकुल आणि सहदेव ही जुळी मुले जन्मली.

त्या मंत्राच्या प्रभावाने माद्रीला आणखी मुले पण झाली असती. पण माद्रीने एकाच वेळी दोन देवांचे स्मरण केल्यामुळें एकाच वेळी तिला दोन मुले झाली या गोष्टीचा कुंतीला राग आला व तिने दुसऱ्या वेळी माद्रीला त्या मंत्राचा उपदेश करण्याचे नाकारले.

एकेक वर्षाच्या अंतराने पांडुराजाला अशाप्रकारे पांच मुलगे झाले. त्याला फार आनंद झाला. आश्रमातील ऋषी व मुनींनी सर्व प्रकारे त्या मुलांचे कोडकौतुक केले. वसुदेवाने आपल्या भाच्यांच्या साठी आपले पुरोहित कश्यप यांच्या हाती निरनिराळी वस्त्राभूषणे, खेळणी व इतर वस्तू पाठविल्या. पांडुराजाने यथावेळी आपल्या पांच ही मुलांचे उपनयन आदि संस्कार करवून त्यांना वेदविद्या शिक-विण्याची व्यवस्था केली.

आणखी काही वर्षे लोटली. वसंतऋतु सुरु झाल्यावर कुंती महाभोज देण्यासाठी



कामात गर्क होती. तेव्हां माद्री एकटी होती. तिला पाहून पांडुराजा स्वतःच्या मनाला आवरू शकला नाही. स्त्रीसंग केल्यास मरण येईल या ऋषीने दिलेल्या शापाचे त्याला विस्मरण झाले आणि त्याच्या हातून चूक घडलीच आणि तो तत्काल मरण पावला.

माद्री पतीच्या मृत देहावर पडून विलाप करीत असतां कुंती व शतशृंगमुनी तेथे आले. ते दृश्य पाहून व घडलेले वृत्त ऐकून सर्व चकित झाले. माद्रीने कुंतीला जवळ बोलावून पतीच्या मृत्यूचे खरे कारण सांगितले.

ते ऐकून कुंती विलाप करीत म्हणाली—"काय ग केलेस हे? घात केलास! महाराजांना ऋषींनी दिलेल्या शापाची गोष्ट तुला पण माहीत होती. मग तू इतकी असावध कशी काय राहलीस? आतां कोण काय करणार? मी मोठी पत्नी आहे म्हणून पतीच्या देहाबरोबर सहगमन करते. तू मुलांना सांभाळ!"

माद्री विलाप करीत म्हणाली—"मी स्वत: त्यांना वांचविण्याचा व त्यांच्यापासून दूर राहण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. परंतु मी पतीला वांचवू शकले नाही. आतां



मुलांचा सांभाळ करण्याची जबाबदारी कोणत्या तोंडाने आपल्यावर घेऊ? इह-लोकांत पतीला सुख देऊ शकले नाही तर निदान परलोकात तरी त्यांना सुखी करण्याचा प्रयत्न करीन. म्हणून मीच सहगमन करते." असे सांगून माद्रीने कुंतीचा निरोप घेतला व पतीच्या चितेत उडी टाकली.

त्यानंतर शतशृंग निवासी ऋषी कुंती व पांडवांना बरोबर घेऊन आणि माद्री व कुंतीच्या अस्थी घेऊन हस्तिनापूरला गेले आणि घडलेला शोकवृत्तांत भीष्म, धृत-राष्ट्रादिकास सांगितला.



पांडुराजाच्या मृत्यूची शोकवार्ता ऐकून भीष्म व धृतराष्ट्र यांना फार वाईट वाटले. धृतराष्ट्राच्या सूचनेवरून विदुराने अस्थि विसर्जन श्राद्धादी सर्व क्रियाकर्मांची व्यवस्था केली. पांडू व माद्रीच्या अस्थी पालखीत ठेवून त्यांची मिरवणूक काढण्यात आली व त्या गंगेत विसर्जित करण्यात आल्या. हस्तिनापुरची सारी प्रजा गंगाकाठी पोचली होती. सर्व संस्कार संपल्यावर लोक राजधानीत परतले.

सत्यवती व्यासमुनींच्या सल्ल्याप्रमाणे आपल्या सुना अंबा व अंबालिका यांना बरोबर घेऊन वानप्रस्थाश्रम ग्रहण करून तपश्चर्या करण्यास निघून गेली. वानप्रस्थाश्रमात असतांना त्यांनी इहलोकाची यात्रा समाप्त केली.

त्या दिवसापासून पांडव धृतराष्ट्राच्या देखदेखीखाली राहू लागले. सर्व मिळून खेळत व त्यांच्या आपसात चढाओढी पण होत. सर्व खेळात भीम प्रथम येई. तो आपल्या शक्तीचे प्रदर्शन करण्यासाठी दहादहा जणांना उचलून घेऊन पळत असे. मुलं रागावली तर त्यांच्या शेंड्या धरून त्यांना वर उचली. पोहतांना आठआठ दहादहा जणांना तो बुडवी. मुलं फळे तोडायला झाडावर चढली की ते झाड उपटून टाकी. मुलं खाली पडून जाण्याच्या भीतीने ओरडू लागली की तो खदाखदा हसे. परंतु तो हे सर्व खेळ म्हणून करीत असे. कोणाशी वैर किंवा दुष्टावा म्हणून करीत नसे. परंतु त्याचा खेळ म्हणजे इतरांना प्राणभय वाटे. भीमाची शक्ती पाहून दुर्योधन त्याच्याशी हेवा करी. भीमाला ठार केले तर इतर पांडव आपल्या म्हणण्याप्रमाणे वागू लागतील, असे देखील त्याला वाटे, त्याला तशी एक चांगली संधी पण मिळाली.

गंगानदीच्या काठी प्रमाण कोटी नामक एक सरोवर होते. तेथे पोहण्यासाठी व जलक्रीडेसाठी पाण्यात उतरायला पायऱ्या होत्या. उद्याने व विश्रांतिस्थाने पण सरोवराच्या काठी होती. एकदा सर्व राजकुमारांनी तेथे जाण्याचे ठरविले. वनभोजनासाठी निरनिराळे खाद्यपदार्थ व पेये घेऊन सर्व सरोवराच्या काठी गेले. अर्थातच बरोबर पांडव पण होते.

सर्वांनी वनभोजनासाठी आणलेले खाद्यपदार्थ खाल्ले. दुर्योधनाने भीमाजवळ बसून गोडगोड गप्पात त्याला रंगवून त्याच्या खाद्यपदार्थात विष घातले. भीमाला मुळीच शंका वाटली नाही. सर्वांबरोबर तो देखील पोहायला पाण्यात उतरला. पोटांत गेलेल्या विषामुळे त्याचे पोट दुखू लागले तेव्हां तो सुस्तावण्यासाठी बाहेर काठावर येऊन पडून राहला व त्याच स्थितीत तो बेशुद्ध झाला. भीम बेशुद्ध झालेला पाहून दुर्योधनाला फार आनंद झाला. त्याने काठावरच्या लता उपटून त्याचे हातपाय बांधले व त्याला पाण्यात टाकले. भीम बुडला तो पाताळात गेला. तेथे साप होते. साप त्याला चावले. त्यांचे विष चढले व पूर्वी पोटात गेलेल्या विषाला ते औषध ठरले. 'विषस्य विषं औषधम्' अशी एक म्हण पण आहे. तो शुद्धीवर आला तेव्हां आपले हात पाय बांधले असल्याचे त्याच्या लक्षात आले. त्याने झटके देऊन आपले हात पाय सोडवून घेतले व सापांना त्यांच्या मुंड्या पिळवटून ठार करू लागला.

ती गोष्ट नागराज वासुकीला कळली. भीम आपल्याच नात्यातला आहे हे ओळखून त्याने त्याच्या अंगात सहस्र हत्तींचे बळ येईल असा एक रस त्याला प्यायला दिला. तो रस आठ मडकी भरून होता. भीम तो सर्व रस गटागटां पिऊन आरामात घोरत पडला.





# गांधीचे चरित्र

[६]

आम्ही 'नको नको' म्हणत असता भारतीय दक्षिण आफ्रिकेत येऊन तेथे राहू लागले आणि कष्ट सहन करीत आहेत, असे काही युरोपीय नागरिक सांगत. पण ते सर्व खोटे होते. दक्षिण आफ्रिका यूरोपीय लोकांचा एक उपनिवेश झाला तेव्हां तेथील सुपीक जमीनीत कॉफी, चहा व ऊस वगैरेची लागवड करून पुष्कळ फायदा मिळू शकेल असे त्यांना वाटले. पण मळ्यात काम करायला मजूर नव्हते. गुलामीची पद्धत बंद झाल्यानंतर नीग्रो लोकांनी काम करण्याचे नाकारले. तेव्हां नाताळमधील गोऱ्यांनी भारतातून मजूर पाठवावे अशी येथील सरकारकडे विनंती केली. त्यांचे प्रतिनिधी मद्रास व बंगाल मध्ये फिरले व निरनिराळ्या प्रकारे लोभ व मोह दाखवून मजूर भर्ती करून घेऊन गेले. १८८०पर्यंत नाताळ राज्यात ४०,००० भारतीय गोऱ्या लोकांच्या हाताखाली काम करीत होते. त्यांच्याकडून बेगारांसारखे काम करून घेतले जाई. त्यांच्या पैकी काही जणांनी स्वतःवरचे अवधीचे बंधन संपल्यानंतर तेथेच कायमचे राहण्याचे ठरविले. थोडीशी जमीन विकत घेऊन भाजीपाला लावून पैसे मिळवू लागले. त्यांची मुलेबाळे शिकू लागली. ते पाहून गोऱ्यांना त्यांचा हेवा वाटू लागला.

सन् १८९३ मध्ये नाताळ मध्ये डोमीनियन सरकार कायम झाले. लगेच गोऱ्या लोकांनी भारतीय लोकांना नाताळ मधून हाकलून लावण्याचा प्रयत्न सुरु केला. जे भारतीय नाताळ सोडून जायला तयार होत नव्हते त्यांच्यावर पोल टॅक्स चार पाच महिने मिळणाऱ्या मजुरी इतका होता.



# शेवटी ठरले काय

एका गावी रामू नाईक नावाचा एक इनामदार रहात असे. त्याच्याकडे पन्नास गाई होत्या. रामू स्वभावाने थोडा चिक्कूच होता. म्हणून त्याने गुराखी किंवा जांगळी नेमला नाही. स्वत:च दुध काढी किंवा गुरे चरायला रानात घेऊन जाई.

पुढे हे सर्व काम करणे त्याला झेपेना. तेव्हां त्याने गुरे विकून टाकून व्यापार करावा असे ठरविले. गाई विकून टाकण्या-साठी तो बाजार पेठेकडे निघाला.

वाटेत एक मोठे जंगल होते. चोरांनी रामूला स्वत: गाईंना घेऊन जातांना पाहिले. त्यांनी त्याला एका झाडाला बांधून ठेवले आणि गाईना हांकून घेऊन गेले. चोर निघून गेल्यावर रामू मोठमोठ्याने ओरडू लागला.

चोरांनी रामूला ज्या झाडाला बांधून ठेवले होते त्या झाडाच्या पोकळीत एक देव रहात होता. देवाला रामूची दया आली. त्याने बाहेर येऊन रामूला सोडले आणि म्हणाला–"हे पहा रे! तू काळजी करू नकोस. त्या पन्नास गाईच्या बद्दल मी तुला पन्नास गाई देतो. तू त्यांना घेऊन जा." असे सांगून त्या देवाने बोटातली अंगठी काढून डोळ्याला लावली. त्या बरोबर पन्नास गाई दिसू लागल्या. तू या गाईंना बाजारात घेऊन जाऊन विकून टाक." देवाने रामूला धीर दिला.

रामूला ते सर्व दृश्य पाहून आश्चर्यच वाटले. त्याने गाईंना हात लावून पाहिला. सर्व गाई खऱ्या हृष्टपुष्ट गाईच होत्या. तो देवाला म्हणाला–"देवा! बाजारपेठ फार दूर आहे रे. मी चोरांच्या हातात सांपडल्या-शिवाय या गाईंना बाजारपेठेपर्यंत सुरक्षित पोंचेन का? आणि पोचलो तरी गाईना

श्री. मा. ना. जाधव

"श्रीमंत माणसाविषयी आपले काय मत आहे, गुरुदेव!" राजाने विचारले.

"त्याच्यात माणुसकीचा लवलेशही नाही." राजगुरु म्हणाले.

एकदा दरबारात दोन व्यापारी आले. त्यांची स्थिती फार दयाजनक होती. ते आपल्या बरोबर मूल्यवान वस्तू घेऊन प्रवास करीत होते. वाटेत डाकू व लुटेऱ्यांनी त्यांना लुटले आणि त्यांना ठार करण्यासाठी तलवारी उपसल्या. तेव्हां त्यांचा सरदार आपल्या अनुयायांना म्हणाला–"तुम्ही मूर्ख दिसता! अशा लोकांना आपण ठार करू लागलो तर आपण लुटणार कोणाला?" असे सांगून त्याने व्यापाऱ्यांना प्रत्येकी दोन दोन रुपये त्यांच्या वाटखर्चाला देऊन पाठवून दिले.

"चोरांच्या सरदारात पाऊण माणुसकी आहे. त्याचा धंदा त्याच्यात पुरी माणुसकी येण्यास बाधक आहे." राजगुरु म्हणाले.

एकदा राजाचा शिपाई दोघां जणांना दरबारात घेऊन आला. त्यां पैकी एक गरीब होता व एक श्रीमंत. शिपाई राजाला म्हणाला–"महाराज! या श्रीमंताने गरीब माणसाला पाण्यात ढकलले. मी स्वत: डोळ्यांनी ते पाहिले. मी जवळ जाऊन पाहतो तो दोघे काठावर येऊन पोचले होते."



"तू त्या गरिबाला पाण्यात कां रे ढकललेस?" राजाने त्या श्रीमंत माणसास विचारले.

तो श्रीमंत मनुष्य म्हणाला–"महाराज, मी या गरीब माणसावर अनेक अन्याय केले आहेत. हा मनुष्य आमचा शेजारी आहे. गरीब आहे. म्हणून मी याची जागा बळकावली. हा माझ्या दुष्टपणाच्या चव्हाट्या सर्व जगभर सांगत सुटला. माझी अब्रू याने चव्हाटयावर आणली यासाठी मी सूड बुद्धीन याच्या घराला आग लावली. नंतर चवकशी झाली तेव्हा याच्या हलगर्जीपणामुळे घराला आग लागली असे मी चार लोकां-करवी सांगवून सिद्ध केले. त्याला पुन्हा घर बांधणे शक्य झाले नाही. आज नदीकाठी तो मला भेटला व म्हणाला–"तुझ्यामुळे माझे हे सर्व वाटोळे झाले." ते ऐकून रागाने मी त्याला पाण्यात ढकलले. त्याने त्यावेळी माझा हात धरला होता, म्हणून मी देखील पाण्यात पडलो. मला पोहता येत नव्हते म्हणून मी बुडू लागलो तेव्हां याने मला वांचविले आणि आम्ही दोघे काठावर आलो."

राजगुरूच्या सल्ल्याप्रमाणे राजाने गरिबाची सर्व नुकसान भरपाई श्रीमंताकडून करवून दिली व दोघांना निरोप दिला

त्यानंतर राजगुरु राजाला म्हणाला–"पाहिलेत महाराज! ह्या गरीब मनुष्यात पुरी माणुसकी म्हणजे पूर्ण मानवत्व आहे. म्हणूनच तो त्या श्रीमंताच्या स्वभावात बदल करू शकला. नाहीतर त्याने स्वतःच्या तोंडाने आपल्या दुष्कृत्यांचे वर्णन करून आपला अपराध स्वीकारला नसता. पुरी माणुसकी असल्या शिवाय दुसऱ्याच्या स्वभावात बदल आणणे शक्य नाही."

राजगुरूच्या उदाहरणसहित या प्रत्यक्ष शिकवणीमुळे राजाला माणुसकी म्हणजे काय, याची पुरी कल्पना आली.



विकून जे पैसे मिळतील ते घेऊन मी सुखरूप घरी येऊ शकेन का? काय करावे मला समजत नाही."

"तरमग तू या गाईंची काय किंमत आहे हे मला सांग मी ती किंमत देऊन टाकतो." देव म्हणाला.

"प्रत्येक गाईची किंमत शंभर या प्रमाणे पन्नास गाईंची किंमत पांच हजार होते." रामू म्हणाला.

देवाने पुन्हां आपली अंगठी डोळ्याला लावली आणि त्याबरोबर पांच हजार रुपयांची एक थैली रामूच्या समोर येऊन पडली. "ही पिशवी जड तर नसेल ना? घरापर्यंत मला ही नेता येईल का? कृपा करून एक गाय दे. गाईच्या पाठीवर ठेवून घेऊन जातो." रामूने देवाजवळ विनंती केली. देवाने ती मान्य केली.

गाईच्या पाठीवर थैली ठेवून निघतांना रामूने आशेने इतर गाईकडे पाहिले. त्या सर्व गाईंना सोडून जाणे त्याला आवडेना. म्हणून तो देवाला म्हणाला–"मी या गाईंना घेऊन घरी गेलो तर देवा, तुला काही हरकत आहे का? कारण या गाई तू मला पूर्वी दिल्याच होत्यास, नाही का?"

"तुला पाहिजे असतील तर घेऊन जा." देव रामूला म्हणाला.

